# 'संयुक्त युरोप'कडे वाटचाल




सन १९५७ मध्ये युरोपातील काही देश 'युरोपिअन इकॉनॉमिक कम्यूनिटी' (ई.ई.सी.) नावाने एकत्र आले. गेली ३५ वर्षे 'कॉमन मार्केट' नावाने ही यांना ओळखले जाते. आता या संघाने या वर्षारंभी आणखी एक सुबोध नाव ग्रहण केले आहे- 'युरोपिअन कम्यूनिटी' (ई.सी.). आता या संघातील १२ देश असा प्रयत्न करीत आहेत की एक अधिक अर्थपूर्ण नावाने ते ओळखले जावेत-'युरोपिअन यूनियन' (ई.यू.)

सुरुवातीला या 'आर्थिक संघांत' सहा देश होते-बेल्जियम, फ्रांस, इटली, लक्झेंबर्ग, नेदरलँड्स् व पश्चिम जर्मनी. सन् १९७३ मध्ये या ई.ई.सी.त आणखी ६ देश सामिल झाले. ते देश म्हणजे-

डेन्मार्क, आयर्लंड; ग्रीस, स्पेन, पोर्तुगॉल व इंग्लंड.

डिसेंबर १९९१ मध्ये या बारा देशांचे विदेश-मंत्री नेदरलँड्स मधील मॉस्ट्रिक्ट येथे एकत्र आले व त्यांनी 'युरोपियन यूनियन ट्रीटी' नावाच्या समझौत्यावर विचार केला. दोन महिन्यांनंतर या देशांच्या नेत्यांनी यां समझौत्याला स्वीकृति द्यावी असे ही ठरले. या तहाला 'मॉस्ट्रिक्ट ट्रीटी' असे नाव देण्यात आले.

हा तह स्वीकृत करण्यामागे काही उद्देश अवश्य आहेत. विशेष म्हणजे सोवियत संघ विघटित झाल्यामुळे जगांतील दोन महान शक्ति अमेरिका व सोव्हियत रशिया यांच्यामधील 'शीत युद्ध' आता संपुष्टात आले. आता सर्व जगात सर्वशक्तिमान एकच देश राहिला-अमेरिका! म्हणून या देशासमोर आपला टिकाव लागावा यासाठी एक तुल्यबल शक्ति एकत्रित होण्याची आवश्यकता सर्वांनी ओळखली.

या तहाचा प्रमुख अंश आहे-यूनियन देशांतील लोकांना सर्वत्र सहज संचार करता यावा आणि व्यापारी मालाची आयात-निर्यात करता यावी. यासाठी आंतरिक सरहद्दी हटवल्या पाहिजेत. या देशांमध्ये माल, सेवा, प्रजा, भांडवल इत्यादींची देवाण-घेवाण स्वतंत्रतापूर्वक होणे आवश्यक आहे. १ जानेवारी १९९३ रोजी या तहाची अंमल-बजावणी सुरू होईल. नंतर एक वर्षाने 'युरोपियन मॉनिटरी इन्स्टिट्यूट' (युरोपीय अर्थ-संस्था) स्थापित होईल. परिणामस्वरूप सन १९९७ मध्ये 'युरोपियन सेंट्रल बँके'ची स्थापना केली जाईल. नंतर या शतकाच्या शेवटी 'संयुक्त युरोपीय मुद्रा' (कॉमन युरोपियन करन्सी) प्रचारात येईल. या तहामुळे शिक्षण, संस्कृति, जन-आरोग्य, उद्योग, उपभोक्ता-संरक्षण, पर्यावरण, परिवहन, दूर-संचार आणि संयुक्त विदेश-नीति या क्षेत्रात एक 'बृहत् युरोप' निर्माण होईल. संयुक्त युरोपीय पार्लमेंट ही बनेल. १९० पृष्ठांचा हा समझोता 'युनायटेड स्टेट्स् ऑफ युरप'चा एक आराखडाच म्हटला पाहिजे.

हा दस्तावेज जेव्हा अनुमोदनासाठी सर्व देशांकडे पाठविला गेला तेव्हा डेन्मार्कने तो स्वीकारला नाही. ग्रीक पार्लमेंटने चांगल्या मताधिक्याने त्याला मान्यता दिली. फ्रान्सने शेंकडा ५१ टक्के मतांनी तो मान्य केला. लक्झेंबर्ग व नेदरलँड्स् यांनी याचे समर्थन केले. आणि उर्वरित सात देश या वर्ष अखेरीस आपला निर्णय जाहिर करतील असे दिसते.

**ऑस्ट्रेलिया सोडला तर युरोप हे फार छोटे महाद्वीप आहे. भौगोलिक दृष्टीने हे आशिया महाद्वीपाला जोडलेले आहे आणि या दोन महाद्वीपांची विशेषता सर्वात प्रथम असीरियन लोकांनी स्पष्ट केली-त्यांनी आशियाला 'उगवता सूर्य' व युरोपला 'मावळता सूर्य' संबोधलं!**



# सुखाचा मूल-मंत्र

शिवा पाच वर्षांचा असतानाच त्याचे आई-वडील वारले. रामदास नावाच्या एका माणसाने पोरक्या शिवाला आपल्या घरी ठेवून त्याचे पालन पोषण केले. लहानपणापासून शिवा आळशी होता. त्याने शाळेचे तोंड देखील पाहिले नाही. त्याला कुठलं ही काम करता येत नसे. अशा स्थितीत तो आता १६ वर्षांचा झाला.

एके दिवशी रामदासने शिवाला बोलवून म्हटले-"अरे शिवा, तू हा असा आळशी! लोक माझ्याकडे बोट दाखवून म्हणतील यात चूक माझीच आहे. मी आता म्हातारा झालो. आजपासून तू सकाळी-संध्याकाळी झाडांना पाणी घालत जा. तरच तुला जेवण मिळेल."

रामदासचं परसू खूप ऐसपैस होतं. तिथे मोठी बाग होती. सगळ्या झाडांना पाणी द्यायला सकाळ-संध्याकाळ दोन-दोन तास खपावं लागे. शिवाला हे काम करणं फार तापदायक वाटू लागलं.

सर्व झाडांना पाणी दिल्यावरच शिवाला भोजन मिळू लागले. आता शिवा विचार करू लागला की झाडांना पाणी मिळावं नि आपल्याला त्रास होऊ नये असं कसं काय जमेल? गावाबाहेर एका लेण्यात रहात असलेल्या साधूकडे तो गेला.

शिवाचं सगळं बोलणं ऐकून साधु म्हणाला-"तू काही न करता बागेला पाणी मिळावं यासाठी पाऊस पडला पाहिजे. आणि तुला वाटेल तेव्हा पाऊस पडावा यासाठी तुला योगसाधना केली पाहिजे. इथून ईशान्येला एक जंगल आहे.



तिथे एका वडाच्या झाडाला तू आपल्याला उलटं टांगून घे आणि सहा महिने तपश्चर्या कर. मग तुला काही सिद्धि प्राप्त होईल.

शिवा लगेच तेथून ईशान्येकडील जंगलात गेला. जंगलात थोडे अंतर चालून गेल्यावर एका झाडाला उलटा लटकलेला एक माणूस त्याला दिसला. शिवा त्याच्याजवळ गेला नि नम्रपणे त्याला म्हणाला-'' मी पण तुझ्याच प्रमाणे स्वतःला उलटा टांगून घेतो. आपण दोघे ही बरोबरच तपश्चर्या करू आणि सिद्धि मिळवूं.''

तो माणूस चिडून शिवाला म्हणाला-''तपश्चर्या करायची? अन् सिद्धि मिळवायची? मला तर काही भिल्लांनी इथं असं टांगून ठेवलंय!''

शिवाने त्याला सोडवलं. त्याला समजलं की हा एक चोर आहे. साधूने सांगितलेल्या गोष्टी त्याने चोराला ऐकवल्या नि म्हणाला-''प्राण संकटात घालून चोऱ्या करीत बसण्यापेक्षा तू सहा महिने असा लोंबत राहून सिद्धि का नाही प्राप्त करून घेत?''

चोर शिवाला म्हणाला-''चोरी करताना मी पकडला गेलो म्हणून मला असं टांगून ठेवण्यात आलं. तुझी इच्छा असेल तर मी तुला या झाडाला उलटा टांगून ठेवतो. नाही तर माझ्या बरोबर चल, मी तुला चोरी करायची कला शिकवतो. तुझ्या तपश्चर्येपेक्षा मला आपल्या चोऱ्याच बऱ्या वाटतात. आणि मला तुझ्यासारखा साथी मिळाला तर संकटकाळी आपण एकमेकांना मदत ही करू.''

शिवाला चोराचं बोलणं पटलं. तो चोराबरोबर निघाला. त्या रात्री चोराने शिवाला तेल लावून छान मॉलिश केले नि त्याला न्हाऊ घातले. त्याच्या अंगाला काळा रंग फासला. चोराने स्वतः आपल्या अंगाला काळा रंग लावला, आणि दोघे जण चोरी करायला निघाले.



दोघे जेव्हा गावात पोचले, तेव्हा एका मोठ्या इमारतीकडे बोट दाखवीत शिवा चोराला म्हणाला-''या हवेलीत आपण चोरी केली तर खूप पैसा मिळेल!''

चोर आपली नापसंती दर्शवीत म्हणाला-''असल्या घरात पहारेकरी नि शिकारी कुत्रे असतात. पैसे कमी मिळाले तरी हरकत नाही, पण लहान घरात चोरी करणंच चांगलं!''

एका घरात त्यांना दोनशे अशर्फ्या मिळाल्या. आनंदाने शिवा म्हणाला-''हे पैसे आपण दोघांनी वाटून घेतले तर निदान एक महिनाभर पुन्हा चोरी करायला नको!''

नकारात्मक डोके हलवीत चोर म्हणाला-''ज्या घरात पहारेकरी नसतो, त्याबाबत सूचना देणारा एक आमचा माणूस आहे. त्याला यापैकी ५० अशर्फ्या द्याव्या लागतील. या घरात चोरी करण्यासाठी चोरांच्या ज्या सरदाराने मला परवानगी दिली त्याला ५० अशर्फ्या द्याव्या लागतील. या गल्लीच्या पोलिस पहारेकऱ्याने आपल्याला न पाहिल्याचं नाटक केलं, त्याबद्दल त्याला ५० अशर्फ्या. आता शिल्लक राहतील त्या आपण निम्म्या-निम्म्या वाटून घेऊ. आपल्या प्राप्तीतील दहा-दहा अशर्फ्या काली मातेच्या मंदिरातील हुंडीत टाकणे



जरूर आहे. अशा रीतीने आपल्या पैकी प्रत्येकाला पंधरा अशर्फ्या शिल्लक राहतील.''

शिवाला एवढ्यावर ही संतोष होता. पण घरी परत आल्यावर आपल्या अंगाला लावलेलं तेल आणि काळा रंग धुवून काढण्यासाठी त्याला कमीत कमी दोन तास मेहनत करावी लागली. चोरी करून आल्यावर प्रत्येक वेळी ही अशी मेहनत करणं त्याला परवडणारं नव्हतं, काही ही काम न करता गल्लीच्या एका टोका-वर पडून राहून चोराकडून लाच उकळणाऱ्या पोलिस पहारेकऱ्याचं जीवन शिवाला छान वाटलं.



म्हणून दुसऱ्या दिवशी शिवा त्या पहारेकऱ्याकडे गेला आणि आपल्याला अशी नोकरी मिळवून देण्याबाबत त्याच्याशी बोलणे केले. तेव्हा तो पहारेकरी म्हणाला-"मी कोतवालाच्या घरातली कामं करतो. म्हणूनच तो मला न धमकावता ही अशी वरकड कमाई करू देतो. अशी वरची कमाई मला चांगलीच होते. तू जर कोतवालाच्या घरची कामं करायला तयार असशील तर मी तुला दरमहा दोनशे अशर्फ्या देऊ शकेन! बोल, आहे तयारी तुझी?"

"ही असली घरची कामं करायचं आपल्याला नाही जमायचं बाबा! मी स्वतःच कोतवाल बनेन. यासाठी मी काय करावं ते मला सांग." शिवाने पहारेकऱ्याला विचारलं.

पहारेकऱ्याने सल्ला दिला-"तुला जर कोतवाल बनायची इच्छा असेल, तर या गावातील शिक्षक चंद्रप्रकाशकडे जा. तो तुला मदत करील."

शिवा लगेच चंद्रप्रकाशकडे गेला. तिथं त्याचे दोनशे शिष्य होते. शिवाची इच्छा जाणून चंद्रप्रकाश म्हणाला- "कोतवालाचं काम असतं चोरांना पकडणं. यासाठी ताकत, चलाखी नि चपळपणा पाहिजे. यासाठी दोन वर्षं रात्रंदिवस चिकाटीने माझ्याकडून शिक्षण घ्यावं लागेल. तेव्हा कुठं तुला कोतवाल अथवा त्यासारखी एकादी नोकरी मिळू शकेल."

हे सर्व ऐकून शिवा म्हणाला-"इतकी मेहनत करणं नाही बुवा आपल्याला जमायचं. म्हणून तुमचा विद्यार्थी होणं मला शक्य नाही. माझी तुमच्यासारखा शिक्षक व्हायची इच्छा असेल तर मी काय करावं?"

"शिक्षक होण्यासाठी तुला मोठ्या श्रद्धेने परिश्रमपूर्वक चार वर्षे विद्याध्ययन केले पाहिजे." चन्द्रप्रकाशने सांगितले.

शिवाने अमळ विचार केला. मग चन्द्रप्रकाशला विनम्रपणे नमस्कार करीत



त्याने प्रश्न केला-"गुरुजी, आपण तर खूप शिकलेले आहात. आपण पुष्कळ जग पाहिलं आहे. कृपा करून मला असं सांगा की श्रम न करता पैसा कसा मिळवता येईल?"

चन्द्रप्रकाशला शिवाबद्दल सहानुभूति वाटली. तो म्हणाला-"तुझी इच्छा न्याय्य नाही हे खरं, तरी पण मी एक उपाय सुचवतो. या गावात सोमनाथ नावाचा एक श्रीमंत माणूस राहतो. त्याच्या जवळ बसून रोज सकाळ-संध्याकाळ दोन तास त्याला गोष्टी ऐकवल्यास तर तुला रोज पाच अशर्फ्या मिळतील!"

शिवा हे ऐकून सोमनाथकडे गेला. सोमनाथ खूप लठ्ठ माणूस होता. एका मोठ्या कॉटवर आळसाने सुस्तावला होता. शिवाच्या गोष्टी त्याला आवडल्या. शिवाला पण आपली ही नोकरी आवडली.

एक दिवशी शिवा सोमनाथला म्हणाला-"तुमच्यापाशी राहणं मला फार आवडलं. जन्मभर तुमच्याच सेवेत राहावं असं मला वाटतं!" हे सांगताना शिवाच्या चेहऱ्यावर स्पष्ट संतोष दिसत होता.

सोमनाथ मंद-स्मित करीत म्हणाला-"तुझ्या गोष्टी तर मला आवडतात. पण असं किती दिवस चालणार?"



"का? आपल्याकडे पैशांची टंचाई आहे का?" शिवाने प्रश्न केला.

पुन्हा हसून सोमनाथ म्हणाला-"हे बघ, घरात बसून पाच पिढ्या खात राहिलो तरी संपणार नाही इतकी संपत्ति माझ्या जवळ आहे. पैशांची टंचाई मला कधीच जाणवणार नाही. पण लहानपणापासून आळशीपणे बसून राहिल्यामुळे मी असा लठ्ठ झालो आहे. माझं शरीर मलाच जड झालंय! वजन कमी करण्यासाठी मी उपास केले. भूक विसरण्यासाठी मी तुझ्या या गोष्टी ऐकत असतो. वैद्य औषधे देत असतो, पण वजन कमी होईपर्यंत औषधांचा काही उपयोग

होत नाही. थोडं वजन कमी झालं की वैद्य नवी औषधे देणार आहे. मग मला तुझ्या गोष्टी ऐकायला फुरसत होणार नाही."

शिवाने भोळेपणाने विचारले-"का बरं?"

सोमनाथने प्रश्नाचे उत्तर दिले-"सध्या मी कॉटवरून उठू शकत नाही. वजन कमी झाले म्हणजे थोडी हालचाल करीन. मग मला रोज सकाळी-संध्याकाळी परसातल्या झाडांना पाणी द्यायला लागेल. ही एक नवी उपचार-पद्धति आहे. या वैद्याच्या औषधाने एक-दोन आठवड्यात मी चांगला होईन. वैद्याने मला सांगितले आहे की जोपर्यंत मी झाडांना पाणी देण्याचे काम करीत राहीन, तोपर्यंत माझी तब्येत चांगली राहील."

शिवाला हे ऐकून आश्चर्य वाटलं. सहजपणे तो बोलून गेला-"अरे बापरे! दोनदा झाडांना पाणी घालायचं! काय तापदायक काम हे!"

"अशी मेहनत न करण्यामुळेच मला असं रात्रंदिवस कॉटवर पडून रहावं लागलं. प्रकृति ठीक राहिली नाही. कुतांगळू बनून अस्वस्थ राहण्यापेक्षा शरीर-श्रम करून तब्येत चांगली ठेवणं अधिक सुखाचं नाही का? बरोबर म्हणतो आहे की नाही मी?" शिवाकडे पहात सोमनाथने विचारले.

आता कुठे शिवाच्या मनात ज्ञानोदय झाला. सोमनाथला आवश्यकता होती तोपर्यंत तो तेथे राहिला, मग आपले पालन-पोषण करणाऱ्या पित्याकडे-रामदासकडे तो परत आला. जे काम आपल्या वाट्याला येईल तो ते खुशीने करू लागला. अशा रीतीने आता सर्व जण त्याच्यावर प्रेम करू लागले. शिवाला सुखाचा मूल मंत्र गवसला. तो सुखाने जीवन जगू लागला.





# माया महाल

## ८

(महेन्द्रनाथ राजकुमारी विद्यावतीच्या शोधार्थ जंगलात शिरला. तेथे त्याला एक सन्यासी भेटला. त्याने महेन्द्रला एक मंतरलेली अंगठी दिली. तेथून पुढे गेल्यावर त्याला डोंगरावर बांधलेला एक महाल दिसला. महालाच्या द्वारपालाने महेन्द्रला एक रात्र तेथे रहाण्याची परवानगी दिली.—त्यानंतर)

त्या रात्री महेन्द्रनाथच्या मनात अनेक विचार येऊ लागले; त्याला झोप येईना. अचानक त्याला संन्याशाने दिलेल्या अंगठीची आठवण झाली, अन् त्याने हळूच अंगठीला स्पर्श केला. अशा प्रकारे पहाता पहाता अर्धी रात्र उलटली अणि मग त्याला झोप लागली. तो जागा झाला तेंव्हा सूर्योदयाची वेळ झाली होती. भोवताली सर्वत्र बरीच गडबड व हालचाल सुरू झालेली त्याला आढळली. इतक्यात द्वारपाल न्याहारीच्या दोन थाळ्या घेऊन आला. दोघांनीही हातपाय धुवून, दात वगैरे घासून न्याहारी केली. खाणे संपल्यावर हात धुताना महेन्द्रने विचारले, "तुमचे मालक परत आलेत ना?"



द्वारपालाने आश्चर्याने विचारले, "अरे! तुला कसं कळलं?"

"मला रात्री बराच वेळ झोपच नाही आली! दाराची कडी ठोठावल्याचा आवाज ऐकू आला रात्री. अन् सकाळी-सकाळीच सगळीकडे कामाची खूप गडबड दिसू लागली. त्यामुळे मी सहजच ओळखलं की रात्री तुमचे मालकच आले असावेत. काय? बरोबर ओळखलं ना मी?"

द्वारपालाने नुसतीच होकारात्मक मान हलवली. महेन्द्र पुढे म्हणाला, "आता माझं इथे रहाणं तुला त्रासदायक होईल कदाचित्. मी इथून आता निघून जाणंच बरं. होय ना?"

"मालक आलेत हे तर खरंच. पण ते या बाजूला कधी येत नाहीत. त्यामुळे तुला घाबरायचं काहीच कारण नाही. तुझ्या मनात असलं तर तू चार-दोन दिवस इथे राहून आराम करू शकतोस. नंतर कर तुझा प्रवास पुढे सुरू! हां, अन् त्या अवधीत, तुला इथंच काही काम मिळवून देता येईल का, याचा मी प्रयत्न करीन." द्वारपाल सहजपणे म्हणाला.

महेन्द्रला काय-'आंधळा मागतो एक डोळा, अन देव देतो दोन.' अशीच अवस्था झाली! पण चेहऱ्यावर तसे दिसू न देता तो म्हणाला, "तू मदतीचा हात देतोयस मला! नोकरी देशील तर राहीन इथेच मी! नाहीतर अद्याच मी आपलं चंबूगबाळं बांधून टाकीन. तुला उगीच त्रास नको."

"ते सारं तू आता माझ्यावर सोड अन् भरपूर विश्रान्ती घे. तुला पुरेशी झोपही नाही मिळाली ना? संधी पाहून मी मालकांशी बोलणं करीन तुझ्यासाठी, अन् तुझ्या नोकरीचं पक्कं करून टाकीन; आता नसते विचार करत बसू नकोस." इतके बोलून द्वारपाल तेथून निघून गेला.

महेन्द्रनाथ त्याच खोलीत बसून, खिडकीतून बाहेरचे निरीक्षण करू लागला. बाहेरचे वातावरण पाहून त्याच्या मनात एक अजब कल्पना डोकावली. 'नोकर तर सगळे मोठ्या उत्साहाने आपापली कामे करत आहेत. आपणही जर त्यांच्यात मिसळून गेलो, तर हा महाल चोहोकडून नीट पहाता येईल. अन् मग महालात नव्याने आलेली खास पाहुणी कोण, हे पहाणेही सोपे होईल.' महेन्द्रने ताबडतोब एक कपडा साफ्यासारखा आपल्या डोक्याला गुंडाळला आणि मुकाट्याने तो तेथे काम करणाऱ्या लोकात जाऊन मिसळला. ते सगळेजण आपापल्या कामात मग्न होते. त्यामुळे त्याचे नवे अस्तित्व कोणाला जाणवलेही नाही.

नोकर आपापल्या कामात दंग होते. महेन्द्रने सर्व खोल्यात डोकावून पाहिले, ठिकठिकाणी त्याला आरसे दिसले

अशा प्रकारे महेन्द्रनाथने थोडा वेळ खोल्या पाहून घेतल्या आणि एका बाजूला त्याला एक लहानशी वाट दिसली, तेंव्हा तो तिकडे वळला. तेथून तो ज्या खोलीशी पोचला, तिचा दरवाजा थोडासा उघडा होता. तो उघडून महेन्द्र आत शिरला. तेथेही सर्वत्र मोठाले आरसे लावलेले होते. एका बाजूला देवीची एक देखणी मूर्ती त्याला दिसली. मूर्तीजवळ एक रेशमी जाजम अंथरलेले असून त्यावर तीन वृद्ध पंडित बसलेले होते. त्या तिघांनीही भगवी वस्त्रे धारण केलेली होती. त्यातले दोघे काही जुनी ताडपत्रे वाचून पहात होते आणि तिसरा जमिनीवर काढलेल्या





काही अुभ्या आडव्या रेषा तपासून पहात होता. दरवाजा अुघडून आत आलेल्या महेन्द्रला पहाताच एका पंडिताने त्याला विचारले, "कोण आहेस तू? आत का आलास?"

"खोली साफ करायला आलो होतो मालक! आपल्याला माझ्या येण्याने त्रास झाला असला, तर क्षमा असावी. मी नंतर येअून साफ करीन ही खोली." वाकून नमस्कार करत महेन्द्र अुत्तरला आणि एक पाअूल मागे सरकला.

"ही खोली तर स्वच्छच आहे की चांगली! आणखी काही करायची जरूर नाही. जा तू." तो म्हातारा पंडित बोलला.

"ठीक आहे मालक!" असे म्हणत पुन्हा एकवार वाकून नमस्कार करून महेन्द्र खोलीबाहेर आला.

तेथून महेन्द्र भरकन द्वारपालाच्या खोलीकडेच गेला. थोड्या वेळाने द्वारपाल परत आला व त्याने महेन्द्रला विचारले, "काय झाली का चांगली विश्रान्ती?"

"हो तर! इथे नोकर इकडे तिकडे काम करत होते ना? ते बघत बसलो होतो आरामात. वेळ कसा गेला कळालंच नाही. आपले मालक भेटले तुला?" महेन्द्रने विचारले.

"यावेळी मालक एकटेच नाही आले. तीन वृद्ध माणसं बरोबर घेअून आलेत ते. बहुधा ज्योतिषी असावेत ते. त्यांच्याचबरोबर दुपारचं जेवण करून मालक आत्ता आपल्या खोलीत विश्रान्तीला गेलेत. त्यामुळे त्यांना भेटायची संधी मिळाली नाही मला. संध्याकाळी या अुद्यानात येतील ना तेंव्हाच बोलणं शक्य होईल आता." असे म्हणून द्वारपाल तेथेच आडवा होअून झोपून गेला.

महेन्द्रनाथ खिडकीशी जाअून बाहेर पाहू लागला. स्नानाच्या थोडा वेळ अगोदर एक माणूस अुद्यानाकडे येत असलेला त्याने पाहिला. त्याने लांब अंगरखा घातलेला होता. त्याचे केस



लांब-लांब होते, पण दाढी मात्र छोटीशीच होती. त्याचा चेहरा नीटसा दिसू शकला नाही महेन्द्रला. त्याच्या चालीत राजाचा रुबाब होता! तोच मालक असावा, हे कळायला महेन्द्रला मुळीच वेळ लागला नाही. त्याने एकदोनदा द्वारपालाच्या खोलीकडे पाहिल्याचे महेन्द्रच्या लक्षात आले. त्याने ताबडतोब द्वारपालाला जागे करून म्हटले, "दोस्ता! तुझा मालक अुद्यानात आलाय. बहुधा तुझीच वाट पहात असावेत ते."

एकदम दचकून खिडकीबाहेर पहात द्वारपाल म्हणाला, "हो, हो! मालकच ते. तुला पाहिलं तर नाही ना त्यांनी?"

"नाही, नाही! मी खोलीबाहेर पडलोच नाही ना मग कसा दिसेन?" महेन्द्रनाथ अुत्तरला.

घाईघाईने साफा बांधून द्वारपाल बाहेर पडला व अुद्यानाकडे गेला. त्याने मालकाला लवून नमस्कार केला. थोडा वेळ दोघांचे काही बोलणे झाले. महेन्द्रनाथ खिडकीतून हे सारे पहात होता. मालक हाताने इमारतीच्या दुसऱ्या भागाकडे इशारा करत द्वारपालाला काही सांगत होता. द्वारपालाने वाकून पुन्हा मालकाला नमस्कार केला अन् तो मागे वळला. मालकही महालाकडे निघून गेला.

संध्याकाळ होअून सर्वत्र अन्धार पसरू लागला, तेंव्हा द्वारपाल तेथे आला व महेन्द्रनाथकडे पाहून हसत म्हणाला, "तुझ्यासाठी एक चांगली बातमी आणलीय बरं का मी! मालकाने या महालाच्या पलिकडे द्वारपाल बदलण्याबद्दल म्हटलं होतं. त्या बाजूला सगळ्या बायका रहातात. तिकडल्या दारावर पहारा करणं तुला पसन्त असेल तर..." महेन्द्रला तर वाटले-'आंधळा मागतो एक डोळा, अन् देव देतो दोन.' द्वारपालाचे बोलणे पुरे होण्यापूर्वीच अुतावीळपणे तो म्हणाला, "हो, हो! कबूल आहे मला ते काम. मी तर आत्ता सुद्धा कामावर रुजू व्हायला तयार आहे.

"ठीक आहे. चल तर मग माझ्याबरोबर. मी तुला तिथे घेअून जातो. सहसा त्या बाजूला कोणी जात नाही. त्या बाजूची दारंही बहुधा बंदच असतात नेहमी." असे म्हणत द्वारपालाने कंदील पेटवला अन् तो पुढे निघाला. महेन्द्रनाथ त्याच्या मागे मागे चालू लागला.

दोघेही थोडा वेळ चालत राहिले. नंतर त्यांना खाली जाणाऱ्या काही पायऱ्या लागल्या. त्या पायऱ्यांवरून ते थोडा वेळ चालत गेल्यानंतर त्यांना साखळ्या लावलेले एक लोखंडी दार दिसले. तेथून मुख्य इमारत अस्पष्ट दिसत होती. द्वारपाल महेन्द्रला म्हणाला, "इथं तुला तसं विशेष काही काम नसेल. तुला लागणारं जेवणखाण मी आणून देत जाईन. सकाळी मी येतो तेंव्हा तूही खोलीत जाअून आराम करू शकतोस. मात्र तुला इथे खूप जागरूक रहायला हवं. हा कन्दील राहू दे इथे." असे म्हणत महेन्द्रला नीट खबरदारी घ्यायला सांगून द्वारपाल तेथून निघून गेला.

जवळजवळ दोन तासांनी द्वारपालाने जेवण आणले. खाणं झाल्यावर महेन्द्रला एक किल्ली देत द्वारपाल म्हणाला, "नीट संभाळून ठेव ही हं, दरवाजा अुघडून बाहेर जाअू नकोस! बाहेर सर्वत्र जंगल आहे, अन् कुठे जायला रस्ताही नाहीय." अशा तऱ्हेने सर्व काम नीट सांगून द्वारपाल तेथून निघून गेला.

आता महेन्द्रच्या मनात एक एक विचार येअू लागले. 'ही नवी आलेली पाहुणी म्हणजे आपली युवराणीच असेल की नाही. हे रहस्य कसे बरे शोधून काढावे.' असलेच विचार करत महेन्द्र तेथे बसून राहिला.

**क्रमशः**











# पहारेकरी पहिलवान

एका गावी मल्लनाग नावाचा पहिलवान रहात असे. अनेक कुस्त्या करून अन् अनेक पहिलवानांना हरवून त्याने खूपशी बक्षिसे जिंकली होती. या सर्व गोष्टी गाव-पाटलाला माहीत असल्याने, मल्लनागाने विचारल्याबरोबर त्याला गावच्या कचेरीवर पहारेकरी नेमून घेतला.

खूप दमदाटी करून करवसुली केली गेली अन् तो सारा पैसा कचेरीत पोचला. एका रात्री चोरांनी कचेरीचे कुलूप तोडून ते पैसे पळवले.

पाटलाला बातमी समजली तेव्हा खूप राग येऊन त्याने मल्लनागला बोलावून विचारले, ''चोरांना तू पकडू शकला नसशील, हे ठीक. पण कमीत कमी तू चोरांना तोंड दिलं असशील, त्यांच्याशी दोन हात केले असशील असा पुरावाही कुठ मिळाला नाही! भानगड काय आहे?''

मल्लनाग यावर म्हणाला, ''सरकार, मी जेंव्हा कुस्ती करत असतो, तेंव्हा लोक जोरजोरात शिट्ट्या वगैरे मारून मला प्रोत्साहन देत असतात. त्यांच्या टाळ्या ऐकून प्रतिस्पर्ध्याला हरवण्यासाठी माझ्या अंगात बारा रेड्यांचं बळ संचरत. पण रात्री चोर आले, तेंव्हा मला प्रोत्साहन देणारं कोणीच नव्हतं तिथे! मग काय करावं मी? नाइलाजच झाला माझा!'' असे म्हणून मल्लनाग आपल्या मिशांना पीळ भरू लागला.

आत्ता कुठे पाटलाच्या डोक्यात प्रकाश पडला की स्वभावाची नीट पारख केल्याशिवाय नुसतेच शरीर पाहून एकादी जबाबदारी कोणावर टाकणं, ही मोठीच चूक होय.



# अंगरक्षकाची गोष्ट

अढळ निश्चयाचा राजा विक्रम नेहमीप्रमाणे पुन्हा त्या झाडाकडे गेला; फान्दीवर लटकणारे प्रेत खाली अुतरवून त्याने आपल्या खांद्यावर टाकले आणि मौन धारण करून तो स्मशानाकडे चालू लागला. तेंव्हा त्या प्रेतातील वेताळ म्हणाला, ''राजा, तू कोणत्या दिव्यशक्ती प्राप्त करण्यासाठी ही मेहनत करत आहेस, ते मला माहीत नाही. पण इतकं मात्र खरं, की नेहमीच मेहनतीच्या प्रमाणात आपल्याला त्यांचं फळ मिळतंच असं नाही. काही कमनशिबी माणसं, बिचारी कित्ती खपली तरी अपेक्षित अुंचीला पोचू शकत नाहीत. अन् अुलट काही नशीबवान माणसं मुळीच कष्ट न करता ही अनपेक्षितपणे अुच्चपद मिळवून जातात. अुदाहरण म्हणून चांगला

वेताळाच्या गोष्टी



धैर्यवान असूनही भित्रेपणानं रहाणाऱ्या जयसिंह नावाच्या एका तरुणाची गोष्ट मी तुला सांगतो. ती नीट सावध चित्तानं ऐक, म्हणजे तुला आपल्या या कष्टांचाही विसर पडेल.'' आणि वेताळ विक्रमराजाला आपली गोष्ट सांगू लागला.–

वैशाली राज्यावर राजा विलासवर्मांचं राज्य होतं. त्याला मुलगा नव्हता, पण एक मुलगी होती. तिचं नाव होतं मृणालिनी. तीं जेंव्हा वयात आली, तेंव्हा तिच्या बाबतीतलं आपलं कर्तव्य पुरं व्हावं म्हणून तो तिच्यासाठी योग्य वर शोधू लागला.

राजा विलासवर्मांच्या अंगरक्षकाचं नाव होतं जयसिंह. हा तरूण चांगला धष्टपुष्ट असून युद्ध-कलेत ही निष्णात होता. खड्गयुद्ध, मल्लयुद्ध वगैरे कशातही त्याला कोणीच हरवू शकणार नाही असा बोलबा होता. त्यामुळे राजाची जयसिंहवर विशेष मर्जी होती. राजकुमारी मृणालिनी आणि अंगरक्षक जयसिंह यांच्यात सहवासामुळे आपसात आकर्षण अुत्पन्न झालं होतं. परन्तु राजाला मात्र याची काहीच खबर नव्हती.

पाटलीपुत्रचा युवराज दीप्तिवर्मा हा देशाटन करता करता एकदा वैशाली नगरात आला. महाराज विलासवर्माने त्याचं सन्मानपूर्वक स्वागत केलं, कारण या दीप्तिवर्मालाच आपला जावई करून घ्यावं असं त्याच्या मनात होतं.

एके दिवशी दीप्तिवर्माला बरोबर घेअून राजा विलासवर्मा आपल्या अश्वशाळेकडे गेला. तेथे एक पांढराशुभ्र घोडा स्वतन्त्रपणे निराळा बांधून ठेवला होता. त्याला पहाताच त्यावर स्वार होण्याची दीप्तिवर्माला हुक्की आली. तो म्हणाला, ''अरे वा! घोडा असावा तर असा! मी आत्ता याच्यावर स्वार होअून थोडी रपेट करून येतो!''

हे ऐकून विलासवर्मा एकदम घाबरून म्हणाला, ''अरे इतका अुतावळेपणा नको



करू बेटा! या घोड्याला इथे येअून अजून एक आठवडाही झालेला नाही. आमचे अश्वशिक्षक याला अजून रुळवू शकलेले नाहीत. आमच्या एकट्या जयसिंहने मात्र पहिल्याच दिवशी याच्यावर आपली मांड पक्की करून याला पळवून आणलं होतं.''

अुसळी घेअून दीप्तिवर्मा घोड्याच्या पाठीवर आरूढ झाला. घोडा दचकून अुधळला अन् वायुवेगाने सैरावैरा धावत सुटला. त्याला काबूत आणणं दीप्तिवर्माला जमलं नाही. अखेर घोडयाने त्याला आपल्या पाठीवरून दगडधोंड्यावर फेकून दिला. दीप्तिवर्माच्या डोक्याला अन् शरीरालाही खोल जखमा झाल्या.

शिपायांनी ताबडतोब दीप्तिवर्माला अुचलून राजवाड्यात पोचवलं आणि राजवैद्यानं येअून त्याच्यावर अुपचार चालू केले. एका आठवड्यातच जखमा भरून येअून तो बरा झाला.

अशातच एकदा राजा विलासवर्मा समाचारासाठी दीप्तिवर्माकडे गेला. त्याच्याबरोबर राजकुमारी मृणालिनी आणि अंगरक्षक जयसिंहही होते. जयसिंहकडे रागाने पहात दीप्तिवर्मा त्याला म्हणाला, ''जयसिंह, इथे अनेक लोकांच्या तोंडून तुझं बरंच गुणगान अैकलंय मी! माझ्याशी द्वंद्वयुद्ध किंवा



खड्गयुद्ध कर ना. तू जर मला जिंकलंस तर, या राज्यांतलाच काय, पण संपूर्ण जगातला 'अजोड वीर' आहेस असं कबूल करीन मी!''

खरं पाहिलं तर दीप्तिवर्मा अजून पाअूल अुचलून नीटपणे चालूही शकत नव्हता. अशा स्थितीत खड्गयुद्ध? राजा तर त्याच्याकडे आश्चर्याने पहातच राहिला! तो आणि मृणालिनी आता जयसिंहकडे या आव्हानाबद्दल त्याची प्रतिक्रिया काय होतेय ते पाहू लागले.

थोडा वेळ मौन राहून जयसिंह बोलला, ''माफ करावं मला युवराज! आपण खरोखरच महान् वीर आहात. म्हणूनच



अजून तब्येत नीट झालेली नसतानाही माझ्याशी युद्ध करायची तयारी दाखवू शकलात. पण मी तरी सध्या आपणाशी लढू शकत नाही. माफी असावी.''

यानंतर काही दिवसांनी दहा शिपाई बरोबर घेऊन, रथात बसून राजा विलासवर्मा शिकारीला निघाला. नेहमीप्रमाणे अंगरक्षक जयसिंह बरोबर होताच.

एका ठिकाणी दाट झाडीतून अचानक एक सिंह समोर आला, अन् त्यानं राजावर झडप घातली. राजा या हल्ल्यापुढे हतप्रभच होता. सिंहाची गर्जना ऐकून अन्य शिपायांचे घोडे उधळले अन् सैरावैरा धावू लागले. जयसिंहला म्यानातून तलवार काढण्याइतकाही अवसर मिळाला नाही, म्हणून तो निःशस्त्र हातांनीच सिंहाशी मुकाबला करायला पुढे झाला. तो इतका शौर्याने लढला की शेवटी सिंहाची मान मोडली, त्याच्या नसा फाटल्या अन् जमिनीवर कोसळून त्याने प्राण सोडला.

राजा विलासवर्माने रथावरून खाली उतरून जयसिंहला प्रेमाने मिठी मारली अन् तो म्हणाला, ''जयसिंह, तुझ्यासारखा महावीर अंगरक्षक म्हणून मिळाल्याने मी स्वतःला धन्य समजतो. तू काहीही माग माझ्याकडे, मी ते मोठ्या आनन्दाने देईन तुला!''

''नाही प्रभु, मी काही मोठंसं केलंय असं वाटत नाही मला. माझं कर्तव्यच केलंय मी!'' जयसिंह नम्रपणे म्हणाला.

राजधानीत पोचल्याबरोबर राजाने राजवैद्याला बोलावून घेऊन जयसिंहच्या जखमांवर इलाज करवला. एका पंधरवड्यात जखमा बऱ्या होऊन जयसिंह पूर्णतः ठीक झाला.

यानंतर बरोबर दोन महिन्यांनी नेहमीप्रमाणे वसंतोत्सवाच्या निमित्ताने निरनिराळ्या चढाओढी झाल्या.

एका मैदानात गोलाकार जागा खुंटा मारून विशेष सुरक्षितता बाळगून





आखाडा म्हणून तयार करण्यात आली होती. तेथे एक धष्ट-पुष्ट माजलेला बैल उभा केला गेला. महाराज आणि युवराणी मृणालिनी थोड्या अंतरावरील उंचशा आसनांवर येऊन बसले; आणि आखाड्याभोवती प्रेक्षकांची गर्दी जमली.

प्रथम दरबारी मल्ल जयभेर बैलाशी लढायला आखाड्यात उतरला. गर्दीतून प्रोत्साहनसूचक शिट्ट्या वाजू लागल्या. मल्लाने आपल्यावर हल्ला करायला आलेल्या बैलाची शिंगं एकदम पकडली; परन्तु त्या माजलेल्या बैलाने नाकपुडीतून जोरात हवा सोडून डोक्याच्या हिसक्याने जयभेरला हवेत उचललं अन् प्रेक्षकांच्या गर्दीत भिरकावून दिलं.

यानंतर आखाड्यात उतरलेल्या नगररक्षक मार्तंडकेतूचीही बैलाने अशीच अवस्था करून टाकली.

हे पाहून राजा जयसिंहला म्हणाला, ''अरे, तू तर महावीर आहेस, उशीर का लावतोस? निशस्त्र हातांनी तू सिंह मारून टाकलास, मग हा माजलेला बैल म्हणजे तर तुला डाव्या हाताचा मळ. चल उतर पाहू आखाड्यात!''

''नाही महाराज! क्षमा असावी मला. मी या बैलाशी झुंज घ्यायला तयार नाही.'' जयसिंहने नकार दिला.

इतक्यात एक अक्रित घडलं! राजाने आपल्या खांद्यावरून लाल रंगाची शाल लपेटून घेतलेली होती, तिच्याकडे बैलाची नजर वळली अन् तो भडकला! बांबूचे खुंट ओलांडून लोकांना आपल्या खुरांखाली चिरडत तो राजाकडे धावून जाऊ लागला.

ते पाहून राजा एखाद्या पुतळ्याप्रमाणे आपल्या आसनालाच खिळून गेला! काय करावं, हेच त्याला सुचेना! इतक्यात युवराणी भयाने किंचाळून बेशुद्ध पडली.

राजाशेजारी उभा असलेला जयसिंह मात्र मोठ्या चपळतेनं उसळी घेऊन बैला-समोर उभा ठाकला. बैलाची शिंगं दोन्ही हातांनी घट्ट पकडून त्याने त्याचं डोकं



एका बाजूला पिळवटून धरलं अन् थेट बैलाच्या काळजावरच त्याने जोराने लाथ हाणली. त्या धक्क्याने तो मस्त बैल एका बाजूला हेलपाटून खाली बसला. तेंव्हा जयसिंहने जोराने बैलाची मान मुरगाळत आपल्या डोक्याने बैलाच्या डोक्याला जोरदार धडक मारली. वेदनेनं हंबरत बैलाने पुन्हा अुठायचा प्रयत्न केला, पण त्याचा एक पायच मोडल्यामुळे त्याला अुठता आलं नाही. तो एका बाजूला तसाच पडून राहिला. त्याच्या नाकपुडीतून रक्त वाहू लागलं.

हे पाहून जनता जयसिंहच्या नावाने जयजयकार करू लागली. त्याला आपल्या हातांनी कवटाळत राजा म्हणाला, "जयसिंह, तू पुन्हा एकदा माझे प्राण वाचवलेस. मी फार कृतज्ञ आहे तुझा!" नंतर राजा म्हणाला की त्या दिवशीच्या चढाओढीत विजयी म्हणून जयसिंहचं नावच घोषित करण्यात येईल.

तेव्हा गंभीर स्वरात जयसिंह म्हणाला, "पण महाराज, मी आखाड्यात अुतरून बैलाशी सामना करायचा प्रयत्नच कुठे केलाय? मग मी विजयी कसा? आपण प्रथम त्या बिचाऱ्या जखमी बैलावर अुपचार करायची व्यवस्था करवावी."

मंद हसत राजा विशेष प्रेमानं जयसिंहला म्हणाला, "तू मला फार आवडतोस बघ! म्हणून आपल्या मुलीचा विवाह तुझ्याशीच लावून द्यायची इच्छा आहे माझी. तुला मान्य आहे हा प्रस्ताव?"

"आपण मला त्या योग्यतेचा समजत असाल, अन् मृणालिनी देवींनाही हे मान्य असेल तर आपला प्रस्ताव मान्य आहे मला!" जयसिंह अुत्तरला.

तोपर्यन्त मृणालिनी शुद्धीवर आली होती. आपल्या पित्याचा प्रस्ताव आणि जयसिंहचं अुत्तर तिनं ऐकलं होतं. गोड हसत तिनेही आपली मान्यता दिली.

एवढी गोष्ट सांगून वेताळ म्हणाला-"राजा, युवराणी मृणालिनीशी



विवाह करून तिच्या वडिलांच्या वैशाली राज्याचा राजा बनायला पाटलीपुत्रचा युवराज दीप्तिवर्मा योग्यच आहे नाही? तो धैर्यवान नि साहसी तर आहेच, कारण उधळणाऱ्या घोड्यावर स्वार होऊन त्याला आपल्या ताब्यात आणण्याचा त्याने प्रयत्न केला. त्यात त्याला यश आले नाही, यामुळे त्याची साहसी वृत्ति डागाळत नाही. ते त्याचे केवळ दुर्भाग्य! बाकीचं सर्व सोडून दे, घोड्यावरून पडल्यावर झालेल्या जखमा ओल्या असतानाच त्याने महावीर अंगरक्षक जयसिंहाला द्वंद्व-युद्धासाठी ललकारलं, यात त्याची साहसी वृत्तीच दिसत नाही का? या उलट जयसिंहचा व्यवहार अगदी निराळा वाटतो. त्याचे वागणे परस्पर-विरोधी दिसते. तो साहसी आहे की भित्रा आहे हे सांगता येत नाही. युवराज दीप्तितवर्माशी द्वंद्व-युद्ध करायला तो कचरला, पुढेच आला नाही. त्याने वाघाशी झुंज दिली ती केवळ राजाच्या रक्षणासाठी नव्हे, त्याला आपले प्राण ही वाचवायचे होते. तसेच बैलाशी लढण्यासाठी रिंगणात उतरायलाच त्याने नकार दिला होता. हे सर्व पाहून असे वाटते की केवळ योगायोगाने त्याला 'महान वीर' ही पदवी मिळाली. आणि केवळ भाग्याने राजाचा जावई होण्याची योग्यता



त्याने प्राप्त केली. अशा अनेक शंका मनात येतात. या माझ्या शंकांचं नीट समाधान कर आणि जाणून-बुजून उत्तर देण्याचं टाळलंस जर तुझ्या शिराचे तुकडे तुकडे होतील हे तुला माहीत आहेच.

यावर राजा विक्रम म्हणाला-"युवराज दीप्तिवर्मा मधे राजकुमाराला साजेसे राज-परिवाराचे संस्कार व दूरदर्शिता दिसत नाही. त्याच्यात फक्त ईर्ष्या भरलेली दिसते. जयसिंहाला मिळालेले यश व कीर्ति त्याला सहन झाली नाही. केवळ ईर्ष्येच्या आहारी जाऊन तो उधळलेल्या घोड्यावर स्वार झाला आणि जयसिंहाहून आपण अधिक

पराक्रमी असल्याचे दाखवून देण्याचा त्याने विफल प्रयत्न केला. या प्रयत्नात त्याचाच उपहास झाला नाही का? स्वतः जखमी अवस्थेत असना त्याने जयसिंहाला द्वंद्व-युद्धासाठी पुकारलं यात स्पष्ट कपट आहे. कारण यात तो जर विजयी झाला असता तर त्याची कीर्ति वाढली असती. आणि जर त्याचा पराजय झाला असता तर जखमी असल्याचे कारण होतेच! आता जयसिंहाबद्दल म्हणायचे असेल वर त्याचे वर्तन परस्पर-विरोधी असे मुळिच नाही. त्याने सिंहाशी जी झुंज दिली ती स्वतःच्या बचावासाठी नाही, राजाचे रक्षण करण्याचाच त्याचा प्रयत्न होता. अन्यथा केवळ आपला बचाव करण्याची त्याची इच्छा असती जर अन्य शिपायांप्रमाणे तो बाजूला उभा राहिला असता अथवा तेथून पळून गेला असता. युवराज दीप्तिवर्माने जखमी अवस्थेत द्वंद्वयुद्धासाठी जेव्हा त्याला ललकारलं तेव्हां जयसिंहाला वाटलं तो काही असंबद्ध प्रलाप करीत आहे. याचा परिणाम काय होणार हे ही जयसिंहाने जाणले. राजाने सांगितल्यावर ही जयसिंह मस्त बैलाशी लढला नाही. कारण मनरंजनासाठी का होईना एकाद्या प्राण्याला घायाळ करणं त्याला पसंत नव्हतं. हे सर्व राजाने जाणलं होतं, म्हणूनच राजाचा जयसिंहाबाबतचा आदर वाढत गेला. आणि शेवटी तो राजाचा जावई बनून नंतर वैशालीचा प्रभु बनला."

वेताळाला हे निवेदन करताना राजा विक्रमचा मौन-भंग झाला. आता वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडाच्या फांदीला पूर्ववत् प्रेत लटकू लागले.

—कल्पित

(आधारः आर्.आय्. पट्टाभि यांनी लिहिलेली एक कथा)



# चान्दोबा पुरवणी-४९

## भारतातील पशुपक्षी



## 'हूपो'-पक्षी

राजा सॉलोमन जेंव्हा उडणाऱ्या सिंहासनावरून आकाशातून जात होता, तेंव्हा जवळपास उडणाऱ्या गिधाडांनी त्याच्या डोक्यावर छाया धरायला नकार दिला होता. त्यावेळी राजाने त्यांना रागाने शाप दिला होता की, 'तुमच्या गळ्यावरील केस नाहीसे होतील.' परंतु त्याच वेळी काही हूपो पक्षांचा कळप तेथे आला. त्यांनी सॉलोमनच्या डोक्यावरून उडत राहून त्याला सावली मिळवून दिली. कडक उन्हापासून आपल्याला वाचवल्या बद्दल राजाने त्यांना वर देऊ केला, तेंव्हा त्यांनी 'आपल्या डोक्यावर सोन्याचा तुरा असावा' अशी मागणी केली. ती मागणी मान्य झाली, परन्तु त्या सोन्यासाठी जेंव्हा पक्ष्यांची हत्या होऊ लागली, तेंव्हा त्यांचे प्राण वाचावेत म्हणून वरदानात बदल करून सॉलोमनने त्यांना सुंदरशा पिसांचा तुरा बहाल केला. ही एक पौराणिक कथा आहे.

हुपो (Hoopoe) पक्षी या सुंदर तुऱ्यामुळेच निराळा ओळखला जातो. भारतातील उपुदे (Upudai) परिवारातला हा एकच एक वारस मानला जातो. त्याची आणखी एक खास ओळख म्हणजे त्याची पाठ, पंख व शेपूट यांवर शेल्याप्रमाणे असणाऱ्या काळ्या-पांढऱ्या पट्ट्या! तसा एक फूट लांबीचा हा पक्षी वर्णाने फिकट पिवळा असतो. हा जेंव्हा दाणे टिपतो किंवा त्यासाठी पायांनी जमीन उकरत असतो, तेंव्हा त्याचा पिसांचा तुरा बन्द होऊन टोकदार झालेला दिसतो. परंतु तो जेव्हां खुशीत येतो, तेंव्हा मात्र त्याचा हा तुरा पंख्यासारखा पसरतो आणि खूपच सुंदर दिसतो. अशा वेळी त्याचा थाट एकाद्या राजासारखा दिसतो. याची चोच लांब व बारिक असते. याचा आवाज 'हू-पो' किंवा 'हू-पो-पो' असा निघतो, म्हणूनच याला 'हूपो' असे नाव मिळाले आहे.

हूपोंची घरटी भिंतींच्या फटीत, छपरांच्या भोकात व झाडांच्या पोकळीत बांधलेली आढळतात. पिकांना धोका असणारे किडे वगैरे पकडून खात असल्याने हा 'शेतकऱ्यांचा मित्र' मानला जातो.



# आधुनिक भारतीय साहित्य

(आपला भारत हा विभिन्न भाषा आणि विभिन्न संस्कृति असणारा एक महान् देश आहे. इथे युगानुयुगे प्रत्येक प्रमुख भाषेत समृद्ध साहित्य निर्माण होत आलेले आहे. आपल्या प्राचीन ग्रंथांबद्दल अन् त्यातील गोष्टींबद्दल आपल्याला थोडीबहुत माहिती असते; परन्तु आधुनिक काळातील महान् ग्रन्थांबद्दल आपल्याला फारच कमी माहिती असते. चान्दोबाच्या या पृष्ठांवर इथून पुढे विभिन्न भाषांतील श्रेष्ठ कादंबऱ्यांच्या गोष्टी दिल्या जातील. होय, या गोष्टी फारच संक्षिप्त स्वरूपात असतील. परन्तु आम्हाला विश्वास वाटतो की, त्या वाचून आमच्या छोट्या वाचकांना, पुढे कधीतरी ते ग्रंथ किंवा त्यांचा पूर्ण अनुवाद वाचून या नव्या साहित्याचा परिचय करून घ्यावासा वाटेल.) —संपादक

## परजा: पहाडी प्रदेशातील मुलांची कहाणी



ओरिसाच्या कोरापुट जिल्ह्यात मैलोन् मैल पसरलेल्या जंगली व डोंगराळ भागात अनेक लहान लहान गावे आहेत. यात परजा, गोंड आदि कित्येक पहाडी जातीचे लोक रहातात. ते अगदीच निरक्षर असल्याने 'सभ्य' समजले जाणारे काही लोक त्यांना लुटत असतात.

सुकू जानी हा एक गरीब परजा असतो. त्याच्या बायकोला एका वाघाने पळवून नेलेले असते. त्याला मंदिया व तिकटा या नावाचे दोन मुलगे व जिली आणि बिली नावाच्या दोन मुली असतात.

गावात आलेल्या एका सरकारी अधिकाऱ्याची सुकूवर काही कारणाने गैरमर्जी होते. त्याचा राग शान्त करण्यासाठी काही रक्कम लाच म्हणून त्याला देण्याचे संकट उभे रहाते. सुकूजवळ तर एक दमडीही नसल्याने त्याला सावकाराकडून कर्ज काढणे भाग पडते. हा सावकार फार क्रूर असतो. कर्ज वसूल होईपर्यंत सुकू व त्याचा धाकटा मुलगा, या दोघांना तो आपल्याकडे जामीन ठेवून त्यांच्याकडून गुलामासारखे काम करवून घेतो. अशा तऱ्हेने कर्ज न फेडणारांना असेच जीवन जगावे लागे. अशा प्रकारच्या बिगारीला तेथे 'गोटी' असे म्हणत.

सुकूचा थोरला मुलगा मंदिया याला चोरून दारू गाळल्या बद्दल पकडले जाते, आणि त्यालाही सरकारी अधिकाऱ्याला लाच देण्याची पाळी येते. तोही त्याच सावकाराकडून कर्ज घेऊन त्याचा गुलाम बनतो.



सुकूच्या दोन्ही मुली खाणीत दगड उचलण्याचे काम करू लागतात. सुकूला कळून चुकते की अशीच परिस्थिति राहिली, तर आपलं कर्ज कधीच फिटणार नाही. त्यामुळे सावकाराकडे आपली जमीन गहाण ठेवून ते तिघेही त्याच्या गुलामीतून मुक्त होतात.

सुकू दोन्ही मुलींना पुन्हा घरी आणून ठेवतो. पण तोपर्यंत त्यांना स्वतंत्र जीवन जगायची चटक लागलेली असते. थोरली जिली झोपडीतल्या मर्यादित राहू शकत नाही. सावकार जेंव्हा जेंव्हा त्या गावात येऊन मुक्काम करी, तेंव्हा जिली लपून-छपून त्याला भेटे. काही दिवसांनी ही गोष्ट गावात सर्वांना कळून सुकू खूप रागावतो: परंतु तो आपल्या मुलीला काहीही बोलू शकत नाही. सावकार जिलीला घेऊन जातो आणि सुकू व त्याच्या मुलांना शरमेने मान खाली घालावी लागते.

सुकूचे धट्टे-कट्टे मुलगे कडक मेहनत करून भरपूर पैसा मिळवतात व सावकाराचे देणे कसेतरी फेडून टाकतात: परंतु तो पर्यन्त सावकाराने त्यांच्या जमिनीत संत्र्याची बाग केलेली असते, त्यामुळे ती जमीन परत करायला सावकार नकार देतो. सुकू कोरापुट कोर्टात तक्रार गुदरतो. कोर्टात खटला उभा रहाण्याची तारीख नक्की केली जाते. परन्तु सावकाराकडून भरपूर लाच घेऊन सरकारी अधिकारी सुकूला खटल्याची तारीख चुकीची सांगतो. त्या तारखेप्रमाणे सुकू कोर्टात हजर रहातो. परंतु योग्य दिवशी कोर्टात हजर न राहिल्याची सबब पुढे करून खटल्याचा निकाल सावकाराच्या बाजूने अगोदरच होऊन गेलेला असतो.

हा निकाल ऐकून पिता-पुत्र हताश होऊन आपल्या अंधःकारपूर्ण जीवनाबद्दल विचार करत सावकाराकडे जातात, आणि आपली जमीन परत देण्यासाठी त्याच्यापुढे गयावया करतात. परंतु त्याचा काहीच उपयोग होत नाही. सावकार उलट गर्वाने त्याला म्हणतो, ''चला चालते व्हा मुकाट्याने, नाहीतर तुझी जिली जशी मी आणून ठेवली होती, तशीच बिलीलाही आणीन बघ!''

हे ऐकल्याबरोबर सुकू विजेच्या वेगाने जाऊन आपल्या कुऱ्हाडीने सावकाराचे डोके धडावेगळे करतो. ते तिघेही गरजून म्हणतात, ''अरे जा बे! आमची जमीन हडपलीस तू, पण तुला तिचा उपभोग नाही घेता येणार.'' त्यांचा ओरडा ऐकून घरातून बाहेर आलेली जिली समोरचे दृश्य पाहून तेथून कुठेतरी पळून जाते.

सावकाराचे मस्तक उचलून घेऊन ते तिघेही पोलीस-ठाण्यात जाऊन हजर करतात व म्हणतात, ''याला आम्ही मारलंय, पकडा आम्हाला!''

हा प्रकार पाहून पोलीस अधिकारीही क्षणभर भीतीने थरारून जातो.

उरिया भाषेतील महान् कादंबरीकार म्हणून प्रसिद्ध असलेल्या गोपीनाथ मोहन्ती (१९१४-१९९१) यांच्या लेखणीतून ही कादंबरी उतरली आहे. साहित्य अँकेडमी आणि ज्ञानपीठ यांच्याकडून पुरस्कार मिळालेले हे पहिलेच उरिया लेखक होत.

# तुम्हाला माहीत आहे काय?

१. इन्द्रगिरी व चन्द्रगिरी या दोन पहाडामधे वसलेले मंदिर नगर कोणते?
२. पर्शियाची स्थापना कोणी केली?
३. नोव्हें. ९, १९९० रोजी कोणती महत्त्वाची घटना घडली?
४. चीन-विजेता मंगोल-सम्राट कोण?
५. बांगला-देशाचा जन्म केव्हा झाला?
६. 'सती' या कुप्रथेचा विरोधक व ब्रह्मसमाजाचा संस्थापक असणारा महान् समाजसुधारक कोण?
७. या वर्षी १२ ऑक्टो. रोजी कोणत्या महत्वपूर्ण ऐतिहासिक घटनेचा उत्सव साजरा केला गेला?
८. 'मोपला' नावाने कोण ओळखले जातात?
९. यू.एस.ए. (अमेरिका) चा राष्ट्रीय प्राणी कोणता?
१०. भारतीय पुराणात एका पुराण-पुरुषाच्या पायाच्या अंगठ्याला बाण लागून मृत्यु ओढवतो. तो पुरुष कोण?
११. चार समुद्रांना रंगांची नावे मिळालेली आहेत. ते समुद्र कोणते?
१२. जगातील सर्वांत अधिक लांबीचा रेल्वे-मार्ग कोणता?
१३. दोन वेळा नोबेल पुरस्कार जिंकणारी एकुलती अेक महिला कोण?
१४. चष्म्यासाठी उपयोगात येणारी 'बायफोकल लेन्स' कोणी शोधून काढली?
१५. युनेस्को पुरस्कृत पहिले अंतर्राष्ट्रीय नगर कोणते? त्याची निर्मिति कोठे झाली आहे?

## उत्तरे

१. कर्नाटकातील श्रवणबेळगोळ.
२. सायरस द ग्रेट-इ.स.पू. ५०० व ४०० च्या दरम्यान.
३. पूर्व व पश्चिम जर्मनी यांच्या मधे १९१६ साली बांधली गेलेली बर्लिनची भिंत या दिवशी, दोन्ही जर्मनीचे एकीकरण सूचित करण्यासाठी तोडली गेली.
४. कुबलाईखान.
५. डिसेंबर १९७१.
६. राजा राममोहन रॉय.
७. क्रिस्तोफर कोलंबस याने लावलेल्या अमेरिकेच्या शोधाचा ५०० वा वार्षिकोत्सव साजरा केला गेला.
८. केरळच्या मलबार प्रान्तातील मुसलमानांना.
९. अमेरिकेतील पांढऱ्या डोक्याचा गरूडपक्षी.
१०. श्रीकृष्ण.
११. पांढरा, काळा, तांबडा व पिवळा समुद्र.
१२. मास्को ते व्हलाडिवोस्टॉक पर्यंत ५,८६४ मैल लांबीचा ट्रान्स सैबेरियन रेल्वे-मार्ग.
१३. मादाम मेरी क्युरी.
१४. बेंजामिन फ्रँकलिन.
१५. पांडीचेरीजवळील ऑरोविल.



# भुतावर कुरघोडी

सुरेन्द्र नावाच्या तरुणाचे सुनीता नावाच्या तरुणीशी लग्न झाले. सुरेन्द्रला प्रीतनगरमधे नोकरी असल्यामुळे तो तेथे बिऱ्हाडासाठी जागा पाहू लागला. बरोबर त्याची बायकोही होतीच. सारे प्रीतनगर पालथे घालून झाले, पण एकही भाड्याचे घर त्यांना मिळेना.

गावाच्या टोकाला कुलूप लावलेले एक घर त्यांना दिसले. त्याबाबत चौकशी करता, सुरेन्द्रला असे कळले की, ते घर धनपती नावाच्या एका व्यापाऱ्याचे होते. काही वर्षांपूर्वी सहकुटुंब नावेतून जात असताना अपघात होऊन सर्वचजण मृत्युमुखी पडले; अणि तेंव्हापासून भूत बनून धनपती त्या घरातच हिंडत असे. कोणी त्याची भीती न बाळगता घरात राहू पाहिले, तर तो त्याच्या मागे लागून, त्याला सतावून घर सोडून जायला भाग पाडत असे.

ही माहिती ऐकून सुरेन्द्र बायकोला म्हणाला, "मला भुताप्रेतांची भीती वाटते बुवा, मला नको असलं घर!"

"है! माझा नाही असल्या भाकडकथांवर विश्वास, अन् खरंच भुतंखेतं असली तरी मी नाही भिणार त्यांना. या घरात राहिलो, तर भाडंही कुणाला देण्याचा प्रश्न नाही. त्या भुताला मी पाहून घेईन." असे म्हणून सुनीताने नवऱ्याला धीर दिला.

घर मिळवण्याबाबत अन्य तरणोपाय नसल्याने सुरेन्द्रला सुनीताचे बोलणे मानावेच लागले. मग त्याने घराच्या किल्लीबाबत लोकांना विचारले. त्यांनी सर्वांनी किल्लीबद्दल कोणालाच काही माहीत नसल्याचे अन् सुरेन्द्र कुलूप तोडून

उर्मिला मिथुन



घरात राहिल्यास कोणाचीच हरकत नसल्याचे सांगितले.

शेवटी सुरेन्द्र आणि सुनीता कुलूप तोडून घरात शिरले. घर आतून पाहिले. तेंव्हा दोघे चकितच झाले. सारे घर ठीकठाक लावून ठेवलेले होते. कुठे एवढीशीही धूळ वगैरे नव्हती. एका खोलीत एक खाट होती व त्यावर जसा नुकताच घातला असावा असा बिछाना पसरून ठेवलेला होता.

हे सर्व पाहून भीतीने थरथर कापत सुरेन्द्र म्हणाला, "घरातली ही स्थिति पाहून तर असं वाटतंच की खरोखरच त्या धनपतीचं भूत इथे रहात असलं पाहिजे."

सुरेन्द्रने असे म्हणताच भूतरूपात तेथे असणारा धनपती त्याच्यासमोर प्रकट होअून म्हणाला, "होय, मी धनपतीच आहे. खूपसा पैसा खर्च करून मी हे घर बांधलं, यात माझं मन अडकलेलं आहे. म्हणूनच मी इथे वावरत असतो. तुम्हाला या घरात रहायचं असेल तर माझी काही हरकत नाही. पण हे घर नेहमी आता आहे असं स्वच्छ, नीटनेटकं ठेवायला हवं. नाहीतर मी तुम्हा लोकांना खूप त्रास देईन लक्षात ठेवा."

भूत पाहून सुरेन्द्र तर घाबरूनच गेला, पण त्याच्या पाठीवर जरा थोपटून सुनीता भुताला म्हणाली, "ते सारं ठीक आहे, पण अेक सांगा-तुम्ही सध्या कोणत्या खोलीत रहाता?"

भुताने आपण रहात असलेली खोली तिला दाखवली आणि त्या खोलीत कोणी यायचे नाही-असे तिला बजावले.

अशा तऱ्हेने सुनीताचा संसार सुरू झाला. एका आठवड्यातच मागच्या बाजूला एका ठिकाणी केर टाकत राहून तिने तिथे केराचा एक मोठा ढीगच जमवला. तो पाहून धनपतीने तिला सारा कचरा बाहेर गल्लीत नेअून टाकायला सांगितले. पण त्याच्या धमकावणीकडे सुनीताने जराही लक्ष दिले नाही. अुलट तिने घरात सगळीकडेच घाण ठेवायला सुरुवात केली. अशा तऱ्हेने सारे घरच घाणेरडे दिसू लागले.

ते पाहून एकदा सुरेन्द्र सुनीताला म्हणाला, "हे बघ, तू असं करत राहिलीस, तर एक दिवस ते भूत आपल्या दोघांनाही गळा दाबून मारून टाकील. घर जरा स्वच्छ ठेवायला शीक ना."

"काय करू? मला तर लहानपणापासून कामाची जराही सवय नाहीय ना!" सुनीताने बेपर्वाई दाखवली.

हळूहळू मागच्या बाजूला जमणाऱ्या कचऱ्याचा सडून घाण वास येअू लागला. एके दिवशी सुनीताच्या खाटेच्या कोपऱ्यावर बसून भूत ओरडून म्हणाले, "मी आधीच सांगितलं होतं ना, की मला अस्वच्छता मुळीच आवडत नाही म्हणून? परसातला कचरा कुजून येणाऱ्या वासानं माझं डोकं अुठायला लागलंय. आता मारून टाकतो पहा मी तुला."

भुताच्या या बोलण्याचा सुनीतावर काहीही परिणाम झाला नाही. अुलट तिने त्याला खाटेवरून ढकलून देत म्हटले, "हं! भुतानं माणसाला कित्ती घाबरवायचा प्रयत्न केला, तरी माणसाला मारण्याची शक्ती भुतात नसते, हे मला छान माहिती आहे." अन् एकाद्या चंडीसारखा अवतार धारण करत हातात



झाडू घेअून ती भुतावर धावून गेली.

त्याबरोबर बारीक आवाजात किंचाळत ते भूत तेथून पळून गेले. पण जाताना ते म्हणाले, "ठीक आहे, सारं घर अन् परसू तुला जितकं घाण करायचं असेल, तितकं कर. मी लक्ष घालणार नाही त्यात. पण कृपा करून माझ्या खोलीकडे येअू नकोस. निदान माझी खोली तरी चांगली स्वच्छ राहू दे."

"हो, मोठा आलाय? अर्ध्या रात्री येअून माझी झोपमोड केलीस. तुझ्या त्या खोलीबद्दल काय तो विचार अुद्या करीन मी." सुनीता अुत्तरली.

दुसऱ्या दिवशी सकाळी अुठताच परसातला थोडा कचरा आणून तिने भुताच्या खोलीत इकडे तिकडे पसरून टाकला. घरातील सर्व वस्तु अस्ताव्यस्त करून टाकल्या. भूत ताबडतोब एका बाजूला घाबरून अुभे राहून म्हणाले, "अग माझे आई सुनीता, तुझ्या अस्वच्छपणामुळे या घरावरचं माझं प्रेम नाहीसं झालय. या घाणीत रहाता यायचं नाही मला. मी आपला हे घर सोडूनच जातो कसा! जंगलातल्या एका झाडावर शान्तिपूर्वक दिवस काढीन मी. शेवटी तूच कुरघोडी केलीस माझ्यावर! पण माझं एक ऐक बये. आपलं घर जरा स्वच्छ ठेवायला शीक. नाहीतर या घाणीनं वेड लागून तुझा नवराही एक दिवस जंगलात पळून जाईल बघ. तसं संकट तुझ्यावर येऊ नये अशी माझी इच्छा आहे." आणि धनपतीचे ते भूत तेथून कुठेसे दूर निघून गेले.

त्या दिवशी संध्याकाळी नवरा घरी आल्यावर सुनीताने त्याला ही सारी हकिकत सांगितली. ते ऐकून रागाने सुरेन्द्र म्हणाला, "आता इथून पुढे तरी घर नीट साफ ठेव. नाहीतर त्या धनपालसारखा मीही पळून जाईन कुठे तरी."

सुनीताने जरा वेडावत म्हटले, "मी जराशी आळशी आहे खरी, पण त्या भुतापासून सुटका मिळवण्यासाठी मी जास्तच केलं. अुद्यापासून छान स्वच्छ ठेवीन मी घर. पहातच रहा."

"बघ, पुन्हा तोच आळशीपणा. भूत बिचारं बोलून-बोलून हरलं. मीही सांगत राहिलो, पण तुझ्यात ढिम्मही बदल झाला नाही. अुद्यापासून नाही, आजपासनंच घर साफ ठेवायला लाग." सुरेन्द्र हसत हसत तिला टोमणा मारत म्हणाला. त्याचे बोलणे ऐकून सुनीताही हसू लागली.





# ऐकावं जनाचं...!

एके दिवशी भल्या पहाटे आपल्या गल्लीतून धापा टाकीत चाललेल्या महेशला सदानंदने मोठ्याने हाक मारून विचारलं-"अहो महेशजी, माझं एक छोटसं काम आहे तुमच्याजवळ."

सदानंदने महेश जवळ येत विचारलं-"सांग झटपट तुला काय पाहिजे ते. मी जरा महत्त्वाच्या कामासाठी निघालो आहे."

"खास असं काही नाही. शिवमंदिराच्या गल्लीत राहणारा चन्दन कसा माणूस आहे मला सांगाल?" सदानन्दने विचारले.

थोडा वेळ विचार करून आश्चर्याने महेशने प्रश्न केला-"का? कशासाठी विचारतो आहेस बरं?"

सदानन्द समजाऊन सांगू लागला-"तो मला काही रक्कम कर्जाऊ मागतो आहे. आपल्या सारख्यांचा सल्ला घेऊन मग पैसे द्यावेत असा विचार करून त्याला दोन दिवसांनी यायला सांगितलं."

महेश मनातल्या मनात हसला. सदानंद अडाणी आहे की उगाच फार सावध होण्याचा प्रयत्न करतो आहे हे त्याच्या लक्षात येईना. क्षण भर थांबून म्हणाला-"चन्दन दिल्या शब्दाला जागेल असं वाटत नाही. त्याला आपल्या जबाबदारीची नीट जाणीव नसते." असं सांगून महेश आपल्या वाटेने चालू लागला.

नदीच्या पुरात आपले घर-दार व संपत्ति गमावून सरकारकडून मिळालेली नुकसान-भरपाईची रक्कम गाठीला बांधून सदानंद या गावी आला होता आणि

नम्रताई गोखले

काही रक्कम खर्च करून त्याने थोडी जमीन खरेदी केली होती. सदानंदला पैशांची किंमत चांगली समजे, म्हणून कर्ज मागणाऱ्या चन्दन बद्दल त्याने महेशला विचारले होते.

दोन दिवसांनी चन्दन पुन्हा सदानंदकडे आला आणि त्याला पैशांबद्दल विचारलं. तेव्हा सदानंदने त्याला खोटंच सांगितलं की तो व्यवस्था करू शकत नाही.

चन्दन गयावया करून सदानंदला म्हणाला-"मला पैशांची अत्यंत आवश्यकता आहे. माझ्या बायकोची तब्येत ठीक नाहीय. येथील वैद्याने शिफारस केली आहे की मी आपल्या बायकोला शहरात घेऊन जाऊन तेथे औषधोपचार करावा. मी तुम्हाला वचन देतो की एक महिना भरात तुमचे पैसे परत देऊन टाकीन. कृपा करून आज मला नाही म्हणू नका."

या गोष्टी ऐकून सदानन्द थोडा मऊ पडून म्हणाला-"बरं, तर उद्या ये आता."

चन्दन गेल्यावर सदानन्द घराबाहेर पडला आणि गल्लीच्या दुसऱ्या टोकावर असलेल्या शिव-मंदिराकडे गेला. देवळाचे पुजारी श्री. वीरबसवलिंगाचार्य नदीवर स्नान करून ओल्या कपड्यांनी मंत्र-पुष्पाचे पठण करीत येत असलेले त्याला दिसले. सदानन्द पुजाऱ्या बरोबर चालत चालत त्याला आपली समस्या सांगू लागला-"महाराज, चंदन पैशांच्या अडचणीत आहे. त्याला मदत करायची मला इच्छा आहे. आपलं त्याच्याबद्दल काय मत आहे बरं? गावातील वयोवृद्ध महेशजींना मी विचारले. तेव्हा त्यांनी आपला अभिप्राय दिला-'चंदन काही विश्वास ठेवायला योग्य माणूस नाही!'

पुजारी थोडा थांबला. नंतर सदानंदकडे निरखून पहात म्हणाला-"दुसऱ्यांच्या म्हणण्यावर विश्वास नकोस; दुसऱ्यांच्या मनाप्रमाणे वागशील तर आत्मनाश करून घेशील!" एवढा उपदेश करून तो आपल्या वाटेने मंदिराकडे चालू लागला.

सदानंद दुग्ध्यात पडला, काही विचार करीत घरी परतला. दुसऱ्या दिवशी जेव्हा चंदन त्याला भेटायला आला, तेव्हा त्याला आवश्यक ती रक्कम सदानंदने देऊन टाकली.

यानंतर चार-पाच महिने असेच गेले. चन्दनने घेतलेली रक्कम काही परत दिली नाही. वाट पाहून सदानंद थकला आणि चंदनच्या घराचा शोध घेण्यासाठी बाहेर पडला.

सदानन्दला पाहून चंदन जरा ही बिचकला नाही. तो म्हणाला-"तुमचे पैसे कुठं जाणार नाहीत, पैसे मी देईनच!" आज माझ्याजवळ पैसे नाहीत. माझ्या हाती रक्कम आली की मीच आपणास कळवीन. येऊन पैसे घेऊन जा म्हणून!"





सदानन्दने आणखी दोन महिने वाट पाहिली, पण काही उपयोग झाला नाही. बाकीचं तर राहूंच द्या, जेव्हा रस्त्यात सदानंदला चंदन दिसे तेव्हा काही ही न बोलता सरळ लगबगीने पुढे निघून जाई. शेवटी निराश होऊन सदानंद एकदा पुजाऱ्याकडे आला आणि म्हणाला-"ही सर्व आपली कृपा आहे! आपला उपदेश मला भवला!"

पुजाऱ्याला मोठं आश्चर्य वाटलं नि म्हणाला-"माझा उपदेश! मी कुठे आलो मधेच, मला काही समजत नाही."

सदानंदने स्पष्टीकरण केलं-"म्हणजे आपण विसरला वाटतं? मी एके दिवशी आपल्याला चंदनबद्दल विचारलं होतं आणि महेश त्याच्याबद्दल काय म्हणाला ते ही सांगितलं होतं. आपण उपदेश केलात की दुसऱ्यांच्या मतानुसार वागलो तर माझा नाश होईल. मला वाटलं-आपण आदरणीय, परोपकारी, सदाचारी आहात. आपला उपदेश जरूर मानला पाहिजे. महेश खोटं बोलत होता असाच मी विचार केला. चंदनला पैसे देऊन आता मी गोत्यात आलो पहा."

मंद स्मित करीत पुजारी म्हणाला-"म्हणजे माझ्या उपदेशाचा नीट अर्थ तुला समजला नाही एवढेच! मी सांगितलं काय नि महेशने सांगितलं काय? ते दुसऱ्याचं मत झालं. त्यावरून आपण आपला निर्णय घेणं वा विचार बदलणं बरोबर नाही-हेच मी तुला सांगितलं होतं. ऐकावं जनाचं, करावं मनाचं! बुद्धिमान माणूस कोण कसा आहे हे स्वतःच्या अनुभवांवरून ठरवतो. याबाबत दुसऱ्यांच्या मतावर अवलंबून राहणं हा शुद्ध मूर्खपणा आहे. याला दुसरं काही नाव देता येणार नाही!"

पुजाऱ्याच्या उपदेशाचा अर्थ आता कुठं सदानंदच्या लक्षात आला. तो बाहेर पडला नि नव्याने विचार करू लागला की चंदनला दिलेले पैसे कसे वसूल करावेत?





# वीर हनुमान

रावण लंका-यज्ञ करीत आहे हे विभीषणाच्या लक्षात आले. तेव्हा विभीषण राम व वानर-वीरांना उद्देशून म्हणाला-"जर रावणाला या लंका-यज्ञात यश मिळाले तर त्यातून अनेक महा-पराक्रमी योद्धे व चतुरंग सेना निर्मित होईल. मग रावणाचा पराभव करणे आपल्याला फार कठीण होईल. म्हणून त्याच्या या यज्ञाचा भंग केला पाहिजे."

हे कसे शक्य होईल हाच तर मोठा प्रश्न होता. तेव्हा जांबवान म्हणाला-"अंगदाला अदृश्यकरणी विद्या अवगत आहे. तिच्या साह्याने आपण रावणाचा यज्ञ उध्वस्त करू शकू."

अदृश्यकरणी विद्येचा उपयोग करून अंगद अदृश्य झाला आणि त्याने रावणाच्या अंतःपुरात प्रवेश केला. त्याने राणी मंदोदरीचे केस पकडले आणि तिला फरपटत रावणाच्या यज्ञ-स्थानी आणले. हे पाहून ही रावण आपल्या यज्ञांतून उठला नाही. तेव्हा अंगद मंदोदरीला फरपटत अन्यत्र घेऊन जाऊ लागला.

मंदोदरी दुःखी अंतःकरणाने ओरडली-"त्रैलोक्य-विजेता रावणाच्या पत्नीचे संरक्षण करणारा कोणीच शिल्लक राहिला नाही का?" ते ऐकून रावण विचलित झाला आणि यज्ञ-वेदी

**३०. राम व लक्ष्मण यांचे अपहरण**



सोडून बाहेर पडला. अदृश्य स्वरूपात काम करणाऱ्या अंगदाने आता मंदोदरीला सोडलं आणि तो तेथून निघून गेला.

मंदोदरीने रावणाला सल्ला दिला-"आता उशीरा का होईना आपण रामाशी समझोता का करीत नाही?"

आपल्या अपार सैनिक-बळावर गर्व करणारा रावण आपल्या सैन्याच्या मदतीने रामाशी युद्ध करायला एक वेळी तयार झाला होता. आता परिस्थिति बदललेली होती. तरी पण रामाशी तह करण्याचा विचार त्याला रुचला नाही. तो राणी मंदोदरीला म्हणाला-"आपले बंधु-बांधव, पुत्र या सर्वांना गमावून आता एकाद्या क्षुद्र-सामान्य माणसाप्रमाणे रामाशी तह करायचा!"

लंकेतील सर्व परिस्थिति अशी असताना हजार योजन दूर असलेल्या पाताळ-लंकेत एक आणखी निराळी घटना घडत होती.

पाताळ-लंकेचा राजा होता महिरावण. त्याच्या जवळ अद्‌भुत मंत्र-शक्ति होती. जादू-टोना करण्यात तो तरबेज होता. त्याच्या मोठ्या भावाचं नाव अहिरावण.

नागलोकातील वासुकीची पुत्री चन्द्रसेना हिला महिरावणाने आपल्या जादूने पळवून आणले आणि जबरदस्तीने तिच्याशी लग्न करायचा त्याने घाट घातला. चंद्रसेना अपूर्व सुंदरी होती. तिने मनाने रामाला पति म्हणून वरलं होतं. ती महिरावणाला म्हणाली-'माझा पति तर राम आहे!' सीता-स्वयंवराच्या वेळी ती नागकन्यांसह तेथे गेली होती, तेव्हा तिने रामाला पाहिलं होत, तेव्हापासून ती रामाच्या मूर्तीची आराधना करीत आहे.

रावण लंकेच्या पश्चिमेकडील सागर-तीरी पोचला व तेथे दर्भ पसरून प्रायोपवेशनाची तयारी करू लागला. त्याच वेळी तिकडून नारद चालले होते. ते रावणाला म्हणाले-"अरेरे, हे तू रावणा काय करीत आहेस? इतका असहाय्य होऊन गेलास? मित्र व बंधुवत्





महिरावणाला तू विसरलास वाटतं?" असं म्हणून नारद तेथून निघून गेले.

महिरावणाची गोष्ट ऐकून आता रावणाच्या अंगात नवीन उत्साह संचारला. त्याने डोळे मिटून महिरावणाचे स्मरण केले. त्यावेळी महिरावण चंद्रसेनेपाशी आलेला होता. ती ज्या रामाच्या मूर्तीची आराधना करीत होती, ती मूर्ति आपल्या हाती उचलून तो म्हणाला-"मी या रामाला इथं आणून काली मातेला त्याचा बळी देणार आहे."

चंद्रसेना म्हणाली-"तो रामच तुला मारून टाकील!"

"मला मारून टाकणं इतकं सोपं का वाटतं तुला? या पाताळ-लंकेपासून हजार योजन दूर एक भयानक गुंफा आहे. तेथील एका रत्न-मंजूषेत पाच भुंग्यांच्या रूपात माझे पंच-प्राण आहेत. पेटी उघडताच पाची भुंग्यांना एकदम मारायला हवं, अन्यथा मी मरणार नाही. एक अतिभयानक पिशाच्च त्या गुंफेवर पहारा देत आहे. माझ्या प्राणांचं हरण करणारा त्रैलोक्यात कोणी नाही." असं म्हणून त्याने रामाची मूर्ति जमिनीवर आपटली नि तिचे तुकडे-तुकडे होऊन गेले.

त्याच वेळी त्याला समजलं की रावण आपले स्मरण करीत आहे. जेव्हा रावणाने डोळे उघडले, तेव्हा जमीन दुभंगून महिरावण वर आला. दोघांनी एकमेकांना आलिंगन दिले.

राम-लक्ष्मणाच्या तडाख्यातून आपली सुटका करून देण्याबाबत रावणाने महिरावणाला विनंती केली. तेव्हा महिरावण म्हणाला-"मला जे पाहिजे तेच तू मागत आहेस. मी उद्याच काली-मातेला या राम लक्ष्मणांचा बळी देतो." महिरावणाच्या तोंडून हे शब्द ऐकून रावण खुश आला. नंतर रावण त्याला आपल्या महालात घेऊन गेला.

बिभीषणाला आपल्या हेरांकडून हे वृत्त समजलं. आता रात्र झाली होती, म्हणून



दोघे ही झोपायच्या तयारीला लागले, विभीषण वानरांकडे गेला आणि महिरावणाचे वृत्त त्यांना सांगितले. आणि म्हणाला-''महिरावणाने राम-लक्ष्मणाचे अपहरण करू नये यासाठी आपण जागरूक राहिले पाहिजे. कडक पहारा ठेवला पाहिजे.'' अशी सूचना देऊन विभीषण निघून गेला.

हनुमानाने आपली शेपूट वाढवली आणि राम व लक्ष्मण यांच्या चारी बाजूंना तिचे विळखे घालून जणू एक छोटा किल्लाच बनविला आणि स्वतः त्यावर बसला. त्याने शेपटाची अशी सुरेख रचना केली की एक मुंगी ही आत जाऊ शकणार नाही.

थोड्या वेळाने विभीषण तेथे आला, हनुमानाने बनवलेल्या किल्ल्याची तारीफ केली व आपण आत जाऊन राम व लक्ष्मणाला राखी बांधणार असल्याचे सांगितले. हनुमानाने आपली शेपूट थोडी बाजूला करून विभीषणाला आत जायला वाट करून दिली.

विभीषणाने राखी बांधून झाल्यावर बाहेर येऊन तो म्हणाला-''हा महिरावण मोठा कपटी आहे. हा माझं अथवा आपल्या पैकी कोणाचं रूप घेऊन ही येऊ शकतो. म्हणून तुला फार सावध राहिलं पाहिजे.''

थोड्या वेळाने विभीषण पुन्हा तेथे आला. हनुमानाने त्याची मान पकडली आणि आपल्या गदेने त्याला मारायचा प्रयत्न करीत तो म्हणाला-''महिरावणा, हे तुझं कपट इथं माझ्यापाशी चालायचं नाही म्हटलं!''

यावर विभीषण म्हणाला-''अरेरे, त्याने धोका दिलेला दिसतोय! माझ्या रूपात महिरावण आला असावा असं वाटतंय. पहा एकदा आत. त्याने राम-लक्ष्मणाला चोरून तर नाही ना नेलं?'' हनुमानाने शेपटीच्या किल्ल्यात डोकावून पाहिलं, तर तिथे राम व लक्ष्मण दिसले नाहीत.





हे सर्व पाहून निराश होऊन हनुमान खाली बसला. तेव्हा जांबवान त्याला म्हणाला-''ऊठ, ऊठ! राम-लक्ष्मणाचं संरक्षण फक्त तूच करू शकतोस.''

पाताळ-लंकेत कसं जायचं ते विभीषणाने हनुमानाला सांगितले. नंतर आपला देह विशाल बनवून तो आकाशात उडाला.

दरम्यान झोपलेल्या राम-लक्ष्मणाजवळ गेलेल्या प्रथम विभीषणाच्या रूपातील महिरावणाने त्यांना छोट्या रूपात बदलून टाकलं नि त्यांना आपल्या कपड्यात लपवलं आणि विभीषणाप्रमाणे हनुमानाला सूचना देऊन तो थेट पाताळ-लोकात पोचला. नंतर त्याने चंद्रसेनेला राम-लक्ष्मणाचे दर्शन घडवले नि म्हणाला-''हा तुझा राम! आणि हा त्याचा छोटा भाऊ लक्ष्मण. मी उद्या सकाळी काली-मातेला या दोघांचा बळी देऊन नंतर तुझ्याशी लग्न करीन. समजलं?'' नंतर त्याने राम-लक्ष्मणाला बंदी बनवलं.

हनुमान पश्चिमेकडील समुद्रात शिरला. कमळाच्या कळीच्या आकाराचा व अग्नीप्रमाणे चमकणारा एक पर्वत त्याला दिसला. हनुमान त्या पर्वताच्या शिखरावर पोचला, तिथलं एक छोटं बिळ त्याने पाहिलं. सूक्ष्म रूप धारण करून तो त्या बिळात खाली उतरत गेला आणि पाताळ- लंकेच्या सिंह-द्वारावर पोचला.

त्या द्वारावर एक महा पराक्रमी युवक पहारा देत होता. त्याच्या चेहऱ्यावर झळकणारा पराक्रम पाहून हनुमान प्रेमाने त्याच्याकडे पाहू लागला. त्याला या युवकाबद्दल आपुलकी व प्रेम वाटू लागले.

हनुमान सूक्ष्म रूपात असला तरी द्वारपालाने त्याला ओळखले व विचारू लागला-''कोण आहेस तू? माझ्या नजरेतून सुटून तू आत जाऊ इच्छित असलास, तर ऐक - माझ्या हातून तुला निश्चित मृत्यु येणार. आणि आपल्या मुठी घट्ट आवळून जणू लढायला तयार झाला.



द्वारपालाचा हा पराक्रम पाहून हनुमानाला मोठे आश्चर्य वाटले. त्याने विचार केला-हा कोणी ही असला तरी माझ्या सारख्याशी लढायला तयार झालेला आहे. थोडा वेळ त्याची गंमत करून मग त्याचा अंत करावा. तो दमल्यासारखा तिथे बसून राहिला.

द्वारपाल युवकाला वाटलं कि आपला शत्रु दमून-भागून हारला आहे. मोठ्या आवेशात येऊन हसत ओरडला-"हे मायावी, माझ्याशी लढायला आलास? तू मला काय समजलास? मी मत्स्यवल्लभ आहे. महान् वीर हनुमान माझे वडील आहेत, ठाऊक आहे तुला?"

जेव्हा तो युवक असं म्हणाला तेव्हा हनुमानाला मोठं आश्चर्य वाटलं, नि राग ही आला. दातांवर दात आपटीत तो म्हणाला-"अरे बेट्या, हनुमान आजन्म ब्रह्मचारी आहे हे सारं जग जाणत आहे. मग तो तुझा बाप कसा असू शकेल? शुद्ध खोटं बोलत आहेस, म्हणून तुला मृत्यूचीच शिक्षा दिली पाहिजे." असं म्हणून हनुमान त्याच्यावर तुटून पडला.

आपल्या मजबूत हातांची मूठ वळून हनुमान त्याला मारणार इतक्यात मागून एक आवाज आला-"स्वामी, थांबा! आपला क्रोध थोडा ताब्यात ठेवा!"

हनुमानाने लगेच मागे वळून पाहिले, विजेप्रमाणे चमकणारी एक सौंदर्यवती धावत-पळत त्याच्याकडे येत असलेली दिसली. हनुमान आश्चर्याने पहातच राहिला. त्या युवतीने जवळ येऊन लवून आदरपूर्वक हनुमानाला नमस्कार केला नि म्हणाली-

"हा मुलगा जे काही म्हणाला ते सर्व सत्य आहे. माझं नाव आहे सुवर्चलादेवी. दक्षिण सागर माझे वडील. असंख्य जलचरांची मी राणी आहे. प्रभु, मी तुम्हाला ओळखते, पण तुम्ही मला ओळखत नाही. एकदा तुम्ही समुद्र पार करून चालला होता. तेव्हां सिंहिकेची सावली तुम्हाला पकडून ओढू लागली,

तुम्ही तिच्याशी लढू लागला. त्यावेळी मी मत्स्य-रूपात तिथे पोहत होते. तुम्ही सिंहिकेला ठार केलंत आणि घामाने भरलेला आपला हात झाडला. तेव्हा घामाचे काही थेंब माझ्या तोंडात पडले. मी ते गिळून टाकले आणि गर्भवती झाले. नंतर माझ्या पोटी हा मत्स्यवल्लभ जन्माला आला. अशा रीतीने हा बालक तुमचाच पुत्र आहे व तुम्ही त्याचे पिता आहात.

सुवर्चलेचे बोलणे संपले, तेव्हा हनुमानाने एक दिव्य वाणी ऐकली- "हनुमान, सुवर्चला जे काही म्हणाली ते सगळं खरं आहे! मत्स्यवल्लभ तुझाच मुलगा आहे."

हनुमानाला सर्व ऐकून आश्चर्य वाटलं, तो काही बोलू मात्र शकला नाही.

तेव्हा सुवर्चला पुढे येऊन म्हणाली-"मत्स्यवल्लभ लहानपणापासूनच मोठा धैर्यशाली नि साहसी आहे या माझ्या महापराक्रमी मुलाला महिरावण उचलून घेऊन गेला आणि त्याला गुलाम बनवलं. दिव्य वाणी झाली की तुमच्या दर्शनानेच याला या गुलामीतून मुक्ति मिळेल. आता याला तुमचं दर्शन घडलं. आजपासूनच माझा मत्स्यवल्लभ दासतेतून सुटणार!"

पुन्हा दिव्य वाणी ऐकू आली-"होय, सुवर्चला जे काही म्हणते आहे, ते सर्व खरं आहे. मत्स्यवल्लभ हनुमानाचाच मुलगा आहे!"

तेव्हा मत्स्यवल्लभाने नम्रपणे हनुमानाला नमस्कार केला. हनुमानाने आपल्या पुत्राला प्रेमाने आलिंगन दिले.

यावर सुवर्चलाला खूप आनंद झाला. हर्षभरे ती हनुमानाला म्हणाली-"तू चन्द्रसेनेकडे जा. महिरावणाच्या प्राणांचं रहस्य तिला ठाऊक आहे. ती तुला सर्व प्रकारे मदत करील." असं म्हणून तिने हनुमानाला नमस्कार केला. नंतर सुवर्चला आपल्या मुलाला घेऊन तेथून निघाली.





# दिवसाढवळ्या भूत!

गोष्ट खूप जुनी आहे. बगदादमधे अब्दुल्ला नावाचा एक अमीर माणूस रहात असे. त्याला गोष्टी ऐकण्याचा फार छन्द होता. त्या गोष्टीसुद्धा भुतांच्या गोष्टीच असाव्या असा त्याचा आग्रह असे. रोज कमीत कमी एक तरी अशी गोष्ट ऐकल्यावाचून त्याला झोपच येत नसे!

शहरात तो दवंडी पिटवत असे की-'भुताखेतांच्या गोष्टी सांगणाराला मोठं बक्षिस देण्यात येईल.' बक्षिसाच्या लोभाने खूपशी माणसे गोष्टी सांगण्यासाठी त्याच्याकडे येत. परंतु गोष्ट सांगता सांगता त्यांना मधेच थांबवून तो म्हणे-'अरे, ही नको, यापेक्षा चांगली गोष्ट सांग.' अन् अशा प्रकारे गोष्टी सांगणारांना तो त्रास देई. ती माणसे बिचारी कंटाळून तेथून निघून जाऊ पाहात, तर अब्दुल्लाला फार राग येई. "गोष्ट सांगता येत नव्हती, तर आलासच का माझ्याकडे? बदमाश! माझा वेळ फुकट घालवलास! थांब, तुला याबद्दल चांगली शिक्षा करतो!" आणि मग अशा माणसांना तो चाबकाने फोडून काढत असे.

एके दिवशी हमीद नावाचा एक काडी पहिलवान अब्दुल्लाला भुताची गोष्ट सांगू लागला. अगदी तुमच्यासारखाच, माझ्या बायकोलाही भुताखेतांच्या गोष्टी ऐकायचा छन्द होता. पण ती स्वतः फार भित्री होती, अंधाराची फार भीती वाटे तिला! एकदा मध्यरात्रीच तिनं भुताची गोष्ट मी सांगावी, म्हणून हट्ट धरला. सर्वत्र दाट काळोख पसरलेला होता, मी नकार दिला. पण ती ऐकेचना! मग मी तिला एक खूप भयानक अशी गोष्ट सांगितली. ती ऐकून

**अरबस्तानातील लोककथा**

ती इतकी घाबरली-इतकी घाबरली, की भयानं तिचं हृदयच बन्द पडलं. अन् मरून गेली ती!" हमीद म्हणाला.

"आहा! ही काय गोष्ट झाली?" असे रागाने म्हणत अब्दुल्ला चाबूक अुचलू लागला.

"थांबा हुजूर! खरी गोष्टी अजून सुरूच व्हायची आहे! सकाळी मी बायकोला दफन करून घरी आलो अन् आपल्या खोलीत जेंव्हा गप्प बसून राहिलो, तेंव्हा माझ्या डोळ्यासमोर कसलासा प्रकाश चमकू लागला. नंतर त्या ठिकाणी मला आपल्या बायकोचं भूत दिसू लागलं. ती मला म्हणाली-"तुम्ही नकार दिलात तरी, मीच हट्टानं तुम्हाला भुताची गोष्ट सांगायला लावली, त्याचाच परिणाम मी आता भोगते आहे."

इतक्यात त्याला थांबवत अब्दुल्ला म्हणाला, "मग, यात विशेष काय घडलं?"

"आहा! भूत दिवसाढवळ्या दिसलं-ही काय विशेष गोष्ट नव्हे?" हमीदने अब्दुल्लाला आव्हान देत विचारले.

आपली दाढी कुरवाळत अब्दुल्ला म्हणाला, "विचित्र आहे, हे खरं! पण दिवसा भूत दिसू शकतं यावर विश्वासच नाही माझा!"

"अं? का नाही दिसणार दिवसा? मी नाही आलो आत्ता तुमच्यासमोर दिवसाढवळ्या? एका महिन्यापूर्वी मी तुमच्याकडे गोष्ट सांगायला आलो होतो अन् चाबकाचा खूपसा मार खाअून निघून गेलो. नंतर अंथरूणच पकडलं मी, अन् मरून गेलो. आत्ता भूत-रूपानंच आलोय मी तुमच्यासमोर!" असे म्हणून त्या हमीदच्या भुताने आपले डोके धडापासून वेगळे करून चेंडूसारखे हवेत अुडवले.

ते पाहून अब्दुल्ला जोराने किंचाळला. पुढे कधीही भुताची गोष्ट अैकण्याच्या फंदात पडला नाही तो!





# सुनेचे धन

पार्वतीला एकुलता एक मुलगा होता शिवकुमार. नवऱ्याच्या पश्चात् पार्वतीनेच आई-वडील बनून शिवकुमारचे पालन-पोषण केले. आपल्या नात्यांतील सुजाता नावाच्या एका मुलीला पार्वती आपली सून बनवू इच्छित होती. पण शिवकुमारने मात्र आपल्याच गावातील पद्मा नावाच्या एका मुलीला पसंत केले होते. पद्मा शिवकुमारला हळू हळू आपल्या मोह-पाशात ओढते आहे अशी पार्वतीला शंका येई. म्हणून एके दिवशी पार्वती स्वतःच पद्माला भेटायला गेली.

पद्मा एका श्रीमंत कुटुंबातील मुलगी होती. ती दिसायला फार नाजुक होती. पार्वती पद्माला म्हणाली-"आम्ही तर गरीब आहोत, माझा मुलगा मात्र फार चांगला आहे. तू जे म्हणशील तो ते करील असा विचार करूनच तू त्याला आपल्या जाळ्यात ओढले आहेस ना?"

"असं नाही सासू बाई, आम्ही दोघांनी एकमेकांना चांगलं पारखलं आहे, आमचं एकमेकांवर प्रेम आहे. तुम्ही आशीर्वाद दिलात तर आम्ही दोघे विवाहबद्ध होऊं!" पद्माने आपले मनोगत सांगितले.

"मग नीट ऐक. जर खरोखर तुझं माझ्या मुलावर प्रेम असेल तर माझी एक अट आहे. माहेरून एक पैसा ही माझ्या घरी येता कामा नये. घरातील सर्व कामे तुला एकटीलाच करावी लागतील. आहे तुझी तयारी?" पार्वतीने पद्माला प्रश्न केला.

पद्माने होकारार्थी मान हलवली. घरी परत आल्यावर मुलाला बोलवून पार्वती

पद्माकर सुखदेव



म्हणाली-''सुजाताला डावलून तू पद्माशी लग्न केलंस तर तूच बदनाम होशील. पैशांच्या लोभाने तू पद्माशी लग्न केलंस असं लोक म्हणतील. मला ही बदनामी सहन होणार नाही. म्हणून मला वाटतं तू सुजाताला डावलू नयेस.''

आपली नापसंती दाखवीत शिवकुमार आईला म्हणाला-''असं असेल तर मी तिच्याहून अधिक गरीब मुलीशी लग्न करीन, पण सुजाताशी मी मुळिच लग्न करणार नाही.''

मुलाचं बोलणं ऐकून पार्वतीला थोडं बरं वाटलं. म्हणाली-''तर मग तू पद्माशीच लग्न कर. पण लग्न झाल्यावर तिने माहेरच्यांकडून काही मदत घेऊ नये. ही माझी अट तुला मान्य आहे?''

शिवकुमारने ही अट मान्य केली. लग्न झालं नि पद्मा त्या घरची सून बनून आली. पार्वतीने मुलाच्या समोरच सुनेला आपल्या सर्व अटी सांगितल्या. ऐकून पद्मा म्हणाली-''सासूबाई, तुम्ही म्हणाल ते सर्व करायची माझी तयारी आहे. मी जरी श्रीमंत घरची मुलगी असले तरी मला घरातली सगळी कामं करता येतात. पण कोणी पहात असलं तर मला छोटं काम ही करता येत नाही. म्हणून मी जेव्हा काम करीत असेन तेव्हा कोणी पाहू नये एवढीच माझी अट आहे.''

पार्वती काही म्हणणार इतक्यात शिवकुमारच म्हणाला-'आई, तुला हे कबूल केलेच पाहिजे.' पार्वती काही बोलू शकली नाही. पद्मा कसं काम करीत असे हे पार्वतीला पाहता आलं नाही. पण घरातील सर्व भांडी स्वच्छ दिसू लागली. सर्व वस्तु जागच्या जागी व्यवस्थित ठेवलेल्या दिसू लागल्या.

पद्मा सगळी कामे कशी करते हे जाणण्याची उत्सुकता पार्वतीला होती. तरी पण मनोमनी तिला संतोष असे.

असे काही दिवस गेले. पार्वतीचा भाऊ शिवराज एकदा तिच्या घरी आला नि म्हणाला-'माझी मुलगी, सुजाताचं लग्न ठरलं!' पार्वतीला आनंद झाला. तिने विचारलं-'नवरा मुलगा कुठला? काय काम करतो?' यावर शिवराज म्हणाला-''पैशांच्या लोभाने बहिणीने मला डावललं, फार चांगलं स्थळ मला कसं मिळणार?''

पार्वतीला जरा वाईट वाटलं. आपल्या सुनेबाबतच्या अटी तिने शिवराजला सांगितल्या. त्या सर्व ऐकून शिवराज म्हणाला-''तुझं घर पाहताच लक्षात येतं की सूनबाई सगळी कामं नौकरांकडून करून घेतात!''

हे ऐकून पार्वतीला आश्चर्य वाटलं. दुसऱ्या दिवशी तिने लपून पहायचा प्रयत्न केला, तेव्हा तिला वस्तु-स्थितीची कल्पना आली. पद्माने घराची दारं लावली की मागचा दरवाजा उघडून ती नोकरांना आत बोलवी. एक भांडी घासे तर दुसरा कपडे धुई. कोणी घर झाडून काढी, तर कोणी स्वयंपाक करी. पद्मा आरामात चित्रे काढीत बसे.

हे सगळं पाहून पार्वती मुकाट बसू शकली नाही. मुलगा रात्री घरी आल्यावर तिने सुनेला समोर बोलवले नि आपल्या डोळ्यांनी पाहिलेले सर्व सांगून तिला स्पष्टीकरण विचारले. पद्मा जरा ही न घाबरता म्हणाली-''सासूबाई, मी स्वतःच सगळी कामं करावीत असं



तुम्हाला का वाटतं?''

पार्वतीने विचारले-''एवढे नोकर-चाकर इथं काम करताहेत, त्यांचा पगार कोण देतं? मी सांगितलं होतं, तुझ्या माहेराहून एक पैसा ही येता कामा नये!''

पद्माने स्पष्टपणे सांगितलं-''सासूबाई, मी माहेराहून एक पैसा सुद्धा मागवीत नाही. मी जी चित्रे काढते ती शहरात विकून तुमचा मुलगाच खूप पैसे आणीत असतो! विचारा त्याला.''

''आपण रोज मेजवान्या झोडीत असतो. तुझी चित्रं विकून एवढा का पैसा मिळतो, सूनबाई?'' पार्वतीने

धमकावणीच्या सुरात विचारले.

शिवकुमारने मधेच दखल दिली-"आई, आज घरात जर स्वयंपाक करायला बाई आहे, तर आपण चारी ठाव जेवण का करू नये?" अशा विचारानेच मी सर्व व्यवस्था केलीय बघ. हल्ली मी सुद्धा अधिक कष्ट करून अधिक पैसे मिळवतो. आई नि बायको यांना सुख देण्यासाठी मी या वयात दोन काम जास्त केली तर काय बिघडलं?"

तेव्हा तिथे हजर असलेला शिवराज म्हणाला-"होय तर, माझी मुलगी असे पैसे मिळवू शकत नाही, तिला चित्रे काढता येत नाहीत. नवऱ्याकडून जास्त काम तिला करवून घेता येत नाही. हो की नाही? पार्वती बाई, पैशांसाठीच तुम्ही या सुनेला घरात आणलीय! पहातो कसं 'नाही' म्हणतेस ते!"

पार्वती झटकन शिवराजकडे वळून म्हणाली-"माझं एवढंच म्हणणं की सुनेनं माहेरून पैसे आणू नयेत. जर तिने स्वतः पैसे मिळवले, अन् नवऱ्याला अधिक पैसे मिळवायला लावले, तर त्यात माझं काय बिघडलं? सून स्वतः कमावते आणि घरात खर्च करते ही तर माझ्या भाग्याची गोष्ट नाही का? तू पण सुजाताला असं काही शिकव, की तिने स्वतः पैसा मिळवावा अन् सासरकडच्या लोकांचं सुख-समाधान वाढवावं!"

आता शिवराजला काही बोलता येईना. तो आल्या वाटेने परत गेला. पद्मा आणि शिवकुमार यांनी पार्वतीच्या पायांवर मस्तक ठेवून माफी मागितली. तेव्हा पार्वती म्हणाली-"जर माझी सून चित्रे काढते, तर घरातली कामं मी का तिच्याकडून करून घेऊं? माझं भाग्य मोठं की मला असा सुरेख मुलगा नि सून मिळालेली आहे." असं म्हणून पार्वतीने जोडप्याला आलिंगन दिलं. तिच्या डोळ्यात आनंदाश्रू तरळले.



# चांदोबाच्या बातम्या





## झुकता मनोरा

इटलीतील पिसा येथील झुकता मनोरा आजच्या युगातील एक आश्चर्य मानला जातो, म्हणून जगातील हजारो प्रवासी तो पहायला जातात. काही लोक सतत कुजबुजत असतात की जेव्हा ही नगरी विशेष प्रसिद्ध नव्हती, तेव्हा लोकांना आपल्याकडे आकर्षित करण्यासाठी हा मनोरा असा झुकता बांधण्यात आला. पण वस्तु-स्थिति मात्र अशी नाही. अलीकडे या गोष्टीचा शोध लागला आहे की सन ११७३ मध्ये जेव्हा हा मनोरा बांधण्यात आला तेव्हा जवळच एक मोठा खड्डा होता. जवळ जवळ दहा वर्षे तो भरण्याचे काम चालू होते. या खड्ड्यात भरलेली माती जेव्हा धसू लागली तेव्हा मनोरा असा झुकू लागला. वर्षानुवर्षे मनोऱ्याचे हे झुकणे चालूच आहे. कधी कधी हा एक वर्षात १ सें.मी. पर्यंत झुकतो.

## वयाच्या पाचव्या वर्षीचे भूगोल-ज्ञान

मद्रासच्या एका नर्सरी स्कूलमधे पाच वर्षांची श्रीविद्या पहिल्या इयत्तेत शिकत आहे. तिच्या पाठ्यक्रमात भूगोल हा विषय नसला तरी तिचे भूगोलाचे ज्ञान अकटोविकटच म्हणायला हवे. जगातल्या राजधान्यांची शहरे, निरनिराळी अशी मोठी शहरे, समुद्र, वाळवंटे, नद्या, सरोवरे इत्यादींची नावे ती सांगू शकते. 'अॅटलास' उघडून आपण विचारलेले कोणतेही स्थान ती नकाशावर दाखवू शकते. भूगोलातला कोणताही प्रश्न विचारला तरी ती ताबडतोब बरोबर उत्तर देते. तिला विचारले की झिंबाब्वेची राजधानी कोणती? तर ती ताबडतोब उत्तर देईल-'हरारे'! यु.एस्.ए. च्या नैशनल जॉग्रफिक सोसायटीचे सभासदत्वही नुकतेच तिला मिळाले आहे. दोन वर्षांची असतानाच अॅटलास व निरनिराळ्या देशांचे नकाशे पहाण्यात तिला खूप मजा वाटू लागली व आपल्या मामाच्या मांडीवर बसून कित्येक देशांचे नकाशे, अॅटलास वगैरे मोठ्या बारकाईने पाहून ती आपल्या मेन्दूत भूगोलाचे ज्ञान भरून घेऊ लागली होती.

## एक विचित्र बचाव

पॉल एड्मंड्स् हा इंग्लंडचा फुटबॉल खेळाडू व प्रसिद्ध गोलकीपर होय. २८ वर्षे वयाच्या या खेळाडूने खेळाच्या मैदानात आतापर्यन्त किती गोल वाचवले, हे सांगणे कठीण आहे. परन्तु ११ ऑगस्टला या फुटबॉल खेळाडूने जो बचाव केला होता, तो मात्र फारच निराळा आणि विचित्र प्रकारचा म्हणायला हवा. हा बचाव तो आपल्या आयुष्यभर कधी विसरणे शक्य नाही. त्या दिवशी एक सामना संपवून घरी परत निघाला असता, वाटेत १२ मीटर (जवळजवळ ४० फूट) उंचीवरील एका खिडकीतून खाली वाकणारी दोन वर्षांची मुलगी कॅली ही त्याला दिसली. ऐन वेळी खिडकीखाली पोचून खिडकीतून खाली पडणाऱ्या या मुलीला झेलून त्याने तिचा बचाव केला. या बालिकेची इंग्लंडच्या स्टीव्हनेज मधे रहाणारी आई नेहमी म्हणते, "तो तर आम्हाला एक महान वीरच वाटतो."



# गाढवाचे ज्योतिष

सुधारा नदीच्या किनाऱ्यावरील एका गावात एक प्रसिद्ध ज्योतिषि रहात असे. त्याच्या सारखं अचूक भविष्य वर्तवणारा कोणी ज्योतिषि आसपासच्या गावात नव्हता.

हळू हळू या ज्योतिषाची कीर्ति राजापर्यंत पोचली. तेथील राज्य-कर्मचाऱ्यांनी त्याला राजधानीत बोलवलं. थोड्याच दिवसात त्याला राजाश्रय ही मिळाला. त्याने सांगितलेले भविष्य-फल अचूक मानले जाऊ लागले.

ज्योतिषाला हळू हळू उच्चपदस्थ अधिकाऱ्यांचे प्रेम लाभले नि त्याने खूप संपत्ति जोडली. आपल्या गावात नदीच्या किनाऱ्यावर शेकडो एकर जमीन त्याने खरेदी केली. पिके काढण्याच्या सुमारास ज्योतिषि आपल्या गावी आला. खळ्यात धान्याच्या राशी लागल्या.

ज्योतिषि घरी आला, दुपारचं जेवण केलं नि थंड हवा खाण्यासाठी घराबाहेरील चबुतऱ्यावर येऊन बसला. त्यावेळी गावचा धोबी घाटावर कपडे धुऊन ते आपल्या गाढवावर लादून घराकडे परत येत होता.

ज्योतिषाला पाहून धोबी अमळ थांबला आणि त्याला सांगू लागला-"मालक, आपलं सारं धान्य खळ्यांवर पडलंय-लवकर घरी आणा, उशीर नका करू आता!"

"आणीन सावकाश, अशी काय त्याची गडबड?" ज्योतिषि म्हणाला.

धोब्याने खबर दिली-"थोड्याच वेळात तुफान येऊन मुसळधार पाऊस पडणार आहे!"

२५ वर्षांपूर्वी चांदोबात प्रकाशित झालेली गोष्ट

हसून ज्योतिषि म्हणाला-"वा रे वा तुझं भविष्य! मोठ्या लोकांपुढे असं अज्ञान-प्रदर्शन करीत जाऊ नकोस."

"महाराज, मी आपल्या भल्यासाठीच हे सगळं सांगत आहे. भविष्य-ज्योतिष वगैरे मला काही कळत नाही. आता काही तासात निश्चित तुफान होणार. ताबडतोब शेतावर गाड्या पाठवा आणि सगळं धान्य घरी आणवा. खळ्यावर थोडं धान्य ही राहू देऊ नका. नाहीतर सोन्यासारख्या धान्याचा नाश होईल." इतकं सांगून धोबी आपल्या गाढवाला हाकत घराकडे निघून गेला.

धोब्याच्या अडाणीपणावर ज्योतिषि हसला आणि मुकाट्याने बसून राहिला.

एक तास गेला. ज्योतिषाने एकदा आकाशाकडे पाहिले. पश्चिमेच्या बाजूला आकाशात त्याला एक छोटा ढग दिसला, नंतर थोड्याच वेळात जंगली हत्तींच्या झुंडीप्रमाणे गर्जना करीत आकाशात ढग जमू लागले. चहूंकडे अंधार दाटून आला. तुफानी वारे वाहू लागले. आकाशात कडाडून विजा चमकू लागल्या.

ज्योतिषाला काही सुचेना. आता काही उपाय नव्हता, तो काही करू शकत नव्हता. धोब्याने सूचना दिली तेव्हाच काही केलं असतं तर सगळं धान्य घरी आणता आलं असतं. शास्त्रानुसार या दिवसात पावसाची शक्यता नव्हती, म्हणून त्याने धोब्याच्या ज्योतिषावर



विश्वास ठेवला नव्हता.

आता ज्योतिषाच्या मनात एकच शंका राहिली की शेवटी धोब्याला हे येणारं तुफान कसं समजलं? त्याला पण ज्योतिषशास्त्राचं ज्ञान होतं काय?

तुफान आलं नि गेलं. पाऊस जसा थांबला, तसा ज्योतिषि घरातून बाहेर पडला नि थेट धोब्याकडे आला. त्याने धोब्याला विचारले-"अरे, तू सांगितल्याप्रमाणे तुफान आलं. तू ज्योतिषशास्त्र जाणतोस हे मी मान्य करतो. नाहीतर इतकी हमखास भविष्यवाणी तू कशी करू शकशील? तू हे ज्योतिषशास्त्र कुठं शिकलास हे मला सांगशील?"

धोब्याला हसू आलं, तो म्हणाला-"महाराज, या ज्योतिषाच्या बाबतीत माझा गुरु म्हणजे माझं गाढव! माझं गाढव इतकं सुरेख भविष्य-फल जाणतं की त्याच्यापुढे सगळे ज्योतिषशास्त्रावरील ग्रंथ फिके पडतील. काही तासांनी पाऊस पडणार असेल तर माझ्या गाढवाच्या अंगावरचे केस उभे राहतात. त्याचे कान ताठ होतात नि डोळे वर करून ते आकाशाकडे पाहू लागते. येणाऱ्या पावसाची ते उतावीळपणे वाट पाहू लागते. मग आपली शेपूट दाबून ते इकडे-तिकडे धावू लागते. त्याची ही भविष्यवाणी अगदी अचूक असते, एवढंच मी सांगू शकतो."

ज्योतिषि तेथून जाताना धोब्याला म्हणाला-"हे बघ, जे झालं ते झालं. आजची ही घटना तू कुणाला सांगू नकोस, नाही तर माझी सगळी कीर्ति धुळीस मिळेल." तरी पण लोकांना ही घटना कळलीच. ज्योतिषाच्या व्यवसायावर याचा परिणाम झाल्यावाचून राहिला नाही. भविष्य जाणण्यासाठी त्याच्याकडे येणाऱ्या लोकांची संख्या हळू हळू कमी होत गेली.



# बहुरूपा वसुंधरा



## मगरी-सुसरीही कधीकधी भयप्रद नसतात!

मगरी-सुसरी दिवसा जेंव्हा पाण्याबाहेर येअून अुन्हात बसतात, त्यावेळी बहुधा त्या भयप्रद नसतात. अशा वेळी त्यांच्या शरीरावर बसलेले किडे, जळवा आणि घुंघुरटी वगैरे खाण्यासाठी पक्षी त्यांच्या अंगावर बसायला, बागडायला मुळीच भीत नाहीत. इतकेच नव्हे, तर त्यांचे जबडे अुघडे असतात, तेव्हां आत अडकलेले मासाचे तुकडे वगैरे काढून आणण्यासाठी ते खुशाल आतही प्रवेश करतात! परन्तु रात्रीच्या वेळी जेंव्हा या मगरी-सुसरी पाण्यात शिरतात तेंव्हा मात्र हे चित्र एकदम बदलून जाते. कारण त्यावेळी त्या शिकार करून आपले पोट भरण्याच्या मागे लागलेल्या असतात. मासे, बेडूक व अन्य किडे त्यांना सहजपणे मिळून जातात; पण जेंव्हा एकादे जनावर पाणी पिण्यासाठी किनाऱ्यावर येते, तेंव्हा त्यांचीही शिकार या करतात. असे जनावर त्यांच्या टप्प्यात आले, की ते पकडून या पाण्यात घेअून जातात. बुडवल्यामुळे ते जनावर मेले, की मगरी-सुसरी त्याला आपटून मोडून-तोडून ते तुकडे गिळून टाकतात. त्यांना आपल्या दातांनी चावता येत नाही.



## अुडण्याची पुच्छप्रगति

क्वेझाल हा ग्वाटेमालाचा राष्ट्रीय पक्षी. यातला नर हा जगातला फार सुन्दर पक्षी मानला जातो. याचे शरीर ३५ सें.मी. इतके लांब असते. आणि त्याची शेपूट शरीरापेक्षा दुप्पट लांब असते. या पक्ष्याचे वैशिष्ट्य असे, की हा जेंव्हा झाडावरून अुडायला सुरुवात करतो, तेंव्हा सरळ पुढे न अुडता, तो अगोदर थोडासा शेपटीच्या बाजूकडे अुलटा अुडतो अन् मग पुढे जातो. हा द्राविडी प्राणायाम आपल्या शेपटीची पिसे एकाद्या फांदीला लागून मोडू नयेत म्हणून असतो. झाडाच्या फांद्यांना असणाऱ्या भोकात मादा अंडी घालतात. ती अुबवण्याचे काम नर करतात. असे करताना त्यांच्या लांब-लांब शेपट्या बाहेर लटकत असतात.

## चमकणारे (प्रकाश देणारे) प्राणी

चमकणाऱ्या प्राण्यात काजवा हा सर्वसामान्य प्राणी होय. ते आपल्या साथीदारांना आकर्षित करण्यासाठी असे चमकत रहातात. चमकत्या डोळ्यांच्या माशांचा जो प्रकाश दिसतो, तो त्यांच्या डोळ्यात असणाऱ्या चमकदार जीवाणूंमुळे दिसतो. आपल्या डोळ्यांजवळ असणाऱ्या कातडीचा अुपयोग करून, हा मासा प्रकाश बन्द करू शकतो. ब्राझीलमधील आदिवासी आपल्या रस्त्यावर अुजेड पाडण्यासाठी एक प्रकारच्या भुंगेऱ्यांचा अुपयोग करत असत. या भुंगेऱ्यांच्या खालच्या भागातून प्रकाश झिरपत असे.









# ऐक्याचा झेंडा फडकत ठेवू या!

४५ वर्षांपूर्वी तुमचे आवडते मासिक 'चांदोबा' सुरु झाले. त्या काळात अनेक महत्त्वाच्या घडामोडी घडल्या. एका बाजूला परकीय सत्तेविरुद्ध दिलेला लढा संपुष्टात आला, तर दुसऱ्या बाजूला देशाचे भारत नि पाकिस्तान मध्ये झालेले विभाजन आपल्याला पत्करावे लागले.

त्यावेळी भारतीयांनी आपल्या उज्ज्वल भविष्याची स्वप्ने पाहिली. त्यांना वाटले की परकीय अमलाखालील आपले दुर्दिन संपले आणि धार्मिक द्वेष ही आता इतिहास बनला. आता आपला पुढील काळ शांतिपूर्ण ऐक्याचा, प्रगति व समृद्धीचा आहे.

पण दुःखाची गोष्ट आहे की ते सर्व दिवा-स्वप्न ठरले. सर्व हुतात्म्यांच्या आशा-आकांक्षा फोल ठरल्या.

अनेक दुर्दैवी घटना घडल्या, धर्म व राजनीतीने आपल्या घरात भेदाच्या भिंती उभ्या केल्या तरी आपल्या उज्ज्वल भविष्याला तडा जाणार नाही. कारण सर्व धर्मांच्या वर एक सत्य आहे की आपण सर्व एकाच परमेश्वराची लेकरे आहोत, सर्व राजनैतिक विचार-प्रणालींवर एक सत्य आहे की आपण सर्व भारतीय आहोत. आम्हांला आपला सर्वनाश करायचा नसेल व भावी पिढ्यांच्या प्रगतीचा मार्ग सुकर करायचा असेल तर हे आपण नीट जाणले पाहिजे.

प्राणीमात्रात परमेश्वर पाहण्याची व सर्वांबाबत प्रेम-भावना बाळगण्याची शिकवण हिंदू धर्म-ग्रंथ देतात. मुसलमानांचा पैगंबर महंमद म्हणतो-''परमेश्वराला सर्वाधिक आवडणारी कोणती गोष्ट असेल तर त्याच्यावरील भक्ति!'' येशू ख्रिस्त म्हणतो-''तुम्ही स्वतःवर जितके प्रेम करता, तितकेच शेजाऱ्यावर ही करा.'' मग आपण जेव्हा एकमेकांचा द्वेष करतो, तेव्हा आपण कोणत्या धर्माचे पालन करतो? आपण धर्माचे पालन करीत नाही, केवळ आपल्या अज्ञानाचे प्रदर्शन करतो.

तुमचे मासिक भारताच्या विविधतेतील एकतेचे प्रतीक आहे. ते अनेक भाषातून बालकांना तोच तो आनंद देते, तेच ते वैचारिक खाद्य पुरविते. म्हणूनच जातीय दंग्यांमुळे भारताच्या ऐक्याचा ध्वज खाली आलेला पाहताना चंदामामाला दुःख वाटते. अर्थात् हे तर निश्चितच आहे की भारताच्या इतिहासातील ही एक तात्पुरती अवस्था आहे. ती संपलीच पाहिजे. म्हणून मित्रांनो, चंदामामाचे वाचकांनो, ती लवकर संपुष्टात कशी येईल हे तुम्ही पाहिले पाहिजे. आजच्या बिघडलेल्या वातावरणातून नवा सूर्योदय झालेला आपणास पहायचा आहे.

जय हिन्द!

**बी. विश्वनाथ रेड्डी**
**-चन्दामामा प्रकाशनासाठी**

विश्व-समाचार




# नोबेल शांति-पुरस्कार



या वर्षी पण नोबेल शांति-पुरस्कार एका महिलेलाच मिळाला. गेल्या वर्षी हे पारितोषिक मियानमार (पूर्वीचा ब्रह्मदेश) च्या श्रीमती आंग सान सू चीला मिळाले होते. या वर्षी हे पारितोषिक ग्वाटेमालाची कुमारी रिगोबेर्टा मेंचूला मिळाले. कु.मेंचू सध्या आपला देश सोडून मेक्सिको मध्ये प्रवासी जीवन जगत आहे.

तिला दिल्या गेलेल्या प्रशंसा-पत्रात नोबेल पारितोषिक समितीने म्हटले आहे-''स्वदेशात, अमेरिकेत व साऱ्या जगात निरनिराळ्या जाति व संस्कृतींमध्ये जो भेदभाव व संघर्ष आज आहे, तो दूर करून शांति व ऐक्य निर्माण करण्याची अद्भुत शक्ति मेंचूमधे आहे.''

कुमारी मेंचूचा जन्म तेहेतीस वर्षांपूर्वी एका गरीब कुटुंबात झाला. गेल्या तीन दशकात ग्वाटेमाला मध्ये चाललेल्या अंतर्युद्धात तिच्या परिवाराची वाताहत झाली. अनेक मध्य व दक्षिण अमेरिकेतील देशांप्रमाणे ग्वाटेमाला मधे पण, युरोपातील देशातून येऊन राहिलेले लोक व तेथील मूळचे रेड इंडियन यांच्यात बेबनावाचे वातावरण व्यापून राहिले आहे. सन १९७०-८० या काळात तेथील मूळच्या रहिवाशांवर अनेक प्रकारे अन्याय केला गेला. श्रीमंत जमीनदार व सैनिकांनी जो भयंकर नर-संहार केला, त्यात मेंचूला आपले आई-वडील व एक भाऊ यांना गमवावे लागले. तेव्हा मेंचू वीस वर्षांची होती. तेव्हांपासून तिने सामान्य जनतेसाठी लढा देण्याचा निश्चय केला. ग्वाटेमालाच्या सैनिकांविरुद्ध लढण्याची पाळी आली तेव्हा तिला गनिमी

काव्याने युद्ध करणे भाग पडले. तोपर्यंत दक्षिण-पंथी सुरक्षा-सेनेने ग्वाटेमालातील ५०,००० हून अधिक स्वदेशियांना मारून टाकले होते, त्यांच्यापैकी अधिक लोक रेड इंडियनच होते. गेल्या तीस वर्षात सतत चालू असलेल्या या संघर्षात १,२०,००० हून अधिक लोकांना आपले प्राण गमवावे लागले.

मेंचूच्या कार्य-पद्धतीला आपण अहिंसात्मक म्हणू शकत नाही, तरी तिचे सिद्धांत शांतिवादी व सहजीवनाचे समर्थक होते. मानवी अधिकारांचे संरक्षण व मानवाचे कल्याण हाच तिच्या लढ्याचा उद्देश होता.

या संबंधी नोबेल पारितोषिक समितीचा एक प्रतिनिधि म्हणतो-"असे विश्वासपूर्वक म्हणता येईल की अमेरिकेतील तसेच सर्व जगातील तद्देशीय लोकांच्या समस्या नीट समजून घेण्यासाठी कु. मेंचूला दिलेला हा पुरस्कार चांगला उपयोगी पडेल."

युरोपियन नाविक क्रिस्टोफर कोलंबस याने अमेरिका शोधून काढल्याला आता ५०० वर्षे झाली. याच्या स्मृति-प्रीत्यर्थ अमेरिकेत सर्वत्र जंगी मिरवणुका काढल्या जात आहेत. नेमक्या याच वेळी मेंचूला नोबेल-पुरस्कार दिला गेला, ही ही एक विशेष गोष्ट आहे.

आपल्याला नोबेल शांति-पुरस्कार मिळाल्याचे जेव्हा कुमारी मेंचूला समजले तेव्हा आत्मविश्वासपूर्वक ती म्हणाली-"या लढ्यात ज्यांनी आपले सर्वस्व व प्राण गमावले, त्यांचे आत्मे आता ओरडून न्यायाची मागणी करीत आहेत. आता 'आम्ही तर मागासलेले आहोत' असे म्हणून नैराश्यपूर्ण जीवन जगण्याची आवश्यकता नाही. इतिहासातील नवे-नवे अध्याय लिहिण्यासाठी आपल्या समोर अनेक कोरी पाने मांडलेली दिसत आहेत. या, आपण नवा इतिहास निर्माण करू या!"

**सन १९९२ चे अन्य नोबेल-पुरस्कार विजेता**

भौतिक शास्त्र : फ्रान्सचे प्राध्यापक जार्जस चार्पाक.

रसायन शास्त्र : संयुक्त राष्ट्र अमेरिकेचे प्राध्यापक रुडोल्फ ए. मारकस.

वैद्यक शास्त्र : अमेरिकेचेच प्राध्यापक एडमण्ड फिशर व डॉ. एडुविन क्रेब्स.

अर्थशास्त्र : अमेरिकेचे प्राध्यापक गॅरी एफ्.बेकर.

साहित्य : अमेरिकेचे वेस्टिंडीजचे वाल्कार.



# कुरूप राजकुमारी

राजनंद गावात प्रवीण नावाचा एक असहाय्य तरूण रहात होता. त्याच्या वडिलांनी जी उधार-उसनवारी करून ठेवली होती, ती सर्व चुकती करण्यासाठी त्याला आपलं घर व जमीन विकून टाकावी लागली. आई-वडिलांच्या मृत्यू नंतर त्याला गावात आपलं असं कोणी राहिलं नाही. निरुपायाने त्याने गाव सोडलं आणि नोकरीच्या शोधात तो राजधानीकडे निघाला.

दुपारच्या वेळी तो जंगलातील एका टेकडीवर पोचला. तिथं त्याला एक झोपडी दिसली. तहानेने व्याकुळ झाल्यामुळे पाणी मिळेल आशा आशेने तो झोपडीजवळ आला.

गेली पंचवीस वर्षे जादूगारीण जगताई त्या झोपडीत एकटीच रहात असे. प्रवीणने जेव्हा चार-पाच वेळा बाहेरून पुकारलं तेव्हा रागाने दरवाजा उघडून तिने विचारले-"कोण रे तू? मला बाहेर बोलवण्याचं धाडस तू कसं केलंस?"

पुढे जगताई खदखदून हसत म्हणाली—"जसा तू दिसतो आहेस तसाच भोळा आहेस अगदी. अरे, राजधानीत कोण विचारणार तुला?"

प्रवीणला काही उत्तर सुचेना, म्हणून तो चुप बसला. तेव्हा जगताई मोठ्या प्रेमाने म्हणाली—"खरं ते सांगितलंच पाहिजे. तुझ्या चेहऱ्यावर राजा होण्याची चिन्हे स्पष्ट दिसत आहेत. बस, तुझ्या डोक्यावर मुकुट तेवढा नाही."

"मी काय करू आत्याबाई? परमेश्वराने मला रूप तर चांगलं दिलंय, पण माझ्या भाग्य-रेषा काही अशा नाहीत की मी राजा बनावं!" अमल दुःखी स्वरात

**धवलश्री पटवर्धन**



प्रवीण जगताईला म्हणाला.

जगताईने थोडा वेळ शांतपणे काही विचार केला नि म्हणाली—"हे बघ, चार दिवस तू माझ्या इथंच रहा. 'आत्याबाई' म्हणून तू नातं जोडलंच आहेस. तुझ्या भाग्य-रेखा मी ठीक करून देईन. राजा आता म्हातारा झाला आहे. दीन-दरिद्री जनतेची दुःखं तू जाणतोस, तुझ्या शासनाखाली प्रजा सुखी होईल. आता तू कसली ही चिंता करू नकोस."

"थट्टा करायला मीच का सापडलो तुम्हाला आत्याबाई? चार दिवस रहा म्हणत असलीस तर राहीन आनंदाने! पण नसतं मधाचं बोट लावायची जरूर नाही म्हटलं." करुण स्वरात प्रवीण बोलला.

जगताई राजकुमारीवर फार प्रेम करी. महाराणी जेव्हा गर्भवती होती तेव्हा महाराज तिला घेऊन वन-विहारासाठी जंगलात आले होते. संध्याकाळी परत जाते वेळी ते टेकडीवरील जगताईच्या झोपडीत आले होते. त्यावेळी राजाच्या रथावर एका चित्त्याने झडप घातली. राजाने चित्त्याला मारुन टाकलं. पण महाराणीची अशी घाबरगुंडी उडाली की तिला प्रसव-कळा सुरू झाल्या. तेव्हा जगताई तिला आपल्या झोपडीत घेऊन गेली आणि तिथेच महाराणीने एका कुरूप राजकन्येला जन्म दिला. आणि तिला न पाहताच राणीला मृत्यु आला.

आपल्या कुरूप मुलीला लोकांच्या समोर आणण्याची राजाची इच्छा नव्हती. म्हणून तो अंतःपुरातील एका गुप्त कक्षात तिचे पालन-पोषण करू लागला. ती कुरूप राजकुमारी आता उपवर झाली. तिचे लग्न करून देणे ही राजापुढे मोठी समस्या होती.

राजकुमारीवर प्रेम असल्यामुळे जगताई वेळ मिळेल तेव्हा राजकुमारी-कडे जाऊन येत असे.

एक दिवशी जगताई एक पोपट आणि पिंजरा हाती घेऊन राजाजवळ







आली. तिला पाहून राजाने विचारले —"जगताई, आज हा पोपट कशासाठी घेऊन आली आहेस?"

"मागच्या वेळी मी आले होते जेव्हा राजकुमारीने पोपट मागितला होता!" जगताईने धाडसाने खोटंच सांगितलं.

पिंजऱ्यातील पोपट पाहून आनंदाने उसळत राजकुमारी म्हणाली—"आजी बाई, मी या पोपटासाठी एक सोन्याचा पिंजरा बनवून घेईन!"

"जंगलात स्वतंत्रपणे भराऱ्या मारणारा पोपट इथे बंधनात कसा आनंदाने राहील?" जगताईने विचारले.

राजकुमारीने कुतूहलाने प्रश्न केला-"जंगल कुठे असतं? कसं असतं?"

"माझ्या बरोबर आलीस तर मी जंगल दाखवीन तुला. तिथं तुला कोणी विचारलं तर सांगावं लागेल की तू माझी नात आहेस. जर मी तुला अशीच नेली तर राजा माझं डोकंच उडवून टाकील. मी तुला पोपट बनवून घेऊन जाईन. आहे कबूल?" जगताईने विचारले.

राजकुमारीने हे आनंदाने मान्य केले. जगताईने एक मंत्र म्हटला आणि राजकुमारी पोपट बनून गेली. जगताईने पिंजऱ्यातला पोपट सोडून दिला आणि पोपट झालेल्या राजकुमारीला पिंजऱ्यात ठेवलं व आपल्या घरी परत आली.

ती जंगलातील आपल्या झोपडीत पोचली तेव्हा संध्याकाळ झाली होती. बाहेर खाटेवर प्रवीण पहुडला होता. कुणाच्या येण्याची चाहूल लागताच त्याने विचारले—"कोण आहे?"

"मीच आहे रे जावईबापू! दिसत नाही वाटतं?" हसत जगताईने प्रश्न विचारला.

रडत रडत प्रवीण म्हणाला—"आत्या बाई, काय सांगू? तुम्ही झोपडीतून बाहेर पडलात आणि माझ्या डोळ्यांना काही दिसेनासं झालं!"

त्याची पाठ थोपटत जगताईने धीर



दिला—"काही काळजी नको करूस. तुला परत दृष्टि लाभेल. बघ ही माझी नात मी बरोबर आणली आहे. ती तुझ्या दृष्टिवर उपचार करील नि तुझी गेलेली दृष्टि परत येईल."

जगताईने एक मंत्र उच्चारला. त्याबरोबर पोपट राजकुमारी बनून गेला. एका छोट्या भांड्यात थोडं औषध घेऊन ती राजकुमारीला म्हणाली—"हे औषधा मधून मधून याच्या डोळ्यात घाल. मला दुसरी काही कामं करायची आहेत." एवढं सांगून ती झोपडीत निघून गेली.

प्रवीणला पाहून राजकुमारीला आश्चर्य वाटलं. तो मोठा सुंदर होता आणि राजकुमारी त्याच्या सौंदर्यावर मोहित झाली. तसेच त्याला दिसत नाही हे जाणून तिला वाईटही वाटलं.

राजकुमारी प्रवीणच्या डोळ्यात जेव्हा औषध घालू लागली तेव्हा प्रवीणने विचारले—"तू कोण आहेस?" आणि हे विचारीत असता त्याने राजकुमारीचा हात आपल्या हाती घेतला.

"मी जगताईची नात आहे. मी जे औषध घालीत आहे ते झोंबत तर नाही ना?" राजकुमारीने विचारले.

प्रवीण म्हणाला—"तसं काही फार झोंबत नाहीय."

राजकुमारीतून पोपट बनण्याचा व पोपटातून राजकुमारी बनण्याचा मंत्र जगताईने राजकुमारीला शिकवला. रात्र होण्यापूर्वी राजकुमारी पोपट बनून अंतःपुरात गेली आणि आपल्या खोलीत पोचल्यावर पुन्हा राजकुमारी झाली.

दुसऱ्या दिवशी दुपारी राजकुमारी परत आली. आल्या बरोबर तिने प्रथम प्रवीणच्या डोळ्यात औषध घातलं. अशा रीतीने दहा दिवस गेले. आता प्रवीणचं राजकुमारीवर असं प्रेम बसलं की त्याला वाटू लागलं—जगताईच्या नाती शिवाय तो सुखा-समाधानाने राहूच शकणार नाही.



एका रात्री प्रवीण जगताईला म्हणाला-"आत्याबाई, जर मला आपली दृष्टि परत लाभली, तर तुमच्या नातीचा मी फार आभारी होईन. जर तिने मान्य केलं तर तिच्याशी लग्न करण्याची माझी इच्छा आहे."

"हे तू काय म्हणतो आहेस रे? मी तर राजकुमारी बरोबर तुझं लग्न लावून देणार म्हणते!" जगताई म्हणाली.

प्रवीणने आपला विचार सांगितला —"मला नको कुणी राजकुमारी. मी लग्न केलं तर तुमच्या नातीशीच करीन."

दुसऱ्या दिवशी जेव्हा राजकुमारी आली तेव्हा जगताईने ही गोष्ट तिच्या कानांवर घातली. ते ऐकून राजकुमारी जगताईला म्हणाली-"आजी, इतक्या सुंदर तरूणाला माझ्यासारखी कुरूप मुलगी योग्य आहे का?"

"प्रवीणला पुन्हा दृष्टि येणार नाही याचंच तुला भय वाटत आहे ना? नाहीतर ही मागणी तू नाकारली नसतीस!" जगताईने विचारले.

"असं नाही आजी. प्रवीणला नाही दिसलं म्हणून काय झालं, मी तर चांगली डोळस आहे न?" राजकुमारीने तत्काळ उत्तर दिले.

आता जगताई खुश होत म्हणाली



—"जर तुमचं दोघांचं एकमेकांवर इतकं प्रेम आहे तर मग हा लपंडाव कशाला? राज्याच्या लोभाने नाही, केवळ तुला पसंत करणाराशी तुझं लग्न करायचा तुझ्या वडिलांचा विचार आहे. शिवाय आता प्रवीणचे डोळे ही बरे होऊन जातील."

राजकुमारी आनंदाने राजवाड्यात गेली. दुसऱ्या दिवशी ती परत आली तेव्हा जगताई प्रवीणला म्हणाली—"जावई बापू, माझी नात आली आहे. लग्नाचा मुहूर्त ही मी निश्चित केला आहे. एकदा तू आपल्या होणाऱ्या बायकोला पाहून

घे.'' जगताईने एक मंत्र उच्चारला आणि आपल्या हातांनी प्रवीणच्या डोळ्यांना स्पर्श केला.

प्रवीणने डोळे उघडले आणि आनंदाने उसळत म्हणाला—''आता मला चांगलंच दिसू लागलंय!'' मग त्याने राजकुमारीकडे पाहिलं. तिचं रूप पाहून खूप निराश झाला तो.

जगताईने विचारलं—''कां, तुला माझी नात पसंत नाही पडली?''

''नाही आत्याबाई, तसं नाही. तुमची नात मला प्राणांहून प्रिय आहे, पण तिचं हे रूप पाहिलं म्हणजे.....'' प्रवीण मधेच थांबला.

जगताई झटपट आपल्या झोपडीत गेली. एक आरसा आणून तिने प्रवीणच्या हातात दिला. प्रवीणने आरशात पाहिलं. त्याला आपलं कुरूप पाहवेना. तो जोराने किंचाळला.

हसत जगताईने विचारलं—''जावईबापू, आता बोला, माझी नात पसंत आहे की नाही?''

प्रवीण थोडा वेळ गप्प बसला. त्याच्या मनात अनेक विचार आले. मग तो म्हणाला—''आत्याबाई, माझ्यातील सर्व मूर्खपणा आता संपला. तुमच्या नातीशी संतोषपूर्वक लग्न करायला मी तयार आहे.'' प्रवीणने जगताईच्या हातातील पुष्प-माला घेऊन ती राजकुमारीच्या गळ्यात घातली.

आणि आश्चर्य! दुसऱ्याच क्षणी ती कुरूप राजकुमारी अनुपम सौंदर्यशालिनी बनली. आणि प्रवीणला ही त्याचे मूळ रूप प्राप्त झाले.

जगताईकडून सर्व हकिकत जाणून राजाला खूप आनंद झाला. त्याने प्रवीणची प्रशंसा केली.

काही दिवसांनी प्रवीण त्या राज्याचा राजा बनला. एक समर्थ राजा म्हणून त्याने चांगलेच नाव कमावले.





# माया महाल

१

(राजकुमारी विद्यावतीला शोधायला निघालेल्या महेन्द्रनाथला जंगलात एक महाल दिसला. महालाच्या द्वारपालाच्या मदतीने तो त्याच्या खोलीत राहिला. दुसऱ्या दिवशी तेथील नोकराचे सोंग करून त्याने महालाच्या आतील खोल्यांची टेहळणी करून घेतली. नंतर महालाच्या दुसऱ्या बाजूचा द्वारपाल म्हणून त्याची नेमणूक झाली.—पुढे)

''आपली विद्यावती आपल्याला दुरावल्याला आज एक आठवडा झालाय. पण अजून आपल्याला तिचा काहीच पत्ता लागला नाहीय.'' दुःखाने व्याकुळ झालेली राणी वज्रेश्वरी राजाला म्हणाली.

राजा वीरसेन ताबडतोब यावर काही बोलू शकला नाही, कारण त्याची दशाही राणीपेक्षा काही निराळी नव्हतीच. क्षण दोन क्षण थांबून राणीला आश्वासन देत तो म्हणाला, ''विद्यावतीच्या शोधासाठी चहूं दिशांना गेलेल्या शिपायांपैकी काही जण अजून परत आलेले नाहीत. आपल्या राज्यातले काही नागरिकही आपल्या युवराणीच्या शोधासाठी गेलेले आहेत. लवकरच आपल्याला एकादी चांगली



बातमी मिळेल. चिन्ता नको करू देवी."

"विद्यावतीच्या शोधासाठी कोणी एक युवक आपल्याजवळ आला होता न? त्याचं काय झालं पुढे?" राणीने पुन्हा विचारले.

"होय. त्याचं नाव आहे महेन्द्रनाथ. तोही अजून परत नाही आलेला. मला तर असा विश्वास वाटतोय, की तोच राजकुमारीचा पत्ता लावून येईल." राजा दृढ विश्वासाने म्हणाला.

"कोण जाणे! तिचं अपहरण करणाऱ्यांनी तिला एकाद्या दूर देशीही नेलं असेल!" महाराणीने शंका अुपस्थित केली.

"या शंकेमुळेच तुझ्या भावानं जवळच्या राज्यातल्या आपल्या गुप्त हेरांनाही ही बातमी कळवली आहे. तेंव्हा आता याबाबत काळजी नको देवी! इतकंच नव्हे, तर आता तिच्यावर असणारी ग्रहांची अवकृपाही संपत आलेली आहे, तेंव्हा ती आता लवकरच आपल्याजवळ परत येअून पोचेल. पुन्हा एकदा आपण आचार्य वाचस्पतींना बोलवून विद्यावतीच्या ग्रहस्थितीबद्दल विचारून घेअू. आता आश्वस्त रहा देवी!" असे म्हणून राजाने एका शिपायाला वाचस्पतीला ताबडतोब बोलवून आणायची आज्ञा दिली.

आचार्य वाचस्पती राजाकडे येअून म्हणाला, "महाराज, मी आत्ता आपल्याकडे निघालोच होतो, अन् तेवढयात हा शिपाईही आला. माझ्या शिष्यगणात हा मंजुनाथ खास हुशार असा आहे, त्याला मी बरोबर घेअूनच आलोय. याने एक बातमी आणलीय, ती आपणाकडे पोचवायची आहे." असे बोलत त्याने आपल्याबरोबर आलेल्या तरुणाकडे संकेत केला.

"काय बातमी? विद्यावतीबद्दल?" राणीने अुत्सुकतेने विचारले.

मंजुनाथ सांगू लागला, "एक प्रकारे ही बातमीच आहे महाराणी! ज्योतिष



शास्त्रातल्या आपल्या काही शंका विचारण्यासाठी मी मुख्य-मुख्य ज्योतिषी गुरुंना गाठायला गेलो, तेंव्हा मला समजलं की त्या साऱ्यांना जगत्पति आचार्यांनी युवराणीची कुंडली तपासायला बोलावलं होतं. या जगत्पतीला मी दोन-चारदा पाहिलं होतं; म्हणून ही खबर सांगायला मी सरळ गुरुजींकडे आलो. पण त्यांच्याजवळ जगत्पती आचार्य नसल्याचं पाहून मला फार आश्चर्य वाटलं!"

"युवराणीच्या पत्रिकेबद्दल मी जगत्पतीशी सांगोपांग चर्चा केली होती. युवराणी अदृश्य झाल्यापासून तोही माझ्याकडे आलेला नाही. इतकंच नव्हे, तर त्यानं इतर पंडितांशी कुंडलीबाबत चर्चा केलीय हे सारं तर मला मोठं गूढ वाटू लागलंय. शिवाय त्यानं सगळं माझ्यापासून लपवलंय. त्यानं असं का करावं हेच कळत नाहीय मला!" आचार्य वाचस्पती मोठ्या दुःखाने बोलत होते.

"तरीही जगत्पती कसा आहे, तो विश्वासार्ह आहे की नाही, हे तर आपल्याला ठाअूक असायला हवं ना? तुझ्याशी न बोलताच त्यानं इतर ज्योतिषी पंडितांशी युवराणीच्या जन्मकुंडलीबाबत चर्चा केली? कदाचित युवराणीबद्दल काही सुखद समाचार आपल्याला



कळवायचा त्याचा प्रयत्न असावा. आपण वाट पहायला हवी." राजा म्हणाला.

"आजपर्यन्त तरी जगत्पतीच्या प्रामाणिकपणाची शंका घेण्याचं कारण पडलं नाही. पण मला न कळत तो अन्य ज्योतिष्यांशी चर्चा करतोय, यामुळे आता मला शंका येअू लागलीय. नाहीतर हे माझ्यापासून लपवायचं कारणच काय? आता आपल्याला तरी तो काय करतोय, कुठे आहे याचा पत्ता लावायला हवा. आम्हाला परवानगी द्या महाराज. त्याचा पत्ता लागला की मी आपणहून इथे येईन." असे म्हणत वाचस्पती तेथून हलला अन् आपल्या शिष्यासह



निघून गेला.

महाराजाने ही खबर सेनापती अग्रसेनकडे पोचवली. ते ऐकताच अग्रसेन म्हणाला, "युवराणीच्या जन्मकुंडली बाबत या जगत्पतीनं फाजिल आस्था दाखवली, तेंव्हाच मला त्याचा संशय आला होता. युवराणीच्या अदृश्य होण्याबरोबरच त्याचं अदृश्य होणंही शंकेत भरच घालतंय. त्याचं गाव, जन्म, परिवार वगैरेंबाबत मी खूप शोधाशोध केली, पण काहीच कळू शकलं नाही. हा मोठा विचित्रच वाटतोय प्राणी! त्याच्याबद्दल चांगलंच सावध असायला हवं आपण."

"ठीक आहे. महेन्द्रनाथकडून काही बातमी आली का? त्याची आई खुशाल आहे नं?" राजाने विचारले.

"महेन्द्रकडून अजून काही वार्ता नाही. त्याच्या आईची आम्ही चांगली व्यवस्था केलेली आहे." अग्रसेनने सांगितले.

"तो तरुणच विद्यावतीचा पत्ता लावेल असं मला वाटतंय." काही विचार करत राजा बोलला.

* * *

महेन्द्र रात्रभर जागा राहिला, पण त्याला कसलाही त्रास झाला नाही. तो थोडा वेळ दाराजवळ बसून राहिला अन् नंतर दार व उद्यान यांच्या मधील छोट्याशा रस्त्याने त्याने दूरवर जाऊन चहूकडे निरखून पाहिले. महालातील खालच्या बाजूच्या सर्व खोल्या प्रकाशित होत्या, वरच्या भागातल्या एक-दोन खोल्यातूनच उजेड असलेला दिसला. थोड्या वेळाने खालच्या भागातले सर्व दिवे मालवले गेले. वरच्या मजल्यावरील दोन्ही खोल्यातले दिवे मात्र जळतच होते. अशा प्रकारे आणखी काही वेळ गेल्यावर तेही दिवे विझले, अन् सर्वत्र काळोखाचे साम्राज्य पसरले.

सकाळ झाल्यावर द्वारपाल महेन्द्रजवळ आला अन् त्याला बरोबर घेऊन तो भवनाच्या दक्षिणेकडे गेला. तेथे एक विशाल भोजनगृह होते. न्याहारीला बसलेल्या महेन्द्रने एकदा मान वळवून पाहिले, तेंव्हा पांढऱ्या साडीतली एक वृद्ध स्त्री त्याला दिसली. तिच्या मागोमाग दोन दासी न्याहारीच्या थाळ्या घेऊन चालत होत्या. त्या दोन्ही दासींची वस्त्राभूषणे अगदी सारखीच होती. महेन्द्रला या गोष्टीचे भारी आश्चर्य वाटले. खाणे आटोपल्यावर महेन्द्र विशान्तीसाठी द्वारपालाच्या खोलीकडे निघून गेला.

सूर्य पश्चिमेकडे सरकत होता. महेन्द्र उठून महालाच्या दुसऱ्या द्वाराकडे पहाऱ्यासाठी निघाला. सूर्यास्त अजून झालेला नव्हता. एका विशाल खडकावर चढून त्याने चहूकडे नीट निरखून पाहिले. दूरवर त्याला महालाच्या पायऱ्यांचा थोडासा भाग दिसत होता. इतक्यात उद्यानातून कसलासा आवाज ऐकू आल्याने तो तिकडे वळला. उद्यानात त्याला सकाळी भोजनशालेत पाहिलेली वृद्ध स्त्री दिसली. तिच्या मागून थोड्या अंतरावरून एक सुन्दर युवती फुलांना स्पर्श करीत हळूहळू चालत होती. ती तरुणी खूपच नाजुक वाटत होती. सकाळी दासींनी नेसलेल्या वस्त्रांप्रमाणे व दागिन्यांप्रमाणेच वस्त्राभरणे तिच्या अंगावर होती. तरीही ती त्यांच्यापेक्षा खूपच सुन्दर दिसत होती.

आपण कामात असल्याप्रमाणे दाखवत महेन्द्र आपल्याबद्दल कोणाला संशय येऊ





नये अशा बेताने आसपास वावरत त्यांच्याकडे नजर ठेवून होता. त्या दोघीजणी आपसात मुळीच बोलत नव्हत्या. वृद्ध स्त्री एका जागी बसली व त्या दुसऱ्या सुन्दरीच्या हालचाली वर तिने नजर ठेवली. थोड्या वेळाने आणखी ए का स्त्रीने येऊन वृद्धेला काहीसे सांगितले आणि ती वृद्धा लगेच लगबगीने महालाकडे निघून गेली. दुसरी जी स्त्री आली होती, ती आता अुद्यानात फिरणाऱ्या सुन्दरीवर लक्ष ठेवायचे काम करू लागली. आता या दोघींचे कपडे एकाच प्रकारचे व एकाच रंगाचे होते. थोडा वेळ त्या दोघी अुद्यानातच राहिल्या आणि नन्तर ती मागाहून आलेली स्त्री सुन्दर युवतीला बरोबर घेऊन महालाकडे निघून गेली. त्या महालात पोचल्यावर महालाच्या वरच्या मजल्यावरील एका खोलीतील दिवे लागले. ते पाहिल्याबरोबर महेन्द्रच्या लक्षात आले, की काल ज्या खोलीतले दिवे लागलेले होते, ती ही खोली नव्हे.

महेन्द्रनाथ पहाऱ्याच्या दरवाज्याजवळ बसून विचार करू लागला, की द्वारपालाने सांगितलेली ती खास युवती कोण असावी? एका गोष्टीचे त्याला आश्चर्य वाटत राहिले की अुद्यानात दिसलेली सुन्दर युवती आणि नन्तर पहारा करणारी युवती, या दोघींची वस्त्राभरणे अगदी सारखी का होती?

बऱ्याच वेळाने द्वारपाल जेवण घेऊन तेथे आला, तेंव्हा सहज विचारल्यासारखे महेन्द्रने विचारले, "कुठेही काही हालचाल, आवाज दिसत नाहीय. मालक काय पुन्हा महालाबाहेर गेले आहेत?"

"नाही, नाही! मालक तर इथेच आहेत. रात्रंदिवस ते ज्योतिष्यांशी कसल्याशा चर्चा करत असतात. म्हणूनच ते या बाजूला येत नाहीत. मग कसला आवाज, अन् कसली गडबड! तरीही तू सावधानतेनंच पहारा कर हं, कळलं?" अशी सूचना देऊन द्वारपालाने आपले

कर्तव्य बजावले.

"इथे पहाऱ्यावर मी आहे हे मालकांना माहीत आहे?" महेन्द्रने जेवणापूर्वी हातपाय धुताधुता विचारले.

"हो, माहीत आहे तर! कालच मी त्यांना हे सांगितलं. हो, आणखी एक खास गोष्ट म्हणजे महालात आलेली खास पाहुणी ही कुणा एका राज्याची युवराणी आहे. ती आणखी काही दिवस इथे रहाणार आहे. तेंव्हा तुला जास्त सावधपणे पहारा करायला हवा." द्वारपालाने महेन्द्रनाथला पुन्हा एकदा इशारा दिला.

"तू मुळीच काळजी करू नकोस. मालक कदाचित् इकडे येतील अशीही खूप शक्यता आहे न? एवढ्यासाठीच नव्हे, पण आपलं कर्तव्य दक्षतेनं कसं पार पाडावं हे ही छान कळतं मला! माझ्यामुळे तुझं नाव अुगीच खराब व्हायला नको. बरोबर न? मी जरासुद्धा डोळा न लववता पहारा करत राहीन." महेन्द्रने त्याला आश्वासन देत म्हटले. आतापर्यन्त त्याचे जेवणही झाले होते, म्हणून त्याने अुठून हात धुतले.

द्वारपाल नन्तर तेथून निघून गेला. आता योग्य संधी पाहून महेन्द्र अुद्यानाकडे गेला. तेथून महालाचें निरीक्षण चांगले करता येत असे. महालाचे सारे दरवाजे बन्द होते. खालच्या भागातले सारे दरवाजे ही व्यवस्थितपणे लावलेले होते. सर्वत्र शांतता पसरलेली होती. थोडा वेळ महेन्द्रनाथ तिथेच गप्प अुभा राहिला अन् राजकुमारीचा पत्ता लावण्यासाठी काय करावे, याबद्दल विचार करू लागला. त्याने पुन्हा एकदा ससाण्याच्या नजरेने सभोवती निरखून पाहिले अन् पुन्हा हळूहळू तो परत आपल्या पहाऱ्याच्या दाराजवळ येअून पहिल्याप्रमाणेच बसून राहिला.

—पुढे चालू



# अहंकार

काम तडीस नेण्याबाबत पक्का निश्चय केलेला राजा विक्रम पुनश्च त्या झाडाकडे गेला, एका फांदीला लटकलेले प्रेत काढून घेअून त्याने आपल्या खान्द्यावर टाकले आणि नेहमीप्रमाणे मौन धारण करून तो स्मशानाची वाट चालू लागला. तेंव्हा प्रेतात मुक्काम करून असलेला वेताळ त्याच्याशी बोलू लागला, "हे राजा, पुनःपुन्हा असफल होअूनही तू आपल्या कार्याबद्दल जी आस्था बाळगून आहेस, अन् ते पूर्ण करण्यासाठी तू आपल्या सुसंस्कृतपणाची जी चुणूक दाखवत आहेस, ती खरोखरच अत्यन्त प्रशंसनीय अशीच आहे. परंतु जगात सर्वच जण तुझ्यासारखे नसतात. अनेकजण अहंकारी अन् दिल्या वचनाचा त्याग करणारे वंचकही असतात. इतकेच नव्हे, तर

## वेताळाच्या गोष्टी



तुझ्यासारखे विवेकी, सुसंस्कृत व दृढनिश्चयी लोक सुद्धा चंचल स्वभावाच्या स्वार्थी लोकांपुढे पड खातात. एक अहंकारी राजकुमारी आणि अभिमान सोडून बुद्धिहीन माणसासारखा वागणारा एक राजकुमार, यांच्याबद्दल मी आता तुला गोष्ट सांगतो. या गोष्टीवरून तुला भविष्यात सावधगिरी बाळगता येईल. नीट लक्ष देऊन ऐक. म्हणजे तुला थकवा जाणवणार नाही आणि रस्ताही सहज संपेल." आणि वेताळ गोष्ट सांगू लागला.

विजयपुरीचा राजा शिवसेन हा मोठा पराक्रमी व धर्माचरण करणारा होता. त्याच्या पत्नीचं नाव होतं इन्द्रावती. खूप कालानन्तर त्यांना एक मुलगी झाली. तिचं नाव होतं सूर्यमुखी.

सूर्यमुखीचं लालनपालन मोठ्या कौतुकानं अन् लाडानं चाललं होतं. ती पाच वर्षांची झाल्यावर तिच्या शिक्षणाची व्यवस्था करण्यात आली. अन्य शिक्षणापेक्षा युद्ध-विद्येत तिला विशेष रुचि होती. ते जाणून राजगुरूंनीही त्याप्रमाणे युद्ध-विद्येत प्रवीण अशा शिक्षकांची तिच्यासाठी सोय करून दिली.

सूर्यमुखी सात वर्षांची होताहोता अश्वारोहण, खड्गयुद्ध आणि भालाफेक या विद्यांत विशेष प्रवीण झाली. खड्गयुद्धातली तिची गति पाहून तिचे खुद्द गुरूही आश्चर्यात पडत. तिच्या हातातली चापल्याने चाललेली तलवार पाहून तिचे प्रतिस्पर्धी भयाने कापू लागत.

आता सूर्यमुखी सोळा वर्षांची झाली होती. राजा शिवसेनला वाटे की, आपली सुयोग्य कन्या सूर्यमुखी हिलाच गादीवर बसवून नंतर तिच्या विवाहाचा विचार करावा.

आपल्या बापाचा आपल्या विवाहाबाबतचा हा विचार कळल्यावर सूर्यमुखी इन्द्रावतीला म्हणाली, "आई, थोडे दिवस आपल्या देशाचा राज्यकारभार संभाळावा असं मला वाटतंय. त्यानंतरच मी विवाह करीन.



म्हणून मी म्हणते की हा निर्णय तुम्ही माझ्यावर सोपवावा."

एका शुभ मुहूर्तावर राजा शिवसेनने सूर्यमुखीला राज्याभिषेक करवला. सूर्यमुखीने राज्यकारभारात खूप लक्ष घातलं.

एक 'समर्थ शासक' म्हणून सूर्यमुखीने चांगलंच नाव कमवलं, हे पाहून राजाला फारच आनन्द वाटला. एके दिवशी तो सूर्यमुखीला म्हणाला, "बाळा, मला मुलगा नसल्याचं दु:ख तर तू दूर केलंसच, आता विवाहाचा विचार केलास तर मला फार बरं वाटेल."

सूर्यमुखी म्हणाली, "बाबा, मला तुमच्या इच्छेविरुद्ध जायचं नाहीय. पण इतर राजकुमारींप्रमाणे स्वयंवर मांडून कुणाच्या गळ्यात माळ घालणंही पसंत नाही मला. तुम्ही कृपा करून राज्यात अशी दवंडी पिटायची व्यवस्था करा की, मला खड्गयुद्धात हरवू शकणाऱ्या बहादुराशीच मी विवाह करीन."

नाइलाजाने राजा शिवसेनने राज्यात तशी घोषणा करवली. विवाहाच्या बाबत सूर्यमुखीचा हा प्रस्ताव पाहून अनेक राजकुमार खूपच खूष झाले.

काही राजकुमार सूर्यमुखीशी लढून, दणदणीत पराभव पत्करून परत गेले, तर काही तिच्या हातातील तलवारीचा



वेग पाहून भिऊन निघून गेले.

परन्तु क्रान्तिपुरचा युवराज जयन्त मात्र चांगलाच हुशार होता. खड्गयुद्धात तो चांगला प्रवीण होता. तरीही सूर्यमुखीच्या खड्गयुद्ध कलेकडे त्याने जराही दुर्लक्ष केले नाही. एका सामान्य माणसाच्या वेषात सूर्यमुखीच्या राज्यात येऊन सूर्यमुखीच्या खड्गयुद्धाचे हात व तिच्या चाली यांचं त्याने बारकाईने निरीक्षण केलं. सूर्यमुखी राजकुमारांशी युद्ध करताना जिंकल्यावर चार-दोन वेळा त्याने आनन्दाने टाळ्याही पिटल्या.

सूर्यमुखीच्या कलेतले डावपेच नीट निरखून जयन्तने त्यावर मात करण्याच्या



दृष्टीने विचार करण्यात काही वेळ घालवला; अन् तो आपल्या राज्यात परत गेला. नंतर जयंत राजपुत्र-वेषात पुन्हा विजयपुरीला गेला व सूर्यमुखीशी युद्ध करण्याची इच्छा त्याने प्रकट केली.

जयन्त व सूर्यमुखी यांच्यात घनघोर लढाई झाली. 'जयन्त ही खड्गयुद्धात आपल्यापेक्षा तिळभरही कमी नाही.' हे सूर्यमुखीच्या लक्षात आलं. तेव्हां तिने आपल्या हातच्या अगदी खास अशा हातांचा उपयोग करून जयन्तच्या हातातील तलवार अडवून देण्याचा प्रयत्न केला. परन्तु जयन्तही अगदी सावध होता. क्षणभरात आपल्या नवीन चालीने तिच्यावर प्रतिहल्ला केला.

आता सूर्यमुखीने जयन्तच्या चेहऱ्याकडे नीट पाहिलं. तिनं पटकन ओळखलं की, काही दिवसांपूर्वी सामान्य वेषात प्रेक्षकात बसून, आपल्या चाली पाहून कौतुकाने टाळ्या वाजवणारा माणूस म्हणजे हा राजकुमार जयन्तच! आपल्याला स्पर्धेत हरवण्यात त्याने कसं यश मिळवलं हे तिनं बरोबर ओळखलं. जयन्तशी विवाह करायला नकार देत ती म्हणाली, "हे राजकुमार, खड्गयुद्धात तू मला हरवलंस म्हणून मी तुझं अभिनन्दन करते. परंतु आपला विवाह धर्मसम्मत होणार नाही, हे तुला सांगताना मला वाईट वाटतंय."

सूर्यमुखीचं हे बोलणं ऐकून जयंत क्षणभर चकित झाला! पण तो फक्त इतकंच म्हणाला, "होय, तुमचं म्हणणं बरोबरच आहे. मी आता आपल्या राज्याकडे परत निघतो. आज्ञा असावी!" अन् मोठ्या भक्तिभावाने सूर्यमुखीला नमस्कार करून राजकुमार जयन्त तिथून निघून गेला.

इथे आपली गोष्ट संपवून वेताळ म्हणाला, "राजा, खड्गयुद्धात मला हरवणाऱ्याशी मी विवाह करीन, अशी सूर्यमुखीने घोषणा केलेली होती. पण तिनं विजय मिळवणाऱ्या जयन्तशी विवाहाला नकार दिला. तिनं असं का बरं केलं? यात तिचा अहंकार, गर्विष्टपणाच दिसतो ना? इथं आणखी एक असंबद्धता दिसून येते-विजयी राजकुमार जयंतला तिनं दिलेली शाबासकी! आता जयंतच्या बाजूने विचार करून पाहू. इथे त्याच्यात आत्माभिमानाचा पूर्णत: अभाव दिसून येतो. इतकंच नव्हे, त्याचं वागणं एकाद्या बुद्धिहीनासारखं वाटतं. हे सारं विचित्रच नाही वाटत? या शंकाचं जाणत असूनही तू बरोबर अुत्तर दिलं नाहीस, तर तुझ्या मस्तकाच्या चिंध्या चिंध्या होतील."

राजा विक्रम ताबडतोब अुत्तरला, "जयन्तनं अन्य राजपुत्रांप्रमाणे ताबडतोब लढत दिली नाही. त्याने गुप्तवेषात येअून राजकुमारीच्या खड्गविद्येतली कुशलता अभ्यासली. असं करणं म्हणजे गुरुसमीप शिष्याचं अध्ययन झाल्यासारखं होतं. अशा प्रकारे प्रत्यक्ष रूपानं नव्हे, पण परोक्ष रूपानं सूर्यमुखी तर जयंतची गुरुच झाली! त्यामुळे आता त्यांचा विवाह धर्मसम्मत होअूच शकत नाही. त्याला आपला शिष्य मानूनच तिनं त्याचं अभिनन्दन केलं. जयंतला बुद्धिहीन म्हणणं योग्य नव्हेच! अुलट तो चांगलाच कुशाग्रबुद्धीचा आहे, हे दिसून येतं. म्हणूनच तिथून निघून जाताना त्याने आपली गुरु सूर्यमुखी हिला आदराने नमस्कार केला. तेंव्हा आपल्याला हे कळून येतंय की सूर्यमुखीही अहंकारी नाहीय अन् जयन्तही बुद्धिहीन नव्हे. त्यांच्या बाबतीत असा गैरसमज योग्य नव्हे."

अशा तऱ्हेने बरोबर अुत्तर दिले, तरीही विक्रमचा मौनभंग झाल्यामुळे वेताळ प्रेतासह अदृश्य झाला अन् पुन्हा आपल्या पहिल्या फान्दीला लटकू लागला.

कल्पित





# कोंडिबाचा अनुभव

एके दिवशी सोमपुर गावचा तलाठी आणि त्याचा नोकर कोंडिबा शेतातून परत येत होते. ते जेव्हा रामाच्या देवळापाशी पोंचले तेव्हा त्यांना तिथे एक ब्राह्मण भेटला. तलाठ्याला नमस्कार करून तो म्हणाला- "मी सोमपुरात नव्यानेच आलो आहे. आपल्या घरी माझ्या निवासाची सोय झाली तर शांतिपूर्वक आपले काम उरकून गांवी परत जाईन. कराल एवढी मेहेरबानी?"

तलाठ्याने ब्राह्मणाकडे बारकाईने पाहिले नि म्हणाला— "वडीलधारी माणसं सांगतात की आपण जे अन्न खातो, त्यावर आपलं नाव लिहिलेलं असतं. माझ्या घरातील काही अन्नावर आपलं नाव लिहिलेलं असावं असं दिसतंय!"

तलाठ्याची प्रशंसा करीत ब्राह्मण उद्‌गारला—"आपण खरोखर मोठे धर्मात्मा आहात!"

नंतर तिघे जण तलाठ्याच्या घरी आले. त्यावेळी गावातील मंदिराचा पुजारी तेथे आला होता. तलाठ्या बरोबर आलेला ब्राह्मण पाहून पुजारी त्याच्याशी गप्पा-गोष्टी करू लागला. दोघांचं दूरचं काही नातं निघालं!

तेव्हा पुजारी तलाठ्याला म्हणाला—"भाऊराव,आपल्या बरोबर आलेले हे पाहुणे माझे दूरचे नातेवाईक आहेत. आता यांना माझ्या घरी जेऊ घालूनच आपल्याकडे पोचवीन मी!"

तलाठ्याने ही विनंती मान्य केली. ब्राह्मण पुजाऱ्याबरोबर त्याच्या घरी गेला.

ते दोघे तेथून रवाना झाल्यावर कोंडिबा तलाठ्याला म्हणाला—"मालक, केवळ आपल्या घरातील अन्नावरच नव्हे, तर या पुजाऱ्याच्या घरातील अन्नावर ही ब्राह्मणाचं नाव लिहिलेलं दिसतंय!"

तलाठ्याच्या लक्षात आलं की आपला नोकर कोंडिबा आपली थोडी टिंगल करतो आहे. तो हसत हसत म्हणाला—"हे बघ कोंडिबा, मी जे काही म्हणालो त्यात तुला संशय यायचं काही कारण नाही. कधी कधी आपल्या पुढे आलेलं जेवण ही आपल्या नशिबात नसतं. आणि जरा बारकाईने विचार केला तर असे लक्षात येईल की आपण जे अन्न खातो त्यातील प्रत्येक पदार्थावर आपलं नाव लिहिलेलं असतं. केवळ अनुभवच याला साक्षी आहे."

कोंडिबाने रात्र भर तलाठ्याच्या घरी काम केले, नि आपल्या घरी परतला. विहिरीतून पाणी काढून स्नान केलं आणि जेवायला बसला. त्याचं भोजन वाढलं जात होतं, एवढ्यात घराबाहेरून कोणी तरी त्याला बोलवलं. जरा चिडून कोंडिबा उठून बाहेर आला. मागोमाग त्याची बायको ही आली.

दरम्यान मागच्या दरवाजाने एक कुत्रा खोलीत शिरला नि कोंडिबा साठी ताटात वाढलेले अन्न खाऊ लागला. कोंडिबाच्या अगोदर त्याची बायको खोलीत परत



आली, कुत्र्याला शिव्या दिल्या आणि त्याला हाकलून लावलं.

कोंडिबा घरात आला. झालेला सर्व प्रकार त्याने पाहिला. पण त्याला थोडं ही वाईट वाटलं नाही. तो म्हणाला—"वा, मालकांनी सांगितलं तसंच झालं अगदी! भोजनातील प्रत्येक पदार्थावर खाणाऱ्याचं नाव लिहिलेलं असतं. कुत्र्याने जे अन्न खाल्ले, त्याच्यावर त्याचे नाव लिहिलेले असले पाहिजे. आता काय करायचं? चल, पुन्हा स्वयंपाक कर झालं."

हे ऐकून कोंडिबाच्या बायकोला खूप राग आला. म्हणाली-"नका सांगू मला तुमचे तत्त्वज्ञान! घरात एक तांदुळाचा

पुरुषोत्तम बापट

दाणा शिल्लक नाही. आता भात कांडून तांदूळ काढायची ताकत माझ्यात नाही. आता थोडं पाणी पिऊं नि झोपून जाऊ."

एक दीर्घ श्वास सोडून कोंडिबा म्हणाला—"आज परमेश्वराने तांदुळांवर माझे नाव लिहिले नसावे. टिंगल करीत मी काही बोललो ते मलाच भोवलं चांगलं. उद्या मालकांना जरूर सांगेन मी हे सगळं!"

एवढ्यात घरासमोर एक बैलगाडी थांबल्याचा आवाज आला. गाडीतून कोंडिबाचे सासू-सासरे उतरू लागले. कोंडिबाला मोठं आश्चर्य वाटलं. आता यांच्यासाठी भोजन तयार केलं पाहिजे, भात कांडायला बायकोला मदत केली पाहिजे. दिवसभर तलाठ्याच्या शेतात काम करून बिचारा थकला होता. आता हे काम करायची ताकत त्याच्यात नव्हती.

कोंडिबा सासू-सासऱ्यांशी थोडं बोलला नि खाटेवर जाऊन आडवा झाला. त्याने कण्हायला सुरुवात केली. पण थोड्याच वेळात त्याची बायको हंसत जवळ येऊन म्हणाली—"उठा, वडीलधारी माणसं सांगतात की भोजनावर नक्कीच आपलं नाव लिहिलेलं असतं, आणि ते भोजन आपल्याला शोधून काढून जवळ येतं बघा. माझे आई-वडील क्षेत्र श्रीशैल्यच्या शंकराची पूजा बांधून आलेले आहेत. प्रसाद म्हणून त्यांनी खूप मिठाया नि पक्वान्ने आणली आहेत. चला, पोटभर खाऊं या!"

हे ऐकून कोंडिबाच्या जिवात जीव आला. मोठ्या भक्तियुक्त अंतःकरणाने प्रसाद ग्रहण करीत तो म्हणाला—"हे परमेश्वरा, कुठे उत्पन्न झालेलं हे धान्य! तुझ्यासमोर नैवेद्य म्हणून आलं आणि आता माझ्या तोंडात पडत आहे. आता मी मानलं की भोजनातील प्रत्येक पदार्थावर तू खाणाराचं नाव लिहितोस!" प्रायश्चित्त म्हणून कोंडिबाने दोन आपल्याच थोबाडीत मारून घेतल्या.



# चांदोबा परिशिष्ट-५०



भारताचे पशु-पक्षी

## घोड्याची विवेक-बुद्धि असणारी गाढवे

आपण नेहमी पाहतो की मूर्ख माणसांना गाढव म्हणून त्यांची चेष्टा केली जाते. परंतु गाढव खरोखर बुद्धिहीन नसते. गाढव हा घोड्याच्याच जातीचा एक प्राणी आहे आणि आपले पालन करणाऱ्या मालकाचे प्रेम त्याला चांगले समजते. घोड्याच्या जातीच्या गाढवात घोड्याप्रमाणेच विवेक-बुद्धि असते. माणसाने दिलेले इशारे समजून त्याप्रमाणे सूचनांचे पालन गाढव करते. मनुष्याबद्दल गाढवाच्या मनात थोडे भय ही असते.

आपल्या देशातील जंगली गाढवे काही 'खास' असतात. गुजरात राज्यातील कच्छच्या रणात ही मोठ्या संख्येने आहेत. कच्छचे रण जवळ जवळ एक हजार चौरस मैलाच्या क्षेत्रात पसरलेले ओसाड वाळवंट आहे. प्राचीन काळी ही जंगली गाढवे कच्छच्या रणातच नव्हे तर पर्शिया व सीरिया देशात ही आढळत. आता मात्र ती तेथे दिसत नाहीत.

जवळ जवळ चार फुट उंचीच्या या आशियातील जंगली गाढवांच्या अंगावर पिवळसर अशा अक्रोडाच्या रंगाचे केस असतात. मानेपासून शेपटीपर्यंत भुरकट रंगाचे दाट केस यांच्या शरीरावर असतात. शरीराचा खालचा भाग पांढुरका असतो. आपल्याकडील ठेंगण्या गाढवांपेक्षा या जंगली गाढवांचे कान लहान असतात. काश्मीरमधील लडाख भागात दिसणाऱ्या तिबेटी जंगली गाढवांचा रंग लाल-भुरकट असतो. जंगली गाढवे माणसांना पाहून घाबरतात. माणसांना लांबूनच पाहून सावध होऊन ताशी ४५ मैलांच्या वेगाने दूर पळून जातात.



# आधुनिक भारतीय साहित्य

कर्नाटकांतील एका जुन्या आचार-परायण ब्राह्मण वस्तीत प्राणेशाचार्य रहात असत. ते एक कर्मठ वैदिक पंडित होते आणि परंपरागत रूढीचे कठोरपणे पालन करीत. त्यांची पत्नि अर्धांग-वायूने आजारी असे. ते प्रेमाने सतत तिची सेवा-सुश्रूषा करीत.

याच वस्तीत नारायणप्पा नावाचा एक दुसरा ब्राह्मण रहात असे. तो अनैतिक व संप्रदाय-विरुद्ध अशी अनेक कामें करी. तो दारू पीत असे, मांसभक्षण करीत असे आणि आदरणीय लोकांशी असभ्य वर्तन करी. त्याची एक सुंदर प्रेमिका होती-चंद्री ।

## 'संस्कारा' : परंपरा विरुद्ध भावावेशाची कथा



एकाएकी नारायणप्पाला मृत्यु येतो. चन्द्री प्राणेशाचार्यांना ही खबर देते आणि त्यांना नारायणप्पाची अन्त्यक्रिया करण्याची व्यवस्था करण्याची विनंती करते. प्राणेशाचार्यांपुढे मोठीच नैतिक समस्या येऊन ठाकते.

नारायणप्पा नैतिक दृष्ट्या पतित माणूस आहे. अशा पापी अनैतिक ब्राह्मणाच्या प्रेताला संप्रदायप्रेमी ब्राह्मणांनी स्पर्श करावा काय? तसेच या व्यभिचारी ब्राह्मणाची उत्तरक्रिया शास्त्र-शुद्ध रूपाने करावी काय? असे अनेक प्रश्न प्राणेशाचार्यां पुढे उभे राहिले.

चन्द्री आपले सर्व दागिने काढून ब्राह्मणांपुढे ठेवते आणि त्यांना नारायणप्पाच्या पार्थिव देहाचा अग्नि-संस्कार करण्याबाबत विनविते. पण हे कार्य करण्यासाठी धाडसीपणे कोणी ही ब्राह्मण पुढे येत नाही. ही समस्या कशी सोडवावी या विचाराने प्राणेशाचार्य मनोमनी व्याकुल होतात. ते धर्म शास्त्रावरील अनेक ग्रंथाची पाने चाळतात, पण समस्या काही सुटत नाही. चन्द्रीला आपले दागिने घेऊन जाला सांगून ते स्वत: हनुमान-मंदिरात जातात आणि काही मार्ग सापडावा अशी परमेश्वरापाशी



प्रार्थना करतात. अगतिक होऊन बिचारे घरी परततात. रस्त्यात त्यांना आपली वाट पाहणारी चंद्री दिसते. त्यांना तिच्याबद्दल सहानुभूति वाटते. प्राणेशाचार्यांवरील भक्तीमुळे ती लवून त्यांना चरण-स्पर्श करते. तेव्हा ते चन्द्रीला प्रेमाने उठवतात. त्यांच्या मनात चंद्रीबद्दल प्रेम निर्माण होते. प्राणेशाचार्यांच्या मनात आता शंका निर्माण होते की या घटने नंतर आपण धर्मनिष्ठ सद्ब्राह्मण आहोत का?

चंद्री तेथून थेट शूद्रांच्या वस्तीत जाते आणि त्यांना पैशांचा लोभ दाखवून नारायणप्पाच्या दहन-संस्काराबाबत प्रार्थना करते. नारायणप्पाच्या प्रेताला स्पर्श केला तर ते अपवित्र होईल व आपणास पाप लागेल अशा भीतीने कोणी ही शूद्र या कामासाठी पुढे येत नाही.

शेवटी चन्द्री एका मुसलमानाच्या मदतीने प्रेताचा अग्नि-संस्कार करते. काही ब्राह्मण अमळ विलंबाने नारायणप्पाचा दाह-संस्कार करण्याचा निर्णय घेतात, पण तोपर्यंत सर्व उत्तर-क्रिया झालेली असते.

प्राणेशाचार्यांच्या पत्नीचा मृत्यु होतो. आपल्याकडून झालेल्या अपराधाचे जसे काही प्रायश्चित्त करण्यासाठी प्राणेशाचार्य देशाटन करण्यासाठी निघतात.

यू.आर.अनंतमूर्ति कानडी भाषेतील सुप्रसिद्ध लेखक आहेत. सन १९३१ मध्ये यांचा जन्म झाला. त्यांची सुप्रसिद्ध कादंबरी 'संस्कारा'ची ही कथा आहे. ही कादंबरी नीतीच्या नावावर पसरलेल्या अंधविश्वासांकडे आपले लक्ष आकर्षित करते. मानवी स्वभावाचे जिवंत चित्रण आपणास या कादंबरीत आढळते. खरी मानसिक परिपक्वता व आत्मशुद्धि यांवाचून केवळ बाह्य आचार-संप्रदायांचे पालन केल्याने माणसाच्या स्वभावात फरक पडत नाही. या सत्याचे प्रमाण म्हणजे प्राणेशाचार्य!

# तुम्हाला माहीत आहे?

१. दक्षिण भारतात एका ठिकाणी डोंगरात एक जैन-मंदिर बनविण्यात आले होते. ते कोठे आहे?
२. एका जातीच्या सापाला 'उडणारा साप' का म्हणतात?
३. जगात अत्यंत उंच जागी उमलणारं फूल कोणतं?
४. रेफ्रिजिरेटरचा शोध कोणी लावला?
५. आपल्या देशातील एका नदीला चार नावे आहेत. ती नदी कोणती? ती चार नावं कोणकोणती?
६. ग्रंथालयाची स्थापना करणारा सर्वप्रथम ग्रीकवासी कोण?
७. गुरु नानक जेव्हा भक्ति-गीते गात असत, तेव्हा त्यांच्या शिष्यांपैकी एक त्यांना 'रबाब' वर साथ करीत असे. त्या शिष्याचे नाव काय?
८. माणूस दर मिनिटाला सरासरी किती वेळा श्वास घेतो?
९. दक्षिण विंध्याचलाच्या सर्वोच्च पर्वत-शिखराचे नाव काय?
१०. जिंकणारा मागे सरकतो व पराभूत झालेला पुढे येतो, असा खेळ कोणता?

## उत्तरे

१. तमिलनाडु राज्यातील पुदुकोट्टै जिल्ह्यांतील सित्तनवासल. पल्लव राजा महेन्द्रवर्माने सुमारे १४०० वर्षांपूर्वी याची रचना केली.
२. आपले शरीर रिबिनीप्रमाणे वाळवून एका झाडावरून दुसऱ्या झाडावर हा हवेतून उडी मारतो, म्हणून.
३. उत्तर प्रदेशातील गढवाल प्रदेशात सुमारे ६४०० मीटर उंचीवर उमलणारे फूल-'एर्मेनिया हिमालयेसिस'.
४. जर्मनीतील म्यूनिचचा रहिवासी कार्ल लिंडे-फ्रेड्रिक स्किपरने सन १८७० मध्ये याचा शोध लावला.
५. महानद ब्रह्मपुत्रा. हिमालयातील मानस सरोवरात उगम पावून बंगालच्या उपसागरात विलीन होणारी ही नदी तिबेटात 'त्सांग पो', अरुणाचल प्रदेशात 'डी थांग' व 'सियांग' आणि बंगाल मध्ये 'मेघना' नावाने ओळखली जाते.
६. यूरिपाइडस (ई.पू. ४८० ते ४०६)
७. 'मार्दना' नावाचा एक मुसलमान शिष्य.
८. सरासरी १५ ते १८ वेळा. व्यायाम करीत असताना अर्थात् यात फरक पडतो.
९. केरळ मधील मलबार भागात पश्चिम घाटावर असलेले 'आनाइमुडी' अथवा 'गजशिख' नि त्याची उंची आहे-२,७०० मीटर.
१०. जूडो.



# धन देणारी पिशवी

केशव आणि जानकी नावाच्या जोडप्याला एकच मुलगा होता चन्द्रसेन. तो बुद्धिमान होता, पण होता एक नंबरचा आळशी. म्हणून लोक त्याची बदनामी करीत.

दरम्यान जानकीचा एक जवळचा नातेवाईक सूर्यदेव तिथे आला. गप्पांच्या ओघात जानकी आपल्या मुलाच्या आळशीपणाबाबत त्याच्याशी बोलली.

सूर्यदेवला चन्द्रसेनबद्दल विशेष आपुलकी होती, कारण आपली मुलगी पार्वती हिच्याशी त्याचा विवाह व्हावा अशी त्याची इच्छा होती. म्हणून दुसऱ्या दिवशी सूर्यदेवने चन्द्रसेनला आपल्या जवळ बोलवलं आणि थोडा हितोपदेश देण्याचा प्रयत्न केला.

चन्द्रसेनने स्पष्टपणे सांगून टाकलं- "खूप पैसा मिळवावा नि आई-वडिलांना सर्व प्रकारे सुखी बनवावं अशीच माझी इच्छा आहे. म्हणून आपण असा विचार करीत असाल की पैसे मिळवण्याची माझी इच्छाच नाही, तर ते मात्र एकदम चुकीचं आहे. मला खूप पैसा कमवायचाय!"

यावर आश्चर्याने सूर्यदेवने विचारले-"तुला पैशांची कुठे कमतरता आहे, बेटा? तुझ्या वडिलांची सारी संपत्ति तुझीच तर आहे. माझी एकुलती एक मुलगी पार्वती हिचे तुझ्याशी लग्न झाले, म्हणजे माझी सारी संपत्ति तुलाच नाही का मिळायची? हे सगळं तुला पुरायचं नाही का?"

सूर्यदेवच्या या बोलण्यावर चन्द्रसेन अमळ गप्प बसला, नंतर त्याने आपल्या मनातील गोष्ट प्रकट केली-"मला क्षमा करा, मी आपल्या पार्वतीशी लग्न करू शकणार नाही. कारण रामराजची मुलगी

प्रमोद दलाल



मालती हिच्यावर माझे प्रेम आहे व मी तिच्याशी लग्न करणार आहे."

रामराज त्या गांवातील एक फार श्रीमंत माणूस होता आणि त्याची मुलगी मालती सौंदर्यवती म्हणून प्रसिद्ध होती.

चन्द्रसेनच्या तोंडून मालतीचं नाव ऐकून सूर्यदेव प्रमाणेच चन्द्रसेनच्या आई-वडिलांना ही आश्चर्य वाटलं. ते पाहून चंदसेन हसत त्यांना म्हणाला-"रामराजचं मन वळवण्यासाठी मी अपार संपत्ति मिळविण्याचा प्रयत्न करणार आहे. मी इतकं धन कमवीन की सर्वत्र अति श्रीमंत म्हणून प्रसिद्ध होईन आणि मग रामराज आपण होऊन मला आपला जावई बनविण्याचा प्रयत्न करील. दर वर्षी कार्तिक महिन्यात महर्षि शिवानंद स्वामी इथे येतात. मी त्यांना भेटून आपले नशीब आजमावणार आहे." असं बोलून चन्द्रसेन तेथून निघून गेला.

दिवस जात राहिले आणि चन्द्रसेन ज्या क्षणाची वाट पहात होता, तो शुभ क्षण आला. महर्षि शिवानन्द स्वामी चन्द्रसेनच्या गावी आले. चन्द्रसेन स्वामीजींना भेटला आणि आपल्या मनातील इच्छा त्यांना सांगितली.

मंद-स्मित करीत स्वामी म्हणाले-"एक आठवडाभर माझा मुक्काम इथेच आहे. तू रोज माझ्याकडे येत जा."

एक आठवडा संपला. रोजच्या प्रमाणे चन्द्रसेन त्याही दिवशी स्वामी शिवानंदांच्या दर्शनासाठी गेला. स्वामीजी चन्द्रसेनच्या हाती एक पांढरी पिशवी देत म्हणाले-"या पिशवीत हात घालून बघ बरं!"

चन्द्रसेनने पिशवीत हात घातला. आश्चर्य, त्याच्या हाती काही सोन्याची नाणी आली. चन्द्रसेनला खूपच आनन्द झाला. त्याने स्वामीजींना विचारलं-"स्वामीजी, मला एक शंका आहे. इतके दिवस माझी परीक्षा पाहून आपण माझी योग्यता जाणलीत. मगच आपण मला ही



'धन देणारी पिशवी' दिलीत. खरं आहे ना?"

मंद-स्मित करीत स्वामी शिवानंद म्हणाले-"तू जर असं म्हणत असशील, जर तूच सांग ना तुझ्यात काय विशेष योग्यता आहे बरं?"

बेधडक चन्द्रसेननं विचारलं-"स्वामीजी, माझा प्रामाणिकपणा ही माझी योग्यता नाही का?"

"मग काय तुला असं म्हणायचंय की जगातील सर्व प्रामाणिक माणसं परिश्रम न करता पैसे मिळवायला योग्य असतात?" स्वामीजींनी प्रश्न केला.

आता चन्द्रसेन म्हणू लागला-"प्रामाणिकपणा बरोबर हुशारी नि पराक्रम ही असला पाहिजे. मी आपल्या या गुणांमुळे कुटुंबातील सर्वांना तर खुश करीनच, पण कामधेनु व कल्पवृक्ष बाळगणाऱ्या राजा विक्रमाप्रमाणे आपल्या प्रजेची सेवा ही करीन."

शिवानन्द स्वामी चन्द्रसेनची कीव करीत म्हणू लागले-"तुझ्या बोलण्यावरून मी जाणलं की तुझी बुद्धि ज्ञानार्जनाला योग्य नाही. म्हणूनच मी तुला ही पिशवी दिली. आपल्या अनुभवाच्या आधारे तू काही धडा शिकावास असे मला वाटते. एका पंधरवड्याच्या आत तुला ही पिशवी परत



द्यावीशी वाटेल असा माझा अंदाज आहे. तेव्हा मी येथून पन्नास कोसांवर असलेल्या शांतिवनात असेन. तू तेथे ये. तुझं कल्याण होवो."

दुसऱ्या दिवशी सर्वांना समजलं की चन्द्रसेनला एक अद्भुत 'धन देणारी पिशवी' मिळाली आहे.

लोक आपल्या इच्छा-पूर्तींसाठी चन्द्रसेनकडे येऊ लागले. त्यांना अनेक गोष्टींची जरूर पडू लागली व ते चन्द्रसेनला पैसे मागू लागले. मागणी करणारांची संख्या दिवसेंदिवस वाढू लागली.

हे सर्व होत असलं तरी अपेक्षेनुसार

एक गोष्ट घडेना. चन्द्रसेनला वाटलं होतं त्याप्रमाणे रामराज काही त्याला आपला जावई बनविण्याचा प्रस्ताव घेऊन आला नाही. या बाबतीत चन्द्रसेन निराशच झाला. शेवटी चन्द्रसेननेच आपले मित्र कमलकांत व तारासिंह यांना रामराजकडे पाठवलं आणि त्यांच्या मार्फत आपली इच्छा रामराजच्या कानांवर घातली.

रामराज म्हणाला-''परिश्रम न करता मिळालेल्या धनाने कोणी मोठा होत नसतो. माझा हा विचार तुमया मित्राला सांगा.'' तेव्हा चंद्रसेनचे डोळे उघडले, त्याच्या डोक्यात लख्ख प्रकाश पडला.

चन्द्रसेनच्या मनात आता विचारांचं काहूर उठलं. तो आता खऱ्या सत्याच्या पातळीवर आला आणि त्याने योग्य दिशेने विचार करायला सुरुवात केली. त्या रात्री त्याला एक स्वप्न पडलं-'पैशांसाठी त्याला आपले जवळपासचे लोक खूप सतावत आहेत, आणि त्यांना नाही म्हटलं तर मारपीट करून ती थैलीच पळविण्याचा प्रयत्न ते करीत आहेत!'

दुसऱ्या दिवशी उठताच चंद्रसेनने आपल्या आईला बोलवून म्हटलं-''आई, मी पार्वतीशी लग्न करायला तयार आहे. या विवाहाची व्यवस्था आता करायला हरकत नाही. मी शांतिवनात जाऊन शिवानंद स्वामींना भेटून येतो.''

''शांतिवनात कशासाठी चालला आहेस बेटा?'' जानकीने विचारले.

चन्द्रसेनने हसत उत्तर दिले-''आई, केवळ ऐश्वर्यच नाही. तर सुख-शांति ही देईल अशी 'बुद्धि' नावाची अद्‌भुत पिशवी परमेश्वराने माणसाला दिलेली आहे. म्हणून मला आता या पिशवीची आवश्यकता नाही. मी ही पिशवी स्वामीजींना परत देऊन टाकणार आहे. इथून पुढे मी परेश्वराने दिलेल्या खऱ्या 'धनाच्या पिशवी'चाच उपयोग करीत राहीन.''





# चलाख मुलगी

एक राजा होता वज्रदत्त. आपल्या प्रजेची सुख-दुःखं जाणण्यासाठी तो वेष पालटून राज्य भर फिरत असे. जनतेला मदत करी. त्याच्या बरोबर त्याचा मंत्री सुबुद्धि नेहमी असे.

एक दिवशी राजा आणि मंत्री वेष पालटून एका गावात हिंडत होते. त्यांना एका झोपडीतून काही निराशेचे सूर ऐकू आले. राजा नि मंत्री थांबून झोपडीतील बोलणी ऐकू लागले.

''काय करावं मला काही समजत नाही. आता परमेश्वरच तुझ्या आईला वाचवू शकेल!'' झोपडीतील पुरुष म्हणाला.

हे निराशेचे बोल ऐकून राजाच्या मनात दया उत्पन्न झाली. राजा व मंत्री दोघे ही झोपडीत दाखल झाले. आत एक गरीब माणूस सचिंत बसला होता आणि त्याची मुलगी रडत होती. जवळच त्या गरीब माणसाची बायको कण्हत आंथरुणावर पडलेली होती.

जेव्हा राजा व मंत्री आत आले तेव्हा त्यांना पाहून गरीब माणूस सादर उठून उभा राहिला.

''तू का बरं इतका दुःखी-कष्टी आहेस? मला सांग, मी तुला शक्य ती मदत जरूर करीन.'' छद्म वेषांतील राजा म्हणाला.

त्या गरीब माणसाने उत्तर दिले-''महाराज, मी एक अति दरिद्री माणूस आहे. माझी बायको आजारी आहे आणि तिच्यावर उपचार करण्यासाठी माझ्याजवळ पैसा नाही. एकाद्या धर्मात्म्याने जर मला थोडे कर्ज दिले तर एक महिनाभरात मी ते परत करीन. पण मला कोणी कर्ज द्यायला तयार नाही.''

२५ वर्षांपूर्वी चांदोबात प्रसिद्ध झालेली गोष्ट



"बरं तर मग मी देतो तुला तेवढी रक्कम." असं म्हणून राजाने मंत्र्याकडे पाहिले. मंत्र्याने आपल्या पिशवीतून वीस अशर्फ्या काढून दिल्या.

गरीब माणसाला मोठं आश्चर्य वाटलं. पैसे घेऊन त्याने विचारले-"आपण कोण, कुठे राहता हे काही मला माहीत नाही. मी कोठे येऊन आपणास पैसे परत करू? आपणास व्याज किती द्यायचं ते ही आपण सांगितलं नाही."

"व्याज देण्याची आवश्यकता नाही. पण कर्जाची रक्कम मात्र एक महिन्यात जरूर परत दे. आज शुक्ल चतुर्थी आहे, पुढील शुक्ल चतुर्थीच्या सायंकाळी गावा बाहेरील गणपतीच्या देवळाजवळ ये. मी तेथे असेन." राजाने सांगितले. नि मग मंत्र्यासह राजा राजधानीला परत आला.

गरीब माणसाला वाटलं की परमेश्वराच्या रूपात हा माणूस आला. आनंदाने त्याने बायकोला औषध-पाणी दिलं. बायको लवकरच आजारातून उठली.

एक महिना संपत आला, कर्जाची रक्कम तो माणूस जमवू शकला नाही. थोडे पैसे कमी पडत होते. अशा परिस्थितीत काही कमी रक्कम देणे त्याला बरे वाटले नाही. म्हणून तो मंदिराकडे गेला नाही. सर्व रक्कम जमली की मगच सर्व कर्ज परत करून क्षमा मागावी असा त्याने विचार केला.

मुदत संपली. पुढील दिवशी म्हणजे शुक्ल पंचमीच्या दिवशी संध्याकाळी राजा आणि मंत्री पूर्ववत् वेष पालटून गरीब माणसाच्या झोपडीपाशी आले. मंत्र्याने बाहेरूनच विचारले-"आत आहे का कोणी?"

तेव्हा झोपडीच्या मालकाची मुलगी बाहेर आली नि त्यांच्याकडे पाहून म्हणाली-"अदृश्य सर्व ठीक आहे. सर्वत्र प्रकाश पसरलेला आहे. कोठे ही अंधार नाही."

या मुलीच्या म्हणण्याचा आशय राजाच्या लक्षात आला नाही. मंत्री निदान असं दाखवीत होता की त्याला सगळं काही समजलं.

मंत्र्याने तिला विचारले-"तुझे वडील कोठे आहेत?"

"वर चढून भगवान सूर्याचे डोळे झाकण्यासाठी गेले आहेत." तिने उत्तर दिले.

"आम्ही येणार आहोत हे तुझ्या वडिलांना ठाऊक नाही वाटतं?" मंत्र्याने विचारले.

"नाही कसं महाराज? दहा आणि दहाच्या जोडीला दोन कमी असल्यामुळे तोंड दाखवायला लाजून मला असं सांगायला सांगितलंय की ते आपल्याला हात दाखवतील, पण आपणास दहा वेळा पापण्यांची उघडझाप केली पाहिजे." मुलीने वडिलांचा निरोप सांगितला.

"बेटा, आम्ही कोण हे तुला माहीत आहे?" मंत्र्याने विचारले.

आदरपूर्वक नमस्कार करीत मुलगी म्हणाली-"होय तर, आपण तीन क्षकार!"

"ठीक आहे. आता तू जा नि आपलं काम कर." मंत्र्याने मुलीला सांगितलं आणि राजाला परत निघायला सुचवलं.

जाताना राजाने मंत्र्याला विचारले-"या मुलीचं बोलणं निदान



मला तरी समजलं नाही. मंत्रीजी, आपल्याला समजलं?"

"होय महाराज, मला सगळं काही समजलं. ही मुलगी गरीब घरची असली तेथे मोठी चलाख आणि बुद्धिमान आहे." मंत्री म्हणाला.

राजाने विचारले-"बरं आहे, पण ती मुलगी म्हणत काय होती?"

"आपल्याला पाहताच त्या मुलीने सांगितले-'अदृश्य' सर्व ठीक आहे. म्हणजे तिच्या आईचे प्राण वाचलेले आहेत. 'अदृश्य' शब्दाचा उपयोग तिने प्राणांसाठी केल, सुख व दुःख यांसाठी तिने 'प्रकाश' व 'अंधकार' हे शब्द

वापरले, आणि ती म्हणाली-आता कोणत्याही कष्टाविना त्यांचे दिवस आरामात चालले आहेत. वडिलांच्या बाबत विचारल्यावर ती म्हणाली की ते भगवान सूर्याचे डोळे झाकायला गेले आहेत. 'भगवान सूर्याचे डोळे' म्हणजे कडक ऊन्ह, उन्हापासून बचाव करण्यासाठी झोपडीचे छत दुरुस्त करायला तो गेला आहे. झोपड्यांच्या छतांना झावळ्या बांधून देणं हा एक त्याचा व्यवसाय आहे. नंतर तिनं सांगितलं की वीस अशर्फ्यांना दोन कमी पडत होत्या, म्हणून शरमेने तिचे वडील आपल्याला भेटायला आले नाहीत. जेव्हा सगळी रक्कम जमा होईल तेव्हा तो येईल असा निरोप त्याने आपल्या मुलीबरोबर दिला. हात दाखवण्याचा इथं हाच अर्थ आहे. तिनं सांगितलं की आपल्याला दहा दिवस थांबलं पाहिजे. दहा वेळा पापण्यांची उघडझाप करणं याचा अर्थ दहा दिवस वाट पाहणं." मंत्र्याने मुलीचे सर्व म्हणणे स्पष्ट करून सांगितले.

राजा म्हणाला-"ठीक आहे, पण तीन क्षकार म्हणजे काय?"

तेव्हा मंत्र्याने उत्तर दिले-"आपण तिचे रक्षक, शिक्षक नि भक्षक आहोत. आपणच ते तीन क्षकार!"

"मंत्रीजी, मला त्या मुलीचं बोलणं काहीच समजलं नाही. तुम्हाला सर्वच्या सर्व लख्ख समजलं. तुमच्या चातुर्याची तारीफ करावी तेवढी थोडीच!" राजा म्हणाला.

या चलाख व बुद्धिमान मुलीच्या उत्तरांवर राजा इतका खुश झाला की त्याने दुसऱ्या दिवशी त्या गरीब माणसाला बोलवून घेतलं आणि त्याला सांगितलं-"तू आता कर्ज परत करण्याची आवश्यकता नाही. मी तुला थोडं धन देतो, तू आणि तुझी मुलगी आता आरामात रहा."

राजाने त्याला एक हजार स्वर्ण-मुद्रा देऊन रवाना केलं.






हनुमानाने सूक्ष्म रूपाने पाताळ-लंकेचे सिंहद्वार पार केले व त्याने आतील नगरीत प्रवेश केला. एका दिशेला बराच गोंधळ चालू असल्याचे त्याने ऐकले. म्हणून तो त्या दिशेने चालू लागला.

एका जागी एका पर्वतातील गुहेत अद्भुत कोरीव काम करून काली मातेचं मंदिर बनवण्यात आलं होतं.

मंदिराच्या परिसरात ढोल, डमरू नि डफली वगैरे वाद्ये वाजत होती. उद्या सकाळी काली-मातेला राम-लक्ष्मणाचा बळी देण्यासाठी ही सगळी तयारी चाललेली होती हे लक्ष्मणाच्या लक्षात यायला वेळ लागला नाही. लगेच हनुमानाने एका छोट्या पालीचं रूप धारण केलं नि काली-मातेच्या गाभाऱ्याच्या छतावर तो जाऊन बसला. काली-मातेच्या मूर्तीच्या ठीक वरच्या बाजूला एक छिद्र होतं. त्यातून हनुमानाने मंदिराच्या गाभाऱ्यात उडी मारली.

काली-मातेची मूर्ति चांगली उंच होती आणि तिचं रूप उग्र होतं. हनुमान त्या मूर्तीच्या समोर जाऊन उभा राहिला आणि आपल्या रौद्र रूपात त्याने देवीला प्रश्न केला-"हे काली-माते! तुला राम व लक्ष्मण यांचाच का बळी पाहिजे?"

काली-मातेने सौम्य रूपात हनुमानाला दर्शन दिले व म्हणाली-"हनुमान, महिरावणाचा अंतिम दिवस जवळ येत चालला आहे. तुझा जय होवो." असा



आशीर्वाद देऊन काली-माता अंतर्धान झाली.

काली-मातेचा आशीर्वाद मिळाल्यावर हनुमानाला खूप आनंद झाला. काली-मातेच्या गाभाऱ्याचे दरवाजे बंद करून, हनुमान स्वतः मूर्तीच्या मागे जाऊन बसला. आता पुढे काय होतंय याची तो वाट पाहू लागला.

याच वेळी महिरावणाच्या अंतःपुरात एक दुसरीच गडबड चालू होती. राम-लक्ष्मणाचा बळी दिल्यावर चंद्रसेना व महिरावण यांच्या विवाहाची तयारी जोरात चालू होती. अंतःपुराचे संरक्षण करणारी कंटकी नावाची राक्षसी मोठ्या उत्साहाने चंद्रसेनेचा साज-शृंगार करीत होती.

राजमहालाच्या प्रांगणात एक नवीन हालचाल सुरू झाली. छोट्या आकारातील राम व लक्ष्मण यांना त्यांच्या खऱ्या स्वरूपात बदलण्यात आले. त्यांना एका गाड्यावर चढवण्यात आलं. तेथील उंच खुंटांना त्यांना बांधून ठेवण्यात आले. ती गाडी ओढण्याचं काम सर्पाकृति दोन भुतं करीत होती. अशा रीतीने राम व लक्ष्मण यांना मिरवणुकीच्या थाटात कालीमंदिराकडे नेलं जात होतं.

राक्षसांचा आनंद-घोष ऐकून त्याचं कारण चन्द्रसेना समजली. ती उठली आणि कंटकीने तिला आडवण्यापूर्वीच ती राजमहालाच्या प्रांगणांतून राजमार्गावर आली. तेव्हा गाडीवर खुंट्याला बांधलेला, पिवळे वस्त्र परिधान केलेला, व कपाळावर शेंदूर लावलेला राम तिला दिसला. चंद्रसेनेला अतिशय वाईट वाटलं आणि दुःखावेगाने ती मूर्च्छित होऊन तेथेच को मडली.

चन्द्रसेनेच्या मागे पळत येणाऱ्या कंटकीचा राग अनावर झाला आणि अगोदरच बेशुद्ध असलेल्या चन्द्रसेनेला ती चाबकाचे फटकारे मारू लागली. तरी पण चन्द्रसेना शुद्धीवर आली नाही. निरुपायास्तव कंटकीने तिला आपल्या





खांद्यावर उचलले व महालात आणून एका खोलीत कोंडून ठेवले.

काली-मातेच्या पूजा संबंधी कार्यात प्रमुख अर्चिका कंटकीच होती. म्हणून ते आपले काम करण्यासाठी ती जलद गतीने मंदिराकडे निघाली. देवी-चरणतीर्थ नावाने दिले जाणारे मद्य सर्वांना कंटकीच्या हस्तेच प्राप्त होई, मग तो अहिरावण असो की महिरावण!

राक्षसांनी कालीच्या मूर्तीला मद्याने अभिषेक करायला सुरुवात केली. गोल छिद्रातून मद्याचे थेंब पडू लागले, तसे हनुमानाने गाभाऱ्यापर्यंत आपले शरीर वाढविले आणि काली-मातेप्रमाणे आदेश दिला-"आता हा मद्याचा अभिषेक पुरे करा, दुधाचा अभिषेक प्रारंभ करा."

हनुमानाच्या या आदेशाबरोबरच बाहेरील सर्व गोंगाट एकदम शांत झाला. सर्व राक्षसांना काली-मातेने मद्याचा अव्हेर केला याचे आश्चर्य वाटू लागले. सोमसूत्राच्या वाटेने येणारे व तीर्थ-कुंडात पडणारे मद्य पीण्यासाठी राक्षस आपापली पात्रे घेऊन तयार होते.

गाडीवर दोऱ्यांनी बांधलेल्या रामाने लक्ष्मणाकडे पाहून मंद स्मित केले. कंटकीने महिरावणाकडे अमळ चिंतातुर नजरेने पाहिले. महिरावणाने आपले डोळे विस्फारून अहिरावणाकडे पाहिले.

अहिरावण डोके हलवून म्हणाला-"महिरावणा, यात आश्चर्य करण्यासारखे काय बरे आहे? राम व लक्ष्मण हे सात्त्विक प्रकृतीचे आहेत ना! मद्याबरोबर हा सात्त्विक आहार योग्य नव्हे. म्हणून काली-मातेने दुधाची मागणी केलेली आहे."

"दादा, तू सांगत आहेस ते ठीकच आहे. रोज देवीचरण-तीर्थ मद्य प्राशन करणारा मी! काली-मातेच्या मनातील गोष्ट इतक्या सहजपणे माझ्या लक्षात कशी बरे येईल?" असं म्हणून महिरावणाने ताबडतोब राक्षसांना आज्ञा केली की आज काली-मातेचा अभिषेक



दुधाने केला जावा.

राक्षसांनी दुधाने भरलेल्या घागरी आणविल्या आणि काली-मूर्तीचा अभिषेक दुधाने सुरू झाला. तीर्थकुंडाच्या वरच्या बाजूच्या छिद्राला तोंड लावून हनुमान ते सर्व दूध गटागट पिऊ लागला. यामुळे त्याचा उत्साह व शक्ति वाढू लागली.

थोड्याच वेळात अभिषेक संपला. महिरावण मोठ्या उत्साहाने मंदिराच्या गाभाऱ्यात आला आणि दरवाजातूनच काली-मातेला नम्र प्रणाम करून म्हणाला-''काली माते! आता तुझे दर्शन घेण्याची अनुमति आम्हाला दे.''

लगेच आतून एक गंभीर ध्वनि ऐकू आला-''महिरावणा! प्रथम तू आपला थोरला भाऊ अहिरावणाला फळे-फुले घेऊन पूजेसाठी पाठव.''

तेव्हा महिरावण आपल्या थोरल्या भावाकडे जाऊन म्हणाला-''दादा, काली-मातेची तुमच्यावर फार कृपा आहे. नैवेद्य घेऊन तिने तुम्हाला आत बोलवलंय!''

आपला पर्वतप्राय स्थूल देह हालवीत, फळां-फुलां बरोबर अनेक स्वादिष्ट खाद्य-पदार्थ व सुवर्ण-पात्रात मध घेऊन अहिरावण मंदिराच्या गाभाऱ्याच्या दरवाजाजवळ पोचला. तेव्हा हनुमानाने दरवाजे उघडले. तो आत पोचताच पुन्हा दरवाजे बंद करून घेतले.

अहिरावण आपल्या हातातील नैवेद्य खाली ठेवू लागताच हनुमानाने त्याचा गळा पकडला व दाबून त्याला मारून खाली पाडले. यानंतर अहिरावणाने आणलेल्या खाद्य-पदार्थांवर हनुमानाने यथेच्छ ताव मारला व स्वर्ण-पात्रातील मध पिऊन तो संतुष्ट झाला. आता त्याचा उत्साह द्विगुणित झाला.

हनुमानाने एकदा चारी बाजूंना पाहिले. अहिरावणाचा मृत देह गाभाऱ्यांतील एका कोपऱ्यात ढकलून दिला. नंतर गंभीर स्वरात हनुमान





म्हणाला-''महिरावण, आता राम-लक्ष्मणाला आत पाठव. अहिरावण माझा प्रिय भक्त आहे, त्याच्याकडून मला प्रथम मंत्रयुक्त पूजा करून घेतली पाहिजे.'' आणि हनुमानाने दार उघडले.

महिरावणाने राम व लक्ष्मण यांना गर्भ-गृहात ढकलून दिले. काली-मातेच्या मूर्तीच्या मागे लपलेला हनुमान म्हणाला-''हे रघुकुल-श्रेष्ठ, अगोदर दाराला कडी लावून घ्या, आणि तयार रहा.'' हे सर्व हनुमान अशा स्वरात बोलला की जणु काली-माताच बोलत आहे.

हे सर्व ऐकून लक्ष्मण आश्चर्याने रामाकडे पाहू लागला. राम मंद-स्मित करून म्हणाला-''लक्ष्मणा, अजून सर्व काही लक्षात नाही आलं तुझ्या? दार आतून बंद करून घे.''

लक्ष्मणाने दार लावून घेतले, तेव्हा एक ध्वनि ऐकू आला-''मूर्तीच्या मागच्या बाजूला या.''

राम व लक्ष्मण जेव्हा काली-मातेच्या मूर्तीमागे गेले, तेव्हा तिथे हनुमानाला पाहून आनंदून गेले. लक्ष्मणाला मोठे आश्चर्य वाटले, तेव्हा राम म्हणाला-''लक्ष्मणा, कालीमातेने मद्याचा अभिषेक नाकारून जेव्हा दुधाचा अभिषेक करायला सांगितले, तेव्हाच मी समजलो की गर्भ-गृहात हनुमान येऊन पोचलेला आहे.''

रामाचं हे बोलणं ऐकून आता लक्ष्मणाला ही एकेक गोष्टीचा उलगडा होऊ लागला. हनुमानाने राम-लक्ष्मणांना काली-मातेच्या मूर्तीजवळ ठेवलेले धनुष्य-बाण दाखविले. राम व लक्ष्मण यांनी धनुष्य-बाण उचलले. आता हनुमानाने आपले शरीर वाढवले व राम-लक्ष्मणांना आपल्या भुजांवर बसविले. मूर्तीच्या जवळपास असलेले सर्व बाण ही त्यांनी आपल्या बरोबर घेतले.

मंदिराच्या गाभाऱ्या बाहेर राक्षसांचा गोंधळ चालू होता. राम व लक्ष्मण यांचा



बळी दिला जात असताना ते दृश्य पाहण्यासाठी ते उतावीळ झाले होते. बळी देण्यासाठी निश्चित केलेल्या मूहूर्ताची वेळ संपून गेली होती. तरी पण अहिरावण गाभाऱ्यातून राम व लक्ष्मणांना बाहेर आणीत नव्हता.

आता सर्वात प्रथम कंटकीच्या मनात शंका आली की गाभाऱ्यात काही तरी गोलमाल झालेला आहे. तिने सावधपणे दाराच्या फटीतून आत डोकावून पाहिले. तिथे देवीच्या अभिषेकाचं दूध जमिनीवर तिला कुठे दिसलं नाही. यावरून तिने ओळखलं की मंदिराच्या गर्भ-गृहात कोणी धोकेबाज शत्रु येऊन थांबलेला आहे.

म्हणून कंटकीने जोरात किंचाळून राक्षसांकडे पाहिले. तेव्हा राक्षस तिच्या जवळ येऊन म्हणाले-"काय झालं? काली-मातेला राम-लक्ष्मणाचा बळी मिळाला?"

या प्रश्नावर आणखी जोरात ओरडून कंटकी म्हणाली-"अरे मूर्खांनो, आपल्या डोळ्यांदेखत आपल्याला धोका देण्यात आलेला आहे. आपली रहस्ये शत्रूपर्यंत पोचवण्याचं काम एकट्या चंद्रसेनेचंच! तिला चाबकाने सडकून काढा, म्हणजेच ती खरं काय ते सांगेल." असं म्हणून ती चंद्रसेनेच्या खोलीकडे धावत सुटली.

कंटकीचं हे सर्व बोलणं ऐकून राक्षस बुचकळ्यात पडले. ते एकमेकांकडे पाहू लागले. कंटकीला शंका आलेली आहे. त्याप्रमाणे खरोखरीच कोणी शत्रु आत पोचला असावा काय? महाबलशाली महिरावणाच्या पाताळ-लंकेच्या राज्यात शत्रु पोचू शकेल? हा शत्रु कोण बरे असावा?

असा विचार करणाऱ्या राक्षसांपैकी काही धाडसी राक्षस मंदिराच्या गाभाऱ्याकडे निघाले. त्यांची थाप दरवाज्यांवर पडण्यापूर्वीच हनुमानाने भयंकर हुंकार भरीत दरवाजांवर लाथ मारली व तो बाहेर पडला.

हनुमानाला पाहताच राक्षस ओरडले-"धोका! धोका!" हनुमानाच्या खांद्यावर बसलेल्या राम-लक्ष्मणांकडे ते आश्चर्याने पाहू लागले, इतक्यात राम व लक्ष्मण यांनी त्यांच्यावर बाणांचा वर्षाव केला. अनेक राक्षस तेथेच मृत्यु-मुखी पडले.

काली-मातेच्या मंदिरासमोर आपल्या प्रमुख सेवकांसह सल्ला-मसलत करीत असलेल्या महिरावणाने जेव्हा अचानक हनुमानाच्या खांद्यावर बसलेल्या राम-लक्ष्मणांना पाहिले तेव्हा तो संतापून गर्जना करू लागला. हातात धनुष्य-बाण घेऊन हा हा म्हणता तो युद्धाला तयार झाला.

राम व लक्ष्मण दुप्पट उत्साहाने महिरावणावर बाण सोडू लागले. या बाणांच्या माऱ्याने ही महिरावण डगमगला नाही. त्याच्या रक्ताचे जे थेंब जमिनीवर पडले त्यातून आणखी एक-एक महिरावण निर्माण होऊ लागले. हे नवे महिरावण पण गर्जना करीत राम-लक्ष्मणांवर बाण फेकू लागले.

हा सर्व प्रकार पाहून राम व लक्ष्मण यांना आश्चर्य वाटले आणि त्यांनी हनुमानाला विचारले-"हे सर्व विपरीत काय घडत आहे? इतक्या सर्व महिरावणांचा, त्यांच्या रक्ताचा एक ही थेंब जमिनीवर पडणार नाही अशा रीतीने कसा वध करता येईल?"

हे प्रश्न ऐकून हनुमानाला सुवर्चलादेवीने सांगितलेले रहस्य आठवले-ते म्हणजे चंद्रसेनेची गोष्ट! हनुमानाने राम व लक्ष्मणाला थोडक्यात सर्व सांगून टाकले व तो आकाशात उडाला. एका उंच ठिकाणी राम व लक्ष्मण यांना उतरवून, हनुमान तेथून चन्द्रसेनेकडे जायला निघाला. इकडे राम व लक्ष्मण लक्षावधि महिरावणांवर बाण सोडीतच होते.





# राक्षस मंत्री

राजवर्मा नामक राजाच्या मनात एकदा सम्राट बनण्याची इच्छा उत्पन्न झाली. त्याने आपला मंत्री धर्मचिंतन याला बोलवून युद्धाची तयारी करण्याचा आदेश दिला.

मंत्र्याने याला स्वीकृति दिली नाही, तो म्हणाला-"महाराज, युद्ध केल्यामुळे दान, मान व प्राण यांची हानि होते. आपला युद्धाचा विचार आपण सोडून दिला तर बरे होईल."

राजवर्माला हा सल्ला आवडला नाही. त्याने धर्मचिंतनला मंत्र्याच्या जागेवरून काढून टाकलं. नंतर अवकाश वर्मा नावाच्या एका दासी-पुत्राला मंत्री-पदावर बसवलं आणि त्याला आपली सम्राट बनण्याची इच्छा सांगितली.

बरेच दिवस अवकाश वर्माची राजसिंहासनावर नजर होती आणि राजा बनण्याच्या संधीची तो वाट पहात होता.

नवा मंत्री अवकाश वर्मा राजा राजवर्माला म्हणाला-"महाराज, आपल्या चेहऱ्यावर सम्राट बनण्याची लक्षणे स्पष्ट दिसत आहेत, आणि आपण सम्राट नक्कीच होणार! आपल्या राज्याच्या सरहद्दीवर प्रलय पर्वतावर प्रलय मुनि तपस्या करीत आहेत. आपण त्यांच्याकडे जाऊन आशीर्वाद मिळवला तर आपली मनोकामना पूर्ण व्हायला वेळ लागणार नाही."

प्रलय पर्वतावर प्रलय नावाचा एक राक्षस राहत असे. तो मोठा क्रूर व रक्तपिपासू होता. त्याला एक शाप होता की जोपर्यंत एकाद्या देशाचा राजा अनुमति देणार नाही, तोपर्यंत त्याला त्या राज्यात प्रवेश करता येत नसे.

अवकाश वर्माचा सल्ला ऐकून राजा

पुरुषोत्तम बापट



म्हणाला-"मी आजपर्यंत प्रलय मुनीबाबत काही ऐकलं नाही. तेथे एक प्रलय नावाचा राक्षस राहतो हे मला माहीत आहे.जर मी तेथे गेलो तर माझ्या जिवाला नक्की धोका आहे."

अवकाश वर्माने विश्वासपूर्वक राजाला सांगितले-"महाराज, कोणी ही सामान्य माणसाने पर्वतावर जाऊन प्रलय मुनींच्या साधनेत विघ्न आणू नये, म्हणून हा अपप्रचार चालू आहे. आपण यावर मुळिच विश्वास ठेवू नये. त्या पर्वतावर कोणी ही राक्षस रहात नाही. मला हे प्रलय मुनीच्या एका शिष्याने सांगितले आहे. सम्राट बनण्याची अद्भुत शक्ति प्राप्त करूनच आपण परत याल."

राजा राजवर्माने विचार केला की काही तरी साहस केल्याशिवाय सम्राट बनण्याची आपली इच्छा कशी पूर्ण होईल?

अनेक संकटांना तोंड देत राजवर्मा प्रलय पर्वतावर पोचला, आणि तिथे एका झाडाखाली आराम करण्यासाठी बसला. अचानक त्याच्या समोर एक भयंकर राक्षस येऊन उभा राहिला.

अवकाश वर्माने सांगितलेल्या सर्व गोष्टींवर विश्वासून राजा राजवर्मा प्रलय पर्वतावर आलेला होता. जरा ही न डगमगता राक्षसाला नम्रपणे नमस्कार करीत राजा म्हणाला-"हे मुनीश्वर, मी या राज्याचा राजा आहे राजवर्मा. माझी इच्छा पूर्ण करण्याची कृपा करावी."

हे सर्व ऐकून राक्षसाला मोठं आश्चर्य वाटलं नि त्याने एकदा राजाकडे निरखून पाहिले. मग तो आपल्या जाड्या-भरड्या आवाजात म्हणाला-"एका राक्षसात मुनीचं दर्शन करणारी तुझी दृष्टि मोठी अजब आहे. तू मला आपला मंत्री बनवून आपल्या बरोबर घेऊन चल. आणि तू मला वचन दे की माझ्या सल्ल्यावाचून तू काही ही करणार नाहीस."

आता काय करावं हे राजाच्या लक्षात येईना.





विचारात पडलेल्या राजाला राक्षसाने आपल्या दोन्ही हातांनी उचललं आणि म्हणाला-"बोलत का नाहीस? मला तर जोराची भूक लागली आहे. तुझा होकार वा नकार काय तो झटकन सांगून टाक."

"माझ्यात अशी ताकत आहे की मी मनात येईल तसे रूप धारण करू शकतो. तू माझ्या सांगण्याप्रमाणे वागशील असं फक्त मला वचन दे." राक्षस म्हणाला.

"तू फक्त मंत्रीच का बनू इच्छितोस? मला मारून माझ्या राज्यात प्रवेश करून तू तेथील राजा ही होऊ शकतोस की?" राजाने आपली शंका विचारली.

राजाचा प्रश्न ऐकून राक्षस थोडा बुचकळ्यात पडला. मग आपण जणू काही रहस्य सांगत आहोत अशा थाटात तो म्हणाला-"मला एक शाप लागलेला आहे. राजाच्या परवानगी शिवाय मी कोणत्या ही राज्यात पाऊल ठेवू शकत नाही. म्हणूनच मी तुला मारून टाकण्या ऐवजी तुझी परवानगी मागत आहे. आता तू मला विचारशीलच की मी मंत्री कशासाठी बनू इच्छितो. प्रजेचं संरक्षण करणं हे राजाचं कर्तव्य असतं, तर मंत्र्याचं कर्तव्य असतं की राजाचं कल्याण करायचं! मी तुझं कल्याण नि संरक्षण सहज करू शकतो, प्रजेचं संरक्षण करणं कर्म-कठीण, ते नाही मला जमणार. राजा माझ्या शब्दात असला, म्हणजे मग प्रजेवर अन्याय झाला तर ती जबाबदारी राजाची, माझी नव्हे!"

हे ऐकून राजा विचार करू लागला. त्याला वाटलं की राक्षसाची शक्ति वाखाणण्यासारखी आहे आणि त्याच्यामुळे आपल्या प्राणाला धोका नाही. कारण आपलं रक्षण करणारा मंत्री बनून राहणार तो! अशा स्थितीत आपले कल्याणच होईल. शिवाय योग्य वेळी याच्या मदतीने आपण सम्राट ही बनू शकू. असा विचार करून राजाने राक्षसाची अट मान्य केली.

राक्षसाने तावडतोब माणसाचं रूप



धारण केलं. आणि मग राजा नि राक्षस राजधानीत आले.

इकडे अवकाश वर्मानं राज्यात घोषणा केली की राजाला मृत्यु आलेला आहे आणि आपल्याला राज्याभिषेक करण्याची योजना त्याने आखली. राजाला परत आलेला पाहून त्याची अवस्था दयनीय झाली. राजाने डोळे वटारून त्याच्याकडे पाहिले आणि म्हणाला-"तू जो अपराध केला आहेस, त्याबद्दल काय शिक्षा होईल तुला माहीत आहे?" राजा असंच आणखी काही बोलणार इतक्यात-

राक्षस मंत्र्याने राजाला मधेच थांबवले नि म्हणाला-"महाराज, आजपासून राज्यात कोणी अपराध केला तर त्याबाबत निर्णय आपण घ्यायचा, पण अपराध्याला शिक्षा करायचं काम माझं! सर्व राजद्रोह्यांना मी कशी शिक्षा करतो पहाच तुम्ही." असं म्हणून राक्षस मंत्र्याने आपले शरीर वाढवले आणि अवकाश वर्माला आपल्या मुठीत दाबून खाऊन टाकलं. मग राक्षस पुन्हा मानव रूपात प्रकट झाला. हा सर्व प्रकार पाहून राजदरबारातील सर्व लोकांनी तोंडात बोट घातलं.

राक्षस मंत्र्याचं हे काम पाहून राजा ही चरकला. असं काही होईल याची त्याला कल्पनाच नव्हती. त्या दिवसापासून राज्यात कोणी काही किरकोळ अपराध केला तरी अपराध शाबित झाल्यावर राक्षस मंत्री अपराध्याला पकडून खाऊ लागला. अचानकपणे राज्यातील गुन्हेगारी एकदम बंद झाली. राज्यातील लोकात आपापसात काही तंटे-बखेडे झाले तर न्यायासाठी कोणी राजाकडे येईना. लोक आपसातच विचार-विनिमय करून भांडणे मिटवू लागले.

अशा रीतीने काही दिवस गेल्यावर राक्षस मंत्री राजाला म्हणाला-"जर लोकांनी गुन्हे केले नाहीत, तर मला भोजन कसे मिळेल? माझ्या भयामुळे लोक न्याय मागण्यासाठी दरबारात येतच नाहीत, म्हणून आता आपणच जनतेत जाऊं. तू गुन्हेगारांना न्याय दे, आणि मी अपराध्याला खाऊन टाकून आपली भूक भागवीन."

राजवर्माला हा प्रस्ताव आवडला नाही. तो म्हणाला-"तुला भरपूर भोजन मिळावं, यासाठी मी एक छान उपाय योजला आहे. आपण शेजारच्या राज्यांवर आक्रमण करू. युद्धात आपलाच जय होईल आणि शत्रूचे जे सैनिक आपण बंदी बनवून आणू, त्यांना रोज एक-एक करून तू खाऊ शकशील."

राक्षसाने याला संमति दिली. राजाने ताबडतोब शेजारच्या राज्याशी युद्ध आरंभिल्याची घोषणा केली. दोन्ही देशांचे सैनिक एकमेकांवर तुटून पडले. शेजारच्या राज्याचा राजा धर्मसेन याच्याजवळ विपुल सैन्य होते. पण राजवर्माच्या सैन्यात राक्षस एकाद्या विशाल वट-वृक्षाप्रमाणे उभा राहिला. त्याला पाहताच धर्मसेनचे सैनिक घाबरून पळून जाऊ लागले.

राजा राजवर्मा धर्मसेनला म्हणाला-"माझ्या पाशी सैनिक-शक्ति बरोबरच राक्षस-शक्ति ही आहे. युद्ध करून सैनिकांचे व आपले प्राण गमावण्याची तुझी इच्छा आहे, का माझा



मांडलीक राजा बनून आपल्या प्राणांचे रक्षण करू चाहतोस?"

धर्मसेनने राजवर्माला काही उत्तर दिले नाही. त्याने आपले सर्व सैन्य परत पाठवले. पळून चाललेल्या धर्मसेनच्या सैनिकांकडे पाहून राजवर्मा विकट हास्य करू लागला.

याच वेळी माजी मंत्री धर्मचिंतन तेथे आला व राजा राजवर्माला म्हणाला-"प्रभु, आता हे सर्व बस झाले. धर्मसेनने लढवलेली युक्ति आपल्या लक्षात न आली, तर आपणच संकटात पडाल."

माजी मंत्र्याला मधेच थांबवीत राजवर्मा म्हणाला-"मला भिऊन पळून



जाणारांचं मला काय भय? तू वेडा तर नाही ना होत चाललास?"

"आपणच नीट विचार करा महाराज! आता आपण आपल्या राज्याच्या सरहद्दीवर आहोत. बुद्धिमान धर्मसेन आपल्या सेनेला आपल्या राज्याच्या सरहद्दीत घेऊन चालला आहे. आपल्या राक्षस मंत्र्याला मिळालेला शाप आपणास माहीतच आहे. धर्मसेनच्या राज्यात जाण्यासाठी त्याला त्याची परवानगी मिळवली पाहिजे. फक्त आपण व आपली सेनाच त्या राज्यात जाऊ शकेल. आपला राक्षस-मंत्री इथेच राहून जाईल. मग धर्मसेन आपल्याला सहज हारवील. तेव्हा आपल्या देशाचा राजा धर्मसेन असेल आणि त्याच्या परवानगी शिवाय राक्षस या राज्यात राहू शकणार नाही, म्हणून मी म्हणतो आपण परत फिरावे." धर्मचिंतनने सल्ला दिला.

आता वस्तु-स्थिति राजवर्माच्या लक्षात आली. राक्षस मंत्र्याच्या मदतीने शेजारचे राज्य जिंकणे राजवर्माला कठीण वाटू लागले. त्याने धर्म-चिंतनला विचारले- "मग आता मी काय करू? शत्रूचे सैनिक मिळाले नाहीत तर हा राक्षस माझ्याच प्रजेला मारून खाईल. याच्या तावडीतून माझी मुक्ति कशी होईल?"

तेव्हा धर्मचिंतनने सल्ला दिला- "महाराज, राजाने दुसरे राज्य जिंकायची इच्छा केली की राक्षसाला खाद्य मिळते. प्रजेने गुन्हे केले तर राक्षसाला भोजन मिळते. राक्षस मंत्र्याच्या कृपेने ही दोन सत्यें आपण जाणली. आपण राक्षसाला आदेश द्या की त्याने आपले राज्य सोडून जावे. यातच आपले सर्वांचे कल्याण आहे असे मला वाटते."

राजाला धर्मचिंतनचा सल्ला पटला. राजाने राक्षसाला आपले राज्य सोडून जाण्याचा आदेश दिला. राक्षस चवताळून राजाला पकडण्याचा प्रयत्न करू लागला. ताबडतोब राजवर्माच्या साऱ्या सैनिकांनी



मिळून राक्षसावर हल्ला चढविला. सर्वांच्या पुढे एकट्या राक्षसाचे काही चालेना. त्याने भिऊन प्रलय पर्वताकडे प्रयाण केले.

हे पाहून राजवर्माला आनंद झाला. तो धर्मचिंतनला म्हणाला-"मंत्रीजी, मी आपणावर अन्याय केला होता. ते सर्व आपण कृपा करून विसरून जा. आपणास मंत्री-पदावरून दूर करण्यात मी मोठीच घोडचूक केली. अवकाश वर्माच्या सल्ल्याने मी काही काळ वागलो व आपल्याच पायांवर धोंडा पाडून घेतला. आता तरी मला आपली चूक कळली. राक्षस-मंत्र्याच्या तावडीतून आपण माझी सुटका केली. मी आपले कसे आभार मानू? आपण मला उदार अंतःकरणाने क्षमा करावी. येथून पुढे तुम्हीच माझे मंत्री. तुमचा सल्ला मी कधी ही डावलणार नाही असे मी आपणास वचन देतो."

नम्रपणे राजवर्माला नमस्कार करून धर्मचिंतनने उपदेश केला-"महाराज, आपण आपापसात तंटे-बखेडे करीत राहिलो की राक्षसांची शक्ति वाढते, जर आपण सर्व एकत्र असलो तर कोणत्या ही राक्षसाला भारी आहोत. राक्षसांशी सामना करण्यासाठी आपण आपलं सैन्य वापरलं पाहिजे, आपलं राज्य वाढवण्यासाठी नव्हे. आता आपण सम्राट बनण्याची आपली महत्त्वाकांक्षा सोडून द्यावी. आपल्या राज्यातच लपून छपून बसलेले मानव-रूपातील राक्षस शोधून काढून त्यांचे निर्मूलन करा, अशा रीतीने जनतेचा उद्धार करणे आपले प्रमुख कर्तव्य आहे."

राजा राजवर्माने धर्मचिंतनलाच पुन्हा आपले मंत्री-पद दिले आणि त्याच्या सल्ल्याने राज्य चालवीत चांगली कीर्ति प्राप्त केली.



# चांदोबाच्या बातम्या

### भूकंपामुळे पिरामिडांचे नुकसान

मिश्रच्या पिरामिडांना इतिहासात पहिल्यांदा भूकंपाचा धक्का बसला. प्राचीन काळापासून पिरामिड जगातील एक अद्भुत मानली जाणारी निर्मिति होय. गेल्या १९ ऑक्टोबर रोजी झालेल्या भूकंपात कैरोला चांगलाच तडाखा बसला. या शहराच्या जवळील खुफु, खियोप्स या पिरामिडांच्या वरील भागाचे खूप नुकसान झाले. जगातील अति प्राचीन सहा-मजली पिरामिड 'सक्कारा' व 'चेप्रेन' यांचे काही दगड निखळून बाहेर आले. मिश्रचे वैभव समजल्या जाणाऱ्या या पिरामिडांचे अधिक नुकसान होऊ नये यासाठी आवश्यक ती कार्यवाही केली जात आहे.

### मुसळधार पाऊस

जगात सर्वात अधिक पाऊस कोठे पडतो हे तुम्हाला माहीत आहे? मेघालयातील चेरापुंजीकडे तुम्ही बोट दाखवाल तर ते बरोबर नाही. सन १९८५ पर्यंत चेरापुंजी मध्ये अधिकाधिक पाऊस ११,३१४ मि.मी. पर्यंत पडत असे. पण त्यानंतर संयुक्त राष्ट्र अमेरिकेतील वायलीले येथे याहून अधिक म्हणजे ११,४३८ मि.मी. पाऊस पडला. या वर्षी चेरापुंजी पासून १६ कि.मी. अंतरावर असलेल्या मासींग्राम येथे झालेल्या पावसाने




उच्चांक गाठला. तेथे ११,८७३ मि.मी. पाऊस पडला. येथे वर्षातील १५० दिवस पाऊस पडल्याची नोंद आहे. १० जुलै १९५२ रोजी एका दिवसात १८९.६ मि.मी. पाऊस येथे पडला. गेल्या ४० वर्षात भारतात इतका अधिक पाऊस अन्यत्र कोठे ही पडला नाही. तसेच जगांत मासिक, अर्धवार्षिक व वार्षिक सर्वाधिक पाऊस चेरापुंजी येथे झाल्याची नोंद आहे.

### दूरच्या ग्रहांवरील रहिवाशांचा कंठ-ध्वनि

दूरच्या ग्रहांवरील कंठ-ध्वनि ऐकण्यासाठी अमेरिकेतील अंतरिक्ष अनुसंधान संस्थेने (NASA) नुकताच कॅलिफोर्नियातील मोझांबेच्या वाळवंटात ३४ मीटरचा डिश-अँटेना लावला. अंतरिक्षांतून येणारे ध्वनि अधिक स्पष्टपणे ऐकून तेथील प्राण्यांबाबत काही समजावे या आशेने हे प्रयत्न करण्यात येत आहेत. नासाचे वैज्ञानिक मोठ्या उत्साहाने अंतरिक्षातील पहिले कंठ-ध्वनि ऐकण्यासाठी उत्सुक आहेत.





# महामल्ल

खूप वर्षांपूर्वी कर्नाटकातील शुभवती नगरात राजा शंबल राज्य करीत होता. त्याच्या दरबारात अनेक मोठमोठे शूर वीर व मल्लयोद्धे ही असत.

एकदा शंबल राजाच्या दरबारात महामल्ल नावाचा एक मल्लयोद्धा आला. अनेक राज्यातल्या कित्येक मोठ्या पहिलवानांना मल्लयुद्धात हरवून त्याने अनेक पदव्या व पदके मिळवली होती. त्यामुळे तो गर्वाने फुगून गेला होता.

महामल्ल शंबल राजाला म्हणाला, "राजा! तुमच्या दरबारात मला हरवू शकेल असा मल्ल कोणी असेल तर त्याला बोलवा. जर कोणी तसा योद्धा तुमच्याकडे नसेल तर ताबडतोब आपला पराभव कबूल करून मला तसं प्रशंसापत्र व पदवी लिहून द्या."

महामल्लाचे हे आव्हान ऐकून सर्वच दरबारी चकित झाले. तेंव्हा राजाचा बुद्धिमान महामन्त्री उठून म्हणाला, "महाराज, आपला दरबारी मल्लयोद्धा 'चंड-प्रचंड दुर्दंड गोलमल्ल' याच्या समोर जगातला कोणीही मल्लयोद्धा उभाच राहू शकत नाही, हे तर सर्वांना माहीतच आहे. सध्या तो बाहेरगावी गेलेला आहे. दोन-चार दिवसात तो परत आला की या मल्लयोद्ध्याला चांगलं पाणी पाजील. तोवर आपण याची इथे रहायची सोय करू या."

नंतर मोठ्या मानमरातबाने महामल्लाची राहण्याची उत्तम व्यवस्था करण्यात आली.

दुसऱ्याच दिवशी महामल्लच्या विश्रामगृहाच्या बाहेर एक नवीन विश्रामगृह बनवण्यात आले. त्याचा दरवाजा खूपच उंच अन् रुंद होता. तो

कर्नाटकातील लोककथा

पाहून महामल्लाच्या नोकरांनी आश्चर्याने विचारले, "हा काय प्रकार?"

मन्त्र्याचे नोकर उत्तरले, "आमचे गोलमल्लजी येणार आहेत नं? म्हणून दरवाजा इतका मोठा केलाय."

घर बांधणाऱ्या मजुरांवर गवंडी ओरडत राहिला, "अरे, जमीन चोपण्याने चांगली बदडून बदडून कडक करा रे; नाहीतर गोलमल्लजींचा पाय पडताच जमीन खचून खड्डे पडतील!" नंतर मोठमोठया भांड्यांतून-हंड्यांतून गोलमल्लसाठी अंडी, बदाम-पिस्ते, दूध, लोणी वगैरे वस्तु मोठया प्रमाणात आणून ठेवायला सुरुवात झाली.

या साऱ्या हालचाली महामल्ल पहातच होता. नंतर साऱ्या शहरात घोषणा दिली गेली की-'गोलमल्लजी उद्या नवीन विश्रामगृहात रहायला येत आहेत.' दुसऱ्या दिवशी सकाळी एक विशाल बग्गी तेथे येऊन उभी राहिली. बग्गीला आठ घोडे जोडलेले होते. सभोवती असणारी सर्व माणसे जोरजोराने जयजयकार करत ओरडत होती-'चंड प्रचंड दुर्दंड गोलमल्ल की जय!' त्याच्या स्वागतासाठी खुद्द राजा तेथे उभा होता. महामल्लने गोलमल्लला कधी पाहिलेच नव्हते.

थोडयाच वेळात एक शिपाई राजाजवळ येऊन म्हणाला, "महाराज, महामल्ल तर आपल्या विश्रामगृहात नाहीच आहे! पहारेकरी म्हणतोय की, तो कुणाला न सांगतासवरताच तेथून निघून गेलाय!"

आता हळूच गालात हसत मन्त्री म्हणाला, "महाराज, आपली युक्ती छान सफळ झाली! तो महामल्ल नुसत्या आपल्या हालचाली पाहूनच घाबरून पळून गेला! आत्तापर्यंत तर तो आपल्या नगराची सीमाही पार करून गेला असेल!"



## बहुरूपा वसुंधरा

### आपापसातील सहकार

आपल्या शरीरावर बसणाऱ्या घोंगावणाऱ्या माशांना पिटाळून लावण्यासाठी जनावरे बहुधा आपल्या शेपटीचा उपयोग करतात. पण शेपूट किती ही लांब असली तरी शरीराच्या सर्व भागांपर्यंत पोचू शकत नाही. अशा स्थितीत दोन जनावरे एकमेकांजवळ उभी राहून आपापल्या शेपट्या हलवतात आणि दुसऱ्याच्या अंगावर घोंगावणाऱ्या माशांना पळवून लावतात.



### झोपणाऱ्या वनस्पति

माणसे सकाळी झोपून उठतात आणि रात्री पुन्हा झोपी जातात. ही सवय काही वनस्पतीत ही दिसून येते. या वनस्पति रात्री झोपतात. अशा वनस्पतींची फुले दिवसा उमलतात आणि रात्री मिटून जातात. विशेष गोष्ट अशी की या वनस्पतींना रात्री प्रकाश मिळेल अशी व्यवस्था केली आणि दिवसा त्यांना जर अंधारात ठेवले तर त्यांची फुले रात्रीच्या प्रकाशात उमलतात व दिवसाच्या अंधारात मिटतात.



### दीर्घायुष्य

अधिकाधिक दीर्घायुषी मनुष्य प्राणीच आहे. पण काही प्राणी मनुष्याहून ही अधिक काळ जगतात. उदाहरणार्थ 'सी-अनेमोन' नावाची समुद्री वनस्पती आणि 'स्पंज' हे शतकानुशतके जिवंत राहतात. त्यांच्या दीर्घायुष्याचे कारण एकच आहे की त्यांच्या शरीराचे जे सेल मरून जातात, ते पुन: जीवित ही होतात.



## चन्दामामाला राष्ट्रीय पुरस्कार

ता. २७ डिसेंबर रोजी एका शानदार समारंभात इचलकरंजी (महाराष्ट्र) येथील एफ्. आय्. ई. फाउंडेशनने तुमच्या आवडत्या मासिकाचा एक ढाल व २५००० रु.चा चेक असा राष्ट्रीय पुरस्कार देऊन गौरव केला याहून अधिक उत्तम नव-वर्षाची भेट काय होऊ शकेल?

मासिकाला दिलेल्या मानपत्रात म्हटले आहे:

"दरमहा प्रकाशित होणारे मासिक चंदामामा सर्व बालक व पालक यांना इतके आवडते की ते त्यांच्या घराचे व जीवनांचे एक अविभाज्य अंग बनून गेले आहे. एकाद्या उदात्त कल्पनेने चालवलेल्या व अभिनव स्वरूपात प्रस्तुत होणाऱ्या, मुलांच्या व पालकांच्या आशा-आकांक्षा यांची पूर्ति करणाऱ्या मासिकाची कल्पना कै. श्री चक्रपाणी यांनी केली. सध्याचे प्रबंध संपादक श्री बी. नागी रेड्डी यांनी मिशनरी उत्साहाने सन १९४७ मध्ये ही कल्पना उचलून धरली आणि आज चन्दामामा १२ विभिन्न भाषातून प्रकाशित होत आहे. काही भाषांतून प्रसिद्ध होणारे अंधांचे संस्करण वेगळे.

चंदामामाने मुले व माता यांची बहुरंगी सेवा करीत असताना हजारो गोष्टी, धारावाहिक कथा, महाकाव्ये व पुराणे यातील गोष्टी, लोक-कथा व चरित्रे प्रकाशित केली. मुले देशाच्या कोणत्या ही प्रदेशातील असोत, त्यांची मातृभाषा कोणती ही असो, ती एकच आहेत; व त्यांच्या आशा-आकांक्षा या एकच असतात. प्रचंड विविधतेने भरलेल्या आपल्या या देशातील जीवनात बालकांच्या विचार व कल्पना यांच्या ऐक्या द्वारे राष्ट्रीय एकात्मता साधता येईल असा या मासिकाला दृढ विश्वास वाटतो."

गेल्या साडे चार दशकात आपल्या उपलब्धीबाबत जे आम्ही अभिमानाने सांगत आलो तेच एफ्. आय्.ई. फाउंडेशनने आपल्या मानपत्रात म्हटले आहे. फाउंडेशनच्या या उद्‌गारांबाबत आपली कृतज्ञता व्यक्त करण्यासाठी शब्द तोकडे पडतील. विज्ञान व तंत्र-ज्ञान, इंजिनियरिंग, व्यापार प्रबंध, कला, संस्कृति, मानव-विज्ञान, कृषि व क्रीडा या क्षेत्रात विशेष कार्य केलेल्यांचा गौरव फाउंडेशन गेली दोन दशके सतत करीत आहे. राष्ट्रीय एकात्मतेला उत्तेजन देण्यासाठी आपापल्या क्षेत्रात ज्या व्यक्ति विशेष कार्य करीत आहेत त्यांना प्रकाशात आणण्याचे काम फाउंडेशनने केले आहे.

आमचे प्रशंसक, प्रेमी व हितचिंतक यांच्या आनंदात आम्ही ही सहभागी आहोत.

बी. विश्वनाथ रेड्डी,
चन्दामामा प्रकाशनासाठी



# चीन मधील परिवर्तन



सोविएट रशियातील कम्युनिस्ट सरकारचे पतन आणि सन १९९१ मधील यु.एस्.एस्.आर्. मध्ये झालेल्या घडामोडी यांचा चीन सारख्या कम्यूनिस्ट देशावर सुद्धा परिणाम होत आहे. चीन मध्ये ही काही बदल होत आहेत.

चीनच्या कम्यूनिस्ट पार्टीचे १४ वे राष्ट्रीय कॉंग्रेस अधिवेशन गेल्या आक्टोबर मध्ये झाले आणि त्यात समाजवादी व्यापारिक अर्थनीतीच्या (Socialist Market Economy) तत्त्वावर देशाच्या घटनेत काही सुधारात्मक बदल करण्यात आले. कसले ही विदेशी भांडवल, साधन अथवा तंत्रज्ञानाचा स्वीकार न करणारा देश असे आज पर्यंत चीनचे वर्णन केले जात असे, आता ते सर्व बदलेल. या राष्ट्रीय कॉंग्रेस अधिवेशनात अन्य देशांशी आर्थिक व तंत्रज्ञान-संबंधी देवाण-घेवाण नि सहकार करण्याचा चीनने निर्णय घेतला. दुसऱ्या शब्दात सांगायचं म्हणजे चीनने अन्य देशांना, बाहेरील जगाला आपल्या देशात प्रवेश करण्यास मोकळीक दिली.

सडके जुने विचार आणि अर्थनीति यांमुळे देशाच्या आर्थिक प्रगतीत अडथळा येत आहे असे या अधिवेशनात प्रतिनिधींचे मत पडले. पार्टीच्या प्रमुख सचिवांनी २६०० शब्दांच्या आपल्या अहवालात असे सुचवले की जेव्हा जेव्हा आर्थिक स्वातंत्र्य दिलं गेलं, तेव्हा तेव्हा बरीच आर्थिक प्रगति घडून आली. या अहवालात असं ही नमूद केलं आहे की "सुधारणा ही एक प्रकारची क्रांति असते आणि उत्पादन-शक्तींना स्वातंत्र्य देणं हे तिचं ध्येय असतं."

कॉंग्रेसने जो निर्णय घेतला त्याला 'चीनची दुसरी क्रान्ति' समजून सर्वत्र त्याचे स्वागत केले गेले. सन १९४९ मध्ये जेव्हा माओ-त्से-तुंगच्या नेतृत्वाखाली कम्यूनिस्ट पार्टी सत्तारूढ झाली ती चीनची पहिली क्रान्ति होय. माओच्या मृत्यूनंतर त्याचा उजवा हात डेंग जियोपिंग जेव्हा प्रमुख बनला (सन १९७८) तेव्हा त्याने चीनच्या आधुनिकीकरणाचा व नवीन अर्थ-नीति अंमलात आणण्याचा प्रयत्न केला. सन १९८७ मध्ये पार्टीचे जे राष्ट्रीय कॉंग्रेस अधिवेशन झाले त्याचा तो अध्यक्ष होता. नंतर 'पॉलिट ब्यूरो' (सेंट्रल कमिटी) च्या कामातून तो निवृत्त झाला. यानंतर पार्टीचे कुठले ही अधिकार-पद त्याने भूषविले नाही.

आता डेंग जियोपिंगचे वय ८८ वर्षांचे आहे, तरी पण सेवा-निवृत्तीच्या काळात तो एक शांतिपूर्ण क्रान्ति करीत आहे. एक वर्षापूर्वी त्याने एका स्थिर व शीघ्र फलदायी अर्थ-नीतीचा प्रयोग सुरू केला. याला 'डेंगचा सिद्धांत' म्हटले जाते. हा सिद्धांत म्हणजे एक अति प्रगतिशील व सुस्थिर युगाचे एक स्वप्न आहे. अलीकडील राष्ट्रीय कॉंग्रेसच्या सर्व अधिवेशनातून डेंग-सिद्धांताला मान्यता देण्यात आली आहे.

आजच्या चीनी नेत्यांनी 'राष्ट्रीय कॉंग्रेस अधिवेशनात' भाग घेतला नाही. तरी पण शेवटच्या दिवशी पॉलिट ब्यूरोच्या सदस्यांना भेटण्यासाठी ते थोडा वेळ आले नि गेले. यांच्यातील बरेचसे पन्नास वर्षांहून अधिक वयाचे होते. डेंगने अशी आशा प्रकट केली आहे की त्याचा सिद्धांत यशस्वी बनविण्याचे काम तरुण पिढीचे त्याचे मित्रच करतील.




इसवी सन पूर्व १८ ते १२ या शतकात चीनवर शाँग वंशाचे राज्य होते. इसवी सन पूर्व तिसऱ्या शतकात चीन एक महान् साम्राज्य बनला. याच काळात सत्तेवर असलेल्या हान वंशी सम्राटांनी 'चीनची महान् भिंत' बांधली. या भिंतीची लांबी १४५० मैल व उंची २५ फुट होती. देशाच्या संरक्षणासाठी ही भिंत बांधली गेली होती. इसवी सनाच्या तिसऱ्या शतकात छिन वंश इथे सत्तारूढ झाला. यानंतर क्रमाने तांग वंश (७ ते १० शतक), सांग वंश (१० ते १३ वे शतक) आणि छिन वंश यांनी चीनवर राज्य केले. सन १९१२ पर्यंत छिन वंश सत्तेवर होता, नंतर सन्-यत्-सेनने सर्व शासकांना दूर करून चीनच्या 'गणतंत्रा'ची स्थापना केली. त्यानंतर जनरल चँग-कै-शेक आणि त्याचे क्योमिनुतांग (नॅशनल पार्टी) हे सत्तारूढ झाले. १९३१ ते ४५ या काळातील दुसऱ्या महायुद्धात जपानने चीनच्या काही भागावर कब्जा केला, पण युद्धात जपानचा पराभव झाला आणि मग कम्यूनिस्टांनी सर्व चीन एका अमलाखाली आणला. १ ऑक्टोबर, १९४१ रोजी 'पीपल्स रिपब्लिक ऑफ चायना'ची स्थापना झाली.



# कर्जवसुली

सूर्यदेव सीतापुरला नव्यानेच आला होता. आधीच्या गावात गरजू लोकांना भरपूर व्याजाने लहानमोठ्या रकमा कर्जाऊ देऊन त्याने खूप पैसा कमावला होता. त्याच्या लोभीपणामुळे चिडून गावच्या काही तरुणांनी त्याला धमकी दिली होती की-यापुढे असे जास्त व्याज वसूल केले, तर ते त्याला चांगली अद्दल घडवतील. या धमकीमुळे भिऊन जाऊन आपली तेथील जमीन, घर वगैरे सर्व विकून टाकून सूर्यदेवने ते गावच सोडले व तो सीतापूरला आला.

सीतापूरला आल्यावरही सूर्यदेवची जुनी सवय काही सुटली नाही. त्याने लोकांना कर्ज तर दिले, पण ते वसूल करणे त्याला कठीण जाऊ लागले. त्याची अडचण जाणून शेजारच्या एका माणसाने त्याला सल्ला दिला की, "अशा परिस्थितीत तुला फक्त चन्दनपुरीतला सुमेधच मदत करू शकेल. तू जाऊन त्याची मदत माग."

सूर्यदेव लगेच चन्दनपुरीला गेला, अन् सुमेधला भेटला. सूर्यदेवने सुमेधला आपली अडचण सांगून मदत मागितली. सुमेधने सारी हकिकत नीट विचारून घेऊन त्याला सांगितले की, "मी एका आठवड्यातच सीतापूरला येईन."

दिल्या वचनाप्रमाणे सुमेध सीतापूरला आला आणि सूर्यदेवने त्याच्या रहाण्याची व्यवस्था आपल्या घरातच केली.

कर्ज घेऊनही पैसे परत न करणाऱ्या साऱ्या माणसांची नावे आणि पत्ते सूर्यदेवने सुमेधला सांगितले.

सुमेधने नीट चौकशी करून जाणून

घननीळ पुरोहित



घेतले की कर्ज घेणाऱ्या माणसांची आर्थिक परिस्थिति चांगली असून पैसे परत करणेही त्यांना शक्य आहे; परन्तु सूर्यदेव परगावचा माणूस असल्याने ते सर्वजण कर्जफेड टाळत आहेत.

दोन दिवसांनी सूर्यदेवला काय करायचे ते नीट सांगून सुमेध त्याला घेऊन सुंदरेश्वर नावाच्या ऋणकोकडे गेला; अन् स्वतः काही काम असल्याचा बहाणा करून बाहेर निघून गेला.

सूर्यदेवने सुन्दरेश्वरला बाहेर बोलावून आपल्या कर्जाबद्दल विचारले. सुन्दरेश्वर म्हणाला, "माझ्याजवळ पैसे जमले की देईन तुझे पैसे!"

परन्तु सूर्यदेव हटून बसला की, 'तू जोपर्यन्त माझे पैसे देत नाहीस, तोपर्यंत मी इथेच बसून रहाणार आहे.' तेथे माणसांची गर्दी जमा होऊ लागली. ते पाहून सुन्दरेश्वरला भीती वाटली की हे भांडण वाढायची लक्षणे दिसत आहेत, त्यामुळे सूर्यदेवला आत बोलावून घेऊन सुन्दरेश्वर म्हणाला, "मी तुझे पैसे व्याजासकट देऊन टाकीन. पण माझ्याकडे पैसा यायला हवा. खरंच विश्वास ठेव माझ्यावर."

"ठीक आहे. तुझे हे आत्ताचे शब्द तू गावच्या काही प्रतिष्ठित माणसांसमोर पुन्हा बोल. तरच मी आत्ता तुला सोडून देईन." सूर्यदेवने त्याला मार्ग सुचवला.

नाइलाजाने त्याने काही प्रतिष्ठित माणसांसमोर सूर्यदेवला पैसे परत करण्याबद्दल तसे वचन दिले.

इतक्यात एक माणूस तेथे आला अन् सुंदरेश्वरला म्हणाला, "माफ करा हं! शहरात काही दंगल चालू झाल्यामुळे मला वेळेवर रक्कम मिळाली नाही. पण तुमचा माणूस येऊन म्हणू लागला की माझ्याकडची रक्कम परत यायची वाट पहात आहात. मी आत्ताच तुमची रक्कम घेऊन आलो आहे. सूर्यदेवची रक्कम आता आपण आरामात त्याला देऊ शकाल." नाइलाजाने त्याने सूर्यदेवचे



पैसे त्याला देऊन टाकले.

सुमेधने अगोदरच बातमी काढली होती की सुन्दरेश्वरने एका माणसाकरवी धान्याची पोती बाजारात पाठवून विकायची व्यवस्था केलेली आहे. त्याचा पत्ता काढून सुमेधने त्याला खोटेच सांगितले की—'सुन्दरेश्वरने मला तुमच्याकडे पाठवलंय!'

सूर्यदेवने चन्द्रस्वामी नावाच्या आणखी एका माणसाला कर्ज दिले होते. सुमेधने त्याच्या हालचालीवर पाळत ठेवली. चन्द्रस्वामी खूपदा गावातल्या एका मोठ्या महालात रहाणाऱ्या रामराजकडे जातो हे सुमेधच्या ध्यानात आले. सुमेधला खरी गोष्ट समजून चुकली.

रामराजचे गावात चांगले नाव होते. रामराजचा मुलगा आपले शिक्षण पुरे करून आता नोकरीच्या शोधात होता. रामराजच्या वशिल्याने आपल्या मुलाला दरबारात चिकटवून देण्याच्या प्रयत्नात चन्द्रस्वामी होता, अन् लवकरच या प्रयत्नांना फळ येण्याचे चिन्ह दिसत होते.

सुमेधने नीट विचार करून एक योजना बनवली आणि सूर्यदेवने काय करायचे हे त्याला समजाऊन दिले.

सूर्यदेवने त्याप्रमाणे रामराजच्या घरी जाऊन चन्द्रस्वामीने आपल्याकडून घेतलेल्या कर्जाबद्दल सांगून म्हटले,



"चन्द्रस्वामी बऱ्याच दिवसांपासून माझं कर्ज चुकवत नाहीये. आपण कृपा करून त्याला सांगून माझे पैसे देववा!"

रामराजने सूर्यदेवच्या समोरच चन्द्रस्वामीला बोलावून घेऊन म्हटले, "काय महाराज, अह्या माझ्या बाबतीतही असंच करणार काय?"

आता मात्र चन्द्रस्वामीचा चेहरा पडला. ताबडतोब पैसे घेऊन येऊन त्याने ते सूर्यदेवाला देऊन टाकले.

सुमेधच्या बुद्धिचातुर्याची तारीफ करून सूर्यदेव त्याला म्हणाला, "यापुढेही माझा धन्दा नीटपणे चालावा यासाठी मला काही उपयुक्त सूचना

देऊन जा ना."

सुमेध यावर म्हणाला, "मी काही अुपाय सांगून काय अुपयोग? जोपर्यन्त आपला व्यापार प्रामाणिकपणे चालतो तोपर्यंत कसल्याही अुपायांची गरजच पडत नाही. अनावश्यक जास्त व्याज अुकळायचा प्रयत्न केला नाहीत, तर तुमचा व्यापार आपोआपच सुरळीत चालेल."

"अजून एक कर्ज-वसुली राहूनच गेलीय की! तेही काम झालं असतं तर बरं झालं असतं न?" सूर्यदेव मोठा निश्वास टाकत म्हणाला.

"त्या शंकरदासचाच मामला नं? त्याला बिचाऱ्याला सोडून द्या ना. तो बिचारा आपल्या धाकट्या भावाच्या भांडणाच्या खातर बराच नुकसानीत आला आहे!" सुमेध अुत्तरला.

"मग काय मी ती रक्कम सगळीच्या सगळी सोडून देअू?" सूर्यदेवाने दुःखाने विचारले.

"मी तुमची बरीच कर्ज वसुलून दिली, त्यामुळे बक्षिस म्हणून तुम्ही मला काहीतरी देणारच असाल न? शंकरदासच्या कर्जाची वसुली म्हणून ती जमा करून घ्या." सुमेध म्हणाला.

इतक्या निर्विकारपणे बोलणाऱ्या सुमेधचा चेहरा पाहून सूर्यदेव चकितच झाला. क्षणभरातच त्याने एक विचार पक्का केला. सुमेधवर त्याचा खूप विश्वास बसला होता.

"तू केवळ बुद्धिमानच नव्हेस, तर सच्च्या दिलाचा प्रामाणिक माणूसही आहेस. तुला माझ्याकडून जी रक्कम फी म्हणून मिळायची, ती मी शंकरदासच्या नावे जमा करून घेईन; पण तुला एक खास बक्षिस द्यायचा विचार आहे माझा! त्याबाबतीत मी माझ्या मुलीशी बोलून सांगतो, थांब." असे म्हणून तो घराच्या आतील भागात गेला.

तोपर्यन्त दाराशी अुभी राहून त्यांचे बोलणे दाराआडून ऐकत असलेली सूर्यदेवची मुलगी सुवर्चला लाजून परसदाराकडे पळून गेली.





# व्याघ्रेश्वर भूपति

दंडकारण्याजवळील एक छोटेसे राज्य वाघपुर येथे व्याघ्रेश्वर भूपतीचे राज्य होते. नावाप्रमाणेच तो एक महाबलाढ्य शासक होता. त्याच्या बोलण्याचे कोणीही खंडन करू धजत नसे. जर कोणी तसे साहस केलेच, तर त्याला लगेच फाशीची शिक्षा ठोठावली जाई.

अशातच हिमालयात अनेक वर्षे कठीण तपस्या करून बऱ्याच सिद्धि मिळवलेला एक साधु वाघपुरला आला. जनता त्या योगीराजाची सेवा करून त्याची प्रवचनेही मोठ्या भक्तिभावाने ऐकू लागली.

राजाच्या गुप्त हेरांनी ही बातमी त्याला कळवली अन् असेही सांगितले की, परमेश्वराबाबतच्या राजाच्या विचारांपेक्षा भिन्न विचार हा साधु जनतेला सांगत आहे.

हे ऐकताच व्याघ्रेश्वर भूपतीचा चेहरा रागाने खदिरासारखा लाल झाला. त्याने शिपायांना आज्ञा दिली की, "ताबडतोब जाअून हिमालयातून आलेल्या त्या साधूला पकडून आणून दरबारात माझ्यासमोर हजर करा."

शिपाई निघून गेले अन् त्यांनी योगीराजाला दरबारात हजर केले. त्याला पाहिल्याबरोबर डोळे वटारत व्याघ्रेश्वर भूपति म्हणाला, "मी भूपति, म्हणजे सम्राट आहे. आमचा दरबारी पंडित सर्वज्ञचूडामणी यानं आम्हाला खूप पूर्वीच सांगितलं होतं की भूमिपालन करणारा भूप हाच साक्षात् भगवान आहे. पण आम्ही ऐकलंय की, तू कोणा दुसऱ्यालाच भगवान म्हणून त्याचा माझ्या प्रजेत

सुनीत तावसे

प्रचार करत असतोस. आम्ही तुला आत्ताच फाशीच्या तक्तावर चढवणार आहोत."

यावर थोडके हसत योगीराज म्हणाला, "राजा, मी असं ऐकलंय की, तुमच्याजवळ या सर्वज्ञचूडामणीशिवाय आणखी दोन विवेकवान मंत्रीही आहेत. मला त्यांना एक प्रश्न विचारायचाय. त्याची अुत्तरं ऐकल्यावर मगंच आपण मला फाशी द्यावं."

व्याघ्रेश्वर भूपतीने हे मान्य केले. नंतर तीन ताडपत्रांवर योगीराजाने एकच प्रश्न लिहिला, "मातीचा अर्थ काय?" नंतर ती तीन ताडपत्रे त्यांने तिघांना दिली.

एका मन्त्र्याने अुत्तर लिहिले, "याच पदार्थापासून पृथ्वी निर्माण झालेली आहे." दुसऱ्याने लिहिले, "पाण्याहून निराळा पदार्थ म्हणजेच माती." अन् त्या पंडिताने लिहिले, "सर्व प्राणीमात्र अन् अचल संपत्ती यांना अंतीम आश्रय देणारा पदार्थ म्हणजे माती."

योगीराजाने ती पत्रे राजा व्याघ्रेश्वर भूपति याच्या हातात देत म्हटले, "राजा, पाहिलंस? विवेकी अन् सुशिक्षित पंडितही अगदी क्षुल्लक अशा मातीबद्दल किती निराळे विचार प्रकट करतात! अशा परि-स्थितीत महोन्नत अशी शक्ति 'भगवान' याच्या बाबतीत एकच विचार प्रकट करणं खरंच कुणाला शक्य होईल का?"

क्षणभर गप्प राहून अन् नन्तर सिंहासनावरून अुतरून व्याघ्रेश्वर भूपति योगीराजाजवळ पोचला व त्याच्या पायांवर लोळण घेत म्हणाला, "महात्मन्, आपल्या प्रश्नाने माझे डोळे अुघडले. सत्य समजलं. मी आपला शिष्य आहे, मला आशिर्वाद द्या."

योगीराजाने राजाला अुठवून आपल्या मिठीत घेतले. व्याघ्रेश्वरचा सारा गर्व गळून गेला; अन् नंतर तो खरोखरच महान् बनला.





# माया महाल

## १०

(विद्यावती अदृश्य झाल्यापासून एकदाही आपल्याकडे न आलेल्या जगत्पतीच्या वागणुकीबद्दल वाचस्पतीला शंका आली अन् त्याने ही गोष्ट राजाच्या नजरेस आणून दिली. राजकुमारीच्या शोधाला निघालेला महेन्द्रनाथ जंगलामधे असलेल्या जादूमहालात पोचला अन् तेथे पहारेकऱ्याचे काम मिळवून आसपासच्या घडामोडींवर कडक नजर ठेवू लागला.—त्या पुढे)

दुसऱ्या दिवशी महेन्द्रनाथ जरा लवकरच पहाऱ्याच्या दाराशी पोचला आणि महालातून कोणी अुद्यानाकडे येतंय की नाही हे पुनःपुन्हा पाहू लागला. थोड्या वेळाने तीन तरुणी महालाबाहेर आल्या. त्यांच्याबरोबर आता ती वृद्धा नव्हती. त्या तिघीही तरुणींनी सारखेच दागिने व वस्त्रे घातलेली होती, त्यामुळे कालच्या त्या विशेष तरुणीला ओळखणे महेन्द्रला प्रथम अवघड वाटले.

महेन्द्रनाथ एका झाडाखाली लपून राहिला अन् फिरणारी तरुणी जेंव्हा त्या बाजूला आली तेंव्हा हलक्या आवाजात त्याने हाक मारली, "युवराणी विद्यावती!" यावर त्या तरुणीने पटकन



डोके अुचलून आवाजाच्या दिशेने पाहिले, परन्तु आवाज कोठून आला हे न कळल्याने ती आणखी पुढे आली. ती जेंव्हा अगदी झाडाजवळ पोचली, तेंव्हा महेन्द्रने पुन्हा एकदा तिला नावाने हाक दिली. तेंव्हा ती युवती जरा थबकली अन् पहारा करणारीला संशय येअू नये म्हणून आणखी जरा पुढे जाअून ती परत मागे फिरली. ती जेंव्हा पुन्हा झाडाशी आली, तेंव्हा महेन्द्रने झाडाआडून डोकावून तिच्याकडे पाहिले. त्याबरोबर फिरणाऱ्या त्या युवतीने तोंडावर बोट ठेअून त्याला न बोलण्याचा इशारा दिला. इतक्यात दूर बसलेली दुसरी तरुणी अुठून पुढे येअू लागलेली पहाताच 'अुद्या' इतकाच शब्द अुच्चारून पुन्हा मागे वळूनही न पहाता ती महालाकडे निघून गेली.

त्या रात्री महेन्द्र मोठ्या सावधगिरीने पहारा देत राहिला. जादूमहालाच्या वरच्या मजल्याच्या खोलीत दिवे लागलेले होते. पण ती खोली काल दिवे लागलेले असलेली खोली नव्हती. महेन्द्रनाथला समजून चुकले की त्या खास तरुणीची आज निराळ्या खोलीत रहाण्याची व्यवस्था केली जात आहे. त्याने ओळखले की ती तरुणी नक्की आपली युवराणीच आहे अन् तिला पटकन कोणी ओळखू नये, म्हणून तिच्या बरोबर असणाऱ्या दासींनाही रोज तिच्याचसारखी वस्त्राभरणे दिली जातात.

थोड्या वेळाने तेथे द्वारपाल आला, तेंव्हा महेन्द्रने त्याला विचारले, "अरे दोस्त, आज तर मला अजिबात दिसलाच नाहीस? काय, आहे काय?"

"आज आणखी काही पंडित आलेत. त्यांना मालकांपर्यन्त पोचवण्याचं काम माझंच आहे न? अच्छा, नीट सावधगिरीनं पहारा दे हं." अशी सावधगिरीची सूचना देअून द्वारपाल तेथून निघून गेला.

दुसऱ्या दिवशीही मुदपाकखान्यातून काही खाणे घेअून जाणाऱ्या दोन दासी महेन्द्रला दिसल्या अन् त्याने हेही ओळखले की, आज त्यांच्याबरोबर ती वृध्दा नाहीय.

त्या संध्याकाळी ती खास तरुणी अुद्यानात जरा लवकरच आली. तिच्याबरोबर एकच दासी होती. दोघी थोडा वेळ बागेत इकडेतिकडे फिरल्या. नंतर दासी एका जागी बसून राहिली अन् ती तरुणी जणू कोणाला शोधत असल्यासारखी दाट झाडाच्या रोखाने निघाली. ती जेंव्हा काल महेन्द्र लपलेल्या झाडाजवळ आली, तेव्हा तो हळू आवाजात म्हणाला, "राजकुमारी मी महेन्द्रनाथ. वीरगिरीहून आलोय." ते ऐकूनही तरुणी तेथे थांबली नाही. कालच्याप्रमाणेच पुढे जाऊन ती पुन्हा मागे वळली. अन् महेन्द्रजवळ येअून हळूच म्हणाली, "होय. मी राजकुमारी विद्यावतीच. इथून बाहेर पडायला हवं."

"राजकुमारी, तुमचं अपहरण करून कोणी इथं आणलं तुम्हाला?" महेन्द्रने विचारले.

"मला नाही माहीत. त्या वृद्धेलाच ठाअूक असेल सर्व." युवराणी अुत्तरली.

"कोण आहे ती? कुठे रहाते?" महेन्द्रने पुन्हा विचारले.

"ती स्वत:ला कमला म्हणवत असते. आपल्या राजवाड्यातल्या कमलासारखीच दिसते ती. पण कालपासनं ती कुठं दिसत नाहीय."



"तुमच्याबरोबरच्या दासी कोण आहेत." महेन्द्र सावधपूर्वक विचारत राहिला.

"त्या कित्ती तरी जणी आहेत. सगळ्या एकसारख्याच दिसतात. नावं नाही आठवत त्यांची मला." विद्यावतीने हळू आवाजात सांगितले.

"दासी काही बोलत नाहीत तुमच्याशी?" महेन्द्रने विचारले.

"जरुरीपेक्षा एक शब्दही जास्त बोलत नाहीत. हे एक मोठं कारस्थानच चाललंय. मला वाटतंय की मला इथून लवकरच पळून जायला हवं." इतके



बोलून युवराणी लांब बसलेल्या दासीकडे निघून गेली.

युवराणीला पाहून तिच्याशी बोलल्यावर महेन्द्रचे मन अुत्साहाने भरून गेले. परमेश्वर कृपेने युवराणी खुशाल होती. 'तिला इथे आणणारे कोण बरं लोक असतील? या जादूमहालाचा मालकच असावा बहुधा तो. जर यात त्याचा हात नसेल, तर दुसरा कोण बरं असेल? अपहरणाचा हेतु काय असेल? युवराणीला इथून काढून सुरक्षितपणे महाराजांच्या हाती सोपवणं कसं बरं शक्य होईल?" इत्यादि विचारात महेन्द्र गढला होता.

"बराच थकलेला दिसतोस!" असे म्हणणाऱ्या द्वारपालाचा आवाज ऐकून महेन्द्र एकदम दचकून भानावर आला, अन् पटकन स्वतःला सावरून अुत्तरला, "नाहीं दोस्त! तुझ्या सूचनेवरूनच आज मी जरा लवकर इथे पहाऱ्यावर येअून बसलो. आता थोड्या वेळापूर्वी काही स्त्रिया इथे अुद्यानात फिरताना दिसल्या."

"अं? काही स्त्रिया दिसल्या थोड्या वेळा पूर्वी?" द्वारपालाने विचारले.

महेन्द्रने नुसतेच डोके हलवले.

"तू त्यांना पाहिलं असलंस, तरी पुन्हा काही त्यांना पहायची संधी तुला मिळणार नाही. जे पंडित इथे आलेत नं, ते लगेच इथून निघणार आहेत. मालकांनी एक पालखीही आणायची आज्ञा दिलीय. ते तर कधीच पालखीतून जात नाहीत. बहुधा इथे आलेली ती खास पाहुणी पालखीतून जाणार असावी असं वाटतंय. कोणत्याशा देशाची ती युवराणी इथून जाणार असेल, तर महालातल्या सगळ्याच स्त्रियाही निघून जातील." द्वारपाल हसत बोलला.

"असं?" चेहऱ्यावर कोणतीच प्रतिक्रिया न दाखवता महेन्द्र म्हणाला.

"होय महेन्द्र! फक्त आजची रात्र मोठ्या सावधगिरीने पहारा कर हं!" असे सांगून द्वारपाल तेथून निघून गेला.





महेन्द्रच्या मनात पुन्हा गडबड सुरू झाली. 'द्वारपालाकडून कळलेली बातमी युवराणीला कशी सांगावी? तो बराच वेळ विचार करीत राहिला. मध्यरात्र अशीच अुलटली. महालातले दिवे विझले. महेन्द्र हळूच महालाजवळ गेला. मुख्य दारे बंद होती. त्याने हळूच धक्का देअून पाहिले, तर आतून कडी लावलेली होती. आसपास हिंडून आणखी एकादे दार दिसते काय, हे त्याने पाहून घेतले. परंतु तो एकच मुख्य दरवाजा फक्त होता. म्हणून पुन्हा तेथे जाअून त्याने डाव्या हाताने ढकलून पहाताच तो अुघडला!

समोर एक अरुंद रस्ता दिसला. दोन्ही बाजूंना असणाऱ्या खोल्यांचे दरवाजे बन्द होते. कोणाचीही हालचाल तेथे नव्हती. महेन्द्र चोरपावलांनी चालत जिन्यापाशी पोचला. तो चढून तो वरच्या मजल्यावर पोचला. तेथेही असाच अरुंद बोळ अन् दोन्ही बाजूंना बंद दरवाज्यांच्या खोल्या होत्या. परंतु डाव्या हाताने तो ज्या दरवाज्याला स्पर्श करी, तो आपोआप अुघडत राहिला.

अशा तऱ्हेने अुघडलेल्या एका खोलीच्या दरवाज्यातून तो आत शिरला. अन् क्षणभर दचकून खिळल्यासारखा अुभाच राहिला! त्याच्यासमोर एक माणूस अुभा होता! पण दुसऱ्याच क्षणी त्याच्या लक्षात आले की समोरच्या पुरुषभर अुंचीच्या आरशातले ते आपलेच प्रतिबिम्ब आहे! त्या खोलीत सर्वत्र असेच आरसे लावलेले असल्यामुळे तेथील अंधुक प्रकाशात वळून पाहू तिथे आपलेच रूप त्याला दिसत राहिले. महेन्द्र त्या खोलीतून बाहेर आला. आणि डाव्या हाताने हळूच स्पर्श करून आणखी एका खोलीचा दरवाजा त्याने अुघडला. तेथेही तो आत शिरला, पण ती खोली रिकामीच होती.

तेथून महेन्द्र तिसऱ्या खोलीत गेला. तेथे काही स्त्रिया खाटांवर झोपलेल्या होत्या, लक्षपूर्वक त्यांच्या चेहऱ्यांवर



नजर फिरवल्यावर त्याच्या लक्षात आले की राजकुमारी विद्यावती त्यांच्यात नाहीय. मग तो आणखी एका खोलीत गेला. तेथेही आणखी काही स्त्रिया झोपलेल्या होत्या.

शेवटी महेन्द्र पाचव्या खोलीत पोचला तेंव्हा मात्र एक हंसाकृती पलंगावर झोपलेल्या तरुणीला त्याने राजकुमारी म्हणून बरोबर ओळखले. तो तिच्याकडे जाऊ लागला तेंव्हा अचानक त्याच्या डाव्या हातातील अंगठी चमचम चमकली! अन् त्याच्या ध्यानात आले की संन्याशाने दिलेल्या त्या अंगठीच्या प्रभावामुळेच तो सारे दरवाजे उघडून इथवर येऊन पोचू शकला आहे. त्याने युवराणीजवळ जाऊन हळूच तिच्या दंडाला स्पर्श केला. दचकून ती जागी झाली, पण महेन्द्रला पाहून तिने ओळखले व विचारले, "तू इथवर कसा येऊ शकलास?" अन् त्याच्या पाठोपाठ ती त्या खोलीबाहेर आली.

महेन्द्र म्हणाला, "ते सारं मी नंतर सांगेन तुम्हाला. कालच तुमच्यासाठी एका पालखीची व्यवस्था केली गेलीय. महालाच्या मालकानेच ती केलीय."

"मला कुठं नेणाराहेत ते?" आश्चर्याने राजकुमारीने विचारले.

"ते मला माहीत नाही. पण तिथं जाणं तुम्हाला मंजूर आहे का, इतकंच मला जाणून घ्यायचंय."

"मला कशाला कुठं जायचंय? मी तर ताबडतोब आपल्या आईबाबांना भेटू इच्छितेय. तू मला त्यासाठी मदत करशील?" युवराणीने विचारले.

"मी तर तुम्हाला आपल्या राज्यात नेऊन महाराजांच्या हवाली करण्यासाठीच तुमच्या शोधाला निघालो. त्यासाठी मी महाराजांकडून परवानगीही घेतली. तुमचा माझ्यावर विश्वास बसावा म्हणून तुमच्या बाबत एक खास गोष्टही मी त्यांच्याकडून जाणून घेतलीय. तुमच्या डाव्या दंडावर एक तीळ आहे. महाराज

म्हणाले की मी हे तुम्हाला सांगावं, म्हणजे तुमचा विश्वास बसेल माझ्यावर." महेन्द्र कळकळीने म्हणाला.

आता विद्यावतीच्या डोळ्यात विश्वासाची चमक आली. ती म्हणाली, "होय, तुझं म्हणणं खरं आहे. माझा तुझ्यावर पूर्ण विश्वास बसलाय. मग आता अुशीर कशाला? निघू या आपण?"

"होय. तेच बरोबर होईल. माझ्याजवळ सिंहद्वाराच्या किल्ल्याही आहेत. त्यामुळे बाहेर सटकण्यात बहुधा काही त्रास होणार नाही. पण अशा मध्यरात्री माझ्याबरोबर जंगलातून जायला भीती तर नाही ना वाटणार?" महेन्द्रने विचारले.

"नाही बाबा! अुलट इथं आणखी राहिले तर सकाळी काय वाढून ठेवलं असेल याचीच भीती वाटतेय. आता तर तू बरोबर आहेस! मग भीती कसली? आता अुशीर करणं बरं नव्हे. निघू या आत्ताच!" युवराणी उतावळीने म्हणाली.

"होय राजकुमारी! पण आपण इथून बाहेर पडेपर्यंत जरा अंतर राखून सावधपणे पाठोपाठ येत रहा." असा इशारा देअून महेन्द्र पुढे झाला.

अशा प्रकारे ते दोघे महालाच्या मुख्य द्वाराशी पोचले. चहूकडे भयानक शांतता पसरली होती. खूप सावधगिरीने महेंद्रने दरवाजा अुघडला. प्रथम त्याने युवराणीला बाहेर पडू दिले व मग तो स्वतःही बाहेर आला. नंतर त्याने दार ओढून घेतल्यावर कुलूप आतून आपोआप लागले.

"हं ! आता आपण जादूमहालातून बाहेर तर पडलो. कोणत्या दिशेनं जाअू या आता आपण? वीरगिरीला जायचा रस्ता माहीत आहे तुला?" युवराणीने महेन्द्रला विचारले. **क्रमशः**



# स्वर्गीय फूल

दृढनिश्चयी राजा विक्रमादित्य पुन्हा त्या झाडाकडे गेला. झाडावरचे प्रेत काढून ते आपल्या खांद्यावर टाकले आणि नेहमीप्रमाणे मौन धारण करून तो स्मशानाकडे चालू लागला. तेंव्हा त्या प्रेतात ठाण देअून असणारा वेताळ बोलू लागला, "हे राजा, एक राज्याचा राजा म्हणून सुख भोगण्याची संधि असूनही तू अशा मध्यरात्रीच्या वेळी सुख शोधण्यासाठी स्मशानात असे कष्ट का अुपसत आहेस हे काही केल्या माझ्या लक्षात येत नाहीय. कधी कधी अतींद्रिय व अलौकिक शक्तींच्या साह्याने आपण जे काम साधू इच्छितो, त्याचा मानवी स्वभावाशी बरोबर मेळ बसत नाही, अन् तो प्रयत्न असफल होतो. अुदाहरणादाखल मी तुला असन्तवर्मा नावाच्या राजाची गोष्ट सांगतो, ती तू

## वेताळाच्या गोष्टी



लक्षपूर्वक ऐक, म्हणजे तुझा रस्ताही सहज संपेल, अन् कष्टही जाणवणार नाहीत." आणि वेताळ गोष्ट सांगू लागला.

खूप पूर्वी वैजयंतीपुरात राजा अनन्तवर्मा राज्य करत होता; पण पोटी संतान नसल्यामुळे आपल्यामागे राज्याला वारस नसल्याचे दुःख त्याच्या मनाला ग्रासू लागले.

एका पौर्णिमेच्या रात्री राजा अनन्तवर्मा आपल्या मन्त्र्याला म्हणाला, "मन्त्रीमहोदय, माझं हे राज्यपद, अुद्या मला गिळून टाकणाऱ्या मृत्यूपासून काही माझं रक्षण करू शकणार नाही नं?"

राजाच्या मनातली मृत्युबद्दलची ही निराशा कशी नाहीशी करावी हे महामन्त्र्याला सुचेना. इतक्यात एक विचित्रशी घटना घडली. आकाशातून तरंगत एक स्वर्गीय फूल येऊन त्या दोघांसमोर भूमीवर पडले! फूल सोन्यासारखे चमचमत होते.

आश्चर्यचकित होऊन राजाने ते फूल वाकून अुचलले व नाकाला लावून वास घेत तो म्हणाला, "मन्त्रीवर, या सुगन्धाचं वर्णन करायला माझ्याजवळ शब्दच नाहीत!"

"महाराज, स्वर्गातून विहार करणाऱ्या एकाद्या अप्सरेच्या डोक्यातून गळलेलं हे एकादं स्वर्गीय फूल असावं. दरबारी पुरोहिताशी अुद्या चर्चा करायला हवी." मन्त्री म्हणाला.

दुसऱ्या दिवशी त्या फुलाचे लक्षपूर्वक निरीक्षण करून राजपुरोहित त्याचे महत्त्व सांगू लागला, "महाराज, अमरलोकात गंधर्व-किन्नर स्त्रियांचं आवडतं व दुर्मिळ असं हे स्वर्गीय फूल आहे. याचं नाव अमृतवर्धिनी. कोणीही तरुण वा तरुणी आपल्या इष्टदेवतेचं मनःपूर्वक स्मरण करून हे फूल हुंगेल, तर त्या व्यक्तीला आपले तारुण्य एकाद्या वृद्ध व्यक्तीला दान करण्याची शक्ति प्राप्त होते."

हे ऐकून राजाचा आनन्द गगनात



मावेनासा झाला. आनन्दोद्वेगाने तो मन्त्र्याला म्हणाला, "महामन्त्री, आपल्या राज्यात ताबडतोब दवंडी पिटवा की-जो कोणी तरुण महाराजांना आपले तारुण्य देईल, त्याला अर्धं राज्य आणि अनेक पुरस्कार दिले जातील."

परन्तु महाराजांच्या आदेशानुसार राज्यात सर्वत्र दवंडी पिटवूनही राजा अनन्तवर्माला आपले तारुण्य अर्पण करण्यासाठी कोणीही पुढे आले नाही. राजाला घोर निराशेने घेरून टाकले.

राजाच्या या स्थितीमुळे मन्त्री चरणगुप्तही फार दुःखी झाला. काही शिपाई बरोबर घेअून आता तो राज्यात फेरी मारण्यासाठी निघाला. एका धर्मशाळेसमोरच्या चबुतऱ्यावर बसून भीक मागणारे दोन भिकारी महामन्त्र्याला दिसले. त्यांच्यापैकी एक तर आंधळाच होता, अन् दुसऱ्याला कसलासा त्वचारोग झालेला दिसत होता. परंतु दोघेही पंचवीस वयाच्या आतलेच होते.

मन्त्री त्यांच्याशी बोलू लागला, "एका आठवड्यापूर्वी राजाने पिटवलेली दवंडी माहीत आहे नं तुम्हा दोघांना? जो तरुण राजाला आपलं तारुण्य देईल, त्याला अर्धं राज्य, मौल्यवान भेटवस्तु देअून राजा त्याचा सत्कार



करणार आहे."

मन्त्र्याचे हे बोलणे ऐकूनही भिकाऱ्यांपैकी एकातही अुत्साहाचे काही चिन्ह दिसेना. ते पाहून मन्त्री रागाने त्यांना विचारू लागला, "काय रे! अर्ध्या राज्याचा राजा बनायचं सोडून, अशी भीक मागणंच जास्त पसन्त आहे काय तुम्हाला?"

यावर तो आन्धळा भिकारी म्हणाला, "मालक, मी तर आन्धळा आहे, मग मला अर्धं राज्य काय कामाचं? आंधळ्यालाही आपलं राज्य देअू करणाऱ्या राजाचं कल्याण असो."

दुसरा लगेच बोलला, "मालक, आपलं










तारुण्य राजाला दिल्यावर म्हातारा होऊन अर्ध्या राज्याचा मालक होऊनही मी काय करणार? अगोदर या व्याधीचं दु:ख माझ्यामागे आहेच; त्यात आणखी अकाली वार्धक्य आलं, तर ते दु:ख कसं सहन करू मी?"

भिकाऱ्यांचे बोलणे महामन्त्र्याला सयुक्तिक वाटले नाही. तो चिडून म्हणाला, "छी:! भिकाऱ्यांसमोरही मला निरुत्तर व्हावं लागलं!" अन् तो पुढे निघून गेला.

मन्त्री दरबारात पोचला तेंव्हा तेथे राजा त्याच दिवशी समोर हजर करण्यात आलेल्या डाकू रामसिंहाचा निवाडा करत होता. मन्त्र्याने पाहिले की आरोपीचे वय विसापेक्षा जास्त नसावे.

रामसिंह आपली कैफियत मांडताना म्हणाला, "महाराज, मी केवळ राजधानीत काळा धंदा करणाऱ्या कुप्रसिद्ध व्यापाऱ्यांना लुटलं अन् ते धन गरीबांना वाटून टाकलं. मी कधी कोणा स्त्रीचा अपमान केला नाही अन् त्यांना लुटलंही नाही. माझ्यावर प्राणसंकटे आली, तेंव्हाही मी कधी कोणाचा जीव घेतला नाही."

हे सारे रामसिंह निडरपणे बोलत होता. त्या चोराची नीतिबद्धता पाहून राजा खुष झाला. तरीही शेवटी तो एक चोरच होता, त्याला शिक्षा देणे प्राप्तच होते; राजा विचार करत राहिला. तेंव्हा मन्त्री सरळ राजाजवळ जाऊन हळू आवाजात सांगू लागला, "महाराज, मी साऱ्या नगरात शोधून आलो. अर्ध्या राज्याचं आमिष दाखवूनही भिकारीसुद्धा पुढे यायला तयार नाहीत. या गुन्हेगाराला आपण काहीही शिक्षा दिलीत तरी त्याचा आपल्याला फायदा होणार नाही. आपण 'हो' म्हणत असाल तर हा खटला मीच पुढे चालवतो."

तारुण्याच्या प्रलोभनाने राजाने मन्त्र्याला सम्मति दिली. आता मन्त्री बोलू लागला, "रामसिंह, तू ज्या चोऱ्या केल्या आहेस, त्याबद्दल दण्ड म्हणून तुला फाशीची शिक्षा होईल. मग...." मन्त्री आणखी काही बोलणार इतक्यात मधेच रामसिंह हसत म्हणाला, "त्यापेक्षा मी महाराजांना आपलं तारुण्य दान द्यायला तयार झालो, तर माझा मृत्युदण्ड रद्द केला जाईल अन् मला अर्धं राज्यही मिळेल-असंच सांगायचंय नं तुम्हाला मला?"

चोराच्या कुशाग्र बुद्धीने चकित होऊनही शान्तपणे मन्त्री म्हणाला, "तू माझ्या मनातला विचार फारच लवकर ओळखलास हं!"

यावर गुडगडून हसत डाकू रामसिंह म्हणाला, "महाराजांनी मला भल्या मनानं सोडून दिलं असतं, तर त्यांच्या सहृदयतेबद्दल आपली कृतज्ञता दाखवली असती. कायद्याप्रमाणे त्यांनी मला







एकादी शिक्षा सुनावली असती तरीही त्यांच्या प्रामाणिकपणाबद्दल मला अभिमान वाटला असता. पण माझे हे दोन्ही अंदाज चूक निघाले. महाराजांची दवंडी ऐकून मी निश्चय केला होता की आपलं तारुण्य आपण त्यांना देअून टाकावं, अन् त्यामुळेच मुद्दाम प्रयत्नपूर्वक मी शिपायांच्या हाती सापडलो. पण आता माझा निश्चय बदलला आहे. संकटात, अडचणीत सापडलेल्या व्यक्तींचा आपल्या फायद्यासाठी अुपयोग करू पहाणं ही अगदी नीच अशी अधम प्रवृत्ति आहे. आत्ता महाराजांच्यात तीच प्रवृत्ति दिसून येत आहे."

चोराचे बोलणे ऐकून महाराजांचा राग अनावर झाला अन् ते म्हणाले, "तुझ्या अतिनीच अशा अपराधाबद्दल मी तुला आत्ता व ताबडतोब फाशी देववू शकतो."

यावर जराही विचलित न होता रामसिंह म्हणाला, "आपणाला हाच न्याय आहे असं वाटत असेल, तर तसंच करा महाराज! परंतु आपण लक्षात ठेवा महाराज, कि आपण देत असलेल्या शिक्षेला भिअून मी मन्त्र्याचा प्रस्ताव कधीच मंजूर करणार नाही."

बापरे! रामसिंहच्या या बोलण्याने राजाची वाचाच बसली. बराच वेळ सुन्नपणे तो सिंहासनावर बसून राहिला. हळूहळू त्याचं मन शांत झालं अन् समाधानाने सिंहासनावरून अुतरून तो रामसिंहजवळ आला. मोठ्या प्रेमाने त्याला मिठी मारत राजा म्हणाला, "रामसिंह तू माझ्या डोळ्यावर असलेली अज्ञानाची पट्टी काढून ज्ञानोदय करवलास; तू एक महर्षि आहेस. जीवनाच्या अंतकाळी का होईना, तुझी भेट होणं हे मी आपलं पूर्वजन्मीचं पुण्य समजतो. माझं बेवारशी होणारं सिंहासन वारस म्हणून मी सहर्ष तुझ्या हवाली करत आहे. तुला सिंहासनावर बसवून मी संन्यास ग्रहण करणार आहे."

इतकी गोष्ट सांगून वेताळ म्हणाला, "हे विक्रम राजा, म्हातारपणी राजा अनन्तवर्माची बुद्धि भ्रष्ट झाली असं वाटतंय. नाहीतर चोऱ्या करणाऱ्या एका डाकूला महर्षि म्हणून त्याने त्या चोराची प्रशंसा का केली? चोराला राजा बनवण्याइतका मूर्खपणा दुसरा असू शकेल काय? अच्छा, चोराला राजा तर केला; पण स्वत: संन्यास घ्यायची काय जरूर होती? या प्रश्नांची अुत्तरं माहीत असूनही तू दिली नाहीस, तर तुझ्या मस्तकाचे शतशः तुकडे होतील."

राजा विक्रम अुत्तरादाखल बोलू लागला, "राजा अनन्तवर्माची वागणूक अन् बोलण्यावरून असं दिसतं की तो एक सुसंस्कारित राजा होता. हा त्याचा अुपजत गुणच असला पाहिजे. अशी माणसं कधी कधी तात्पुरती मानसिक दुर्बलतेच्या अधीन होतात, पण या तात्कालिक स्थितीला 'बुद्धि भ्रष्ट झाली' म्हणणं अुचित नव्हे. सृष्टीतले सारेच जीव आपल्या प्रकृति-धर्माप्रमाणे वागत असतात, हे एक सत्य आहे. परन्तु तारुण्याच्या प्रलोभनात सापडून क्षणभर या सत्याचा त्याला विसर पडला. पण प्राणांचा मोहही सोडून बेडरपणे रामसिंह काही बोलला, तेंव्हा त्याचे डोळे अुघडले. साहस व संस्कार असे अुत्तम गुण अंगी असलेल्या रामसिंहला तो महर्षीच समजला, त्याला राजाने 'महर्षि' असे संबोधले अन् त्याला आपले सिंहासनही देअून टाकले. नंतर जीवनात अनिवार्य मानली जाणारी स्थिति मृत्यु; त्याचे सहर्ष स्वागत करून, तोच आपल्या जीवनाचा परमार्थ मानून शेवटच्या दिवसांत शांति मिळवण्यासाठी राजाने संन्यास घेतला!"

अशा तऱ्हेने अुत्तर दिल्यावर विक्रमराजाचा मौन भंग झाल्यामुळे वेताळ पुन्हा प्रेतासह अदृश्य होअून त्या झाडाच्या फांदीला लटकू लागला.

—कल्पित



# खरी सुधारणा

नामवर गावात गरीब शेतकऱ्यांना कर्ज देणारा एक छोटा सावकार होता. फार थोड्या दिवसात तो खूप श्रीमंत झाला. त्याने गावात एक चारमजली इमारत बांधली· आणि आरामात दिवस घालवू लागला. हे सर्व पाहून मोठ्या सावकाराला त्याचा हेवा वाटू लागला. त्याला हे ही समजलं की छोटा सावकार गरीब गरजू शेतकऱ्यांकडून मासिक शेकडा वीस-पंचवीस टक्के व्याज जबरदस्तीने वसूल करतो.

मोठ्या सावकाराने विचार केला की वाटेल ते करून छोट्याचा हा व्यापार बंद पाडला पाहिजे. याशिवाय त्याला सुखाने झोप येणार नव्हती. तो सरळ गावच्या पाटलाकडे गेला आणि छोट्या सावकाराच्या अन्याय्य व्याज-वसूलीबाबत त्याने जोरदार तक्रार केली. छोटा सावकार मधून मधून पाटलाला भेटी देत असे, म्हणून मोठ्या सावकाराच्या तक्रारीकडे पाटलाने फारसे लक्ष दिले नाही. हसून गप्प बसला.

आता मोठा सावकार सरळ राजाकडे गेला आणि छोट्याची धन-तृष्णा व पाटलाच्या उदासीनतेबाबत तक्रार केली. सर्व काही ऐकून घेऊन राजा म्हणाला-''ठीक आहे, मी तुझ्या गावात एक शाळा उघडतो आणि तेथे एका व्यवहारकुशल व प्रामाणिक शिक्षकाची नियुक्ति करतो!''

मोठ्या सावकाराने आश्चर्याने विचारले-''महाराज, मी आपणाकडे शाळेची मागणी तर केलीच नाही. छोट्या सावकाराचा जुल्मी व्यापार आणि त्यात गुंतलेला पाटील यांच्याबद्दल मी तक्रार केली. आपण शाळा उघडण्याबाबत काय सांगताहात?''

तेव्हा हसत राजाने स्पष्ट केले–''तुमच्या गावची जनता अशिक्षित व अडाणी आहे, म्हणून छोट्या सावकरा सारख्यांना फावतं. जर मी छोट्या सावकाराला शिक्षा केली तर त्याची जागा दुसरा कोणी सावकार घेईल नि गरीबांचे शोषण होतच राहील. खरी सुधारणा म्हणजे जनता सुशिक्षित झाली पाहिजे, लोक व्यवहारकुशल बनले पाहिजेत. कोणी आपल्यावर अन्याय करायला धजणार नाही अशी विवेक-बुद्धि लोकात असली पाहिजे. म्हणून माझ्या दृष्टीने तुमच्या गावात एक शाळा उघडणे अत्यंत आवश्यक आहे. जा, आता आपण निश्चिन्तपणे जायला हरकत नाही.''

—एस्. लोकेश्वरी




# चान्दोबा पुरवणी–५१



**भारतातील पशुपक्षी**

## गप्पिष्ट पक्षी

बहुधा सारे पक्षी रात्री गप्प बसतात. परन्तु 'बॉबलर' नावाचे गप्पिष्ट पक्षी रात्री चिवचिवाट करून खूप मोठा आवाज करतात. बहुधा तो आवाज शत्रूंना भिवबून आपले रक्षण करण्यासाठी असावा. अन्य सर्व पक्षांत हेच फक्त पक्के गप्पिष्ट असतात.

कुठेही जायचे असले, तरी हे पक्षी नेहमी कळपानेच हिंडतात. सगळे मिळूनच ते खाद्याच्या शोधात फिरतात. इतकेच नव्हे, तर अंडीही एकत्र मिळूनच एकाच जागी घालतात, एकत्रच उबवतात, अन् पिल्लांचे पालनपोषणही मिळूनच करतात. एका बॉब्लर पक्षाच्या पंखांची स्वच्छता दुसरा बॉब्लर करतो. एकाद्या बॉब्लरला पकडून पिंजऱ्यात कोंडले, तर बाकीचे पक्षीही तेथेच येऊन त्याला घेरून रहातात. पण असे का? आपल्या मित्राला सोडवण्यासाठी मुळीच येत नाहीत ते इतके जवळ! उलट त्याच्याबरोबरच पिंजऱ्यात शिरण्यासाठी येतात ते! साधारणतः सहा-सात पक्षी कळप करून रहातात.

जंगली बॉब्लरची लांबी जवळजवळ १० इंच (२५ सें.मी) असते. फिक्या भुऱ्या रंगांचे शरीर असणाऱ्या या पक्ष्यांचा खालचा भाग पिवळट राखी असतो. त्यांच्या डोळ्यांची बुबुळे फिक्या पिवळ्या रंगाची झाक असलेली असतात. चोच व पाय कांचासारख्या लाल रंगाचे असतात.

जास्त उंचावरून उडताना हे क्वचितच आढळतात. लहान लहान झुडुपात हे आपली घरटी बांधतात. उत्तर भारतात आढळणाऱ्या बॉब्लेर पक्ष्यांपेक्षा दक्षिण भारतातले बॉब्लर बरेच मोठे असतात. यांच्या उपस्थितीमुळे जंगलात एक नवेच चैतन्य येते.



# आधुनिक भारतीय साहित्य

विशेष अशी कथावस्तु असल्याशिवाय कधी एकादी कादम्बरी असू शकेल काय? मल्याळी भाषेचे सुप्रसिद्ध लेखक वैकम महम्मद बशीरने रचलेली 'पातुम्मयूडे आडु' जर तुम्ही वाचलीत, तर तुम्ही सुद्धा असेच म्हणाल.

या कादम्बरीच्या कथेत स्वतः लेखक एक प्रमुख भूमिका करत आपली गोष्ट स्वतःच्या तोंडून सांगत असतो. अनेक वर्षे इकडे तिकडे भटकून लेखक शेवटी आपले उर्वरित आयुष्य कंठण्यासाठी परत आपल्या गावात येतो. तोपर्यन्त अनेक कादम्बऱ्या लिहून त्याने एक 'प्रसिद्ध लेखक' म्हणून चांगलीच कीर्ति

## वैकम महम्मद बशीरचे 'पातुम्मपूडे आडु'



मिळवलेली असते.

याचे घर अगदीच लहान आहे. अन् त्यामानाने कुटुम्बात माणसे बरीच जास्त आहेत. लेखकाची मुले, आई, दोन भाऊ, बहिण व तिचा पति, लग्नाचा एक धाकटा भाऊ. याशिवाय उंदीर, मांजरे व कोंबड्याही! या साऱ्यांमुळे घरात नेहमीच गोंगाट, गडबड चालू असते. जणू काही हे सर्व कमी असल्याने घरात एक बकरीही मुक्तपणे वावरत असते!

एके दिवशी ही बकरी लेखकाच्या खाटेवर चढून त्याने लिहिलेली दोन पुस्तके मोठ्या प्रेमाने खात असताना त्याला दिसते. ते पाहून लेखक आश्चर्यात पडतो खरा, पण तो तिला हाकलत मात्र नाही. ती दोन पुस्तके खाऊनही भूक न भागल्यामुळे बिछान्यावरची चादरही कमरेत जोर लाऊन ती ओढू पहाते. आता मात्र तो शान्त राहू शकत नाही.

या कादम्बरीत सुरुवातीपासून शेवटपर्यन्त या बकरीचा उल्लेख आढळतो. त्याच गावात रहाणाऱ्या, लेखकाच्या पातुम्मा नावाच्या बहिणीची आहे ही बकरी. कधी कधी ही बकरी मोठी विलक्षण परिस्थिति निर्माण करते. एक असलीच घटना अशी आहे—त्या बकरीने एका घड्यात आपले डोके खुपसले अन् जणू



काही ते बाहेर काढण्याचे काम इतरांचे आहे अशा समजुतीने ते तिने बाहेरच काढले नाही. तो घडा फोडून तिची सुटका करायचं काम घरातल्या माणसांचेच!

शान्त वातावरणात आपले लेखनकार्य चालू ठेवण्याच्या इरादाने लेखक या गावात आलेला आहे, परन्तु त्याचे स्वप्न साकार होत नाही. त्याच्या आईची, बहिणींची अन् बंधुमित्रांची त्याच्याकडून आर्थिक सहाय्याची अपेक्षा असते. पण प्रत्येकजण आपला हा मामला दुसऱ्याला न कळण्याची खबरदारी घेत असतो.

पातुम्माला कायम एक आशा असते, की आपल्या या बकरीला लवकरच एकादे करडू होईल, अन् आपल्याला खूपसे दूध मिळेल! मग आपण पुष्कळसा पैसा मिळवू शकू!

शेवटी बकरीला एक सुंदरसे पांढरे करडू होते. परन्तु पातुम्माचे नातेवाईक चोरून बकरीचे दूध काढून घेतात. अशा तऱ्हेने चोरलेल्या दुधामुळे घरातल्या सगळ्यांना चहा मिळत रहातो.

या लहानशा कादम्बरीत आपल्याला लेखकाच्या लहानपणचा गोष्टी, बांधवांची अन् मित्रांची विचित्र वागणूक वगैरेंचा परिचय होतो. एक नातेवाईक तर त्याला नेहमीच धमकी देत असतो, की त्याने आपल्या गरजा पुऱ्या केल्या नाहीत, तर आपण सैन्यात भरती होऊ.

एकदा तेथल्या स्थानिक शाळेतल्या मुली लेखकाकडे पहातात. तेंव्हा त्याला वाटते की आपण लेखक म्हणून प्रसिद्ध असल्यानेच त्या आपल्याकडे पहात आहेत, अन् यामुळे तो खूप आनन्दित होतो. पण लवकरच त्याला हा भ्रम आहे हे लक्षात येते; कारण त्याच्यामागे असणाऱ्या, फळांनी लगडलेल्या झाडाकडेच त्यांची दृष्टि असल्याचे त्याला कळून चुकते!

नरम विनोदाने भरलेली ही कादम्बरी केरळमधील एका सर्वसामान्य मुसलमान कुटुम्बाच्या परिस्थितीचे दर्शन घडवते, गरीब माणसांच्या लहान सहान अपेक्षा व समजुतींचे दिग्दर्शन करते.

वैकम महम्मद बशीर हा त्याच्या समकालीन मल्याळी कथा साहित्याचा मार्गदर्शक आहे. याचा जन्म सन १९१० मधे झाला.

# तुम्हाला माहीत आहे?

१. दिल्ली ही आपल्या देशाची राजधानी केंव्हापासून झाली? त्यापूर्वी आपली राजधानी कोणती होती?
२. ऱ्होडेशियाचे नवीन नाव काय?
३. खूप जुना खेळ कोणता?
४. भारतातल्या राष्ट्रीय काँग्रेसची पहिली अध्यक्षा कोण?
५. सर्वात पहिल्या रोबोटची निर्मिती केंव्हा झाली?
६. 'जयहिन्द'या घोषणेची सुरुवात कोणी केली?
७. भारताच्या उपाध्यक्षांची आणखी एक दुसरी जबाबदारी कोणती?
८. झेब्र्याचे वैशिष्ट्य काय?
९. 'राजतरंगिणी' हा ग्रन्थ कोणत्या राजांचा इतिहास सांगतो?
१०. पोस्टाचे तिकिट भारतात प्रथम केंव्हा सुरू झाले?
११. कोणत्या चॉकलेट-संस्थेने एका पुऱ्या गावाची निर्मिति केली?
१२. इटलीचे राष्ट्रीय फूल कोणते?
१३. 'गीतगोविन्द'चा लेखक कोण?
१४. "दास कॅपिटल" जगातल्या प्रमुख पुस्तकांपैकी एक आहे. त्याचा लेखक कोण?
१५. अमेरिकेच्या अध्यक्षांचे निवासस्थान 'व्हाईट हाऊस'याला पांढरा रंग का दिला गेला?

# उत्तरे

१. १९११; कलकत्ता.
२. झिंबाब्वे.
३. पोलो (इसवी सनाच्या पहिल्या शतकात पर्शियात खेळला जात असे.)
४. डॉ. ॲनी बेझन्ट.
५. अमेरिकेतील युनिमेशन या संस्थेने १९६२ मधे निर्माण केला.
६. नेताजी सुभाषचन्द्र बोस.
७. राज्यसभेचे अध्यक्षपद.
८. दोन झेब्र्यांच्या अंगावरचे पट्टे कधीही सारखे नसतात.
९. काश्मिरच्या राजांचा इतिहास.
१०. इ.स. १८५२ मधे.
११. कॅडबरी बोर्नव्हिल.
१२. कुंद.
१३. जयदेव.
१४. कार्ल मार्क्स.
१५. आगीत पडलेले डाग लपवण्यासाठी.



# शंभूचा पश्चात्ताप

एकतापुर नावाच्या गावात शंभू नावाचा एक श्रीमन्त माणूस रहात असे. त्याला एकच मुलगी होती- मन्दाकिनी.

मंदाकिनी दिसायला फार सुरेख होती. धन-दौलत व रूपसौन्दर्य यामुळे अनेक श्रीमन्त घराण्यातल्या तरूण मुलांना तिचे आकर्षण वाटू लागले व त्यांच्याकडून तिला लग्नाच्या मागण्या येऊ लागल्या. परन्तु इकडे मंदाकिनीची गोष्ट निराळीच होती. आपल्या पित्याजवळ काम करणाऱ्या रामचन्द्र नावाच्या तरुणाशी लग्न करायची तिची इच्छा होती.

रामचन्द्र सुन्दर होता; भोळाभाबडा व मोठा प्रामाणिकही होता तो.

मन्दाकिनीसाठी स्थळे पहाण्याचा जेंव्हा शंभूने विचार केला, तेंव्हा तिने रामचन्द्रशी विवाह करायची आपली इच्छा त्याला सांगून टाकली. ते ऐकून रामचन्द्र सुन्नच झाला!

आपल्याकडे काम करणाऱ्या नोकराला आपला जावई बनवणे शंभूला फार अपमानकारक वाटत होते. खूप विचार करून न केलेल्या अपराधाचा आरोप ठेवून त्याला कामावरून काढून टाकले.

रामचन्द्रला याबद्दल फार दुःख झाले व तो ते गावच सोडून निघून गेला. मन्दाकिनीने हट्टाने सांगून टाकले की, 'लग्न केले, तर रामचन्द्रशीच करीन, नाहीतर जन्मभर तशीच राहीन.' आईनेही मुलीच्या म्हणण्याचे समर्थन केले. नाइलाजाने शंभूने रामचन्द्रला शोधायचा प्रयत्न केला, पण त्याचा कुठेच पत्ता लागेना.

सुमन देसाई

अशीच दोन वर्षे निघून गेली. आपल्या सर्व कामात मदत करणारा रामचन्द्र जवळ नसल्याचा आणि मन्दाकिनीच्या लग्न न करण्याच्या निर्णयाचा शंभूच्या तब्येतीवर परिणाम होऊन तो वारंवार आजारी पडू लागला.

हे सारे पाहून शंभूच्या बायकोने मुलीची कशीतरी समजूत घालून तिला लग्नाला तयार केले.

दूरच्या एका गावी धर्मराज नावाचा एक करोडपति रहात असे. त्याच्या मुलाचे स्थळ योग्य वाटून, गावच्या एका प्रतिष्ठित माणसाला बरोबर घेऊन शंभू धर्मराजच्या गावी गेला. तो तेथे पोचला, तेंव्हा धर्मराजचा मुलगा घरी नव्हता.

धर्मराजने शंभूचे खूप आतिथ्य केले. "मी मुलाला निरोप देऊन बोलवून घेतो. शेतीबरोबरच माझा व्यापारही असल्याचं आपण ऐकलंच असेल. माझा मुलगा नेहमी व्यापारातच गुंतलेला असतो." असे म्हणून त्याने आपल्या नव्या नोकराला बोलवून घेतले.

नोकर समोर आला, तेंव्हा त्याला पाहून शंभूला मोठेच आश्चर्य वाटले! तो अन्य कोणी नसून, रामचन्द्रच होता! त्याला असे अचानक पाहून शंभू जरा घाबरूनच गेला. परन्तु रामचन्द्र मात्र शंभूशी मोठ्या प्रेमाने बोलला. त्याने त्याच्या घरातल्या प्रत्येक व्यक्तीची नावे घेऊन त्यांची खुशाली विचारली.

हे पाहून धर्मराज शंभूला म्हणाला, "मी याला काही दिवसापूर्वीच कामाला ठेवला आहे. त्यानं आपणाकडे अगोदर काम केलंय असं दिसतंय." अन् लगेच रामचन्द्रकडे वळून तो म्हणाला, "जा, लवकर जाऊन माझ्या मुलाला बोलवून आण."

यावर रामचन्द्र हळू आवाजात अुत्तरला, "ते आत्ता येणार नाहीत."

"का नाही येणार? व्यापाराची कामं मागनं पहाता येतील, अगोदर त्याला इकडे यायला सांग. मुलीकडचे त्याला भेटायला आलेत म्हणून सांग जा लवकर." असे म्हणून धर्मराजने त्याला काही खूण केली.

परंतु तिकडे लक्ष न देता आपलेच बोलणे चालू ठेवत रामचन्द्र म्हणाला. "आत्ता तर ते नीलवेणीच्या घरी असतील. त्यांनी यायचं म्हटलं, तरी नीलवेणी येऊ देणार नाही त्यांना."

"ही नीलवेणी कोण?" शंभूने आश्चर्याने पहात विचारले.

धर्मराज काहीतरी अुडवाअुडवीचे अुत्तर देऊन नीलवेणी प्रकरणावर पडदा टाकायच्या विचारात होता. प्रण इतक्यात रामचन्द्रच अुत्तरला, "ही नीलवेणी तर मंजुवाणीची मुलगी. काही दिवसांपूर्वी छोटे बाबू मद्यपान करून झिंगले अन् रस्त्यात पडले. तेंव्हा त्या नीलवेणी अन् मंजुवेणींनी त्यांना अुचलून घरात नेऊन





झोपवले, त्यांची सेवाशुश्रूषा केली. तेंव्हा पासून हे असंच चाललंय, अन् मंजुवेणी तर सांगत फिरते की छोटे बाबू तिचे 'भावी जावई' आहेत."

ते ऐकताच शंभू सर्व काही समजून चुकला. रागावून आता शंभू धर्मराजकडे एकटक पहात राहिला. पण तो तर त्याहीपेक्षा जास्त रागाने रामचन्द्रकडे पहात होता. शंभू मुकाट्याने आपल्याबरोबरच्या त्या प्रतिष्ठित माणसाला घेऊन घराबाहेर निघून आला.

इतक्यात अपार क्रोधाने धर्मराजने रामचन्द्रचे मानगुट पकडून त्याला बाहेर ढकलत म्हटले, "अरे बुद्धिहीन माणसा, तुला कामला ठेवून मी तर पदरात निखाराच बांधून घेतला! चल, चालता हो तावडतोब! क्षणभरही थांबू नकोस इथे!"

धडपडून पडणाऱ्या रामचन्द्रला ऐनवेळी हाताने सावरत शंभू म्हणाला, "चल बेटा! आता आपण आपल्या घरी जाऊ या."

तेथेच कट्ट्यावर उभा असलेला धर्मराज म्हणाला, "अहो, त्याच्या बोलण्यावर काही विश्वास ठेवू नका."

शंभू हसत-हसत त्याला म्हणाला, "हा रामचन्द्र किती चांगला आहे, हे माझ्या घरच्यांना आधीपासनंच चांगलं ठाऊक आहे; ओळखायला मलाच तेवढा उशीर लागला. मला कळलंय की, जीव गेला तरी हा कधी खोटं बोलणार नाही. मी अुगीचच घालवून दिलं बिचाऱ्याला, अन् मग बसलो होतो काळजी करत. पण यानं मात्र नंकळत माझ्या मुलीचं आयुष्य बरबादीपासून वाचवलं! मी आता याला नोकर म्हणून नव्हे, तर भावी जावई म्हणून घेऊन जातो आहे."

शंभू बरोबर आलेल्या रामचन्द्रला पाहून मायलेकींना फार आनन्द झाला. एका सुमुहूर्तावर रामचन्द्र व मंदाकिनीचा विवाह थाटाने साजरा झाला.






प्राचीन काळची गोष्ट आहे. रशियात एक म्हातारी रहात होती. तिला दोन मुलगे होते. त्यांच्यापैकी एक मेला आणि दुसरा कोठे तरी दूर देशी निघून गेला. तो गेल्यावर तिसऱ्या दिवशी म्हातारीकडे एक शिपाई आला. "आजी बाई, रात्र बरीच झाली आहे. आजची रात्र तुमच्या इथे झोपू का? सकाळी जाईन मी आपल्या वाटेने!" तो म्हातारीला म्हणाला.

"ठीक आहे, माझी काही हरकत नाही. पण तू कोठून आला आहेस ते तर सांगशील?" म्हातारीने शिपायाला विचारले.

"आजी बाई, मी तर त्या लोकातून आलो आहे!" शिपायाने उत्तर दिले.

"खरंच? माझा एक मुलगा नुकताच मेला. तुला तर कुठे तो भेटला नाही?" म्हातारीने भोळसटपणे विचारले.

"आम्ही दोघे तेथे एकाच खोलीत राहतो." शिपायाने माहित पुरवली. "तुमचा मुलगा तिथे बगळ्यांचा रखवालदार बनून काम करतोय आजी!"

"अरेरे, बिचाऱ्याला खूपच त्रास होत असेल नाही?" म्हातारीने विचारले.

"खूप त्रास होतो त्याला. बगळे केव्हांही काटेदार झाडा-झुडुपात जातात. त्यांच्या पाठीमागे पळावं लागतं बिचाऱ्याला!" शिपाई म्हणाला.

म्हातारीने विचारले-"तर मग त्याचे सगळे कपडे फाटून गेले असतील नाही?"

"होय, त्याच्या सगळ्या कपड्यांची

अरुण देशपांडे



लक्तर झाली आहेत. खरंच सांगतो मी आजीबाई." शिपाई म्हणाला.

म्हातारीने विचारले-"एक काम करशील? माझ्या पाशी चाळीस वार कापड नि काही पैसे आहेत. ते माझ्या मुलाला नेऊन देशील!"

"जरूर, अगदी नक्की नेऊन देईन!" शिपायाने आश्वासन दिले.

शिपाई रात्री म्हातारीच्या घरी झोपला. दुसऱ्या दिवशी म्हातारीने दिलेले चाळीस वार कापड नि पैसे घेऊन त्याने मजेत आपला रस्ता धरला.

या घटनेनंतर काही दिवसांनी दूर देशी गेलेला म्हातारीचा मुलगा परत आला.

म्हातारीने त्याला सांगितले-"बेटा, तू जेव्हा इथं नव्हतास तेव्हा एक माणूस त्या लोकातून आला. तुझा मोठा भाऊ अन् तो तेथे एकाच खोलीत राहतात असे ही त्याने मला सांगितले. त्याच्या बरोबर तुझ्या भावाला देण्यासाठी मी चाळीस वार कापड आणि काही पैसे ही दिले."

"फार मोठं काम केलंस आई! कुणी तरी धोका देऊन आपल्याला लुटलं बघ." असं म्हणून म्हातारीचा मुलगा बाहेर पडला.

जंगलातला रस्ता पार करून तो एका गावात पोचला. त्या गावच्या जमीनदाराच्या घराच्या बाजूला असलेल्या गोठ्यात एक डुक्कर आपल्या पिल्लांसह चारा खात होतं. म्हातारीच्या मुलाने डुकराला लवून नमस्कार केला आणि त्याच्याशी काही बोलत असल्याचे त्याने नाटक केले.

घराच्या वरच्या मजल्यावरून जमीनदाराची बायको हा सर्व प्रकार पहात होती. तिने आपल्या मोलकरणीला बोलवून सांगितलं-"तो मुलगा डुकराला का नमस्कार करीत आहे हे त्याला विचारून ये बरं!"

जमीनदाराची मोलकरीण म्हातारीच्या मुलापाशी आली नि तिने विचारलं-





"आमच्या डुकराला असा लवून का नमस्कार करीत आहेस?"

म्हातारीचा मुलगा म्हणाला-"ताई, ही डुकरीण माझ्या बायकोच्या नात्यातील आहे. उद्या माझ्या मुलाचं लग्न आहे. लग्नाच्या कामात देखरेख ठेवण्यासाठी हिला घेऊन जायला मी आलो आहे. आपल्या मालकिणीला विचारून मला तेवढी परवानगी मिळवून दे ना!"

मोलकरणीकडून हे सर्व ऐकून जमीनदाराची बायको म्हणाली-"लग्नासाठी डुकरांना घेऊन जायला आला आहे म्हणतेस? मूर्खच दिसतो आहे. आपलं काय बिघडले त्यात? त्या डुकरिणीला माझा लोकरी कोट घाल, आणि पिल्लांसह टांग्यात बसवून थाटात रवाना कर तिला."

मोलकरणीने मालकिणीच्या इच्छेनुसार डुकरीण नि तिच्या पिल्लांना टांग्यात बसवले नि म्हातारीच्या मुलाच्या हाती लगाम दिला. तशी वरच्या मजल्यावरून हे सर्व पाहणारी जमीनदारीण जोरात हसली.

जमीनदार परत आला तेव्हा जमीनदारिणीने सर्व वृत्त नवऱ्याला सांगितलं.

"डुकरीण नि तिच्या पिल्लांना तू त्याच्या बरोबर पाठवून दिलंस हं?" जमीनदाराने विचारले.

"होय, मी डुकरिणीला आपला लोकरी कोट चढवला अन् आपल्या टांग्यात पिल्लांसह तिला बसवून त्या मुलाला रवाना केले." जमीनदाराच्या बायकोने नवऱ्याला सर्व समाचार दिला.

जमीनदार चांगलाच रागावला. त्याने बायकोला सांगितलं-"तुला चांगलाच धोका दिलाय त्याने!" नंतर जमीनदार घोड्यावर स्वार होऊन म्हातारीच्या मुलाच्या शोधासाठी निघाला. घोड्याच्या टापांचा आवाज ऐकून म्हातारीचा मुलगा सावध झाला. त्याने टांगा झाडीत लपवला व रस्त्यावर आला. त्याने आपली

टोपी रस्त्यावर समोर ठेवली आणि बसून गेला.

थोड्याच वेळात जमीनदार तेथे आला नि त्याने विचारले—"टांग्यातून डुकारांना घेऊन जाणाऱ्या कोणाला तू पाहिलंस?"

"होय साहेब, पण त्याला आता बराच वेळ झाला. तो खूप दूर गेला असेल आता पर्यंत!" म्हातारीच्या मुलाने माहिती दिली.

जमीनदाराने त्याला पकडण्यासाठी मदत मागितली तेव्हा म्हातारीचा मुलगा म्हणाला—"जर येथील आसपासचे रस्ते आपणास माहीत असतील, तर आपण त्याला पकडू शकाल. मला रस्ते माहीत आहेत, पण माझ्या जवळ घोडा नाही. म्हणून मी आपणास मदत करू शकणार नाही. शिवाय या टोपीखाली एक ससाणा आहे. मी त्याची रखवाली करीत आहे. तो जर उडून गेला तर माझा मालक त्याची किंमत ३०० रुबल माझ्याकडून वसूल करील!"

"बेटा, तावडतोब माझ्या घोड्यावर बसून त्या बदमाशाला पकड. तुझा ससाणा मी सांभाळतो. हं, हे तीनशे रुबल तुला देऊन ठेवतो. जर ससाणा उडून गेला, तर तुझं नुकसान नको व्हायला." असं म्हणून जमीनदाराने आपला घोडा व ३०० रुबल त्याच्या स्वाधीन केले.

म्हातारीचा मुलगा जमीनदाराच्या घोड्यावर बसून तीनशे रुबल घेऊन पुढे निघाला, जाताना टांगा ही आपल्या बरोबर घेतला नि गावी पोचला. इकडे जमीनदाराने खूप वाट पाहिली, म्हातारीचा मुलगा काही परत आला नाही. त्याने टोपी उचलून पाहिली तर खाली ससाणा नव्हताच. हे पाहून जमीनदाराच्या लक्षात आलं की आपल्या बायकोप्रमाणेच या भामट्याने त्याला ही चांगलाच हात दाखवलेला आहे.





# वीर हनुमान

हनुमान बाणाच्या वेगाने चंद्रसेनेच्या निवास भवनात पोचला. हे भवन संगमरवरी दगडांनी बांधलेले होते व ठिकठिकाणी अद्भुत शिल्पाकृति कोरलेल्या होत्या. त्या घुडुप अंधारात ही ते भवन चमकत होते, कारण त्याचे बांधकाम करताना जागोजागी विविध रत्ने लावलेली होती.

भवनाच्या प्रवेश-द्वारी कोणी राक्षस पहारेकरी नव्हता. सर्व जण काली-मंदिरातील उत्सवात भाग घेण्यासाठी गेले होते. पण प्रवेश-द्वारावर एक भयानक राक्षस-सर्प दिसत होता.

हनुमानाने जेव्हा त्या राक्षस-सर्पाला पाहिलं, त्याच वेळी त्याने ही हनुमानाला पाहिलं. फूत्कार करीत तो साप आपल्या शेपटीवर उठला. या सापाला पाय सुद्धा होते. त्याच्या नाकपुड्यातून धूर व ज्वाला निघत होत्या. त्या सर्पाला मारण्यासाठी हनुमान त्याच्यावर झडप घालणार, इतक्यात भवनाच्या वरच्या मजल्यावरील एका कक्षातून कोणा स्त्रीचा आर्त स्वर त्याला ऐकू आला.

लगेचच हनुमानाने सूक्ष्म रूप धारण केलं व तो राक्षस-सर्पाच्या तोंडावाटे त्याच्या पोटात जाऊन पोचला. त्याने त्या सापाचे पोट कापून त्याला मारून टाकले. नंतर तो भवनाच्या



अंतर्भागात आला. वरच्या मजल्यावरून त्याला चाबकाच्या फटकाऱ्यांचे आवाज व स्त्रीचे ओरडणे ऐकू आले.

चंद्रसेना जिथे कैदेत होती त्या कक्षा-जवळ हनुमान धावत-पळत जाऊन पोचला. दाराला आतून कडी लावलेली होती. म्हणून हनुमानाने खिडकीतून डोकावून आतील दृश्य पाहिले. तेव्हा शुद्धीवर आलेल्या चन्द्रसेनेला चाबकाने मारीत कंटकी धमकावीत होती—"सांग, तू काली मंदिरात कुणाला पाठवलं होतंस? नाहीतर आता मी तुझं डोकं धडापासून अलग करते. तुझ्यासारख्या धोकेबाज बाईला पाताळ-लंकेत आणताना त्या महिरावणाने आपली अक्कल गहाण टाकली होती असं वाटतं, नाहीतर त्याने असं कधी केलं नसतं!" असं म्हणून कंटकी चंद्रसेनेचा गळा जोराने दाबायचा प्रयत्न करू लागली.

हनुमानाने लगेच आपली शेपूट वाढवली आणि खिडकीतून आत घातली. कंटकी जेव्हा चन्द्रसेनेचा गळा दाबून तिला मारू लागली, तेव्हा हनुमानाने आपल्या शेपटीने कंटकीच्या गळ्याला वेढले आणि तिला मागे ओढले. इतकंच नव्हे, तर त्याने आपल्या शेपटीने कंटकीचा गळा असा जोराने दाबला की ती मरून गेली.

हनुमानाने एकच लाथ मारून कक्षाचा दरवाजा मोडून टाकला व तो आंत पोचला. त्याने चन्द्रसेनेला नमस्कार केला व थोडक्यात सर्व वृत्त तिला सांगितले. नंतर त्याने महिरावणाला मारण्याचा उपाय सांगण्याबाबत चन्द्रसेनेला प्रार्थना केली.

रामाचे नाव ऐकताच चन्द्रसेना आपले सर्व दुःख विसरली. ती आनंदून म्हणाली—"हे हनुमान, महिरावणाच्या प्राणांचे रहस्य मी तुला सांगते, पण महिरावणाचा संहार केल्यानंतर तू मला रामाचे दर्शन घडवशील असे वचन मला दे."



आपण चन्द्रसेनेला रामाचे दर्शन अवश्य घडवू असे हनुमानाने तिला वचन दिले. मग महिरावणाचे प्राण जेथे सुरक्षित आहेत ती जागा चन्द्रसेनेने हनुमानाला सांगितली. यावर हनुमान लगेच तेथून बाहेर आला, आकाशात उडाला आणि साता समुद्रापलीकडील ज्वालामुखी कमळाजवळ पोचला. त्या कमळाच्या पाकळ्या म्हणजे जळणाऱ्या ज्वाला होत्या. हनुमानाने अग्निदेवाची प्रार्थना केली आणि त्या कमळात घुसला. मग त्या कमळाच्या देठातून तो थेट मकर-बिळापाशी पोचला.

मकर-बिळात भयंकर साप फूत्कार करीत होते. पिशाच्च हुंकार भरीत होते. हनुमान जोराने ओरडला आणि त्या दुष्ट शक्तींना डाव्याउजव्या हातांनी गुद्दे मारून घाबरवून सोडले. सगळे पिशाच्च तर पळून गेले, पण आता हनुमानाला सर्वत्र व्यापून राहिलेली एक भयंकर राक्षसाकृति दिसली. तिला लांब सफेद दाढा होत्या आणि तिचे डोळे लाली-लाल होते. आकृतीने हनुमानाला रोकले.

हनुमान जोरात ओरडला—"दूर हो माझ्या समोरून. कोण आहेस तू?" ती आकृति विकट हास्य करीत म्हणाली—"मी आहे वेताळ. भूत, प्रेत



व पिशाच्च या सर्वांचा मी नायक आहे. तू कोण? इथे फक्त दोन जणच येऊ शकतात. एक म्हणजे महिरावण, आणि दुसरा एक महाबलशाली कोणी! तू महिरावण नाहीस, म्हणजे तो दुसरा महाबलशाली असावास!"

हनुमान जोर-जोरात हसत म्हणाला—"वा रे वेताळ! अरे स्मशानात स्वतंत्रपणे राहणाऱ्या तुझी अशी दुरवस्था का झाली? इथे अंधारात काय करीत आहेस? चल, हट इथून. नाहीतर माझ्या ताकतीचा मजा पहा."

हनुमानाचा उपहास करीत वेताळ हसत म्हणाला—"अस्सं? तर मग



पाहतोच मजा! दाखव तुझी ताकत!"

हनुमानाने तावडतोब आपल्या मुठीने वेताळाला एक गुद्दा घातला. त्यासरशी वेताळ खाली जमिनीवर पडला. आता हनुमानाला नमस्कार करीत तो म्हणाला-"स्वामी हनुमान, मी धन्य झालो. थोड्या दुर्वर्तनामुळे मी शापग्रस्त झालो नि इथे कैदेत पडलो. शिवजींनी सांगितलंय की तुझ्या स्पर्शाने मी शापमुक्त होईन! जय वीर हनुमान की!" असे म्हणून क्षण भरात वेताळ तेथून अदृश्य झाला.

हनुमानाने तेथील गुंफेत प्रवेश केला. एका उंच शिलावेदीवर गोल रत्नमंजूषा त्याला दिसली. तिच्या झाकणावर अग्नि-ज्वाला दिसत होत्या. हनुमान जवळ पोचताच त्या ज्वालांनी त्याला घेरले. तावडतोब हनुमानाने जोरात श्वास घेतला आणि प्रलयंकारी हवेचे झोत त्यांच्यावर सोडले. तरी पण एक ही ज्वाला विझली नाही, उलट त्यांनी हनुमानाला अधिकच घेरले.

हनुमानाने अग्नि-देवाचे मनःपूर्वक स्मरण केले नि म्हणाला-"हे अग्निदेव! तुझ्या मित्र वायुदेवाचा मी मुलगा! माझ्यावर कृपा कर." बस, दुसऱ्याच क्षणी सर्व ज्वाला विझून गेल्या. लगेचच रत्न-मंजूषेवरील ज्वालेतून ध्वनि आला—

"हनुमान, तुला एक महत्त्वाची गोष्ट सांगण्यासाठी मी इतक्या उग्र स्वरूपात तुझ्यावर तुटून पडलो. या मंजूषेत असलेल्या पांच भुंग्यांना एकाच दमात मारण्यासाठी तुला पाच तोंडे असली पाहिजेत आणि आपल्या प्रचंड श्वासांनी यांना तोंडात घेऊन चावून चावून खाऊन टाकले पाहिजे. हे सर्व नीट लक्षात ठेव."

हनुमानाने अग्नि-देवाला नमस्कार केला. आणि नंतर भ्रमरांनी भरलेली ती मंजूषा घेऊन तो वायु-वेगाने राम-लक्ष्मणांकडे आला. ते दोघे



आतापर्यंत असंख्य महिरावणांशी युद्ध करीत राहिले होते. हनुमान हुंकार भरीत महिरावणापुढे उतरला, आणि त्याला रत्न-मंजूषा दाखवीत म्हणाला—"हे पाताळ लंकेश्वरा! तुझे पंचप्राण आत असलेली ही पेटिका मी घेऊन आलो, अजून ही तुला एक संधि देतो, राम-लक्ष्मणाची क्षमा माग नि आपले प्राण वाचव."

आपल्या पंच-प्राणांची रत्न-मंजूषा पाहून महिरावणाचा चेहरा फिक्का पडला. जसा काही आपल्यावर दगडांचा वर्षाव होत आहे असा त्याला भास झाला. दुःखी अंतःकरणाने तो म्हणाला-

"वानरा, हे तू बरं नाही केलंस! या मंजूषेत जरी प्राण असले, तरी ते तू नि रामलक्ष्मण यांना अतिशय घातक असे मृत्यु-द्वारच समज. तू जेव्हा ही पेटिका उघडशील तेव्हा ते भुंगे तुला डंख मारून तुझे शरीर कालकूट विषाने भरून टाकतील, जाळून तुझी राख करून टाकतील. तुम्हा तिघांचा मृत्यु तू आपल्या बरोबर आणला आहेस. जर तुला आपल्या प्राणांचे प्रेम असेल तर ती पेटिका खाली ठेव."

यावर जोराने हसत हनुमान म्हणाला-"झोपलेल्या राम-लक्ष्मणांना जादूने इथे आणण्याचा जो अपराध तू केला आहेस, त्याबद्दल तुला मृत्यु-दंडच मिळाला पाहिजे. मरण्यापूर्वी काही मंत्र-तंत्र दाखवू इच्छित असलास तर दाखव."

हनुमानाची निर्भयता पाहून महिरावण घाबरला नि जोराने ओरडला—"कंटकी! ओ कंटकी! ताबडतोब जाऊन चंद्रसेनेला ठार मारून टाक."

मंदस्मित करीत हनुमान म्हणाला-"अरे मायावी महिरावण! त्या कंटकीची बुद्धि तुझ्याहून ही प्रखर आहे. तिने यापूर्वीच चन्द्रसेनेला मारण्याचा प्रयत्न केला. आणि म्हणूनच तिला आपले प्राण गमवावे लागले."



काय झालं असेल ते महिरावणाच्या लक्षात आलं. तो जोराने किंचाळून हातात जी वस्तु येईल ती बाणाप्रमाणे राम-लक्ष्मणांवर फेकू लागला. मधून मधून स्वतःलाच घायाळ करून आपले रक्त इकडे-तिकडे सांडू लागला. हे सर्व पाहून हनुमानाने भगवान शंकराचे स्मरण केले आणि पाच तोंडे प्राप्त करून घेतली. अशा रीतीने हनुमान 'पंचमुखी हनुमान' बनला.

हनुमानाने पाच तोंडांनी भयंकर गर्जना केली. त्याने रत्न-मंजूषेचे झाकण उघडताच महिरावणाचे प्राण असलेले पाच भुंगे प्रलयकालीन झंकार करीत बाहेर आले. हनुमानाने आपल्या पाच तोंडांनी जोरात श्वास घेऊन त्या पाच भुंग्याना एकाच वेळी आपल्या पाच तोंडात शोषून घेतले, आणि चावून-चावून त्यांना खाऊ लागला. नंतर या भुंग्यांचे मृत अवशेष त्याने थुंकून टाकले. दुसऱ्याच क्षणी सारे मायावी महिरावण जमिनीवर निश्चेष्ट पडले.

अशा रीतीने महिरावणाची सेना नष्ट झाली, तरी पण त्याने पळून जाण्याचा प्रयत्न केला नाही. तो राम व लक्ष्मणावर विविध प्रकारच्या शस्त्रास्त्रांचा उपयोग करू लागला. तेव्हा रामाने एका महान्



अस्त्राने महिरावणाचे डोके उडवले. त्याबरोबर महिरावण खाली पडला नि मरून गेला.

तेव्हा पंचमुखी मारुती व राम आणि लक्ष्मण यांच्यावर फुलांचा वर्षाव झाला. ब्रह्मादि देव व शिवजी तेथे आले. ब्रह्मदेव रामाला म्हणाला-"हे राम, हा महिरावण कालनेमीच्या अंशातून उत्पन्न झाला. हनुमानाच्या मदतीने हा तुझ्या हस्ते आता मारला गेला. हनुमान शिवाच्या अंशातून उत्पन्न झालेला होता, म्हणून महिरावणाचा संहार करण्यासाठी आवश्यक रत्न-मंजूषा साता समुद्रांपलीकडून आणू

शकला."

शिवाने हनुमानाला आशीर्वाद देऊन म्हटलं-"हे हनुमान, तुझी शक्ति आणि बळ केवळ अपूर्व आहे. अत्यंत असाध्य काम तू साध्य करून दाखवलंस! अन्यथा महिरावणाचा संहार करणं अशक्यच होतं. इथून पुढे पंचमुखांजनेय हनुमानाचे जो स्मरण करील, त्याला भूत-प्रेत, पिशाच्च यांची कधी ही बाधा होणार नाही."

हनुमानाने आपले पंचमुख स्वरूप सोडून दिले. आपल्या पूर्ववत् रूपात येऊन त्याने ब्रह्मा व शिव यांना प्रणाम केला. ब्रह्मादि देव व शिव यांनी राम-लक्ष्मणाचा विजय होईल असा आशीर्वाद दिला व ते तेथून निघून गेले. जाण्यापूर्वी ब्रह्मदेवाने रामाला आदेश दिला की मत्स्यवल्लभाला पाताळ-लंकेचा राजा बनवण्यात यावं. त्यानुसार रामाने मत्स्यवल्लभाला बोलवले व त्याला पाताळ-लंकेच्या राज-सिंहासनावर बसवले.

यानंतर हनुमानाने रामाला नम्रपणे आपण चन्द्रसेनेला दिलेल्या वचनाबद्दल सांगितले. तो म्हणाला-"हे राम, जर चन्द्रसेने मदत केली नसती तर महिरावणाचे प्राण कोठे आहेत हे मला समजूच शकले नसते. आपल्या कार्य-सिद्धीसाठी मी चन्द्रसेनेला वचन दिले आहे की महिरावणाचा संहार केल्यानंतर मी आपणास तिच्यापाशी घेऊन जाईन!"

थोडा वेळ मौन धारण करून राम हनुमानाला म्हणाला-"ठीक आहे, चल तर मग!" रामाने स्वीकृति दिल्यावर हनुमानाला अत्यंत आनंद झाला. तो श्रीरामाला चन्द्रसेनेच्या महालापर्यंत घेऊन गेला. राम मंद-स्मित करीत हनुमानाच्या मागे चालत राहिला.





# सहज गुण

गोपाळ हा लहानपणापासूनच सेवाभावी होता. आपल्या आसपासचे लोक ही आपल्याप्रमाणे सुखी असावेत असे त्याला वाटे. जसजसे वय वाढले, तसतशी त्याची उपकारी प्रवृत्ति वाढत गेली.

अशा रीतीने काही काळ लोटला. आता गोवर्धनपुरात गोपाळच्या या परोपकारी प्रवृत्तीची बूजच कोणाला राहिली नाही. तो स्वतःच लोकांकडे जाऊन त्यांच्या गरजा जाणून त्यांना मदत करू लागला. त्याच्याकडे मदत मागण्यासाठी कोणी येईनासे झाले.

गावात त्याने कुणाला मदत केली नाही तर लोक त्याला म्हणत—"तुझ्या भरोशावर मी दुसऱ्या कोणाला मदतीसाठी बोलावलं नाही. आता तू नाही म्हणतोस, मग मी कुठे जाऊ?" अशी गोपाळची गत झाली.

पाठीमागे लोक गोपाळची टिंगल ही करीत. एकदा गोपाळची निंदा लोक कशी करतात हे त्याच्या कानावर आलं.

ते ऐकून गोपाळला वाईट वाटलं. तो आपल्या बायकोला म्हणाला—"माझ्या चांगुलपणाचा हा परिणाम बघ. मी ज्याला मदत करतो त्याला संतोष नाही. एकाद्याला मदत केली नाही तर तो माझ्यावर रागावतो. ज्यांना माझ्या मदतीची आवश्यकता नाही ते माझा हेवा करीत बसतात. आसपास कोणी दुःखी माणूस असला तर त्याच्याकडे लक्ष न द्यावं हे बरं असं मला वाटू लागलंय!"

गोपाळची बायको हे ऐकून हसून म्हणाली—"दगड मारणाराला ही वृक्ष

सुदाम पवार



फळंच देतो. हा ज्याचा त्याचा सहज गुण आहे. तुम्हाला आपला सहज गुण सोडून शांति मिळणार नाही. आता तुम्हाला मन:शांतीची आवश्यकता आहे. म्हणून आता आपण देव-दर्शन करीत तीर्थ-यात्रा करू या, म्हणजे तुम्हाला शांति मिळेल. चला, उद्या निघूं या!"

पण गोपाळ उदासपणे म्हणाला-"माझ्या प्रामाणिकपणावर माझा विश्वास आहे. देवावर माझा कधी विश्वास नव्हता-नाही. म्हणून तीर्थ-यात्रा करून मला शांति मिळणार नाही."

गोपाळची बायको प्रेमाने नवऱ्याला म्हणाली-"तुमचा परमेश्वरावर विश्वास नाही. म्हणून तुम्हाला शांति लाभत नाही. एकदा विश्वास करून तर पहा म्हणजे कळेल तुम्हाला!"

पण गोपाळला हा विचार रुचला नाही. तो म्हणाला-"आपल्या अवती-भवती वावरणाऱ्या माणसांपेक्षा मी त्या दगडी मूर्तींना महान समजत नाही. या बाबतीत तू मला शिकवण्याची जरूर नाही."

गोपाळची बायको म्हणाली-"तर मग माणूस रूपी परमेश्वरावर विश्वास ठेवा. श्रीनिवासपुरात एक महात्मा आहे. लोक त्याला परमेश्वराचा अवतार मानतात असं मी ऐकलंय. त्याचं नाव आहे आत्मानंद. त्याच्याजवळ अनेक महान् सिद्धि आहेत. मी नुकतंच ऐकलं आहे की तुमचा चुलत भाऊ श्रीपाल त्या स्वामीजींचा अनन्य भक्त बनला आहे. श्रीपाल कोणे एके काळी तुमच्याच सारखा नास्तिक होता हे तुम्हाला माहीतच आहे न?"

हे ऐकून गोपाळच्या मनात एक विचार आला. त्याला वाटलं की जर आत्मानंद स्वामींनी श्रीपालला भक्त बनविले असेल तर स्वामीजी खरोखर एक अवतारी पुरुष असले पाहिजेत. कारण श्रीपाल पहिल्यापासूनच मोठा स्वार्थी होता. आपल्या छोट्या भावांना फसवून त्याने त्यांची संपत्ति हडपली होती आणि सरकारी अधिकाऱ्यांना लाच देऊन त्याने



प्रमोदपुरची पाटीलकी मिळवली होती. आता जर तो भक्त बनला असेल तर तो खूपच बदलला असेल.

"आपण प्रमोदपुरला जाऊन श्रीपालच्या घरी काही दिवस राहून येऊं या. जर त्याच्यात खरेच बदल झाला असेल तर निश्चितच श्रीनिवासपुरला जाऊन स्वामीजींचे दर्शन घेऊ. कदाचित् मला तिथे मन:शांति मिळेल!" गोपाळ बायकोला म्हणाला.

दुसऱ्या दिवशी पति-पत्नि प्रमोदपुरला जायला निघाले. ते जेव्हा तेथे पोचले तेव्हा श्रीपालच्या घरी मोठ्या थाटा-माटात पूजा चालू होती आणि अनेक भक्त भजन-कीर्तनात रंगलेले होते.

दोघांची भेट झाली तेव्हा श्रीपालने गोपाळला प्रेमाने आलिंगन दिले आणि आत्मीयतेने म्हणाला-"आमच्या या गावात फक्त तुझ्यावरच माझं प्रेम आहे. आमच्या गावातील लोक माझी सतत बदनामी करीत असतात की माझी जीवनात कधी ही प्रगति होणार नाही. आत्मानंद स्वामींच्या कृपेने मी किती थाटात रहात आहे हे तू पहातच आहेस आता."

गोपाळ यावर म्हणाला-"गावात जे कोणी तुझी बदनामी करतात ती तुझ्यावरील प्रेमामुळे, द्वेषाने नव्हे! आता



तू जसा थाटात रहात आहेस, तसेच ते ही रहातात नाही का?"

श्रीपालला राग आला. आपला राग आवरून तो म्हणाला-"ते किती ही वैभवात रहात असले, जरी माझ्या सारखे वैभव त्यांच्या नशीबात नाही हे मी चांगले जाणतो. आमच्या गावातल्या वीरबाहूला सरकारी नोकरी मिळणार होती. तो या गावातील होता, म्हणून सरकारी अधिकाऱ्यांनी त्याच्या बाबत माझ्याकडे चौकशी केली. वीरबाहूने एकदा माझ्या धाकट्या भावाला साथ देऊन मला दोषी म्हटलं होतं. ते मी कसं विसरून जाणार? मी त्याच्या विरुद्ध आपले मत दिले.



त्याला नोकरी मिळू नये असा मी सर्व प्रकारे प्रयत्न केला."

हे ऐकून गोपाळला आश्चर्य वाटलं, तो म्हणाला-"मला वाटले आता तू राग-द्वेषाच्या पलीकडे पोचला असशील! जुन्या एकाद्या गोष्टीवरुन कुणाचा सूड उगवणं ठीक नाही."

तिकडे लक्ष न देता श्रीपाल पुढे सांगू लागला-"आमच्या गावचा शंकर काल-परवाच इथं आला होता. त्याच्या मुलीला एक चांगलं स्थळ सांगून आलं होतं. तो आमच्या गावचा होता, म्हणून मुलाकडच्यांनी त्याच्या बाबत मला विचारलं. काही दिवसांपूर्वी कोणी माझ्या मुलीपेक्षा त्याची मुलगी चांगली आहे, आणि तिचंच लग्न प्रथम होईल असं म्हटल्याचं मी विसरलो नव्हतो. मी आपल्या मुलीसाठी स्थळं पाहतो आहे. अशा स्थितीत शंकरच्या मुलीचं लग्न अगोदर का व्हावं? म्हणून मी शंकरच्या मुलीला बदनाम केलं. आत्मानंद स्वामींच्या कृपेने कालच माझ्या मुलीसाठी एक सुरेख स्थळ आलं नि लग्न ठरलं. म्हणूनच आजची पूजा योजली आहे."

आश्चर्यचकित होऊन गोपाळने विचारले-"श्रीपाल, एकाद्या निरागस मुलीच्या लग्नात मोडता घालताना तुला वाईट नाही वाटलं?"

"वाईट काय वाटायचंय? ही सर्व स्वामीजींची लीला आहे! शंकरच्या मुलीचं लग्न होणार असतं, तर त्याच्या अगोदर माझ्या मुलीचं लग्न निश्चित व्हायला हवं होतं. हे सगळं त्या शंकरचं दुर्भाग्य!" श्रीपाल म्हणाला.

"तुझं भलं करण्यासाठी दुसऱ्याचं नुकसान करणारा हा स्वामी परमेश्वराचा अवतार कसा होऊ शकेल? तू त्या आत्मानंद स्वामींची प्रशंसा करीत आहेस. शंकर त्यांना दोष नाही देणार?" गोपाळने विचारले.

श्रीपालने आपल्या मनातील विचार सांगितला-"कोणी कोणाला दोष दिला तर त्याच्याशी माझा काय संबंध?" मी आणि माझ्या कुटुंबाने सुखात रहावे एवढीच माझी इच्छा आहे.

आता गोपालला त्या घरात राहवेना. आपल्या बायकोसह तो परत निघाला. गोपाळ तेथे होता तोपर्यंत श्रीपाल त्याला आपलाच मोठेपणा सांगत राहिला.

गोपाळच्या बायकोला वाटलं की आपण आपल्या गावी परत निघालो आहोत. पण आत्मानंद स्वामींच्या दर्शनासाठी आपण श्रीनिवासपूरला निघालो आहोत हे तिला समजलं, तेव्हा तिला आश्चर्य वाटलं.

गोपाळला बायको म्हणाली-"श्रीपाल परमेश्वराचा भक्त झाला खरा! पण त्याच्यातील स्वार्थ व अहंकार ही खूप वाढला. हे सर्व पाहून माझा परमेश्वरावरील विश्वास उडत चालला आहे. अशा स्थितीत आपल्या मनांत आत्मानंद स्वामींचे दर्शन घेण्याचा विचार कसा बरे आला?"

गोपाळ दोन क्षण गप्प बसला काही विचार करीत तो म्हणाला-"परमेश्वराच्या भक्तीमुळे माणसांतील सूड-भावना कधी ही वृद्धिंगत होता कामा नये. भक्तीच्या आगीत अहंकारासारखे सहजगुण भस्मसात् व्हावेत. पण माझा भाऊ श्रीपालच्या बाबतीत मात्र असं घडलं नाही. तरी पण स्वामी आत्मानंद खरोखर अवतारी पुरुष आहेत, कारण अत्यन्त स्वार्थी श्रीपालच्या मनात त्यांनी भक्तीची ज्योत पेटवली. जर श्रीपालचे सहज गुण त्यांच्या लक्षात आले, तर ते त्याच्यात बदल घडवून आणू शकतील. म्हणूनच आता मला आत्मानंद स्वामींकडे जावे असे वाटूं लागले आहे."

आता गोपाळची बायको समजली की नवऱ्याच्या अंगचे सहज गुण काम करीत आहेत, त्यांना अडथळा आणणं बरं नाही. ती मुकाट्याने आपल्या पतीसह श्रीनिवासपुरला निघाली.



# चांदोबाच्या बातम्या



## मेळ्यात महाल

दिल्लीत नुकताच 'बलून मेला' साजरा झाला. या मेळ्यात ज्या स्पर्धा झाल्या त्यात भारता व्यतिरिक्त जर्मनी व इंग्लंडच्या जवळ जवळ दहा गटांनी भाग घेतला. त्या दिवशी सकाळी दाट धुकं पडलं होतं, त्यामुळे स्पर्धा ठरलेल्या वेळी सुरू होऊ शकल्या नाहीत. यावेळी आकाशात अनपेक्षितपणे 'बलून ताजमहाल' दिसू लागला. तो पाहून सर्व प्रेक्षक प्रभावित झाले. 'बलून-स्पर्धेत' भाग घेणाऱ्या एका स्पर्धकाने हा महाल आकाशात उडण्यासाठी सोडला होता. त्यावेळी उपस्थित असलेले आमचे उपराष्ट्रपति के. आर. नारायणन ताजमहाल पाहून म्हणाले—"असं सांगतात की, एक ब्रिटिश व्हाइसराय आमचा ताजमहाल पाहून इतके प्रभावित झाले होते की त्यांना तो उचलून आपल्या देशात घेऊन जावासा वाटला. ते यावेळी इथे असते तर हा 'बलून ताजमहाल' आपल्या देशात घेऊन जाऊ शकले असते!"

## फटाकडे उडवण्याचे यंत्र

दिवाळीत अनेक मुले फटाकडे उडवतात. काहींना फटाकडे उडवताना खूप भीति पण वाटते. आता फटाकडे उडवताना घाबरण्याची जरूर राहिली नाही. तमिळनाडु राज्यातील ईरोड येथील एका शाळेत काम करणारे चित्रकला-शिक्षक श्री. के. आनन्दन यांनी एक यंत्र बनवलं आहे. त्याच्या साह्याने हातात धरून फटाकडे उडविता येतात. या यंत्रामार्फत विजेचा संचार झाला की त्यात ठेवेला फटाकडा पेटतो व २० फुट दूर जाऊन जोरदार बार होतो.





# भरतम्माची गोष्ट

एका जंगलात एक भरत पक्षी (भारद्वाज) रहात असे. लहानपणापासून तो परोपकारी वृत्तीचा होता. भूलोकावरील त्याचे आयुष्य जेव्हा संपले, तेव्हा त्याच्या संचित पुण्याचा विचार करून देवदूत विमान घेऊन आले आणि त्यांनी त्याला स्वर्गात पोचवले.

स्वर्गातील सर्व देवी-देवतांनी भरत पक्ष्याचे आनंदाने स्वागत केले आणि त्यांनी त्याला विचारले-"बोल, तुला काय वरदान पाहिजे?" काय मागावे हे भरत पक्ष्याला सुचेना. म्हणून तो म्हणाला-"मी वेळ आली म्हणजे मला काय पाहिजे ते मागेन."

एकदा भरत पक्षी स्वर्गातील देवांकडे जाऊन म्हणाला-"मला तर इथं काहीच काम नाही. आपण मला पुन्हा भूलोकात जायला परवानगी दिली तर मला बरे वाटेल. तेव्हा देवांनी भरत पक्ष्याला वर दिला की त्याला कोणते ही रूप धारण करता येईल आणि आपल्या इच्छेप्रमाणे कोणत्या ही लोकात जाऊन तो परत स्वर्गात येऊन शकेल. आता भरत पक्षी लहान लहान पिसे धारण करून स्त्री-रूपात मानव-लोकी आला. आता ती भरतम्मा होती. जंगलातील आपल्या पहिल्याच ठिकाणी घर बांधून भरतम्मा तेथे राहू लागली.

एके दिवशी भरतम्माला आपल्या लहानपणची एक गोष्ट आठवली. भरतम्मा एकदा शहरात राहणाऱ्या आपल्या आजोबांकडे गेली होती.

आता भरतम्माला पुन्हा शहराचं

जनार्दन चिंचाळकर




आकर्षण वाटू लागलं. तिने विचार केला-"या जंगलात मला काहीच काम नाही. मी जर पुन्हा शहरात आपल्या आजोबांकडे गेले, तर तेथे आरामात राहीन."

निश्चय पक्का झाल्यावर एके दिवशी भरतम्माने सकाळी दरवाजा बंद केला आणि कुलूप लावलं. पायीच शहरात जायला निघाली ती. इतक्यात मागून एक पुकार आली—"भरतम्मा! भरतम्मा!"

भरतम्माने मागे वळून पाहिले. तिला हरिणाचा एक बच्चा दिसला. तो खूपच घाबरलेला दिसत होता. भरतम्माने त्याला विचारले—"काय रे, काय झालं? इतका घाबरला का आहेस?"

"भरतम्मा, आपल्या जंगलात शिकारी आलेले आहेत. जे जनावर दिसेल, त्याच्यावर ते आपले बाण सोडीत आहेत. मी तुझ्या घरात लपून बसू का? " हरणाच्या बच्च्याने विचारले.

"अरे, मग त्याला काय हरकत आहे?" असे म्हणत भरतम्मा परत आपल्या घरात आली, ती त्याला म्हणाली-"बाळा, घरच्या परसात पुष्कळ भाजी-पाला नि फळे आहेत. तुला वाटेल तितक्या दिवस इथे रहा." मग भरतम्माने पुन्हा दार बंद करून कुलूप लावले आणि ती जायला निघाली.

भरतम्मा दोन पावले चालली असेल नसेल इतक्यात मागून पुन्हा एक आर्त स्वर ऐकू आला—"भरतम्मा! भरतम्मा!" भरतम्माला वाटलं आणखी कोणी तरी संकटात सापडलेलं दिसतंय. तिने मागे वळून पाहिलं तर एक बदक घाबरून तिच्याकडे धावत येत होतं.

"का रे बाबा, काय झालं इतकं घाबरायला?" भरतम्माने विचारले.

"भरतम्मा, मी आपल्या लोकांबरोबर जवळच्या एका तलावात पोहण्यासाठी आलो होतो. मी तिथे जरा जास्त वेळ रमलो व लवकर बाहेर आलो नाही. माझे सर्व साथी मला सोडून गेले. डोळ्यात अश्रू आणून बदक म्हणाले.

त्याला धीर देत भरतम्मा म्हणाली—"अरे, मग काळजी कसली करतोस? आपल्या घराच्या मागे एक डबकं आहे, त्यात मनसोक्त डुंबत जा. इथं हे हरिण तुझ्या बरोबर असेल. मी शहरातून परत आले की तुला तुझ्या लोकांकडे पोचवीन!"

भरतम्माने पुन्हा दार उघडलं, बदकाला घरात ठेवलं. आणि मग दार लावून कुलूप घातलं. आता ती आपल्या शहरातल्या आजोबांकडे निघाली.

बराच उशीर झाला होता. म्हणून ती आता झपाझप पावलं टाकायला लागली. पुन्हा मागून आणखी एक करुण आवाज तिच्या कानी पडला. भरतम्माने लगेच मागे वळून पाहिलं. तिला एक खार दिसली. खारीचा उदासवाणा चेहरा पाहून भरतम्माने विचारले—"खारी बाई, खारी बाई, झालं काय?"

खार म्हणाली-"मोठ्या कष्टाने पावसाळ्याची बेगमी करून ठेवली होती. झाडाच्या ढोलीत सगळं साठवून ठेवलं होतं. काही उचले चोर आले नि सगळं



धान्य चोरून घेऊन गेले. आता घरात एक कण शिल्लक राहिला नाही. माझी सगळी मेहनत फुकट गेली. मी आता काय करू?" असं विचारीत खार जोरजोरात रडू लागली.

भरतम्मा खारीचे सान्त्वन करीत म्हणाली–"अग, मग एवढ्याशा गोष्टीचं इतकं दुःख काय करीत बसलीस? माझ्या या घरात पुष्कळ धान्य आहे. किती ही खाल्लंस तरी कमी नाही पडायचं. तुला वाटेल तितक्या दिवस माझ्याकडे रहा. मी काही दिवस शहरात चालले आहे. मी नसले तरी हे हरिण व बदक आहे तुझ्या सोबतीला!" असं म्हणून भरतम्माने पुन्हा किल्ली काढली, घराचं दार उघडलं आणि खारीला आपल्या धान्याच्या खोलीत सोडून दिलं.

भरतम्माने पुन्हा दरवाजा बंद केला, कुलूप लावलं, किल्ली जागेवर ठेवली आणि शहराकडे जाण्याचा तिने विचार केला. आता तिच्या मनात एक दुसराच विचार आला. तिने कुलूप काढून दार उघडलं नि आपल्या घरात जाऊन बसली. आपल्या अंगावरचे दागिने काढून ठेवले. रेशमी साडी सोडून साधी साडी नेसली आणि आपल्या आराम-खुर्चीत आरामात बसली. आताचा तिच्या मनातील विचार असा–

"मला काही दुःख नसलं तरी हे माझे दोस्त निरनिराळ्या संकटांना तोंड देत आहेत. अशा स्थितीत जर मी शहरात गेले तर या सर्वांची खबर कोण घेणार? आणि हे इथे दुःखात असले तर शहरात मला कसे सुख लागेल? मी शहरात मुळिच जाणार नाही, याच नंदनवनात राहणार!"

बस, नंतर भरतम्मा कधी ही शहरात गेली नाही, तो विचारच कधी तिच्या मनाला शिवला नाही.




## बहुरत्ना वसुंधरा



### डोक्याकडून सुरुवात

साप सामान्यतः जिवंत जनावरांना पकडून खातात. ते प्रथम जनावरांना आपल्या मांस-पेशींनी दाबून अथवा त्यांना चावून मारून टाकतात आणि नंतर डोक्याच्या बाजूने त्यांना गिळतात. अशा रीतीने-जनावरांना गिळणारे अजगर जातीचे साप आपल्या पोटातील जनावर व त्यांची हाडे मोडण्यासाठी एकाद्या झाडाच्या बुंध्याला स्वतःला लपेटून घेतात व आपल्या शरीराने प्रचंड दाब देतात.

### एकाच आकार व प्रकारची पाने

ज्याप्रमाणे फुलपाखराच्या पंखांचे दोन भाग एक सारखे असतात, त्याचप्रमाणे पानाच्या उजव्या व डाव्या भागांची रचना एकाच प्रकारची असते. जर मधल्या रेषेवर चिरून त्याचे दोन भाग केले तर ते अगदी एकरूप दिसतात. पण सगळीच पाने मात्र अशी नसतात. उत्तर अमेरिकेत आढळणाऱ्या 'सस्साफ्रास' नावाच्या वृक्षाचे पान देठापासून वर पाहिले तर त्यात पानाचे तीन भाग झालेले दिसतात.






### जहाजाहून अधिक वेग

अंटार्क्टिका मध्ये आढळणारे पेंग्विन नावाचे पक्षी उडू शकत नाहीत. परंतु ते पाण्यात जहाजाहून अधिक वेगाने जातात. 'एम्परर पेंग्विन' पक्षी ८७० फूट खोल पाण्यात जाऊ शकतो. एवढेच नाही तर पेंग्विन पाण्यात २० मिनिटांपर्यंत बुडून राहू शकतो.











# अमेरिकेचे नवे अध्यक्ष




अर्कान्सस राज्याचे माजी राज्यपाल बिल क्लिंटन हे अमेरिकेचे ४२ वे अध्यक्ष म्हणून निवडून आले. ते ४६ वर्षांचे आहेत. गेल्या नोव्हेंबरच्या ३ तारखेला अध्यक्ष-पदासाठी जी निवडणूक झाली तीत जॉर्ज बुश यांना पराभूत करून क्लिंटन विजयी झाले. या निवडणुकीत १० कोटी मतदारांनी, म्हणजे शेकडा ८८ टक्के लोकांनी आपला मताधिकार बजावला. बिल क्लिंटन यांना ४४ टक्के, जॉर्ज बुश यांना ३१ टक्के व स्वतंत्र उमेदवार रॉस पेरोट यांना १७ टक्के मते मिळाली. अलिकडील काळात प्रथमच श्री. क्लिंटन यांच्या नेतृत्वाखाली डेमोक्रॅटिक पार्टीने व्हाइट हाऊस व यु. एस्. कांग्रेस मध्ये जय मिळवला.

अमेरिकेच्या इतिहासातील एक खास गोष्ट आहे की डेमोक्रॅटिक पार्टी १६ वर्षांनी एकदा अधिकारवर येते. सन १९६०मध्ये जॉन एफ्. केनेडी, सन १९७६ मध्ये जिम्मी कार्टर आणि नंतर आता १६ वर्षांनी सन १९९२ मध्ये डेमोक्रॅटिक पार्टीने रिपब्लिकन पार्टीकडून अधिकार-सूत्रे आपल्या हाती घेतली.

निवडणुकीच्या काळात लोकांना दिलेल्या वचनांचे आपण कसोशीने पालन करू असे २० जानेवारीच्या आपल्या सार्वजनिक भाषणात अध्यक्ष क्लिंटन यांनी जाहिर केले. देशाच्या डळमळीत आर्थिक स्थितीत सुधारणा केली जाईल व ती अधिक सुदृढ करण्यासाठी अर्थविषयक कायद्यात आवश्यक ते बदल घडवून आणण्यात येतील असे त्यांनी प्रतिपादन केले. ते म्हणाले की या सुधारणा रातोरात होणार नाहीत. पण हळू हळू पंचवीस कोटी जनतेच्या हितासाठी आरोग्य व शिक्षण या बाबतच्या सोयी वाढविण्यात येतील. विद्यार्थ्यांना सहज परत करता येतील अशी कर्जे मोठ्या प्रमाणात देण्यात येतील. वातावरणातील प्रदूषण थांबविण्यासाठी ही योग्य ती कारवाई करण्याचे वचन त्यांनी दिले.

अमेरिकेच्या जीवन-पध्दतीत बदल करण्याची आवश्यकता श्री. क्लिंटन यांनी प्रतिपादिली होती, त्यामुळेच त्यांना विजय मिळाला. ते म्हणत—"आमच्या देशात विविध जाति नि विविध भाषा आहेत. ही विविधता हा आपला दुबळेपणा नाही, आपल्या देशाबरोबर सर्व जगाला उपकारक ठरणारी ती एक अद्भुत शक्ति आहे." आणखी एका भाषणात ते म्हणाले होते—"आपल्या देशातील स्त्री-पुरुष, वयोवृद्ध लोक व मुलांनी आपल्या शक्तीचा संपूर्ण उपयोग करून सुख-संतोषाने जीवन जगावे अशी माझी इच्छा आहे. मला असे वाटते की आपल्या देशातील विविधता ही आपल्या ऐक्याला बाधक

ठरू नये, आपल्याला दु:खाच्या अंधारात तिने नेऊ नये. आपल्या विविधतेतून आपलं ऐक्य फुलावं असं मला वाटतं.''

श्री. क्लिंटन यांचे वडील विलियम जफरसन ब्लैथ हे त्यांच्या जन्मानंतर दोनच महिन्यात एका मोटार-अपघातात अकाली मृत्युमुखी पडले. यानंतर बिल क्लिंटन यांच्या आईने रोजर क्लिंटन यांच्याशी विवाह केला. क्लिंटन यांचे शिक्षण छात्रवृत्तींच्या आधारे झाले. वाशिंग्टन येथील जॉर्जटाउन विश्व विद्यालयातून पदवी संपादन केल्यावर त्यांना महत्त्वपूर्ण रोड्स छात्रवृति मिळाली व ते ऑक्सफर्ड विश्वविद्यालयात दाखल झाले व त्यांनी तेथे तत्त्वज्ञान व राजनीति-शास्त्राचे अध्ययन केले. यानंतर अमेरिकेतील येल्स विश्वविद्यालयात त्यांनी न्यायशास्त्राचे ही अध्ययन केले.

AL GORE



यु. एस्. काँग्रेसची निवडणूक लढवण्याचा त्यांचा पहिला प्रयत्न फसला. दुसऱ्या प्रयत्नात ते अर्कान्ससचे अटार्नी जनरल म्हणून निवडून आले. नंतर ते तेथील गव्हर्नर ही बनले. पण त्यांचा निवडणुकीत पुन्हा एकदा पराभव झाला. यानंतर दोन वर्षांनी पुन्हा एकदा निवडणूक लढवून ते विजयी झाले.

बिल क्लिंटन यांची ही एक विशेषता आहे की दुसऱ्या महायुद्धानंतर जन्म घेतलेले ते अमेरिकी अध्यक्ष आहेत. पन्नास वर्षांहून कमी वयाच्या अमेरिकन अध्यक्षात ते सहावे होत. सन १९०१ मध्ये थियोडोर रूजवेल्ट आपल्या वयाच्या बेचाळिसाव्या वर्षी अध्यक्ष बनले होते.

क्लिंटन यांच्या पत्नी, श्रीमती हिलरी क्लिंटन या अमेरिकेतील एक नामांकित वकील आहेत. त्या मुलांच्या अधिकारांचे जोरदार समर्थन करतात. क्लिंटन दंपतीला एकच मुलगी आहे चेल्सी. ती एका पब्लिक स्कूल मध्ये शिकत आहे.

अमेरिकेचे उपाध्यक्ष म्हणून निवडून आलेले एल्गोर हे क्लिंटन पेक्षा दोन वर्षांनी लहान आहेत. ते पर्यावरण-संरक्षणाचे काम करीत आलेले आहेत. आणि रिओ-डी-जनीरो मध्ये भरलेल्या भू. परिरक्षण शिखरसंमेलनात अमेरिकी दलाचे प्रमुख म्हणून त्यानी काम केलेले आहे.

**बिल क्लिंटन यांचे काही विशेष**

* ते मोठे क्रीडाप्रेमी आहेत. गोल्फ हा त्यांचा सर्वात आवडता खेळ.
* चित्रपट, विशेषत: 'स्पाय-थ्रिलर' त्यांना फार आवडतात.
* आइस्क्रीम आणि आंब्याचे लोणचे त्यांना फार प्रिय.
* शीत-युद्धानंतर पुढे ठाकलेल्या समस्यांना तोंड देण्यासाठी देशातील जनतेला तयार करण्याचे कार्य ते करण्याचा प्रयत्न करीत आहेत.



# दोन वैद्य

प्राचीन काळी अवंती नगरीवर राजा अनंगपाल राज्य करीत असे. त्याच्या जवळ असलेल्या हत्तीत शर्वाणी नावाच्या एका हत्तीवर बसून राजाने अनेक युद्धे जिंकली होती.

एकदा राजा अनंगपाल शर्वाणीवर बसून नगरीबाहेरील उद्यानात फिरायला निघाला. उद्यानात पोचण्यापूर्वीच एका जागी कळवळून शर्वाणी खाली बसला.

ताबडतोब हौद्यातून उडी मारून अनंगपाल खाली आला आणि त्याने हत्तीला काय झालंय याची परीक्षा महावताला करायला सांगितली. महावताने सर्व बाजूंनी हत्तीला पारखलं, पण शर्वाणीला काय झालंय हे काही त्याच्या लक्षात येईना. राजवैद्य शिवशर्मा पक्षी व जनावरांची चिकित्सा करण्यात ही पटु होता, म्हणून त्याला ताबडतोब बोलविण्यात आले.

शिवशर्माने हत्तीच्या अवस्थेची नीट पारख केली आणि तो राजाला म्हणाला—''महाराज, क्वचितच जनावरांना होणारा हा वातरोग आहे. याला म्हणतात 'सर्वांग संकुचित'! मी नुकतेच एका प्राचीन वैद्यक-ग्रंथात या रोगाच्या चिकित्सेबाबत वाचलेले आहे. पण ही चिकित्सा फार खर्चाची आहे!''

राजा म्हणाला—''हा हत्ती या रोगातून मुक्त व्हावा अशी माझी इच्छा आहे. उपचार किती ही खर्चिक असला तरी चालेल.''

शिवशर्माने तेथेच राहून उपचाराला सुरुवात केली. त्याच्या निवासासाठी एक तंबू लावला गेला. अनेक गुणसंपन्न

घननील पुरोहित












जडी-बूटी, पाने-फुले वफळे मागवून त्यांचे लेह-अवलेह बनविण्यात आले.

एक महिना झाला, तरी पण शर्वाणीची स्थिति काही सुधारली नाही. तेव्हा शिवशर्मा म्हणाला "महाराज, वरवर दिसत नसली तरी एक वैद्य म्हणून मला दिसतंय की हत्तीच्या प्रकृतीत बरीच सुधारणा माझ्या उपचारांनी झालेली आहे. थोड्याच दिवसात हत्तीची प्रकृति पूर्ण सुधारेल व तो हिंडू-फिरू लागेल."

यावर चिडून राजा काही बोलणार, एवढ्यात तेथे उपस्थित असलेल्या लोकातून एक माणूस पुढे येऊन म्हणाला–"प्रभु, आजपर्यंत जे काही उपचार झाले, त्यांनी हत्तीची तब्येत सुधारली असं मला तरी वाटत नाही. आपण मला एक संधी दिली, तर मी हत्तीच्या प्रकृतीत सुधारणा करून दाखवतो."

राजाने शंकेखोर नजरेने त्या माणसाकडे पाहिले, तेव्हा राजाला नमस्कार करून तो म्हणाला-"महाराज, माझं नाव जीवकदत्त. मी वैद्यकीचा व्यवसाय करतो."

शिवशर्मा मधेच दखल देत म्हणाला-"राजन्, याने काही दिवस माझ्याकडे वैद्यक-शास्त्र शिकण्याचा प्रयत्न केला. पण याला वैद्यकी शिकविण्यात काही अर्थ नाही अशा विचाराने मी याला काढून टाकले!"

राजा अनंगपालने थोडा विचार केला नि म्हणाला–"शर्वाणी वर उपचार करायला मी याला परवानगी देतो, कुणाच्या हातात काय कला असेल सांगता येत नाही."

तेव्हा जीवकदत्त राजाला म्हणाला–"महाराज, या हत्तीला सहज दिसेल इतक्या अंतरावर एक तळं बनवा. त्या तळ्याच्या पाण्यात भरपूर कमळाची फुलं फुलू द्या. तळ्याच्या सभोवती सुंदर वेल लावा."

राजाने आश्चर्याने विचारले-"तू करणार ती चिकित्सा ही असलीच का?"

यावर जीवकदत्त म्हणाला- "महाराज, कृपा करून आपण ही सर्व व्यवस्था मला करून द्यावी. माझ्या चिकित्सेचा परिणाम लवकरच आपण पहाल."

राजाला आश्चर्य तर वाटलंच, तरी पण चार-पाच दिवसात राजाने सर्व व्यवस्था केली. थोड्याच दिवसात जीवकदत्ताच्या मागणीनुसार गज-शाळेतील काही हत्तींना तळ्यात डुंबण्यासाठी सोडण्यात आले.

दहा दिवस ही गेले नाहीत, एवढ्यात शर्वाणीत चांगलीच सुधारणा दिसू लागली. एक दिवशी जीवकदत्त राजाला तळ्यावर घेऊन गेला. शर्वाणी इतर हत्तींबरोबर पाण्यात डुंबत होता, चिंघाडत होता व आपल्या सोंडेने इतर







हत्तींवर पाण्याचा फवारा उडवीत होता.

राजाला आनंद झाला. तो जीवकदत्ताला म्हणाला—"तू आपल्या वचनाचं पालन केलंस. तुझी चिकित्सा-पद्धति प्रशंसनीय आहे. उद्या ये, मी भर दरबारात तुझा सन्मान करीन."

जवळच शिवशर्मा होता. तो राजाला म्हणाला—"महाराज, मी मेहनत करून हत्तीला रोगमुक्त केलं. माझ्या औषधांचा हत्तीच्या शरिरावर परिणाम होऊन तो आता इतर हत्तींबरोबर हिंडू-फिरू लागला आहे. जीवक-दत्ताने काय केले? सन्मान करणार असलात तर माझा करा, त्याचा नाही."

पण जीवकत्ताला हे मान्य नव्हतं. त्याने प्रतिपादन केले-"मी जी चिकित्सा पध्दति वापरली त्यामुळे हत्ती बरा झाला. शिवशर्माच्या चिकित्सेने नव्हे."

अनंगपालाला काही निर्णय घेता येईना. तो म्हणाला—"उद्या सकाळी तुम्ही दोघे ही दरबारात या. तुमच्यातील विवादाचा निकाल तेथेच लागेल."

दुसऱ्या दिवशी दरबार भरला. राजाने दोन वैद्यांमधील विवाद दरबारी जनांना सांगितला आणि विचारले—"दोघांपैकी कोणाच्या उपचाराने हत्तीला बरे वाटले असावे?"

मंत्री सुबुद्धि प्रथम उठून म्हणाला—"महाराज, शिवशर्माने दिलेल्या औषधांमुळेच आता शर्वाणी हिंडू-फिरू शकतो आहे याबद्दल मला मुळिच शंका नाही."

सुकीर्ति नावाचा दुसरा एक मंत्री म्हणाला—"राजन्, जीवकदत्तने जे काही केले त्यामुळेच मेल्यासारख्या हत्तीत उत्तेजना आली, नि त्याचा रोग नाहीसा झाला असे मला विश्वासपूर्वक वाटते."

सर्व मंत्र्यात वयाने लहान मंत्री होता शशिधर. तो म्हणाला—"महाराज, वैद्य जरी दोन असले तरी त्यांनी केलेल्या उपचारांना वेगवेगळं पहाणं बरोबर नाही. ही सर्व एकच चिकित्सा-पद्धति आहे असं मानलं पाहिजे. मला वाटतं आपण दोन्ही वैद्यांचा सन्मान करणं इष्ट आहे. आपण जरा विचार केलात तर आपणास माझे म्हणणे पटेल."

थोडा वेळ विचार करून अनंगपाल म्हणाला—"मंत्री शशिधरचं म्हणणं योग्यच दिसतंय. मी दोन्ही वैद्यांचा सन्मान समान रूपाने करीन. कारण या जगात कोणता ही प्राणी आजारी पडला तर उपचार केवळ त्याच्या शरीरावर नव्हे, तर मनावर ही झाला पाहिजे. जर दोन्ही वर उपचार झाले नाहीत, तर त्या प्राण्यात जगण्याची इच्छाच उरत नाही. शिवशर्माने शर्वाणीवर चांगले उपचार केले, त्याच्या औषधांचा हत्तीवर काहीच परिणाम झाला नाही असे म्हणणे बरोबर नाही. आजारामुळे गमवलेली मानसिक शक्ति जीवकदत्ताने आपल्या उपचारां द्वारे दिली हे मात्र निःसंशय!"

याला सर्व दरबाऱ्यांनी दुजोरा दिला.

तेव्हा राजा अनंगपाल म्हणाला—"जीवकदत्ताच्या चिकित्सेमुळे शर्वाणीचे मनोबल वाढले, त्याच्यात जगण्याची इच्छा निर्माण झाली हे आता आपणास मानले पाहिजे. तलावात इतर हत्ती डुंबताना पाहून त्या कळपात आपण ही सामिल व्हावे असे शर्वाणीला वाटले व त्याने आपल्या जागेवरून उठण्याचा प्रयत्न केला, नि यात त्याला यश मिळाले. शरीरावर उपचार केला शिवशर्माने, पण मानसिक चिकित्सा केली जीवकदत्ताने. शशिधर जेव्हा म्हणाला की दोन वैद्यांच्या उपचारांना अलग अलग पाहणे बरोबर नाही, तेव्हा हे माझ्या लक्षात आले."

यावर सर्व दरबाऱ्यांनी आनंदाने टाळ्या वाजविल्या आणि राजाने दोन्ही वैद्यांची प्रशंसा करून त्यांचा यथायोग्य सन्मान केला.



# प्रौढी मिरवणारा

काही कामासाठी रामू शहरात गेला होता. तिथले काम अुरकून तो पायीच गावाकडे परत निघाला. रस्त्यात त्याला दुसऱ्या एका गावचा भोला नावाचा तरूण भेटला. दोघेही गप्पा मारत मारत चालत राहिले.

रामू मोठा गप्पिष्ट होता अन् रिकामी प्रौढी मिरवण्यात तर फारच प्रवीण होता तो. बोलता बोलता रोगराईबद्दल बोलणं निघालं, तेंव्हा रामू म्हणाला, "तुला माहीत आहे? अरे, आमच्या गावात कधीच कोणी कसल्या रोगाने आजारी पडत नाही."

हे बोलणे ऐकून भोला तर चक्रावलाच! पण तो बोलला मात्र नाही काही. ते जेंव्हा रामूच्या गावात पोचले, तेंव्हा पुढे आपल्या वाटेनं जायला निघताना भोलाने पाहिले की—गावच्या सरहद्दीवरल्या एका घराच्या जोत्यावर बसलेला एक लुकडासा माणूस जोराने खोकत आहे! भोलाला आयतीच संधी मिळाली. त्याने विचारले, "काय रामू! तू तर म्हणलास नं की तुझ्या गावात कोणी आजारीच पडत नाही? मग हे काय आहे समोर? तो माणूस तर इतका आजारी दिसतोय की आज अुद्याच तो नक्की मरून जाईल!"

भोलाचं आव्हान ऐकून रामू क्षणभर गांगरला खराच. पण लगेच स्वतःला सावरून तो म्हणाला "तो माणूस होय? तो तर आमच्या गावचा वैद्य आहे. विचारा आजारी पडेल, नाही तर काय होईल? गावात कोणी आजारीच पडत नसल्यामुळे याच्यावर पोटभर अन्नालाही महाग होण्याची पाळी आली, अन् असा दुर्बल अन् लुकडा बनला नं? काय, बसला नं विश्वास?" हे ऐकून भोला पुन्हा एकदा बेशुद्ध झाला.





# माया महाल

## ११

(द्वारपालाकडून महेन्द्रनाथला कळले की युवराणीसाठी पालखीची व्यवस्था झालेली आहे. त्याच रात्री महालात प्रवेश करून त्याने ही बातमी राजकुमारीला दिली. त्याच वेळी, आपण हा महाल सोडून महेन्द्र बरोबर जायला तयार असल्याचे तिने त्याला सांगितले. त्याच रात्री जादूमहाल सोडून दोघे मोठ्या सावधगिरीने बाहेर पडले.—त्यापुढे)

म्हातारी दाई भल्या पहाटेच अुठली अन् मालकाच्या आज्ञेने युवराणीला तेथून घेअून जायला तयार करण्यासाठी तिच्या खोलीत गेली. परंतु राजकुमारी तेथे न दिसल्याने तिने शेजारच्या खोलीत पाहिले. पण तेथेही ती नव्हतीच! आश्चर्याने चक्रावून जाअून म्हातारीने साऱ्या खोल्या शोधल्या, खिडक्यातून डोकावून पाहिले, पण विद्यावतीचा कुठेच पत्ता लागेना. मालिनी दासीच्या खोलीत ती डोकावली. तिथले दरवाजे अुघडेच होते. म्हातारी खाली येअून अुद्यानाच्या दरवाज्याकडे गेली. तो दरवाजाही अुघडाच! मग ताबडतोब ती बाहेरील दाराकडे गेली. त्याची कवाडे मात्र बन्द असून किल्ली भोकातच आढळली. परंतु तिथल्या द्वारपालाचा कुठे पत्ताच नव्हता! परत फिरून लांब लांब



पावले टाकत ती पुन्हा महालात गेली. पालखी निघायची वेळ जवळ आलेली होती. कालच मालकाने आदेश दिला होता की, युवराणीला पालखीत बसवून म्हातारीनेही पालखीबरोबरच जायचे आहे. युवराणीचा तर कुठे पत्ताच नव्हता. तिने झटपट काही विचार केला व ती मालिनीच्या खोलीत गेली. मालिनी तेथे डाराडूर झोपलेली होती. तिला उठवून म्हातारीने आज्ञा दिली की, "झटपट दागिने वगैरे घालून इथून निघायला तयार हो. कुठे जायचं, कशासाठी जायचं हे तू मता काही विचारू नकोस"

मालिनीने मुकाट्याने आज्ञापालन केले. तिला बरोबर घेऊन म्हातारी जिन्यावरून खाली आली. तेथे एक पालखी तयार होती. ती पाहून, पालखी आपल्यासाठीच आहे यावर मालिनीचा विश्वासच बसेना! तिने आश्चर्याने विचारले. "यातनं जायचं मी? कुठे जायचंय मला? काही तरी मला समजूं दे न ।"

"हो, तुझ्यासाठीच आहे ती. कुठे जायचंय हे जाणायची गरज नाही तुला. पालखीमागोमाग मी चालत येणार आहे; तेव्हा तुला घाबरायचं काही कारण नाही. मी सांगतेय तसं करत रहा फक्त तू! ही आपल्या मालकांचीच आज्ञा आहे." म्हातारीने तिला कडक शब्दात खडसावून सुनवले.

मालिनी मुकाट्याने निघाली, पालखीत बसून तिने पडदे खाली केले. भोयांनी पालखी खांद्यांवर उचलली अन् महालाचे दार बन्द करून म्हातारीही पालखीमागे चालू लागली.

जादूमहालातून बाहेर पडून महेन्द्रनाथ व विद्यावती जंगलात घुसल्याबरोबर त्यांना एक रस्ता दिसला. ते खूप सावधपणे चालत राहिले. जराही कुठे आवाज झाला की दोघेही बाजूला हटून झुडुपामागे लपून नीट न्याहाळत अन् धोका नाही असे पाहून पुढे चालू लागत. थोड्या वेळाने त्यांना भोयांचा आवाज



ऐकू आला. ते कसलेसे गीत गात चालत होते. दोघेही लगेच झाडीमागे लपले. थोड्याच वेळात या दोघांना ओलांडून पालखी पुढे निघून गेली. ती म्हातारी पालखीमागे चालत होती, पण पालखीत कोण होते, कोणास ठाऊक! राजकुमारीला आश्चर्य वाटले की, पालखी तर आपल्याच साठी आलेली होती, मग आता पालखीतून कोण चाललेय! आणि पालखी आता चालली आहे कुठे?

"युवराणी आपल्याला खूपच सतर्क रहायला हवं, आपण आपले वेषही बदलले तर छान होईल." आपल्याला चुकून कोणी ओळखू नये-" महेन्द्र म्हणाला.

"हं, कल्पना तर चांगलीच आहे. सकाळ झाल्याबरोबर आपण वेष बदलू या." डोके हलवत राजकुमारी म्हणाली.

सकाळी पालखी एका मैदानात पोचली. तिथे आणखी एक पालखी तयार असलेली दिसली. त्या पालखीजवळ तीन घोडेस्वार तयार. "युवराणीला म्हणावं, त्या पालखीतून उतरून तिने या पालखीत यावे."

त्यांच्या बोलण्याने चमकून म्हातारीने विचारले, "मालक कुठे आहेत? मला त्यांच्याशी बोलणं आवश्यक आहे."



"मालक तुमच्यासाठी आणखी एका निराळ्या जागी वाट पहात आहेत. युवराणीला सुरक्षित त्यांच्यापर्यन्त पोचवायची जबाबदारी आमच्यावर टाकण्यात आली आहे. तुला संशय घ्यायचं काही कारण नाही. तू याच पालखीतून जादूमहालात परत जा." त्या घोडेस्वाराने आज्ञेच्या सुरात म्हातारीला सांगितले.

त्याचा आवाज आपल्या मालकासारखाच असल्याचे पाहून म्हातारी क्षणभर चमकून त्याच्याचकडे पहात राहिली. पण तिच्या लक्षात आले, की याला दाढी नाहीय, पण तरीही त्याच्या



चेहऱ्यावर ऐट आणि क्षात्रतेज दिसत होते. दिसायला तर तो कोणी राजकुमारच वाटत होता.

म्हातारीचा आता नाइलाज होता. तिने मालिनीला पालखीतून अुतरवून दुसऱ्या पालखीत बसवत म्हटले, "हे तुला मालकांकडे सुरक्षित पोचवतील. तुला घाबरायचं काहीच कारण नाही." अन् तिने पडदे खाली सोडले.

दुसऱ्याच क्षणी घोडेस्वारांमागे ती दुसरी पालखी निघाली आणि पहिल्या पालखीतून म्हातारी महालाकडे परतली.

आता सूर्य वर आलेला होता. रस्ता नीट दिसत होता. महेन्द्र व राजकुमारी अुत्साहाने डोंगरावरून अुतरू लागले. दुपारपर्यंत चालत राहून दोघे डोंगर अुतरून खाली आले. थोडा वेळ आराम करून ते पुन्हा चालू लागले. सूर्य पश्चिमेला अुतरेपर्यन्त ते मैदानात पोचले. महेन्द्रला आशिर्वाद देअून प्रथम रवाना करणाऱ्या मुनीची झोपडी त्यांना दूरवर दिसली. महेन्द्रने एकवार आपल्या बोटावरच्या अंगठीकडे कृतज्ञतेने पाहिले. त्याने मुनि आणि त्याने दिलेल्या अद्‌भुत अंगठीबद्दल राजकुमारीला सांगितले. त्याला दिलेल्या वचनाप्रमाणे प्रथम त्याचे दर्शन घेण्याच्या विचाराने महेन्द्र त्याच्या झोपडीकडे निघाला. बरोबर युवराणीही चालू लागली.

त्याच वेळी मुनि कुटीबाहेर येत होता. महेन्द्रकडे मोठ्या प्रेमाने पहात तो म्हणाला. "ये बाळ, ये! तू हे काम फत्ते करशील अशी खात्रीच होती माझी! मी वाटच पहात होतो. वीरगिरीच्या युवराणीच स्वागत असो."

"आपण आमची वाट पहात होता, यांच आश्चर्य वाटलं. आम्ही येणार हे कसं ओळखलंत बाबा?" महेन्द्रनाथने विचारले.

महेन्द्रच्या बोटावरल्या अंगठीकडे निर्देश करत मुनि म्हणाला, "असं पहा मुला, तुझी अंगठी अन् माझ्या बोटावरची



ही अंगठी यांच्यात काही खास शक्ति आहे. मी माझी अंगठी बोटावर घातली, अन् तुझ्या बोटातली अंगठी तुला इथे घेऊन आली. तुला तर ते कळलंही नाही."

"ओहो! असं आहे होय?" आश्चर्य प्रकट करत महेन्द्रने मुनीला भक्तिपूर्वक वन्दन केले.

"तुम्ही दोघं इथे आलात त्यामुळे मला फार आनन्द झालाय. आज रात्री इथे मुक्काम करून उद्या सकाळी तुम्ही पुढे चालू लागा," मुनि म्हणाला.

त्या रात्री झोपण्यापूर्वी महेन्द्रनाथ व राजकुमारी विद्यावतीने आपापले अनुभव कथन केले. मुनीने प्रेमपूर्वक ते सारे ऐकले.

दुसऱ्या दिवशी सकाळी दोघांना आपल्याजवळ बोलावून मुनि म्हणाला, "तुम्हा दोघांबरोबर मीही राजधानीला येणार आहे. त्यामुळे तुमचे रक्षणही होईल. बऱ्याच वर्षांनी आपलं कर्तव्य पुरं करायची संधी मला मिळत आहे, त्याचा मी पुरेपूर सदुपयोग करीन."

"तुम्ही काय म्हणताय, ते लक्षात नाही येत माझ्या!" महेन्द्र आश्चर्याने मुनीकडे पहात म्हणाला.

"मला प्रथम आपली सारी हकीकत सांगायला हवी. मग कळेल तुला सर्व काही." मुनि उत्तरला.

"सांगा नं मग!" महेन्द्रने उत्साह दाखवला.

"ती एक मोठी दुर्दैवी कथा आहे. तरी मी थोडक्यात ती तुम्हाला सांगतो." असे म्हणून मुनि सांगू लागला.

"महिमापुरी राज्याबद्दल तुम्ही दोघांनी ऐकलंच असेल. तिथला युवराज वीरेन्द्रनाथ तरुण होता. त्या वेळी त्याचा पिता शिकारीला गेला असताना अपघाताने त्याचे प्राणोत्क्रमण झाले. वयाच्या एकविसाव्या वर्षीच वीरेन्द्रनाथ सिंहासनावर बसला. त्याच्या आईनेही दुःखाने प्राण सोडले. अखेरच्या क्षणी तिने आपली कन्या ऐश्वर्या हिची जबाबदारी



वीरेन्द्रनाथवर सोपवली. राजा वीरेन्द्रनाथ धर्मपालक होता. एक चांगला शासक म्हणून त्याने नाव कमावले. आपली बहीण ऐश्वर्या हिचा विवाह त्याने शेजारच्या राज्याचा युवराज सुरेन्द्रनाथ याच्याशी करून दिला. लवकरच सुरेन्द्र-ऐश्वर्या या दम्पतीला पुत्रलाभही झाला. त्या काळी राजा वीरेन्द्रनाथ अनेकदा तीर्थयात्रेला जात असे. अशा दिवसात सुरेन्द्रनाथ व त्याचा धाकटा भाऊ जितेन्द्रनाथ महिमापुरीत रहात.

असाच एकदा वीरेन्द्रनाथ तीर्थयात्रेला गेला असताना पाटलीपुत्रच्या राजाने अचानक महिमापुरीवर हल्ला केला. त्या युद्धात सुरेन्द्रनाथ मारला गेला. त्याची पत्नी ऐश्वर्या व तिचे छोटे बाळ यांना घेऊन जितेन्द्रनाथ मात्र कसा तरी तेथून दूर पळून गेला. तीर्थयात्रेहून परत आल्यावर वीरेन्द्रनाथही पकडला जाऊन त्याला कैदेत टाकण्यात आले. आपली बहीण ऐश्वर्या हिच्यावर काय संग गुदरला, ती कुठे असेल वगैरे चिन्तेमुळे वीरेन्द्र तुरुंगात फार दुःखी असे. अखेर त्याचेही तुरुंगातच निधन झाले.

जितेन्द्र आपली वहिनी व तिचे बाळ यांना घेऊन ठिकठिकाणी फिरत राहिला. शेवटी ते तिघे वीरगिरी राज्यात पोचले. तेथे त्यांचे काही दिवस गरिबीतच गेले. वीरगिरीत पोचल्यावर जितेन्द्रने एका तरुणीशी विवाह केला. परन्तु अचानक











थोड्या आजाराने तिचाही मृत्यु ओढवला. त्यामुळे निराश झालेल्या जितेन्द्रने घरदार सोडले व तो देशाटन करू लागला. शेवटी तो एका जंगलात पोचला व तेथेच एक झोपडी बनवून राहू लागला. मन थोडे स्वस्थ झाल्यावर आपण वहिनी व तिच्या बाळाची काहीच वास्तपुस्त न घेतल्याबद्दल त्याला वाईट वाटू लागले."

इतके सांगून मुनीने डोळे मिटले. त्याच्या डोळ्यातून अश्रू झरू लागले.

"आपण ऐश्वर्याच्या मुलाचं नाव नाही सांगितलंत?" राजकुमारीने विचारले.

"महेन्द्रनाथ!" मुनि अुत्तरला, "तो हाच!"

महेन्द्रनाथला जेंव्हा कळले की मुनि दुसरातिसरा कोणी नसून आपला काका जितेन्द्रनाथच आहे, तेंव्हा त्याने प्रेमाने मुनीला मिठीच मारली.

"आता मला राजधानीत येअून आपली दोन कर्तव्यं पुरी करायची आहेत. एक म्हणजे महेन्द्र कोण हे राजाला सांगायचे व दुसरे म्हणजे महेन्द्रच्या आईला भेटून तिची क्षमा मागायची. नंतर परत या कुटीत येअून आपले अखेरचे दिवस मी शान्तीने घालवीन."

महेन्द्र व विद्यावती काही बोलणार, इतक्यात त्यांना थांबवत मुनि म्हणाला, "आता तुम्ही दोघं आश्रमवासियांसारखा वेष करा. मीही तुमच्याबरोबर असल्याने कोणी, कसली शंका घेणार नाही. आत्ता आपण निघालो, की सूर्यास्तापर्यन्त राजधानीत पोचू. मग आपण सरळ राजवाड्यातच जाअू."

राजकुमारी विद्यावती आनन्दाने म्हणाली. "महात्मा, मला आता इतका आनन्द होतो आहे, की जणू काही मी राजवाड्यात पोचलेच आहे." नन्तर तिने आपला वेष बदलला. ती थेट मुनिपुत्री दिसू लागली. महेन्द्रनाथही मुनिकुमार दिसत होता.

आता तिघेही वीरगिरीकडे चालू लागले. (क्रमशः)



# सत्यवानचा वारस

राजा विक्रम पक्का निश्च्यी होता. नेहमीप्रमाणे मध्यरात्री तो त्या झाडाकडे गेला, प्रत खाली अुतरवून त्याने आपल्या खांद्यावर आडवे टाकले. नंतर मौन स्वीकारून तो स्मशानाकडे निघाला. तेंव्हा वेताळ बोलू लागला. "हे राजा, तुला इतकं कष्टदायक काम सांगणारा माणूस तुझा पिता किंवा तुझा पूज्य गुरु तर नव्हे? मी हे अशाकरता विचारत आहे की, अशी माणसंही, आपल्या मुलाचं किंवा शिष्याचं बुद्धिसामर्थ्य पाहूनही, त्याचा निरादर करतात. या विधानाच्या पुष्ट्यर्थ मी तुला आता सत्यवानची गोष्ट सांगतो." आणि वेताळ गोष्ट सांगू लागला.

चित्रदुर्ग नावाच्या गावातील लोकांच्यात नेहमीच भांडणतंटे व दंगे वगैरे चालत असत. एकदा त्या गावात सत्यवान नावाचा एक मध्यमवयस्क

वेताळाच्या गोष्टी



माणूस आला. तो आजारी असल्याने पुढे प्रवास करणे त्याला अशक्य झाले. एकाद्या घरी आश्रय घ्यावा म्हणून रस्त्याने जागाऱ्या एका माणसाला थांबवून त्याने त्याला आपली इच्छा सांगितली.

तो त्याला म्हणाला, "माफ करा. मी एक गरीब माणूस आहे. मलाच स्वतःला रहायला इथे घर नाहीये. दिवसा जिथे कुठे मिळेल तिथे काम करतो अन् रात्र एकाद्या झाडाखाली झोपून आपले दिवस घालवतो मी! तुम्ही त्या गल्लीतल्या चन्द्रसेनकडे किंवा त्याच्या पुढल्या गल्लीतल्या सूर्यदिवच्या घरी जा, तिथे तुम्हाला रहायला जागा मिळेल."

मोठ्या कष्टाने चालत सत्यवान एका घराशी पोचला. एका माणसाने दरवाजा अुघडला, तेव्हां सत्यवानने विचारले, "हे सूर्यदिवचं घर काय?"

यावर त्या माणसाला एकदम राग आला अन् तो म्हणाला, "माझं नाव चन्द्रसेन आहे, अन् माझ्या घरी येअून सूर्यदिवचं नाव घेण्याचं धाडस या गावातलं कुणीही करत नाहीं.!"

सत्यवानने आपली परिस्थिति सांगून राहण्यासाठी जागा मागितली. पण चन्द्रसेन अजूनही त्या रागातच म्हणाला, "कोणीतरी तुला दोन नावं सांगितली, तर तू फक्त सूर्यदिवचं नावच लक्षात ठेवलंस. मला अुगाच त्रास नको देअूस. जा आपल्या वाटेनं!"

नंतर सत्यवान सूर्यदेवच्या घरी पोचला. त्याचे बोलणे ऐकून सूर्यदिव म्हणाला, "या गावात ज्याने अगोदर चन्द्रसेनच्या घराचा दरवाजा खटखटवला असेल त्याला माझ्याकडे मुळीच आश्रय मिळणार नाही."

या घटनेनन्तर सत्यवानने त्या गावातल्या अनेक घरी आश्रय



मिळवायचा प्रयत्न केला, चन्द्रसेन किंवा सूर्यदिवकडे आश्रय न मिळालेल्या कोणाही व्यक्तीला आपल्याकडे आश्रय न देण्याचा त्या गावच्या लोकांचा अलिखित नियम होता.

आपल्या दुर्भाग्याला दोष देत सत्यवानने चित्रदुर्ग सोडून पुढे जाण्याचा प्रयत्न केला. पण दुसऱ्या एकाद्या वस्तीवर जाण्याइतकी शक्ती त्याच्या शरीरात नव्हती. गावच्या सरहद्दीवरच्या एका झाडाखाली तो मटकन बसला. सत्यवानला सूर्यदेव व चन्द्रसेनबद्दल सांगणारा तो माणूस थोड्याच वेळात तेथे आला. तो म्हणाला, "तुमच्यावर इथे कायकाय बेतलं, ते सारं कळलंय मला! त्या दोघांशी तुमचं एक प्रकारे भांडणच झालं, म्हणूनच आता अजूनही तुम्ही जर इथे, या झाडाखाली रहाल तर पुन्हां तुम्हाला भांडणाला तोंड द्यावं लागेल. ती तिकडे झाडी दिसतेय ना, तिथे जाअून आराम करा."

सत्यवानने त्या झाडीमागे जाअून पाहिले, तर तिथे बसण्यासारखी जागाच नव्हती! सर्वच लहानमोठी झुडुपे पसरलेली होती. पण त्याने त्यातच



झोपण्यासाठी थोडीशी जागा साफ केली. इतक्यात तेथे दोन नाग अचानक कुठूनसे आले. पण सत्यवानला पाहूनही न पाहिल्यासारखे करून ते जेंव्हा तिथून निघून गेले, तेव्हा त्याला फार बरे वाटले. थोड्याच वेळात तो अगदी डाराडूर झोपला.

दुसऱ्या दिवशी जागा झाला, तेंव्हा तो एका अजगराच्या विळख्यात होता! पण त्याच्या शरीरात हालचाल जाणवताच अजगर आपला विळखा सोडून निघून गेला. रात्रभर आपण एका अजगराच्या विळख्यात झोपलो होतो या विचारानेच

सत्यवानाचा थरकाप झाला!

परन्तु एक गोष्ट त्याच्या तावडतोब लक्षात आली. आपला सारा अस्वस्थपणा, आजार नाहीसा झालेला आहे! त्याने ओळखले की या आसपासच्या झाडीतच काही विशेष गुण असला पाहिजे. नीट परीक्षण केल्यावर त्याच्या या संशयाला पुष्टीच मिळाली!

इतक्यात बाजूला त्याला काही आवाज व दंगल ऐकू आली. त्या बाजूला पाहिल्यावर सत्यवानला दिसले की दोन गटात काही मारामारी चालू असून. मध्यभागी दोन युवक बेशुद्ध अवस्थेत पडलेले आहेत.

हकीकत अशी होती की—चन्द्रसेन व सूर्यदेव या दोघांच्या मुलात काही कारणावरून बाचाबाची झाली, त्या मारामारीत दोघेही रक्ताळून गेले, अन् आता तर दोघेही मृत्यूशीच झुंज देत होते! ते पाहून दोघांचे बाप इतके चिडले की आपापल्या गटाची माणसं आणून ते आता आपसात लढू लागले.

त्या जख्मी युवकांना पाहून सत्यवान म्हणाला, "तुम्ही आपसातली मारामारी सोडून द्या, मी या दोघांवर अुपचार करतो."

चन्द्रसेन व सूर्यदेव या दोघांनीही सत्यवानला ओळखले अन् विचारले, "अरे, कालच तर तू म्हणत होतास की आपण आजारी आहोत? आपल्या स्वतःवरच अुपचार न करू शकणारा तू, या दोघांना कसं बरं करणार आहेस?"

"तुम्ही आपसातल्या भांडणात स्वतःला इतकं बुडवून टाकलंयत, की या गावच्या काही विशेष गोष्टी तुमच्या ध्यानात आलेल्याच नाहीत. मी स्वतः एक वैद्य आहे. पण मला असा एक रोग झाला, की ज्याचा अुपचार कुणाला माहीतच नाहीय इथे. अशा काही वनस्पती आहेत की ज्यामुळे माझा आजार एका रात्रीत पळून गेला! या वनस्पती इतक्या प्रभावी आहेत, की त्यामुळे रक्तपिपासू जनावरं अन् विषारी सापही अगदी सात्त्विक बनून जातात. या वनस्पती अगदी शेवटचा श्वास घेत असलेल्या रोग्यालाही खडखडीत बरं करू शकतात.

"ठीक आहे. पण हे बघ, याचा मुलगा बरा झाला, अन् माझा नाही झाला, तर मात्र मी तुला जिवन्त सोडणार नाही." चन्द्रसेन अन् सूर्यदेव दोघे एकदमच बोलले.

सत्यवानने त्यांच्यावर अुपचार केला. थोड्याच वेळात दोघेही खडखडीत बरे झाले. चन्द्रसेन व सूर्यदेव दोघांचेही चेहरे आनन्दाने अुजळले. आपल्याकडचा पाहुणचार स्वीकारून मगच पुढे जायचा







आग्रह त्यांनी सत्यवानला केला.

सत्यवान हा केवळ वैद्यच नव्हे, तर एक महान पंडितही होता. आपल्या ज्ञानाच्या मदतीने गावकऱ्यांच्या मनातली द्वेषभावना अन् भेदाभेद दूर करायचा त्याने निश्चय केला. रोज तो गावकऱ्यांना एकत्र आणून प्राचीन ग्रन्थातल्या अुपदेशात्मक गोष्टी सांगू लागला.

हळूहळू गावकऱ्यांच्यात बदल घडून येअू लागला. चित्रदुर्गाच्या लोकांच्या प्रतिभेचा विकास होअू लागून आसपासच्या गावांत त्यांची प्रसिद्धी हो‌ू लागली. आता सत्यवान, आपल्याला आपल्या गावी परत जायचे आहे असे म्हणु लागला. परंतु गावकरी त्याला सोडायला राजी होईनात! सर्वजण मुक्त कंठाने म्हणू लागले की, सत्यवानने गावपाटील बनून आता तेथेच रहावे.

परन्तु त्यांना नकार देअून सत्यवान म्हणाला, "तुम्ही लोक आता आपल्यातल्याच कुणा एकाला पाटील म्हणून निवडा."

विचारविमर्श करून गावकरी त्याला म्हणू लागले, "नको बाबा! आम्ही पुन्हा आमची स्थिती पहिल्यासारखीच किंवा कदाचित त्याहूनही वाईट करुन घेऊं."

थोडासा विचार करून सत्यवान आता म्हणाला, "मी आपला वारस इथे पाठवून देईन. त्याला तुम्ही आपला पाटील बनवा."

सत्यवान आपल्या गावी गेला अन् घरच्यांना त्याने चित्रदुर्गाची सारी हकिकत सांगितली. नंतर तो आपला मुलगा सत्यशील याला ग्रामाधिकाऱ्यासाठी आवश्यक असे प्रशिक्षण देअू लागला. एक वर्ष गेले तरी सत्यवानला मुलाच्या प्रगतीबद्दल संतोष वाटला नाही.



अशीच पाच वर्षे निघून गेल्यावर सत्यवान सत्यशीलला म्हणाला, "आता तू चित्रदुर्गला जा, अन् मी तुला जे पत्र लिहून देईन ते तिथल्या गावकऱ्यांना दाखवून तिथला पाटील बन."

सत्यशील चित्रदुर्गला पोचला, तेंव्हा त्याला कळून चुकले की गुणनाथ नावाचा कोणी माणूस अगोदरच स्वत:ला 'सत्यवानचा वारस' म्हणवून तिथला पाटील बनून राहिलेला होता.

सत्यशील पत्र घेअून चन्द्रसेनकडे गेला. त्याने गुणनाथला जाब विचारला.

जराही विचलित न होता तो अुत्तरला. "मीच सत्यवानचा बारस आहे, ही गोष्ट ते स्वत:च येअून सांगतील."

चन्द्रसेनला आता काही करता न आलं. तरी तो सत्यशीलच्या बाजूचा राहिला अन् काही लोकांनी गुणनाथचीच तळी अुचलून धरली. गावात झगडे सुरू झाले.

काही दिवस निघून गेल्यावर सत्यशीलने चन्द्रसेनला सांगितले, "हे भांडण असं सुटणार नाही. माझ्या बाबांकडे माणूस पाठवा."

तसा निरोप पाठवल्याबरोबर सत्यवान



चित्रदुर्गला आला. जराही न संकोच करता गुणनाथने सत्यवानचे पाय धरले व तो म्हणाला, "आपण इथून गेल्यावर इथे पुन्हा भांडणतंटे सुरू झाले आणि या गावचा एक माणूस माझ्याकडे आला. त्याने गावची परिस्थिती मला सांगितली. त्याच्या इच्छेवरून मी इथे येअून पाटीलकी ग्रहण केली. आपला वारस बनून हे एक आदर्श गाव बनवण्यासाठी मी सर्वतोपरी प्रयत्न केले. आपला मुलगा सत्यशील प्रथम माझ्याकडे न येता चन्द्रसेनकडे गेला. आता आपणच या प्रसंगानून मला वाचवू शकाल."

गुणनाथचे सान्त्वन करून सत्यवानने जाहीर केले की, "गुणनाथ हाच आपला खरा वारस आहे." नंतर आपल्या मुलाला बरोबर घेऊन तो आपल्या गावी परत निघून गेला.

आपली गोष्ट इथे संपवून वेताळ म्हणाला, "राजा! सत्यशीलने स्वतः काही त्या गावचा पाटील बनायचं स्वप्न जोपासलं नव्हतं! त्याच्या पित्यानेच त्याच्या मनात ती इच्छा जागवली. गुणनाथलाच आपला वारस जाहीर करून सर्वांसमक्ष सत्यशीलच्या आशेवर बोळा फिरवला! असं वागण्यात सत्यवानची स्वतःचीच काही दुर्बलता किंवा आपल्या मुलावर काही गुप्त राग वगैरे असावा! या शंकेचं अुत्तर ओळखूनही, द्यायचं तू टाळलंस तर तुझं मस्तक फुटून जाईल."

राजा विक्रम बोलू लागला, "सत्यवानने सत्यशीलचा अपमान नाही केला. एक प्रकारे सत्यशीलला तो एक योग्य धडाच होता. सत्यवानचा वारस म्हणवून गुणनाथने चार वर्षं पाटीलकी संभाळली; पण पदवीच्या मोहाने सत्यशीलने मात्र आल्यापासून थोड्याच दिवसात तिथे भांडणं अुपस्थित केली अन् दाखवूनं दिलं, की ग्रामाधिकारी बनायची आपली लायकीच नाही. गावच्या कल्याणासाठीच सत्यवानने गुणनाथला आपला वारस म्हणून जाहीर केलं."

अशा तऱ्हेने योग्य अुत्तर देअूनही राजाचे मौन भंग झाल्यामुळे वेताळ प्रेतासह पुन्हा अदृश्य होअून त्याच झाडांच्या फान्दीला लटकू लागला.

कल्पित



# चान्दोबा पुरवणी-५२

## भारतातील पशुपक्षी :

## गंभीर प्रकृतीचे हत्ती



लहान मुलांना हत्तीवर बसायला फार आवडते. दरवर्षी दिल्लीच्या गणतन्त्र दिवसाच्या समारंभात हत्ती सामिल असतात. त्याच प्रमाणे दसरा-अुत्सवात म्हैसूरमध्ये, जयपूरमध्ये व 'पूरम'च्या संदर्भात केरळ मधील तिरुच्चूरच्या मिरवणुकीत हत्ती पहावयास मिळतात. दक्षिण भारतातल्या काही मंदिरात देवांच्या मूर्ती हत्तीवर बसवून सकाळ-संध्याकाळ त्या हत्तीवरून मिरवल्या जातात.

सैन्याच्या चतुरंग दलांत गजदलाचे विशेष महत्त्व असते. इतिहास असे सांगतो की चन्द्रगुप्त मौर्याच्या सैन्यात १०,००० हत्ती असत.

जमिनीवर रहाणाऱ्या प्राण्यात हत्ती हाच सर्वात विशालकाय प्राणी आहे. जंगली हत्ती पकडून त्यांना पाळीव बनवणे सोपे असते. त्यांचा अनेक तऱ्हेने अुपयोग केला जातो.

आपल्या देशात अुंटांच्या धावण्याच्या स्पर्धां-प्रमाणेच हत्तींच्या ही धावण्याच्या स्पर्धा काही ठिकाणी घेतल्या जातात. जंगलात वृक्ष तोडल्यानंतर मोठ-मोठे ओंडके खेचून नेण्यासाठी नेहमी हत्तींनाच कामाला लावले जाते.

सर्वसाधारणतः हत्ती तीन मीटर अुंच व चार ते पाच हजार किलो इतक्या वजनाचा असतो. १.४० मीटर लांबीची याची सोंड खूपच मजबूत असून ती त्याला कोणत्याही दिशेने हलवता येते. आपले खाणे सोंडेने अुचलून तो तोंडात घालतो. आपल्या सोंडेने तो जमिनीवरील नाण्यासारखी लहान वस्तूही अुचलू शकतो. तर हत्तीला बाहेरच्या बाजूला जे दोन दांत (सुळे) असतात ते खूपच मूल्यवान असतात.

जंगलात हत्ती नेहमी कळप करून रहातात. इतक्या मोठ्या भक्कम हत्तीचे डोळे मात्र फारच लहान असतात. त्याची वास घेण्याची व ऐकण्याची शक्ती मात्र फारच तीक्ष्ण असते. हत्तीचे पिल्लू बावीस महिने गर्भात राहून मग जन्म घेते. हत्ती हा खूपच बुद्धिमान प्राणी मानला जातो. त्याची स्मरणशक्तीही प्रशंसनीय असते.

आफ्रिकेतील हत्तींच्या मानाने आपल्या देशातले हत्ती आकाराने लहान असतात.



# आधुनिक भारतीय साहित्य

मद्रास शहरातील एका इस्पितळात शंकरी नावाची एक डॉक्टर काम करत असते. दिसायला ती खूपच सुन्दर असते. एकदा तिरुमूर्ति नावाचा एक धनवान माणूस आपल्या गर्भवती पत्नीला इलाज करण्यासाठी डॉ. शंकरीकडे आणतो. तिरुमूर्तीला पाहून ती एकदम आश्चर्यात पडते; कारण तिचा प्रेमी दिसायला अगदी सहीसही तिरुमूर्तीसारखाच असतो. त्याचे नाव असते गुरुमूर्ति. या गुरुमूर्तीने डॉ. शंकरीशी गुप्तपणे लग्न केलेले असते. पण अचानक एक दिवस तो तिला सोडून निघून गेलेला असतो. तिरुमूर्तीकडे विचारपूस करता, तिला कळते की, गुरुमूर्ति व तिरुमूर्ति हे दोघे जुळे भाऊ असतात.

## सुनहरा फूल



तिरुमूर्तिकडून तिला गुरुमूर्ति मरण पावला असल्याचेही समजते. परन्तु तिरुमूर्ति किंवा त्याच्या बायकोला गुरुमूर्तीने डॉ. शंकरीशी विवाह केला असल्याची गोष्ट मात्र कळून येत नाही.

डॉ. शंकरीच्या देखरेखीखाली तिरुमूर्तीच्या पत्नीचे बाळंतपण सुरक्षितपणे व सुखप्रद झाले. पति-पत्नींनी खुशीने डॉ. शंकरीजवळ आपली कृतज्ञता व्यक्त केली. तिरुमूर्ती चांगला श्रीमन्त असल्याने त्याने डॉ. शंकरीला अमूल्य अुपहार दिले.

खरे म्हणजे तिरुमूर्तीने हे सारे कृतज्ञता म्हणून नाही केले! तो डॉ. शंकरीच्या सौन्दर्यामुळे तिच्याकडे आकर्षित झाला होता. तिच्याशी विवाह करावा असे त्याच्या मनाने घेतले व तशी इच्छाही त्याने तिच्याजवळ प्रकट केली.

विवाहित असूनही तिरुमूर्तीने हा प्रस्ताव केल्याने डॉ. शंकरी आश्चर्यचकित झाली. नंतर तिने तिरुमूर्तीबद्दल माहिती गोळा करायला सुरुवात केली. तिला असे कळून आले की तो केवळ धनाला महत्त्व देणारा माणूस असून धनाच्या साह्याने काहीही साधू पहाण्याइतपत तो दु:साहसीही आहे। तो इतका दुष्ट



आहे, की आपला हेतु पूर्ण करण्याच्या प्रयत्नात मध्ये अडचण आणणाऱ्याचा खूनही करायला कमी करणार नाही!

एके दिवशी तिरुमूर्ति कुमुदा नावाच्या तरुणीला बरोबर आणून डॉ. शंकरीच्या इस्पितळात दाखल करतो. तिच्याशी त्याने गुप्त विवाह केलेला होता अन् आता त्याला तिच्यापासून आपली सुटका करून घ्यायची असते. डॉ. शंकरीच्या मदतीने कुमुदाचा अन्त करावा असे त्याच्या मनात असते, व तो त्यासाठी तिची मदत मागतो. एके दिवशी कुमुदा अचानक तेथून नाहीशी होते अन् तिरुमूर्तीला वाटते की-बरे झाले, पीडा गेली!

त्याच काळात डॉ. शंकरीचा लहानपणचा मित्र तिरुज्ञान तिला शोधत तेथे येऊन पोचतो. शंकरी अनाथ बालिका असताना तिला तिरुज्ञानने खूप मदत केलेली असते. शंकरी तिरुज्ञानला तिरुमूर्तीच्या कंपनीत नोकरी मिळवून देते. नंतर काही दिवसांनी शंकरी तिरुमूर्तीच्या लग्नाच्या प्रस्तावाला नकार देते. त्यामुळे रागावून तो तिरुज्ञानला नोकरीवरुन काढून टाकतो. तिरुज्ञान हा खरे म्हणजे एक गुप्त हेर असून अबोध मुलींना फसवणाऱ्या तिरुमूर्तीबद्दल माहिती मिळवण्यासाठीच तेथे आलेला असतो.

डॉ. शंकरी व तिरुज्ञान यांचा कायमचा काटा काढण्यासाठी तिरुमूर्ति आपली माणसे पाठवतो. अशातच त्यापैकी एका दुष्टाचा मोटार अपघातात अन्त होतो अन् तिरुमूर्तीला अटक केली जाते.

कुमुदाला डॉ. शंकरीनेच वाचवलेले असून तिला तिने आपल्याकडेच रहायला जागा दिलेली असते. तिरुज्ञानची डॉ. शंकरीशी विवाह करायची इच्छा असते. पण तो तिरुमूर्तीकडे नोकरी करत असताना, तिरुमूर्तीची बहीण राजेश्वरी त्याच्यावर प्रेम करू लागलेली असते. हे माहीत असल्याने डॉ. शंकरीला त्यांच्या मार्गात आपली अडचण नको असे वाटते. डॉ. शंकरी गरीबांच्या सेवेसाठी आपले जीवन वाहून टाकते. त्यामुळे डॉ. शंकरी ही एक सुवर्ण-पुष्पासारखी तरुणी आहे.

'अखिलन' या नावाने प्रसिद्ध असलेल्या पी. व्ही. अखिलन (१९२२-१९८८) याने रचलेल्या 'पोन-मलर' (स्वर्णपुष्प) या कादंबरीचे हे कथासार होय. काही स्वार्थी धनवान लोकांचे अत्याचार व सहज-त्यागाची जणू मूर्तीच, अशा डॉ. शंकरीची भूमिका यांची या कादम्बरीत जिवन्त चित्रे आपल्याला पहायला मिळतात. अखिलनला साहित्य-अॅकॅडेमी व भारतीय ज्ञानपीठ यांच्याकडून गौरव-पुरस्कार प्राप्त झालेले आहेत.

# तुम्हाला माहीत आहे काय?

१. 'बोन्साय' म्हणजे काय?
२. शक-संवत्सराची सुरुवात कोणी केली?
३. एक देश पृथ्वी खंडभर पसरलेला आहे. तो कोणता?
४. म. गांधींनी सर्वात प्रथम स्थापन केलेला आश्रम कोणता?
५. खूपच जुने राष्ट्रगीत असणारा देश कोणता?
६. कांजीवरमच्या विणकरांचे एक विशेष असे नाव आहे. ते कोणते?
७. एकही सिनेमा थिएटर नसलेला देश कोणता?
८. बुद्धाचे निर्वाण कोठे झाले?
९. मानव शरीरात सर्वात मोठा अवयव कोणता?
१०. उत्तर भारतात गोमती नदीच्या किनाऱ्यावर वसलेले राजधानीचे शहर कोणते?
११. 'आधुनिक इटलीचा पिता' कोणाला मानले जाते?
१२. नवी दिल्ली येथील व्हाइसरॉय हाऊस (राष्ट्रपती-भवन) कोणी बनवले?
१३. पोस्टाचे पहिले तिकीट सर्वप्रथम कोणत्या देशाने काढले?
१४. भारताच्या राष्ट्रीय काँग्रेसचा शत-वार्षिकोत्सव केव्हा साजरा केला जाईल?
१५. सन् १८९६ मधे साजऱ्या झालेल्या आधुनिक ऑलिंपिक्स स्पर्धांत किती देशांनी भाग घेतला होता?

## उत्तरे

१. भांड्यात (कुंडीत) वाढणारा पूर्ण वृक्ष. ही कला जपानमध्ये सुरू झाली.
२. सम्राट कनिष्क. सन् ७८ मधे.
३. ऑस्ट्रेलिया.
४. दक्षिण आफ्रिकेतील दर्बान जवळील 'दि फोनिक्स फार्म'—सन् १९०४ मधे.
५. जपान. त्याचे 'किमियागो' गीत इ.स. च्या पहिल्या शतकात लिहिले गेले.
६. साळगार.
७. सौदी अरेबिया.
८. कुशीनगर.
९. यकृत (लिव्हर).
१०. लखनऊ.
११. गॅरिबाल्डी.
१२. सर एडविन् ल्युटिन्स.
१३. इंग्लंड.
१४. सन् १९९५ मधे.
१५. नऊ.



# दध्योदनावरील संकट

"शारदापुर मध्ये धनंजय शर्मा नावाचा एक माणूस रहात असे. तो आपलं भोजन स्वतःच बनवी, आणि ते जेवण म्हणजे दध्योदन-दहीभात! दही व भात एकत्र करून त्याला तुपाची फोडणी दिली की मोठा स्वादिष्ट दही-भात तयार होई. लोक त्याच्या दही-भाताची अशी प्रशंसा करीत की शेवटी त्याचे नावच पडले—दध्योदन शर्मा.

त्याची लग्न करण्याची इच्छा होती. कारण दही-भात खाऊन तो आता कंटाळला होता. शेवटी शेजारच्या गावातील एक मुलगी पार्वतीशी त्याचे लग्न ठरले.

पार्वतीची आई तिला म्हणाली—"पार्वती, सासू-सासरे असलेले बरे. हा मुलगा मला मुळीच पसंत नाही."

पार्वती आईला म्हणाली—"आई, मला वाटतं—घरात मी आणि माझा नवरा दोघेच असावेत, ऐकलंय की माझा नवरा झकास दही-भात बनवतो. हा त्याचा गुण मला इतका आवडला की मला स्वयंपाकाचे कष्टच नाहीत."

पार्वतीचे धनंजय शर्माशी लग्न झाले, आणि ती नवऱ्याच्या घरी आली. आता बायकोने बनविलेले स्वादिष्ट पदार्थ आपल्याला खायला मिळतील असा त्याने विचार केला. पण बायकोची तर त्यालाच आपला स्वयंपाकी बनवण्याची इच्छा होती.

सकाळी उठताच पार्वतीने प्रेमाने प्रस्ताव केला—"काय हो, तुमचा दही-भात म्हणजे अमृत असतं असं लोक म्हणतात. आज मला दही-भात खायचा आहे."

राजेश्वर मिश्रन



पहिल्याच दिवशी भांडण नको म्हणून दध्योदन शर्मानं स्वतःच दही-भात बनवला. काही ना काही सबब सांगून पार्वती काही दिवस रोज दही-भात खात राहिली. एक दिवशी शर्मानं स्वयंपाक करायला पार्वतीला भाग पाडलं.

असा एक महिना गेला. पुढच्या महिन्यात नाइलाजाने पार्वतीने दोन-चार दिवस स्वयंपाक तर केला, पण आपल्या आळशी स्वभावामुळे तिला तो सर्व तापदायक वाटला. एक दिवशी ती माहेरी जायला निघाली. ती नवऱ्याला म्हणाली—"आहो, उद्या संध्याकाळ पर्यंत मी आपल्या आईला इथं आणीन. एक-दोन महिने ती आपल्याकडेच राहील. आम्ही येऊ तोपर्यंत तुम्ही छान दही-भात तयार करून ठेवा. प्रवास करून आम्ही दमून येऊ, मग भोजन बनवणं कठीण होईल."

बायकोच्या हुकुमाप्रमाणे दध्योदन शर्मानं दही-भात तयार केला, पण बायको नि सासू यांचा पत्ता नाही. स्वतः थोडा दही-भात खाल्ला नि तो झोपला. पण त्याला झोप येईना.

अर्ध्या रात्री कोणी तरी दार खटखटवलं. दरवाजा उघडला तेव्हा बाहेर एक वृद्ध पिशाच्च उभं दिसलं.

वृद्ध पिशाच्च म्हणालं—"उगाच आरडा-ओरड करू नकोस. मला थोडा दही-भात खाऊ घाल."

शर्मानं कापऱ्या हातांनी पिशाच्चाला दही-भात आणून दिला. पिशाच्चाने दही-भाताची खूप प्रशंसा केली, नि मग निघून गेला. शर्मा पुन्हा बिछान्यावर पडला. त्याला चांगली झोप लागली.

काही वेळाने तो झोपेतून जागा झाला. त्याच्या चेहऱ्यावर अद्भुत प्रकाश पडत होता आणि कानात एक मंजुळ ध्वनि—"शर्मा, ऊठ की आता! किती झोपणार?"

शर्मानं आश्चर्याने डोळे उघडून पाहिले तर समोर ग्रामदेवी हसत उभी होती. धनंजय शर्मा हात जोडून म्हणाला—"माते, आज तू माझ्यावर कृपा करीत आहेस."

ग्रामदेवी म्हणाली—"कोण म्हणतं मी तुझ्यावर कृपा करण्यासाठी आलेली आहे? तूच माझ्यावर कृपा कर नि आपल्या हातांनी बनविलेला दही-भात मला खायला दे. माझ्या पुजाऱ्याने बनवलेला दही-भात तर मी रोज खाते. तुझ्या दही-भाताची प्रशंसा मी आपल्या अनेक भक्तांकडून ऐकलेली आहे."

शर्माला शंका आली की देवीला रोज तर दही-भात द्यावा लागणार नाही ना? त्याच्या मनातील विचार ओळखून ग्रामदेवीने स्पष्ट केले—"शर्मा, तुला भय वाटायला नको. मला आजच तुझा दही-भात पाहिजे. आपल्या हातांनी बनवलेला दही-भात. तुला रोज मला द्यावा लागणार नाही."

शर्मानं शिल्लक असलेला सर्व दही-भात ग्रामदेवीपुढे आणून ठेवला नि तो देवीने आनंदाने खाल्ला. जाता जाता ग्रामदेवी म्हणाली—"शर्मा, तुझा दही-भात छान होता. मी तुझ्यावर खुश आहे. होय, पण थोडा दही-भात देऊन मोठी धन-दौलत मागण्याचा प्रयत्न करू नकोस. तसली भोळी-भाबडी देवी मी नाही." आणि देवी अदृश्य झाली.



दुसऱ्या दिवशी धनंजय शर्मा जेव्हा कचेरीत काम करीत होता, तेव्हा शेजारच्या एका मुलाने येऊन खबर दिली की त्याची बायको नि सासू आली आहे. तो संध्याकाळी जेव्हा घरी आला तेव्हा स्वयंपाक-घरात छान छान पदार्थ बनत होते नि त्यांचा सुवास घरात दरवळत होता. आता खुश होऊन तो बायकोला म्हणाला—"तू कशासाठी एवढे कष्ट घेतलेस? अग, मी दही-भात बनवला नसता का?"

पार्वती घाबरून म्हणाली—"आता इथून पुढे दही-भाताचं नाव काढू नका. तुम्ही आईशी गप्पा-गोष्टी करीत बसा. मी थोड्याच वेळात गरम-गरम भोजन

वाढते, चार भाज्या नि चटणी आज मिळेल तुम्हाला!''

दध्योदन शर्माचा विश्वासच बसेना बायकोच्या या म्हणण्यावर. आपल्या बायकोत एवढा बदल कसा झाला हेच त्याला समजेना. कदाचित् आपला दही-भात खाऊन गेलेल्या पिशाच्च अथवा ग्रामदेवीची ही करामत असावी असं त्याला वाटलं. पण ज्या भिकाऱ्याला रात्री त्याने दही-भात खाऊ घातला होता त्याची ही करामत असावी हे रहस्य त्याच्या लक्षात आले नाही.

तो भिकारी दिवसा दाढी-मिशा लावून साधूप्रमाणे भटकत असे नि रात्री सामान्य भिकारी बनून भीक मागे. त्या दिवशी दुपारी तो त्याच्या घरी आला होता तेव्हा शर्माच्या बायकोने त्याला बोलावून केळी खायला दिली नि आपलं भविष्य विचारलं.

भिकाऱ्याने पार्वतीच्या हस्त-रेषा पारखण्याचे नाटक केले नि म्हणाला—''तू खरंच महालक्ष्मी सारखी आहेस बेटा! पण तुझा नवरा दध्योदन याच्यावर एक संकट येऊं पहातंय. दही-भात बनवीत वा खात असताना त्याचे प्राण जाणार आहेत बघ. या संकटापासून तू त्याला वाचवू शकतेस! एकच उपाय, त्याला दही-भातापासून दूर ठेव.''

रोज रात्री या घरातून आपल्याला छान छान पदार्थ भीक म्हणून मिळावेत अशी त्याची इच्छा होती. या त्याच्या उपायाचा परिणाम उत्तमच झाला. पार्वतीने त्या दिवशी निश्चय केला की नवऱ्याला स्वयंपाकघरात येऊंच द्यायचं नाही, कारण दही-भात सोडून त्याला काही बनवताच येत नसे.

अशा रीतीने धनंजय शर्माची दही-भातापासून कायमची सुटका झाली. तरी पण त्याचं नाव तेच राहिलं—दध्योदन शर्मा! त्या नावापासून त्याची सुटका होणं शक्य नव्हतं!





# परसातले भूत

एका दाट जंगलात शेकडो भुतं रहात असत. त्यातल्या एका लहान भुताला त्याची आई-भूत रागे भरली. त्यामुळे रुसून ते एका घराच्या परसातल्या निंबाच्या झाडावर जाऊन बसलं.

त्या घरचा मालक होता एक गरीब शेतकरी. त्याच्या थोरल्या मुलीच्या नवऱ्याच्या घरचे लोक तिला नेहमी आपल्या बापाकडून पैसा मागून आणण्यासाठी त्रास देत असत. एक हजार रुपये आणण्यासाठी त्यांनी नुकतंच तिला माहेरी पाठवून दिलं होतं.

लक्ष्मीचा पिता लक्ष्मण याच्या डोक्यावर हे फारच मोठं ओझं होतं. लक्ष्मीच्या लग्नात घेतलेलं कर्जच तो अजून फेडू शकला नव्हता. तरीही सगळ्या खर्चातून वाचलेलं घरही विकून लक्ष्मीच्या सासुरवाडीची मागणी पुरी करायचे त्याने ठरवले.

परन्तु लक्ष्मी म्हणाली, ''बाबा, तुम्ही हे घर विकलंत, तर रहाल कुठे? माझ्या बहिणींची लग्नं कशी करू शकाल? तेंव्हा मीही इथून पुढे तुमच्या जवळच राहू म्हणते.''

यावर वैतागून लक्ष्मण म्हणाला, ''अग, सासरची माणसं असा एवढातेवढा त्रास सगळीकडेच देतात! माझ्याबद्दल तुझ्या मनात थोडा जरी आदर असेल, तर मी सांगतो तसंच कर. उद्या घर विकून मी तुला पैसे देईन. तू आपल्या सासरी जाऊन सुखाने नांद.''

लक्ष्मी बिचारी चुप बसली! पण रात्री तिचा मुळीच डोळा लागेना. आपल्यामुळे आपले बाबा अन् बहिणींचं राहिलंसाहिलं

सौ॰ राजश्री डिके



घरही हिसकावलं जात आहे, हीच चिंता तिला खात होती!

परसात निंबाच्या झाडाखाली एक मोठीशी विहीर होती. त्याच्यात उडी मारून आत्महत्या करायचा लक्ष्मीनं विचार केला. ती विहिरीजवळ आली तेंव्हा, तिला भिववण्यासाठी छोट्या भुतानं तिच्यासमोर एकदम उडी घेतली, अन् ते भयानकपणे नाचू लागलं.

ते पाहून घाबरलेली लक्ष्मी किंचाळत घरात पळून गेली. आणि थरथरत म्हणाली, "परसात भूत आहे!"

"थांब, मी पाहून येतो." असं म्हणून लक्ष्मण परसात निंबाकडे गेला.

त्यालाही भिववायच्या हेतूने छोट्या भुताने त्याच्या समोरच उडी घेतली. पण त्याला पाहून जराही न भिता लक्ष्मणनं विचारलं. "कारे! एकटाच आलास? तुझा वेळ जात नाहीय का?"

लक्ष्मणच्या या धैर्याचं भुताला मोठं आश्चर्य वाटलं. मग त्यानं आपली हकिकत लक्ष्मणला सांगून टाकली. लक्ष्मण हसून म्हणाला, "काय वेडा रे तू! हे काही चांगलं नाही केलंस बघ! लवकर आपल्या आईकडे जा बरं! आईच्या प्रेमापेक्षा जगात मोठं काहीही नाही. म्हणूनच ती कितीही रागावली तरी आपण रागावू नये तिच्यावर!"

लक्ष्मणच्या या बोलण्याचा भुताच्या मनावर चांगला परिणाम झाला आणि ते आपल्या आईकडे निघून गेलं. जाऊन पहातो, तो आई खरोखरच खूप रडत होती! छोट्या भुताने आईला लक्ष्मणबद्दल सांगितलं तेंव्हा आई म्हणाली, "तुला परत मुझ्याजवळ पाठवणाऱ्या त्या भल्या माणसाकडे थोडंसं सोनं पाठवून आपली कृतज्ञता दाखवायला हवी!" छोट्या भुतासह पोटलीभर सोनं घेऊन ती आई-भूत तिथून निघाली, तेंव्हा ते छोटं भूतही रस्ता दाखवायला तिच्याबरोबर निघालं.

ती दोन्ही भुतं जेंव्हा लक्ष्मणच्या घरी पोचली तेंव्हा तो लक्ष्मीला रागावत होता "माणसानं जिवन्त राहूनच काही करत रहावं. मरून काहीच हाती येत नसतं." तेंव्हाच आई-भूत पुढे आली अन् सोन्याची पोटली लक्ष्मणच्या हाती देऊन तिने आपली कृतज्ञता व्यक्त केली. ते पाहून लक्ष्मण चक्रावूनच गेला. तो म्हणाला, "हे सोनं तर सहज एक लाख रूपयांचं असेल! मी आयुष्यभर कष्ट करूनही इतकी रक्कम मिळवू शकणार नाही."

आता लक्ष्मणच्या घरी आणखी काही दिवस रहायची इच्छा छोट्या भुताने प्रकट केली, तेंव्हा त्याला रागवून आई म्हणाली. "नाही आपल्यामुळे माणसावर अपकाराऐवजी अपकार होऊ नये. नाहीतर आपल्याला या पिशाच्च-योनीतून मुक्ति नाही मिळत."

लक्ष्मण तिला म्हणाला, "तुझ्या मुलामुळेच आज माझ्या मुलीचा जीव वाचला आहे. तू आपल्या मुलाला ठेव नं थोडे दिवस आमच्याकडे!"

"आज तो आमच्यावर रागावून इथे आला म्हणूनच तुमचं भलं झालं. आम्ही मुद्दाम होऊन मानवाचं भलं करायचं ठरवलं, तरी आम्हाला जास्त काळ सद्बुद्धीनं रहाणं जमत नाही. माणसांना सतावून संतोष मिळवणं हाच भुतांचा स्वाभाविक स्वभाव असतो." आई-भूत समजावत म्हणाली.



तरीही आणखी थोडे दिवस माणसात रहाण्यासाठी छोटं भूत हटून बसलं. तेंव्हा काही विचार करून लक्ष्मण म्हणाला, "माझ्या लक्ष्मीला तिच्या सासरची माणसं फार त्रास देत असतात. तू आपल्या मुलाला माझ्या मुलीबरोबर तिच्या नवऱ्याघरी पाठव. जेंव्हा जेंव्हा ते लोक तिला त्रास देतील, तेंव्हा तुझा मुलगा त्यांना चांगलं सतावेल."

आई-भुताने या बेताला संमती दिली. मग आनन्दाने उड्या मारत छोटं भूत म्हणालं, "वा, वा! नव्या जागी मला खूप गंमत वाटेल. मला पाहून तिथले लोक घाबरतील. इथे तर मला कुणीच घाबरणार नाही नं!"

हसून आई-भूत तिथून निघून गेली. दुसऱ्याच दिवशी छोटं भूत लक्ष्मीबरोबर तिच्या सासरी निघालं. लक्ष्मीच्या घरच्या आवारात एक मोठंसं पिंपळाचं झाड होतं. त्याच्यावर छोट्यानं आपलं बस्तान बसवलं.

सुनेबरोबर आलेली रक्कम पाहून लक्ष्मीचे सासूसासरे काही दिवस शान्त राहिले. परंतु थोड्याच दिवसात आपल्या स्वभावानुरूप त्यांनी तिला त्रास द्यायला सुरुवात केली. पण असं जेंव्हा होई, तेंव्हा छोटं भूत घरात घुसून घरातल्या वस्तु इकडे-तिकडे फेकून देई अन् पिंपळाच्या फांद्या मोडून घरात त्यांचा ढीग रची!

यामुळे लक्ष्मीची सासू घाबरून गेली अन् हे सारं आसपासच्या घरात सांगू लागली. बराच विचार करून तिची एक शेजारीण तिला म्हणाली, "हे बघ, आता इथून पुढे घरून पैसे आणायसाठी सुनेला छळत जाऊ नको."

यांनतर मात्र लक्ष्मीच्या सासरच्यांच्या वागणुकीत फरक पडला. लक्ष्मीच्या आयुष्यात संतोषाचे, हसण्याचे दिवस आले. छोट्या भुतालाही खूप आनन्द झाला.






महिरावणाचा संहार झाल्याची वार्ता चन्द्रसेनेला सुवर्चला देवीच्या तोंडून समजली. आता मत्स्यवल्लभ पाताळ लंकेचा राजा झाला आहे हे ही तिच्या कानी आले.

महिरावणाच्या कैदेतून सुटका झाल्यामुळे चन्द्रसेनेला आनंद झाला. तेव्हा सुवर्चला चन्द्रसेनेला म्हणाली–"चन्द्रसेने, तुझं भाग्य थोर! महिरावणाचा संहार करून श्रीरामचन्द्र आता सरळ मोठ्या प्रेमाने तुझ्याकडेच येत आहेत."

ही बातमी सांगून सुवर्चला तेथून निघून गेली. चन्द्रसेनेला अत्यानन्द झाला. ती रामाच्या स्वागताच्या तयारीला लागली. प्रथम तिने तोरणे बांधून आपला महाल सजवला. चन्दन-तांबूल व सुगंधित पाण्याची व्यवस्था केली. हंसतूलिका तल्पावर तिने रंगीबेरंगी व सुगंधित फुले आच्छादिली.

एवढं सर्व करून झाल्यावर चन्द्रसेनेने डोळे उघडले. शांत व गंभीर चेहऱ्याने राम तिच्यापुढे उभा होता. तिने ताबडतोब सोन्याच्या तबकात गुलाब पाण्याने रामाचे पाय धुतले व ते पाणी आपल्या डोक्यावर शिंपडले. सुगंधित फुलांनी रामाची पूजा करून शेवटी आरती म्हटली.

अत्यानंदाने चन्द्रसेनेने काही बोलायचा प्रयत्न केला, पण तिच्या

२३. राम-लक्ष्मण परतले



ओठातून शब्द फुटेनात. ती एक ही शब्द बोलू शकली नाही. तिने मौन भावाने रामाचे स्वागत केले आणि त्याला हंसतूलिका तल्पाकडे घेऊन गेली. तिथे शय्येवर ठेवलेली पुष्पमाला आपल्या हाती घेऊन ती रामाच्या गळ्यात घालायला निघाली. श्रीराम हंसतूलिका तल्पावर बसू लागला. एवढ्यात तल्प मध्यभागी मोडला नि कडाड असा आवाज झाला. चन्द्रसेनेच्या हाती पुष्पमाला तशीच राहिली.

या सर्व घटनेकडे दुर्लक्ष करून ती पुष्पमाला रामाच्या गळ्यात घालणार, एवढ्यात तिला थांबवीत राम म्हणाला-''चंद्रसेने, पाहिलंस ना? अपशकुन झाला!''

दुसऱ्याच क्षणी चन्द्रसेनेच्या हातातून माळ सुटली आणि ती रामाच्या पायांवर जाऊन पडली. आता चन्द्रसेना शुद्धीवर आली आणि मोडून पडलेल्या खाटेकडे तिची नजर वळली.

तल्प मोडण्याचे काम करणारा हनुमान सूक्ष्म स्वरूपात तिथेच होता. त्याला चन्द्रसेनेच्या नजरेला नजर भिडवणे अशक्य झाले. त्याने लगेच सूक्ष्म रूप सोडून आपले खरे रूप धारण केले आणि नम्रपणे चंद्रसेनेची क्षमा-याचना करीत म्हणाला-''माते, मला माफ कर. तुला दिलेल्या वचनानुसार मी रामाला इथं घेऊन आलो. पण हा राम आहे एकपत्नीव्रती! कसली ही अपेक्षा न करता त्याची सेवा करणे हेच या क्षणी तुला श्रेयस्कर!''

बोलण्याची इच्छा असली तरी चन्द्रसेना काही बोलू शकली नाही. रामाच्या तीक्ष्ण दृष्टीतून तिला परमतत्त्वाचा बोध झाला. आता चन्द्रसेनेला श्रीराम अद्भुत तेजस्वी भगवान विष्णूच्या स्वरूपात दिसले. श्रीविष्णु तिला म्हणाले-''चंद्रसेने, आता रामावतारात मी एकपत्नीव्रती आहे. पुढील कृष्णावतारात तू माझ्या





अष्ट-पत्नीपैकी माझी अतिप्रिय पत्नी सत्यभामा म्हणून जन्म घेशील व तुझे मनोरथ पूर्ण होतील!''

त्यावेळी चन्द्रसेनेला वाटू लागलं की आपणात विष्णूचं तेज प्रवेश करीत आहे आणि एकाद्या ज्योतीप्रमाणे ती विष्णूच्या तेजात लीन होत आहे. ज्योतीप्रमाणे प्रकाश रूप धारण करून ती जेव्हा श्रीरामात विलीन होऊं लागली, तेव्हा भक्तिभावाने हनुमानाने डोळे मिटून हात जोडले. काही वेळानंतर जेव्हा हनुमानाने डोळे उघडले, तेव्हा समोर राम हंसत असलेला त्याला दिसला. मध्यंतरी जे काही घडलं ते सर्व हनुमान विसरून गेला. फक्त महिरावण-संहाराची गोष्ट त्याच्या स्मृतीत राहिली.

एवढ्यात पाताळ-लंकेचा राजा मत्स्यवल्लभ तेथे आला. त्याने राम व हनुमान यांची फुलांनी पूजा-अर्चना केली आणि त्यांचे आशीर्वाद मिळविले. नंतर तो पाताळ-लंकेच्या नागरिकांना भेटला व सर्वांनी मिळून राम, लक्ष्मण व हनुमान यांना मोठ्या प्रेमाने निरोप दिला. आपल्या खांद्यावर राम व लक्ष्मण यांना बसवून हनुमान पाताळ-लंकेतून आकाशात उडाला व रावणाच्या लंकेकडे निघाला. निघालेल्या राम-लक्ष्मणाला निरोप देताना सर्वांनी रामाचा जयजयकार केला, व मत्स्यवल्लभ बराच वेळ हात वर करून हलवीत राहिला.

हनुमान लंका-नगरीत पोंचण्यापूर्वी सर्व वानर-प्रमुख नि वानर-सेना अपार दुःखाने काळजीत होते. त्यांच्या पैकी काही वानर मोठ्या आशेने आकाशाकडे पहात होते. पण जांबवान थोडा ही निराश नव्हता, तो मंदास्मित करीत सर्वांना धीर देत होता.

लंका-नगरीत राक्षस आनंदाने आरडा-ओरड करीत होते, तुताऱ्या वाजवून जल्लोष करीत होते. मोठमोठ्या मद्य-पात्रातून मद्य घेऊन काही राक्षस



नाचत-गात होते. त्यांच्या आनंद-गीतांचे सूर सर्व वातावरणात दुमदुमत होते.

रावण मोठ्या उत्साहाने महिरावणाची प्रतीक्षा करीत होता. कोणत्या ही क्षणी महिरावण राम व लक्ष्मणाची डोकी घेऊन येईल अशी त्याला आशा होती. ही डोकी सोन्याच्या थाळीत ठेऊन ती सीतेकडे पाठविण्याची त्याची योजना होती. यासाठी आवश्यक ती सर्व तयारी तो करून बसला होता.

वेळ जात होता. पण महिरावणाची काही वार्ताच नव्हती. रावण आपल्या महालातून बाहेर आला, आणि किल्ल्याच्या भिंतीवरून दूर दिसणाऱ्या वानर-सेनेला दु:खी पाहून त्याला संतोष झाला. सर्व वानर दु:खी अंत:करणाने माना खाली घालून बसलेले होते. तेथेच जवळ विभीषण ही उभा होता. रावणाने त्याला ओळखले आणि इतक्या मोठ्याने ओरडला की तो आवाज चार योजनांवर ऐकू जावा-"हे बंधु विभीषण! किती रे भोळा तू! अजून ही तू कसली वाट पहात आहेस? पाताळ-लंकेच्या काली-मातेचा प्रसाद म्हणून राम व लक्ष्मणाची डोकी आता माझ्याकडे येणार आहेत. डोक्याचं मांस फार स्वादिष्ट असतं हे तर तू जाणतोसच. निदान त्या मांसाचा स्वाद घेण्यासाठी तू लवकर लंकेत ये. इथे तुला कसले ही भय नाही. काही झालं तरी तू माझा धाकटा भाऊ आहेस. मी तुला अभय दान देतो. तू ताबडतोब इकडे निघून ये."

रावणाचं बोलणं जसं ऐकू येऊ लागलं, तसं विभीषणाने आपले कान बंद केले. दु:खाने त्याच्या डोळ्यातून अश्रू ओघळू लागले. विभीषणाचं दु:ख पाहून सुग्रीवाला ही फार वाईट वाटलं. त्या दोघांना दु:खी पाहून अन्य वानर ही रडू लागले.

वानरांची दीन-हीन अवस्था पाहून रावण आणखी एकदा सात-मजली हसला. किल्ल्या जवळून जाणाऱ्या





राक्षस-स्त्रियांना बोलावून तो म्हणाला-"तुम्ही सीतेला जाऊन सांगा की मी लवकरच राम व लक्ष्मण यांची डोकी तिच्याकडे पुरस्कार म्हणून पाठवीत आहे. पाताळ-लंकेतील राक्षसांनी त्यांच्या शरीरांचा उपयोग आपल्या मेजवानीत केला असेल. ही बातमी तुम्ही सीतेला सांगा आणि राम-लक्ष्मणाच्या डोक्यांचे स्वागत करण्यासाठी तिला तयार रहावयास सांगा."

त्या वेळचा रावणाचा अपार आनंद पाहून राक्षसिणींना वाटलं की रावणाला मति-भ्रम झालेला आहे. थोडा वेळ त्या मागे-पुढे करीत राहिल्या, आणि नंतर रावणाला नम्रपणे नमस्कार करून तेथून निघाल्या.

रावण पुन्हा आपल्या महालात परत आला नि खिडकीजवळ बसून समुद्राच्या दिशेने आकाशाकडे दूर-दूर पाहू लागला. महिरावणाच्या येण्याची तो वाट पहात होता. तेव्हा आकाशातून उडत त्याच्याकडे येणारी एक छोटी आकृति त्याला दिसली.

रावण तावडतोब आपल्या जागेवरून उठला आणि टाळ्या वाजवीत म्हणू लागला-"तो पहा, आला महिरावण! राम-लक्ष्मणाची डोकी घेऊन तोच येत आहे. काली मातेला त्याने राम-लक्ष्मणाचा बळी दिला. ते सोन्याचं ताट कुठे आहे? त्यात राम-लक्ष्मणाची शीर्षं मला ठेवायची आहेत, ते ताट लवकर घेऊन या." पण एकाएकी तो चुप झाला. हताश होऊन जागच्या जागी बसला.

समुद्रावरील आकाशाकडे लक्ष असणाऱ्या जांबवानाला समजले की आकाशातून उडत येणारी ती छोटी आकृति म्हणजे कोण? नंतर त्याने वळून अंगदाकडे पाहिले. अंगदाने ही आश्चर्याने जांबवानाकडे पाहिले.

हात उंच उभारून जांबवान वानरांना म्हणाला-"तो तिकडे पहा! हनुमान



येताना दिसतोय!आता कसली ही काळजी करू नका."

तेव्हा अंगद अतिशय उत्साहाने जयजयकार करीत ओरडून म्हणाला-"हा आपला हनुमान येतो आहे, राम-लक्ष्मणांना आपल्या खांद्यावर घेऊन! चला, आपण त्यांचे स्वागत करू या!"

एवढ्यात राम व लक्ष्मणाला खांद्यावर घेऊन येणारा हनुमान सर्वांना दिसला. वानर-सेना आनंदाने उड्या मारू लागली. त्यांच्या जयजयकारांनी आकाश दुमदुमले. लंका-नगरीत राक्षसांचा जो आनंदोत्सव चालू होता, तो एकदम थांबला.

वानर-सेनेचा उत्साह व आनंदोल्लास ऐकून रावण आपल्या महालातल्या खिडकीजवळ दगडाप्रमाणे स्थिर झाला. राम-लक्ष्मणाला काही अपाय झालेला नाही व ते जिवंत आहेत हे त्याच्या लक्षात आले. पण महिरावण नि त्याचा मोठा भाऊ यांचं काय झालं? हनुमान वा राम-लक्ष्मण यांनी त्याचा तर वध नाही ना केला?

रावणाच्या मनात हे विचार येत होते, एवढ्यात एक राक्षस-सैनिक तेथे आला आणि वानर-सेनेत चाललेली बोलणी ऐकून त्याला जी बातमी समजली ती त्याने रावणाला सांगितली. अशा रीतीने पाताळ-लंकेत जे घडलं ते रावणाला समजलं. त्याबरोबर त्याची घाबरगुंडी उडाली. त्याच्या तोंडातून एक आवाज बाहेर पडला व तो बेशुद्ध झाला.

थोड्या वेळाने रावण शुद्धीवर आला. आता त्याच्या मनात क्रोध व द्वेष थैमान घालीत होते. मुठी आवळून व दातांवर दात आपटीत तो म्हणाला-"माझ्या प्रिय इंद्रजितचा ज्याने वध केला तो लक्ष्मण कुठे आहे? तो कुठे ही जाऊन लपला असला, तरी मी त्याला मारून टाकणार. तो वानर-सेनेत कुठे तरी भ्याडासारखा लपून बसला असेल, पण मी त्याला आता

सोडणार नाही. त्याला माझ्या समोर येऊ दे, एका क्षणात त्याचे प्राण अनंत वायूत विलीन करून टाकतो." अशा रीतीने रावण उन्मादाच्या अवस्थेत बरळत राहिला.

रावणाची ही दशा पाहून मंदोदरीच्या डोळ्यात अश्रू भरून आले. तिला पाहून ही न पाहिल्या सारखे करीत तो म्हणाला-"त्या लक्ष्मणाला मारण्यासाठी मला कुणाच्या मदतीची आवश्यकता नाही. मी एकटाच युद्ध करून त्या राम व लक्ष्मणाचा वध करून त्यांची डोकी सीतेकडे पाठवीन. हा महिरावण मधेच कडमडला, निष्कारण मला आशा दाखवून व्यर्थ माझा वेळ नष्ट केला त्याने. तो नि त्याचा मोठा भाऊ असमर्थ ठरले. भ्याड लेकाचे! म्हणूनच राम त्यांना सहज मारू शकला. आता त्या भ्रष्ट महिरावणाचा विचार सुद्धा करायला नको. माझा पुत्र इंद्रजितचे प्राण घेणाऱ्या लक्ष्मणाचे डोके मी माझ्या तलवारीने उडवणार. आहे कुठे तो दुष्टात्मा लक्ष्मण?" असं विचारून रावण जोराने ओरडला व वेड्याप्रमाणे हालचाली करू लागला.

वानर-सेना युद्धाची तयारी करू लागली, शंखध्वनि ऐकू येऊ लागले. ते ऐकून रावणाचे डोळे जळत्या निखाऱ्यासारखे झाले, त्याचे सर्व शरीर जळतं असल्याचा भास झाला. त्याच्या डोळ्यातील अश्रू आटून गेले, त्यांची जागा आता पौरुषाने घेतली.

रावणाने ताबडतोब चिलखत चढवले, हाती धनुष्य-बाण घेऊन तो जोरात ओरडला-"तो भ्याड लक्ष्मण कुठे आहे रे?" त्याच आवेशात तो आपल्या महालातून बाहेर पडला आणि वानर-सेनेच्या रोखाने त्याने कूच केले.





# मन्त्रशक्ति

एके काळची गोष्ट आहे. त्या काळात नेपाळमधे काही सर्वसामान्य माणसांनाही मन्त्रशक्ति अवगत असत. एका गावात वर्धक नावाचा एक गुराखी रहात असे. एके दिवशी तो गुरे चरायला घेऊन गेला अन् मधेच तहान लागल्यामुळे एका धर्मशाळेजवळील विहिरीकडे गेला. तेथे काही गाववाले एका जागी बसून गप्पा मारत होते, तर हाही त्यांच्याजवळ जाऊन बसला.

"काय रे वर्धक! इथे आरामात बसला आहेस, जनावरं कुणाच्या हाती सोपवून आलायस?" एका प्रौढ माणसाने विचारले.

"हं! जनावरांना काहीसुद्धा होणार नाही!" वर्धक उत्तरला.

तेंव्हा ते लोक त्याची चेष्टा करू लागले. तर वर्धक चिडून म्हणाला, "मी कुठेही असलो, तरी माझी गुरं माझी आज्ञा पाळतात. तुम्ही म्हणत असाल तर दोन खोंड इथे बोलावून दाखवतो मी तुम्हाला."

"ठीक आहे. बोलव पाहू. आम्हीही पाहू की." ती प्रौढ माणसे वर्धकला म्हणाली.

"हो!" वर्धक म्हणाला अन् खरोखरच थोड्या वेळात दोन खोंड तेथे धावत येऊन पोचले आणि डोकी बुचलून पहात वर्धकजवळ उभे राहिले.

"आता तुम्ही परत जा आपल्या चरायच्या जागी." वर्धक हसत म्हणाला. ते बैल मुकाट्याने परत गेले.

आणखी एकदाही अशीच घटना घडली. त्या गावचा सावकार एक बैल



खरीदण्यासाठी वर्धकला बरोबर घेऊन गुरांच्या बाजारात गेला. एक बैल खरीदून त्याला वर्धकच्या ताब्यात देऊन सावकाराने त्याला गावात घेऊन जायला सांगितले.

अजून संध्याकाळ व्हायला भरपूर अवकाश होता. वर्धकला वाटले की सावकार रात्रीपर्यन्त काही घरी पोचणार नाही. आणखी थोडा वेळ आपल्याला इकडे-तिकडे भटकायला हरकत नाही, असे ठरवून तो त्या बैलाला म्हणाला, "तू आपल्या घराकडे जा. मी मागाहून येईन."

बैल चालू लागला. सूर्यास्त झाल्यावर तो घरच्या वाटेला लागला. तो बैल सावकाराच्या घरी तर पोचला होता, पण गोठ्यात जाण्याऐवजी तो बाहेरच पडून राहिलेला होता. वर्धकने त्याला गोठ्यात नेऊन खुंट्याला बांधले अन् थोडा चाराही घातला त्याला.

तो बैल पुढे वर्धकच्या आज्ञेत राहीना, त्याला पाहून बैल शिंगे रोखून त्याच्यावर आक्रमण करू पाही. वर्धक समजून चुकला की आता तो बैल आपल्या मन्त्र-प्रभावाखाली राहिला नसून, दुसऱ्याच कोणाच्या मंत्रप्रभावाखाली येऊन आता असे करत आहे! वर्धकने बाभळीच्या काही डहाळ्या काढून एकत्र बांधल्या अन् त्या झाडूने तो गोठा झाडू लागला. अन् थोड्याच वेळात आवाज आला—"बापरे! मला मारून टाकतोय हा!"

तेथे गोठ्यातच काम करणारा एक नोकर, "अरे थांब! थांब!" असे ओरडत धावत तेथे आला. त्याच्या पाठीतून रक्त वहात होते! वर्धक तर बाभळीच्या झाडूने गोठा झाडत होता, पण त्याचे, फटकारे मात्र त्या नोकरच्या पाठीला टोचत होते!

"का रे, माझ्याशीच स्पर्धा करू पहातोस? पुन्हा कधी या बैलाच्या आसपासही फटकलास नं, तर तुला जिवन्त नाही सोडणार समजलास?" अशी तंबी देऊ वर्धकने त्याला सोडून दिले.

त्या नोकरालाही काही मन्त्रशक्ति अवगत होत्या, पण वर्धकच्या तुलनेत तो कच्चाच होता. वर्धक त्या मानाने मन्त्रशक्तींच्या प्रयोगात खूपच प्रवीण होता.

एकदा त्या गावच्या वडीलधाऱ्या माणसांना अशीच एक घटना पहायला मिळाली होती. त्यांच्या शेतात कापणी झाली, तेंव्हा धान्य पाच-सहा गाड्यात भरून ते शहराकडे पाठवत होते. त्या गाड्यांबरोबर जी दहाबारा माणसे जात होती, त्यांच्यात वर्धकही होता. दुपारच्या वेळी गाड्या एका तळ्याजवळ थांबल्या अन् बैलांना चारा टाकण्यात आला. माणसे स्वतःही जेवूनखाऊन तिथे बसून गप्पा छाटू लागली.

अचानक एक गाडीवाला म्हणाला, "अरे महा, महा! तो कुत्रा कसा धावत येतो आहे!"

सगळ्यांनी पाहिले की इकडे तिकडे कुठेही न पहाता कुत्रा सरळ धावत येत होता. आसपास कोणी चिटपाखरू नव्हते, की एकादा गावही नव्हता. बहुधा तो खूप दुरून आलेला असावा, अन् त्याला अजून खूप दूर जायचे असावे.

त्या कुत्र्याकडे थोडा वेळ विचार करत



पाहून वर्धक म्हणाला-"तो कुत्रा स्वतः होऊन असा जात नाहीये. त्याला कोणीतरी पाठवला असला पाहिजे."

"का बरं कोणी असं पाठवावं?" एकाने विचारले.

"त्याचाच तर पत्ता लावायला हवाय." वर्धक उत्तरला.

वर्धकने नन्तर काय केले कुणास ठाऊक, पण तो कुत्रा जसा काही आत्ताच भानावर आल्यासारखा इकडे तिकडे पाहू लागला. हे सर्व गाडीवान व इतरांना विचित्रसे वाटले. गाड्या पुढे हाकायची ते तयारी करू लागले, तसा वर्धक एकदम म्हणाला, "थांबा जरा, त्या

कुत्र्याची हकिकत जाणून घेऊनच पुढे जाऊ या."

अर्धा तासही झाला नसेल, इतक्यात कुत्रा ज्या बाजूला गेला, त्या बाजूने एक माणूस घोड्यावरून आला व त्याने विचारले, "माझ्या कुत्र्याच्या बाबत कुणी नाक खुपसलं? तुम्ही आपलं काम न पहाता दुसऱ्याच्या भानगडीत का पडता?"

"कुणाला विचारतोयस? तुझ्या कुत्र्याबाबत कोणी दखल दिली?" वर्धकने त्या माणसाला विचारले.

वर्धकबरोबर आणखी बरीच माणसे असल्याने तो घोडेस्वार काहीसा शान्त झाला. नंतर वर्धकने त्याच्या तोंडून खरी हकिकत वदवली. तो माणूस एक पशुवैद्य होता. त्याला काही मन्त्रशक्तीही अवगत होत्या. आसपास आणखी कोणी पशुवैद्य नव्हता. त्याच्या आज्ञेने त्याचा तो कुत्रा एकाद्या जागी जाऊन तेथील एकाद्या जनावराला चावत असे. पिसाळल्या कुत्र्याने चावले असे समजून लोक इलाज करवण्यासाठी आपले जनावर या पशुवैद्याकडेच आणत, किंवा त्याला बोलवून घेत. औषधाच्या नावाने जनावराला काहीतरी पाजून अन् जनावराच्या मालकाकडून मोठीशी रक्कम उकळून तो निघून जाई. खरंच जर पिसाळला कुत्रा चावला तर त्याची चिकित्सा करणं काही सोपं नव्हे. पण त्या पाखंडी वैद्याला त्याच्या कुत्र्याने मात्र "एक अप्रतिम वैद्य" असे नाव मिळवून दिले. कुत्रा पिसाळलेलाच नसल्याने कोणी जनावर मरतही नसे. पण आता मात्र वर्धकमुळे त्या पाखंडी पशुवैद्याचा भ्रमाचा भोपळा फुटला! त्यापुढे मात्र तो असे कुणाला कधी फसवू शकला नाही.





# कूर्मावतार

कृष्णपूरमध्ये कृष्णशास्त्री नावाचा एक पंडित रहात असे. त्याच्या घराच्या परसात एक खूप जुनी अन् खोल अशी विहीर होती. या विहिरीत एक कासव रहात असे. पण ते तेथे असल्याचे मात्र कोणालाच माहीत नव्हते.

कार्तिक महिन्यात रोज कृष्णशास्त्रीच्या परसात त्याच्याकडून पौराणिक कथा ऐकण्यासाठी लोक जमत असत. त्यावेळी त्याच विहिरीतून पाणी काढून त्याने आपले हातपाय धुवून मगच सर्वजण मोठ्या भक्तीने पुराण ऐकायला बसत.

लोक आपसात नेहमीच म्हणत की, "कूपमंडूकासारखं आपलं जीवन व्यर्थ घालवण्यापेक्षा, पंडित माणसांकडून धार्मिक प्रवचनं अन् पुराण ऐकून आपला जन्म धन्य करणं चांगलं."

पण असली बोलणी ऐकून कासवाला मात्र फार वाईट वाटे. त्याला वाटे, "मी विहिरीत रहात असलो, म्हणून एवढ्यासाठी मी काय बेडूक झालो? मीही एक दिवस या विहिरीतून बाहेर पडून आपलं जीवन सार्थक करीन." रोज रोज असा विचार करून विहिरीबाहेर पडायची कासवाची इच्छा तीव्र होत गेली.

एक दिवस त्याची ही इच्छा पूर्ण झाली. कोणीतरी पाणी काढू लागला, तेंव्हा बादलीतून कासव विहिरीबाहेर आले. त्या वेळी कृष्णशास्त्री भक्तांना दशावताराची कथा सांगत होता. कासव बाहेर आले, त्यावेळी नेमकी

कु. धनश्री डिके



कूर्मावताराची कथा चालू होती.

कासव चांगले एका मोठ्या भोपळयाच्या आकाराचे होते. ते पाहून पुराणिकबुवा कृष्णशास्त्री म्हणाला, "अरे वा! ऐन वेळी प्रत्यक्ष भगवान विष्णूच कूर्मावतारात प्रकट झाले म्हणायचे! आपण सर्वजण धन्य झालो!"

हे सर्व पाहून कासव गर्वाने फुलून गेले. खुश होऊन ते विचार करू लागले, "ओहो! मी तर भगवान विष्णूंचा अंश घेऊन जन्मलोय. काय भाग्यशाली मी!" अन् ते त्याच गर्वाने निर्भय होऊन साऱ्या भक्तांकडे प्रेमाने पाहू लागले.

बास! यामुळे काही भक्त इतके खुश झाले, की ते घोषणा देऊ लागले, "देवाची कृपा झाली आमच्यावर! आम्ही धन्य झालो! धन्य, धन्य झालो!"

कृष्णशास्त्रीने आता त्या कासवाला गुलाल, हळद वगैरे लावून अन् दागिने घालून देवघरात बसवले. आरती झाली, नारळ फोडले गेले! फळाफुलांनी कूर्मराजाचे पूजन सुरू झाले. घोषणांनी पूजामन्दिर दुमदुमून गेले.

झाले, त्या दिवसापासून हाच कार्यक्रम सुरू झाला. भेटवस्तु मिळू लागल्या अन् कूर्मराजाचे देऊळ बांधण्यासाठी वर्गणीही गोळा केली जाऊ लागली! कृष्णशास्त्र्याची प्राप्ती वाढली. त्याचा आनन्द गगनात मावेनासा झाला! अशा स्थितीत देऊळ बांधले गेले, तर कासव तिथे रहायला जाईल अन् आपली प्राप्ती बन्द होईल असेही त्याच्या मनात आले. असे होणे त्याला नक्कीच आवडले नाही. त्या रात्री बराच वेळ तो बायकोशी बोलत राहिला.

दुसऱ्या दिवशी कूर्मराज कृष्णशास्त्रीच्या बायकोच्या अंगात आले अन् घुमत घुमत तिच्या तोंडून बोलू लागले, "माझ्या प्रिय भक्तांनो! माझं देऊळ बांधायच्या फन्दात पडू नका तुम्ही! तसं केलंत तर मी आपलं जीवन समाप्त करीन. माझं सांगणं ऐकलंत, तर कल्याण होईल तुमचं!"

कूर्मराजाचेच हे बोलणे, असे मानून भक्तांनी देऊळ बांधायचा विचार रद्द केला. पण हा सारा प्रकार पहाणाऱ्या कासवाला मात्र कृष्णशास्त्र्याच्या या नाटकाचा भारीच राग आला.

कासवाला नमस्कार करून कृष्णशास्त्री म्हणाला, "हे कासवा! विहीरी बाहेर आल्यापासनं तुझा अन् माझा वेळ मजेत चाललाय नं? तू असाच माझ्या घरात सोन्या चान्दीचा वर्षाव करत रहा. मी तुझ्यासाठी सोन्याचे दागिने घडवून घालीन तुला."

कासवाला काही हे बोलणे आवडले नाही. त्याच्या मनात आले की ही माणसे आपल्या स्वार्थासाठी दुसऱ्यांना फसवायलाही मागेपुढे पहात नाहीत. माणसांचा त्याला इतका राग आला की आपले विहीरीतलेच जीवन बरे, असे त्याला वाटू लागले.

थोड्याच दिवसात कासवामुळे मिळालेल्या प्राप्तीतून कृष्णशास्त्रीने चार एकरांचे शेत व आणखी दोन घरे खरेदी केली. यामुळे काही लोकांना त्याचा हेवा वाटू लागून त्यांनी आपल्या प्राप्तीचा सारा हिशोब कृष्णशास्त्रीने द्यावा अशी मागणी केली. आता मात्र कृष्णशास्त्रीने कासवाला गावाबाहेर घेऊन जाऊन एका तलावात सोडून दिले अन् पुन्हा दुसऱ्या दिवशी त्याच्या बायकोच्या अंगात आले! कूर्मराज तिच्या तोंडून बोलू लागले. "मी कूर्मावतार बोलत आहे! तुमच्यातला हेवादावा पाहून मला फार दुःख झालंय. तुम्ही आपसात गुण्यागोविन्दाने राहू लागलात, तरच मी पुन्हा तुम्हाला दर्शन देईन."

हे ऐकून लोकांना पुन्हा पूर्वीसारखाच कृष्णशास्त्रीबद्दल आदर वाटू लागला.





# राजपुत्र-प्रधानपुत्र

पुष्करावती राज्यावर राज्य करणाऱ्या राजा प्रमोद वर्माला एकच पुत्र होता. प्रमोदवर्माचा प्रधान सुनीतिचन्द्र यालाही एकच पुत्र होता. राजपुत्र व प्रधानपुत्र दोघेही एकाच वयाचे होते. दोघांच्यात अतूट मैत्री होती अन् त्यांचे एकमे-वर प्राणापेक्षाही अधिक प्रेम होते. इतकेच नव्हे, तर जणू काही एकाच मातेच्या पोटी जन्म झाला असावा असे वाटण्याइतके दिसायला सारखे होते, भाऊभाऊच वाटत ते.

राजपुत्राचा विवाह आनन्दपूरच्या राजकुमारीशी होणार होता. त्या विवाहासाठी राजपुत्र आपल्या परिवारासह आनन्दपुरकडे निघाला. बरोबर अर्थात प्रधानपुत्र होताच. संध्याकाळपर्यंत हे वऱ्हाड इक्षुमति नदीच्या किनारी पोचले अन् तेथेच विश्रान्तीसाठी थांबले. भोजनानन्तर राजपुत्राने आपल्या आजीला गोष्ट सांगायला सांगितले. आजी एक गोष्ट सांगू लागली, परन्तु राजपुत्राला मात्र मधेच झोप लागली. त्यामुळे आजीने आपली गोष्ट मधेच थांबवली.

प्रधानपुत्राला मात्र अजून झोप आलेली नव्हती. इतक्यात त्याला कुठूनसे काही बोलणे ऐकू येऊ लागले. त्याला दिसले की आकाशात कांही देवकन्या आपसात बोलत होत्या प्रधानपुत्र ते बोलणे, लक्षपूर्वक ऐकू लागला.

गोष्ट मधेच थांबल्याने नाराज झालेल्या त्या देवकन्यांपैकी एक म्हणाली, "या मूर्खाने गोष्ट शेवटपर्यन्त ऐकू दिली नाही. मधेच झोपून गेला. म्हणून मी त्याला शाप देते. मी आता हा चन्द्रहार खाली टाकते. सकाळी उठल्याबरोबर राजपुत्र तो अुचलू पाहील. त्याचा स्पर्श झाल्याबरोबर राजपुत्र मृत्यु पावेल."

"यातूनही जर तो चुकून वाचला,तर तो जेंव्हा नवरीच्या शयनकक्षात प्रवेश करू पाहील, तेंव्हा तिथलं सिंहद्वार कोसळून त्याखाली राजपुत्र चिरडून मरेल." दूसरी देवकन्या म्हणाली.

लगेच घाईने तिसरी बोलू लागली, "नशिबाने या दोन्ही संकटातून तो वाचला, तर तो जेंव्हा शयनकक्षात जाईल, तेंव्हा त्याला शंभर शिंका येतील. तेथे कोणी प्रत्येक शिंकेच्या वेळी "आयुष्यमान् भव" असा आशिर्वाद देईल तर ठीक आहे, अन्यथा राजपुत्र मरेल."

इतक्यात सावधगिरी म्हणून एक देवकन्या म्हणाली, "आपलं बोलणं ए`कून जर ते कोणी राजपुत्राला सांगेल, तर तो सांगणाराच ताबडतोब मरून पडेल."

असे शाप देऊन त्या साऱ्या देवकन्या तेथून निघून गेल्या. प्रधानपुत्राने झोपल्याचे सोंग करुन त्यांचे सारे बोलणे नीट ऐकले होते. तो बिचारा विचारात पडला, 'राजपुत्राचा मृत्यु झाला, तर मी तरी कसा जगू शकेन?' पण हे सारं त्याला सांगून स्वत:चे मरणही ओढवून कसे घ्यावे?



सकाळी अुठताच राजपुत्राला तो चन्द्रहार दृष्टीस पडला. तो अुचलण्यासाठी तो पुढे होताच त्याला अडवत प्रधानपुत्र म्हणाला, "अरे, हात नको लावूस त्या चन्द्रहाराला. कसला जादूबिदूचा हार असला पाहिजे तो. नाहीतर इतक्या वेळात तो एकाद्या शिपायाच्या हाती कसा नाही लागला?" त्याचे सांगणे मानून राजपुत्राने हाराला हातही लावला नाही. एक धोका टळला. सर्वजण तेथून पुढे निघाले.

आता सर्व वऱ्हाडासह राजपुत्र व प्रधानपुत्र आनन्दपुरच्या राजवाड्यात

(२४ वर्षांपूर्वी चान्दोबात प्रकाशित झालेली गोष्ट)

प्रवेश करण्यासाठी पुढे होणार इतक्यात प्रधान पुत्राने राजपुत्राचा हात धरून त्याला मागे ओढले, अन् काय आश्चर्य! एकाएकी त्यांच्या पुढ्यातले सिंहद्वार कड्कड् आवाज करत खाली कोसळले! राजपुत्र अगदी थोडक्यात वाचला! त्याने प्रधानपुत्राजवळ आपली कृतज्ञता व्यक्त केली.

राजपुत्राचा विवाह पार पडला. त्या रात्री प्रधानपुत्र अगोदरच शयनकक्षातील हंसतूलिकेखाली लपून बसला. राजकुमार येऊन त्यावर बसताच अचानक त्याला शिंका येऊ लागल्या. प्रत्येक वेळी पलंगाखालून प्रधानपुत्र 'आयुष्यमान् भव' असा आशिर्वाद देत राहिला. बरोबर शंभर शिंका आल्या राजपुत्राला! त्याच्या शिंका थांबल्याबरोबर प्रधानपुत्र लपल्या जागेतून बाहेर आला व चुपचाप शयनकक्षाबाहेर जाऊ लागला. परंतु प्रधानपुत्राला आपल्या शयनकक्षात असा लपलेला पाहून राजपुत्राला त्याचा अतिशय राग आला व शिपायांना बोलावून त्याने त्याला कैद करवले, अन् ताबडतोब आज्ञाही दिली की प्रधानपुत्राला फाशी दिले जावे!

दुसऱ्या दिवशी फाशीची तयारी झाली. तेंव्हा प्रधानपुत्राने एकवार राजपुत्राला भेटायची इच्छा व्यक्त केली.

राजपुत्राच्या परवानगीने प्रधानपुत्राला त्याच्यापुढे आणून उभे केले गेले. प्रधानपुत्राने राजपुत्राला सारी हकिकत सांगून टाकली. सिंहद्वार तर अकारणच कोसळलेले सर्वांनी पाहिलेलेच होते. त्यामुळे त्याच्या सांगण्यावर सर्वांचा विश्वास बसला.

आपण प्रधानपुत्राच्या बाबत अतावळेपणाने असा निर्णय घेतल्याबद्दल राजपुत्राने त्याची माफी मागितली अन् प्रेमाने त्याला गळामिठी मारली. दोघेही पूर्ववत् मित्र बनून गेले.



बहुरूपा वसुन्धरा

## विषारी बेडूक



दक्षिण आफ्रिकेतील जंगलात काही गमतीदार रंगाचे सुन्दरसे बेडूक आढळतात. परन्तु यांची शरीरे मोठी विषारी असतात. जास्त करून हे बेडूक लाल व पिवळ्या रंगांचे असून त्यावर काळे ठिपके किंवा रेषा असतात. आपल्या या रंगांमुळे आसपासच्या निसर्गात एकवटून जाऊन शत्रूपासून त्यांचे आपोआपच संरक्षण होते. यांच्या शरीराच्या कातडीखाली असलेले विष काढून तेथील जंगली लोक आपल्या बाणांच्या टोकांना लावतात अनु शिकार करतात. असा बाण लागलेला प्राणी पुढे चालूच शकत नाही. तावडतोब तो बेशुद्ध होऊन खाली पडतो!

## माशांची श्वसनक्रिया



पोहणाऱ्या माणसांना श्वास घेण्यासाठी पाण्यावर यावे लागते. पण माशांना तशी गरज भासत नाही. पाण्यातून प्राणवायु अलग करणारे 'गिल्स' नावाचे एक खास असे श्वसनेंद्रिय त्यांच्या शरीरावर असते. मासे प्रथम तोंडाने पाणी आत घेऊन ते गिल्सकडे पाठवतात. तेथून त्यातला प्राणवायु तेवढा काढून घेऊन, बाकीचे पाणी त्याच्या कल्यातून बाहेर टाकले जाते. गिल्सला जोडलेल्या नलिकेतून प्राणवायु रक्तात शोषला जातो.

## अतिप्राचीन



चार वर्षांपूर्वी ऑस्ट्रेलियात मेलबोर्नजवळ एक सकोशबीज शिलाखंडवृत्त (Fossil of angiosperm) सापडले. अमेरिकेतील येल विश्वविद्यालयात अनेक शास्त्रज्ञांनी त्याची तपासणी करून असा विचार प्रकट केला की हे शिलाखंडवृत्त बारा कोटी वर्षांपूर्वीचे आहे! मिरीच्या वेला प्रमाणे दिसणाऱ्या "कूर्लवर्री" नावाच्या रोपाचे हे शिला वृत्तखंड असून, त्याचे अेक फूल व दोन पानेही यावर दिसून येत आहेत.



















# दोन नवे देश

ता. ३१ डिसेंबरच्या मध्य-रात्री गत वर्षाला निरोप देऊन नवीन वर्षाच्या स्वागतासाठी जगात सर्वत्र घंटा वाजल्या. ठीक याच वेळी 'प्राग' व 'ब्राटिस्लावा' मध्ये झेक व स्लोवाकिया या दोन नवीन देशांच्या निर्मितीची घोषणा करण्यात आली. या दोन नवीन रिपब्लिकांच्या निर्मितीमुळे जगाच्या नकाशावरील 'झेकोस्लोवाकिया' नावाचा देश लुप्त झाला. वीस दिवसांनंतर या दोन्ही देशांना संयुक्त राष्ट्रसंघाचे सभासदत्व मिळाले. हे दोन धरून आता संयुक्त राष्ट्रसंघाच्या सभासद-देशांची संख्या १८० झाली.

सन १९१५ मध्ये आस्ट्रियाच्या साम्राज्याचे पतन झाल्यावर झेकोस्लोवाकिया देशाचा जन्म झाला. त्या काळी आस्ट्रियाच्या वर्चस्वाखाली असलेली राज्ये बोहमिया, मोराविया, सायलीशिया व रुथेनियाचा काही भाग मिळून एक नवीन देश तेव्हा बनला. या देशाचे नेतृत्व थॉमस गॅरिक मजारिक आणि एडवर्ड बेन्स यांनी केले. गॅरिक मजारिक पहिले अध्यक्ष बनले व सन १९३५ पर्यंत त्यांनी ही जबाबदारी संभाळली. त्यांच्या नंतर बेन्स अध्यक्ष झाले.

त्या काळी आपल्या महत्त्वाकांक्षी राज्य-विस्ताराच्या योजनेत अडॉल्फ हिटलरने सन १९३५ मध्ये 'सुडेटन लंड'या प्रांतावर कब्जा केला. पुढील वर्षी त्याने पोलंडवर हल्ला केला आणि दुसरं महायुद्ध सुरु होण्यापूर्वीच त्याने संपूर्ण झेकोस्लोवाकियावर ही हल्ला चढविला. बेन्स लंडनला गेले आणि त्यांनी आपले प्रवासी सरकार स्थापन केले.

सन १९४५ मध्ये दोस्त राष्ट्रांनी नाझी जर्मनीचा पराभव केला. आणि दुसऱ्या महायुद्धाच्या शेवटी झेकोस्लोवाकिया सोवियत संघात सामिल झाला. सन १९४८ मध्ये अंतोतिन नोवोत्नीच्या नेतृत्वाखाली येथे कम्यूनिस्ट राजवट सुरु झाली. युद्धजन्य परिस्थितीमुळे देशाची आर्थिक स्थिति खालावली होती. तीत सुधारणा करण्यासाठी लोकांनी उदार नीति अवलंबिली. नोवोत्नी यांच्या हातून अधिकारसूत्रे काढून घेण्यात आली आणि अलेक्झांडर ड्यूब्सेक यांच्या नेतृत्वाखाली सन १९६८ मध्ये सुधारणावादी सरकार स्थापन झाले. तथापि सुधारणावाद्यांचे उग्र सुधार लोकांना आवडले नाहीत. यानंतर यु.एस्.एस्.आर्. ने वार्सा तहांतर्गत झेकोस्लोवाकियावर आक्रमण केले




आणि ड्यूब्सेक यांनी राजिनामा दिला. यानंतर युरोपीय देशात झालेले कित्येक बदल आपण पहातच आलो आहोत.

झेकोस्लोवाकियाच्या जनतेत दोन-तृतीयांश झेक आहेत व बाकीचे लोक आहेत-स्लोवाक, जर्मन, पोल, हंगेरियन व अन्य अल्प-संख्यक. अधिक संख्यावाल्यांच्या नियंत्रणाखाली कुचंबलेल्या अल्पसंख्यकांची आपले स्वतंत्र राज्य असावे अशी इच्छा होती. १७ जुलई १९९२ रोजी स्लोवाक रिपब्लिकने आपल्या स्वतंत्र राज्याची घोषणा केली. परंतु अधिक संख्यावाल्या स्लोवाकांना हे विभाजन मान्य नव्हते. म्हणून दोन्ही रिपब्लिकांनी सार्वमताचा अंतिम निर्णय घेतला. परंतु राष्ट्रीय संसदेने नोव्हेंबर मध्ये हा निर्णय फेटाळून लावला. तसेच झकोस्लोवाक फेडरेशन रद्द करण्यासाठी घटनेत काही सुधारणा करण्याची फेडरल संसदेकडे मागणी केली. फेडरल संसदेने विभाजन मान्य केले आणि अशा रीतीने नव्या वर्षाच्या प्रारंभी दोन नवीन देशांचा जन्म झाला.

१५ जानेवारी रोजी 'प्राग' व 'ब्राटिस्लावा' येथून तेथील विदेश-मंत्री न्यूयॉर्कला गेले व त्यांनी संयुक्त राष्ट्रांकडे सभासदत्वाचा अर्ज सादर केला. सभासदत्व मिळाल्यावर मिलान नाज्को म्हणाले-"या महान दिवशी स्लोवाकियाच्या इतिहासाचा नवा अध्याय सुरू होत आहे", तर जोसेफ जिलेनिक म्हणाले-"मानवी अधिकार व स्वतंत्रतेच्या मौलिक सिद्धांतांचे जतने करण्यासाठी झेक रिपब्लिक सर्वतोपरी प्रयत्नशील राहील."



# नारायण आणि नारळ

बलभद्र नावाच्या तरुणाचे गुरुकुलातले शिक्षण पूर्ण झाले आणि तो परत आपल्या गावी रहायला गेला. त्याचे वडीलही चांगले विद्वान होते. आपली शेती करता करता, ते काही लेखनही करत असत. बलभद्र परत आल्यावर त्यांनी त्याला सुचवले की, त्याने आपल्याबरोबरच राहून लेखन कामात आपल्याला मदत करावी. बलभद्रचे वडील काही संस्कृत ग्रंथांचे हिन्दी भाषांतर करून ते शहरातील जमीनदाराकडे पाठवत असत.

हे भाषांतराचे काम बलभद्रला खूप आवडले. त्याच्या मदतीमुळे काम भरभर होऊ लागले. त्याच्या वडिलांनी हंसपुराण नावाच्या ग्रंथाचे भाषांतर पूर्ण केले व ते बलभद्रला म्हणाले, "बेटा, हे भाषांतर जमीनदारकडे घेऊन जा.

तो ग्रन्थ घेऊन बलभद्र शहराकडे निघाला. वाटेत त्याला एक माणूस भेटला. तो म्हणाला, "अरे, बलभद्रच ना तू? कुठेतरी निघालेला दिसतोयस?"

त्या माणसाच्या प्रश्नांची उत्तरे तर बलभद्रने दिली; पण तो माणूस कोण, हे काही त्याच्या लक्षात येईना! त्या माणसाने ही गोष्ट बरोबर हेरून म्हटले, "अरे विसरलास होय? मी नारायण!?"

आता बलभद्रला बरोबर आठवले. त्या दिवसात नारायण लहान मुलांना एकत्र करून त्यांना छान-छान गोष्टी सांगायचा. पण गोष्ट चालू असतानाच कुठूनशी त्याची बायको येऊन त्याला रागावे आणि मुलांना तेथून हाकून लावी. पण पुन्हा त्यांना एकत्र करून नारायण गोष्ट पुरी करी. गोष्ट मधे कुठे थांबली होती, हे मुलांपेक्षा नारायणच्याच लक्षात असे.

सुनंदा ठाकुर



नारायण यावर हसून म्हणाला, "ठीक आहे, सोडून दे रे! बरं, तू उद्या संध्याकाळपर्यन्त परत येणार असशील, तर माझ्यासाठी एक नारळ आण शहरातून! परवा सकाळी पूजेच्या वेळी देवळात नारळ फोडायचाय मला. आपल्या गावात चांगले नारळच मिळत नाहीत!"

"तुमच्यासाठी उद्या संध्याकाळी नक्की आणीन मी एक नारळ. खात्री बाळगा." बलभद्र म्हणाला.

तरीही नारायण पुन्हा म्हणाला, "विसरू नको हं! या गावात मी कुणाला काही करायला सांगितलं, की नुसतेच मुंडी हलवतात सर्वजण. पण करत मात्र नाही कुणीसुध्दा! निदान तू तरी त्यांच्यासारखा नसशील अशी आशा आहे मला!"

बलभद्रने हसून त्याला वचन दिले की, उद्या त्याला नारळ नक्कीच मिळेल. नन्तर संध्याकाळपर्यन्त शहरात पोचून त्याने ग्रन्थ जमीनदाराच्या हाती दिला. हंसपुराणाचे ते भाषान्तर पाहून जमीनदाराने आश्चर्याने विचारले, "अरे! हा अनुवाद इतक्या लवकर करणं कसं शक्य झालं?"

बलभद्रने आपले गुरुकुलातले शिक्षण व नन्तर आपण आपल्या पित्याला त्याच्या भाषान्तरासाठी करत असलेली मदत वगैरेबद्दल जमीनदाराला सांगितले. तेव्हा जमीनदाराने त्याला एक श्लोक म्हणून दाखवला व त्याचा अर्थ विचारला. बलभद्रने जमीनदाराला म्हटले की या संस्कृत श्लोकाचे एकच नव्हे, तर अनेक अर्थ होतात; आणि त्याने श्लोकाचे एकूण अठरा अर्थ सांगितले.

ते सारे ऐकून जमीनदार फारच आश्चर्यचकित झाला व तो म्हणाला, "तू तर असामान्य असा पंडित आहेस इथे तू चार दिवस राहिलास, तर मी इथे एक पंडितसभा बोलावू म्हणतो."

बलभद्रला एकदम नारायणच्या नारळाची आठवण झाली. पण ती गोष्ट जमीनदाराला कशी सांगावी हे त्याला कळेना. त्याने तर नारायणला वचन दिले होते, व आपल्यामुळे त्याच्या भक्तीत बाधा येऊ नये अशी बलभद्रची इच्छा होती. पण केवळ एका नारळासाठी जमीनदारची इच्छा डावलणेही इष्ट झाले नसते, असा विचार करून त्याने एक कल्पना लढवली.

"महाराज, माझी आजी सध्या आजारी आहे. तिच्यासाठी औषध घेऊन मला उद्या संध्याकाळी आपल्या घरी पोचायला हवं." बलभद्रने जमीनदाराला खोटेच सांगितले.

"बास, इतकंच? औषध कोणते सांग मला, म्हणजे मी ते आपल्या माणसाकरवी पाठवीन तुझ्या घरी." जमीनदार पटकन म्हणाला.

आता मात्र बलभद्र गडबडला; तो म्हणाला, "महाराज, माझ्या आजीचा आजार तसा बराचसा मानसिक आहे. माझ्या तिथल्या गैरहजेरीमुळे ती माझ्यासाठी चिंतित आहे. त्यामुळे तिच्या जवळ राहून तिला मी स्वतःच औषध पाजलं पाहिजे, तोपर्यन्त नुसत्याच औषधाचा काही उपयोग होणार नाही, असं वैद्याचं म्हणणं आहे."

जमीनदार यावर काहीच बोलू शकेना. त्याने फक्त त्या रात्री आपल्याच घरी आराम करून दुसऱ्या दिवशी आपल्या घरी जाण्याबद्दल बलभद्रला सुचवले





आणि त्याच्या रहाण्याची व खाण्यापिण्याची सारी व्यवस्था केली.

त्या रात्री विश्रान्ती घेतल्यानन्तर दुसऱ्या दिवशी सकाळी बलभद्र नारळ खरेदी करण्यासाठी बाजारात गेला. परन्तु त्याच दिवशी कोणा नारळवाल्याचे निधन झाल्यामुळे नारळाची सगळी दुकाने बन्द होती. त्याला नारळ खरेदी न करताच परत यावे लागले.

परत घरी आल्यावर जमीनदाराच्या स्वयंपाक्याला त्याने नारळाबद्दल विचारले. स्वयंपाकी म्हणाला, "इथं पोतंभर नारळ आहेत; पण जमीनदाराच्या परवानगीशिवाय मी कोणाला काही देऊ शकत नाही. तू जमीनदाराकडे मागणंही बरं दिसणार नाही, मोठ्या माणसांकडे अशा क्षुल्लक गोष्टी मागू नयेत."

तरीही नारायणला दिलेले वचन बलभद्रचा पिच्छा सोडत नव्हते. शेवटी जमीनदाराकडे जाऊन तो म्हणाला, "माझ्या आजीला नारळाचं खोबरं फार आवडतं. अन् बाजारात तर मला आज नारळच मिळू शकला नाही."

"अरे, इतक्या क्षुल्लक गोष्टीची मागणी करावी लागली तुला माझ्याकडे?" असे म्हणून जमीनदाराने चार नारळ व दहा हजार अशर्फ्या देऊन बलभद्रला रवाना केले.

बलभद्र आपल्या गावी पोचला, तेंव्हा रात्र झाली होती. रक्कम पित्याला देऊन त्याने शहरात काय काय घडले याबद्दल सारा वृत्तान्त कथन केला. तेव्हा वडील त्याला म्हणाले, "जमीनदारांनी आजपर्यन्त कोणत्याही ग्रन्थाची इतकी मोठी रक्कम कोणालाच दिली नाही. ते तुझ्यावर फारच खूष झालेले दिसतायत. पंडित सभेत भाग घेतला असतास, तर त्यांनी तुला नक्कीच एक लाख अशर्फ्या दिल्या असत्या. तू केलंस, ते काही बरं नाही केलंस."

"पण गुरुकुलात आम्हाला शिकवलं होतं की, धनापेक्षा वचनाचं महत्त्व अधिक असतं." बलभद्र म्हणाला, "आपल्याला जे धन मिळणं नशिबात असतं, ते आपोआप चालून आपल्याकडे येतं."

तेव्हा वडील त्याला म्हणाले, "पण हे सारं तू नारायणसारख्या माणसासाठी बोलतोयस, हे मला खटकतंय. तुला प्रथम ही गोष्ट समजून घ्यायला हवी की— आपल्याला जी कामं करायची, त्यातली महत्त्वाची कोणती व कोणती बिनमहत्वाची! ते जमलं नाही तर तुझ्या जीवनात अडचणींचे डोंगरच उभे रहातील."

बलभद्र थोडा वेळ नारायणच्या घराच्या कट्ट्यावर बसून राहिला; पण बराच वेळ नारायण न आल्याने, आपण नारळ आणल्याबद्दल एक चिट्ठी लिहून ती कुलुपाला अडकवून बलभद्र निघून गेला.

दुसऱ्या दिवशी सकाळीही नारळ घेऊन तो नारायणकडे गेला आणि पुन्हा कुलूप पाहून तो मन्दिरात गेला. तेथेही नारायण न आल्याचे कळल्याने त्याने पुजाऱ्याजवळ त्याच्यासाठी निरोप ठेवला.

पुन्हा दुपारीही नारायणला नारळ द्यायचा विचार करून बलभद्र ऐन दुपारच्या कडक उन्हातून त्याच्याकडे गेला. नारायण घरात कसलेसे पुस्तक वाचत बसलेला होता. बलभद्र आलेला पाहून, तो चिडून म्हणाला, "मला कोणी



मुकाट्याने वाचूही देत नाही. बोल काय हवंय तुला?"

"तुमच्याकरता मी नारळ घेऊन काल रात्री आलो होतो, नंतर पुन्हा सकाळी आलो, अन् आत्ता पुन्हा आलो. तुम्ही कुठं परगावी गेला होता का?" बलभद्रने विचारले.

"पर गांव? नाहीतर! इथे येणारांचा त्रास चुकवावा, म्हणून मी पुढील दारी कुलूप घालून, पुन्हा मागल्या दाराने आत येऊन बसतो." नारायण उत्तरला.

"ओहो, असं होय? मग आज सकाळी तुम्ही देवापुढे नारळ नाही फोडलात?" बलभद्रने विचारले.

"नारळ फोडणं काही फारसं महत्त्वाचं नव्हे; असेल जवळ तर फोडतो मी, नाहीतर नाही! सध्या माझी तब्येत बरोबर नाहीय. वैद्यानं सांगितलंय की मी रोज अुग्रभस्म खावं. तू कधी शहरात गेलास, तर आण हं अुग्रभस्म माझ्यासाठी!"

बलबद्रच्या हातातला नारळ पाहूनही नारायण त्याबद्दल काही बोलला नाही, तेंव्हा जरा रागावूनच त्याने नारायणच्या समोर नारळ ठेवून तो आणण्यासाठी आपल्याला कसा त्रास सोसावा लागला याचे वर्णन केले.

तेव्हा नारायण म्हणाला, "अरे मी विसराळू नाहीये पोरा! पण मी म्हटलं, अन् कुणी काही आणलं असं तुझ्याच बाबतीत घडतंय. तू नारळ आणलास, याचं आश्चर्यच वाटतंय मला! झालं ते झालं! विसरून जा तू! पण अुग्रभस्म मात्र माझ्यासाठी आणू नकोस हं! अन् दुसऱ्या कुणाला आणायलाही सांगू नकोस; कारण फार महाग आहे ते."

हे ऐकून बलभद्र चक्रावूनच गेला! पित्याच्या बोलण्याचे सत्य त्याच्या लक्षात आले; अन् तो योग्य-अयोग्य कामे ओळखण्याची बुद्धि मिळवण्याच्या प्रयत्नाला लागला.





# माया महाल

## १२

(जादूमहालातून बाहेर पडून युवराणी विद्यावती व महेन्द्रनाथ संध्याकाळपर्यन्त मुनीच्या झोपडीत पोचले. त्यांना पाहून मुनीला फार आनन्द वाटला व त्याने आपली आत्मकहाणी त्या दोघांना सांगितली. मुनी हा आपला काका जितेन्द्रनाथच आहे, हे महेन्द्रला समजले व त्याचवेळी राजकुमारी विद्यावतीलाही कळून चुकले की महेन्द्रनाथ हा कोणी सामान्य घरातला तरूण नसून तो एक राजपुत्रच आहे. महेन्द्र व विद्यावती मुनिवेष धारण करून मुनीबरोबर वीरगिरीकडे निघाले.—पुढे वाचा.)

युवराणी नाहीशी होऊन दोन आठवडे लोटले, तरी तिचा काहीच पत्ता न लागल्याने राजा-राणी फार चिंतेत होते.

तेथेच अुपस्थित असलेल्या सेनापति वाचस्पतीला विचारले, "आचार्य! आचार्य जगत्पतीने अन्य ज्योतिष्यांशी कोणत्या विषयाबद्दल चर्चा केली याबद्दल आपणाला काही कळले का?"

"अजूनपर्यन्त काहीच कळलं नाही महाराज! पण विशेष म्हणजे युवराणीच्या कुंडलीप्रमाणे आता तिचा शुभकाल सुरू होत आहे. माझ्या अंदाजाप्रमाणे तिच्या ग्रहांच्या प्रभावाने ती आता राजधानीत पोचायला हवी." आचार्य वाचस्पती संतोषाने म्हणाला.

"आपण तर मोठाच शुभसमाचार सांगितलात!" महाराणी वज्रेश्वरी देवी



बोलली. तिचा गळा भरून आलेला होता.

अग्रसेन तेथून बाहेर जायला निघाला. इतक्यात एक शिपाई समोरून येत असलेला दिसला. तो म्हणाला. "आत्ताच एक पालखी येअून राजवाड्यासमोर थांबलीय. तिच्याबरोबर तीन घोडेस्वारही आहेत. त्यांच्यातला एक आत्ताच महाराजांना भेटायचं म्हणतोय."

"असं? त्यानं आपलं नाव काय सांगितलंय?" सेनापती अग्रसेनने सावधगिरी दाखवत विचारले.

"काहीच नाही सांगितलं मालक!"

"ठीक आहे. पण पालखीत कोण आहे?" अग्रसेनने पुढे चौकशी केली.

"मालक! पालखीवर पडदा आहे!" शिपाई म्हणाला.

"हं! ठीक. तू जा आता. मी आलोच." असं म्हणून सेनापति पुन्हा राजाच्या कक्षात आला. त्याने पालखी व घोडेस्वारांबद्दल सांगितले. महाराणी राजाला अुतावीळपणे म्हणाली. "प्रभु, त्या पालखीत आपलीच विद्यावती असू शकेल! बरोबरचा घोडेस्वार कुणी राजकुमार असेल. चला, आपण आताच जाअून पाहू या."

पण काही विचार करत राजा म्हणाला, "पालखीत आपलीच बेटी असेल तर आतापर्यन्त तिथेच कशी थांबली असती? राजवाडा तिला नवा नव्हे!" तरीही पोटच्या अुत्सुकतेमुळे राजा जागचा अुठला. तिघेही राजवाडयाच्या प्रवेशद्वारी पोचले, तेंव्हा एक पालखी खाली अुतरवली जात होती; अन् तिघांपैकी एका घोडेस्वाराने पुढे होअून राजाला नमस्कार केला.

घोडेस्वार म्हणाला, "हिमगिरी राज्यावर राज्य केलेल्या राजा त्रिलोकपतीचा नातू मी!" हे सांगताना त्याच्या चेहऱ्यावर राजेशाही ऐट दिसत होती.

"हिमगिरीचा राजा तर अुमापति न?" संशयाने राजाने विचारले.

"होय महाराज! त्या अुमापतीने राजा त्रिलोकपतीला पदच्युत करून ते सिंहासन बळकावले आहे. मी त्रिलोकपतीचा धाकटा भाअू कैलासपती याचा मुलगा आहे. त्यावेळी माझे आजोबा, माझे वडील गजपती अन् मीही राज्य सोडून हिमगिरीबाहेर पडलो होतो. माझं नाव जगत्पती आहे. घोडेस्वार ऐटीत बोलला. 'जगत्पती' हे नाव ऐकताच राजा व आचार्य वाचस्पती दचकले व एकमेकांकडे पाहू लागले. अग्रसेनचा हात लगेच आपल्या तलवारीच्या मुठीवर गेला.

"मी आपणासाठी एक चांगली बातमी आणलीय महाराज! आपली कन्या विद्यावती हिला वाचवून मी इथे बरोबर आणलीय. विद्यावती याच पालखीत आहे." पालखीकडे इशारा करत जगत्पती म्हणाला.

"काय? माझी बाळी पालखीत आहे?" एक पाय पुढे टाकत राणीने विचारले.

परन्तु आपल्या नजरेनेच तिला थांबवत राजा त्या घोडेस्वार जगत्पतीला म्हणाला, "असं? पण पालखीत खरोखरच जर विद्यावती असेल, तर



अजून पालखीतून अुतरून ती धावत आमच्याकडे का नाही आली? तिची तब्येत तर बरी आहे ना?"

"होय महाराज, छान आहे की! आताच तिला पालखीबाहेर यायला सांगतो मी." जगत्पती म्हणाला, अन् पालखीचा पडदा दूर करत तो म्हणाला. "आता बाहेर ये राजकुमारी! तुझे आईवडील तुझी वाट पहात आहेत." असे म्हणून जगत्पती राजदम्पतीजवळ गेला.

पडदा बाजूला सारून मालिनी पालखीबाहेर आली अन् भिअून चहूकडे पाहू लागली.



'दुरून पाहून तर ही आपल्या मुलीसारखीच दिसतेय, मग तिला इतकी भीती कसली वाटतेय?' राजदम्पतीच्या मनात आले. इतक्यात सेनापती अुग्रसेन झडप घालून जगत्पतीजवळ आला आणि त्याचे मनगट पकडून तीक्ष्ण स्वरात विचारले, "ही तरुणी विद्यावती नव्हेच! तुझ्याकडून चूक झाली असावीसं वाटतंय!"

"नाही, ती युवराणी विद्यावतीच आहे, यात शंकाच नाही." अत्यंत बेपर्वाईने जगत्पती म्हणाला.

"हे तू कसं सांगू शकतोस? तू कधी राजकुमारी विद्यावतीला पाहिलयस?" सेनापतीने दरडावून विचारले.

या प्रश्नाचे सरळ अुत्तर न देता जगत्पती म्हणाला, "मी हिला दुष्टांच्या तडाख्यातून वाचवलंय. तिच्यावर जोपर्यन्त दुष्ट ग्रहांचा प्रभाव होता, तोपर्यन्त मी तिचं रक्षण केलं अन् आता तिला घेअून आलोय मी."

"युवराणीवर दुष्ट ग्रहांचा प्रभाव आहे, हे तुला कसं कळलं?" आता आचार्य वाचस्पतीने पुढे येत जगत्पतीला विचारले व त्याने जगत्पतीचा दुसरा हात घट्ट पकडला.

"ती गोष्ट मला ज्योतिष्यांकडून कळली." जगत्पती अुत्तरला. कृतघ्नता! युवराणीची ग्रहस्थिति जाणून घेअून तूच तिचं अपहरण करून तिला लपवून ठेवलंस! अन् नन्तर तिला महाराजांकडे परत आणून सोडण्यासाठी चांगला मुहूर्त पहाण्यासाठीच तू ज्योतिषी-पंडितांशी चर्चा केलीस-होय ना? अरे दुष्टा जगत्पती! आता तुझं पितळ अुघडं पडलंय. मीही तुझ्या कह्यात गेलो होतो. म्हणून मला आता शरम वाटतेय." असे म्हणून आचार्य वाचस्पतीने जगत्पतीचा हात सोडून दिला.

इतक्यात जगत्पतीने आपल्या गळ्यातल्या माळेचा ताईत घट्ट पकडला.



दुसऱ्याच क्षणी तेथे काहीतरी चमकले व धूर निघू लागला. त्या धुरातच एक झटका देऊन सेनापतीच्या पकडीतून आपला हात सोडवून घेतला अन् तो महालाबाहेर पळाला.

जगत्पती मुख्य द्वारापर्यन्त पोचला अन् तो घोड्यावर झेप घेणार इतक्यात तेथे पोचणाऱ्या महेन्द्रची त्याच्यावर दृष्टी गेली. महेन्द्रला वाटले की कोणी चोर अचक्का रत्नमाला घेऊन पळून चालला आहे, आणि त्याने जगत्पतीला रोखले. त्याला पकडून महेन्द्रने त्याला घोड्यावरून खाली ढकलले. त्याची पगडी पडली व त्याच्या हातची रत्नमाला महेन्द्रने ताईतासह पकडली. महेन्द्र त्याला म्हणाला. "तुझा खेळ आता खलास झालाय समज!"

इतक्यात राजदम्पती व वाचस्पती तेथे येऊन पोचले. राजाने आज्ञा दिली. "त्या दुष्टाला पकडून हात बांधून टाका त्याचे."

शिपाई तेथे आले व त्यांनी जगत्पतीला पकडून बांधून टाकले. त्याच वेळी सेनापतीने महेन्द्रनाथला ओळखून म्हटले, "अरे महेन्द्र? या दुष्टाला पकडण्यात तुझी मोठीच मदत झाली, शाब्बास महेन्द्र! अच्छा, राजकुमारीची काही खबर मिळाली तुला?"

"मी इथेच आहे, मामा!" विद्यावती म्हणाली.

त्या आवाजाकडे पाहिल्यावर सेनापतीने मुनिपुत्री-राजकुमारीला पाहून ओळखले. अन् मोठया आनन्दाने तो ओरडला, "महाराज, विद्यावती आलीय!"

एकदम पुढे लपकून राजकुमारीला प्रेमाने मिठीत घेत राणी म्हणाली, "ओह! माझी लाडकी! कशी आहेस बाळ तू? बरी आहेस नं?" अन् ती विद्यावतीच्या डोक्यावर थोपटू लागली.

"विद्या! हा कसला वेष?" राजाही तिच्या डोक्यावरून हात फिरवत विचारू



लागला.

इतक्यात मालिनी तेथे येऊन विद्यावतीला नमस्कार करू लागली, तेंव्हा तिने विचारले, "अच्छा, तर पालखीत बसून तू आलीस होय?"

महेन्द्रनाथने राजाला नमस्कार करत म्हटले, "महाराज, मी बरोबर काम साधलं, युवराणीला आपल्या हाती सोपवण्यात सफलता मिळाली मला! मला फार आनन्द वाटतोय त्यामुळे! आपलं कार्य पूर्ण करण्यात माझ्या भाग्यानं मला आपल्या काकाचे आशिर्वाद अन् सहाय्यही मिळालं." अन् त्याने आपल्या बाजूला उभ्या असलेल्या मुनीकडे इशारा केला. त्याला पाहून राजाला आश्चर्य वाटले.

महेन्द्रनाथ म्हणाला, "हे माझे काका जितेन्द्रनाथ! महिमापुरीच्या राज-परिवारातले आहेत,राजा वीरेन्द्रनाथचे धाकटे भाऊ. आता ते संन्यासी झाले आहेत.

तेंव्हा जितेन्द्रनाथकडे पहात राजा म्हणाला, "देवीच्या मंदिरात दर्शनाला आलेला असताना मी राजा वीरेन्द्रनाथला पाहिलं होतं. नन्तर मी ऐकलं की, तो शत्रूच्या हाती सापडून मारला गेला. मग तुम्ही?"

मुनि वेषातला जितेन्द्रनाथ आपली कहाणी सांगू लागला. "माझा मोठा



भाऊ वीरेन्द्रनाथ युद्धात मरण पावला. तेंव्हा महेन्द्र अगदीच लहान बाळ होता. त्याला व त्याच्या आईला घेऊन, मी कसा बसा जीव वाचवून पळालो. पुढे काही दिवसात मला वैराग्य येऊन मी संन्यास घेतला. दैवयोगानेच महेन्द्र मला जंगलात भेटला. महिमापुरी राज्याचा हाच खरा वारस आहे. ही सारी हकिकत सांगण्यासाठी अन् या दोघांना मधेच असं सोडून पळून गेल्याची चूक केल्याबद्दल याच्या आईची क्षमा मागण्यासाठीच मी या दोघांबरोबर इथवर आलो."

"महेन्द्रची आई आमच्याकडे सुरक्षित आहे. मी तावडतोब तिला इथे बोलावून घेतो." सेनापती म्हणाला.

"आपली आज्ञा असेल, तर मीच जाऊन आपल्या आईला ही आनन्दाची वार्ता सांगू इच्छितो." महेन्द्र अुत्सुकतेने म्हणाला.

राजा वीरसेन सेनापतीला म्हणाला, "अुग्रसेन, महेन्द्रनाथच्या सुरक्षिततेसाठी आवश्यक ती तजवीज करा, तो अन् त्याची आई आता आपले अतिथि आहेत."

महाराणी वज्रेश्वरी मधेच म्हणाली, "महाराज! एक गोष्ट!" नन्तर राजाच्या कानाजवळ ती हळूच म्हणाली, "महेन्द्रनाथ दिसायलाही छान रुबाबदार आहे. मला वाटतं हा आपला जावई म्हणून छान शोभेल."

डोके हलवून आपली स्वीकृति देत राजा म्हणाला, "शुभ समय आला आहे ना आता! सर्व काही चांगलंच होईल." नन्तर मुनीकडे वळून राजा म्हणाला, "महेन्द्रनाथ अन् त्याची आई इथे येईपर्यन्त आपण इथेच आमच्याबरोबर रहा." आणि आता वाचस्पतीला राजा म्हणाला, "आचार्य, आता आपण युवराणीची ग्रहस्थिति पुन्हा एकदा पाहून सर्व सांगा चला, आपण सर्वजण आत जाऊन बसू या."

सेनापती अुग्रसेन महेन्द्रनाथचे अभिनन्दन करत म्हणाला, "कष्टात रहात असूनही आपण एक प्रसिद्ध राजघराण्यातील असल्याचा, तुझ्या आईने कधी अुल्लेखही केला नाही. आता गौरवाने तिला राजभवनात बोलावून नेण्याचा मान मीच घेणार आहे."

इतके बोलून सेनापती अुग्रसेन महेन्द्रनाथबरोबर बाहेर निघाला. दोघेही तिथल्या दोन घोड्यांवर स्वार झाले अन् ते महेन्द्रच्या मातेच्या निवासस्थानाकडे निघाले. (समाप्त)



# महान् शिल्पकार

पक्का निश्चयी असणारा राजा विक्रम नेहमीप्रमाणे त्या झाडाकडे गेला. फान्दीला लटकणारे प्रेत खाली अुतरवून तो स्मशानाची वाट चालू लागला. त्याबरोबर प्रेतात मुक्काम करून असणारा वेताळ म्हणाला, "हे राजा, या मध्यरात्री स्मशानासारख्या भयानक जागी, तू जे हे कष्ट अुपसत आहेस, त्याचं फळ तुला मिळेल की नाही, ते मला माहीत नाही. पण कमीत कमी, तुला तरी तसा विश्वास असायला हवा. पण तेवढा तरी तुला आहे की नाही, हे ही मला माहीत नाही. हां! पण इतकं मात्र मला नक्कीच ठाअूक आहे की, काही कलाकारात वास्तवदृष्टीचा अभाव असतो. प्रत्येक समस्येकडे ते व्यक्तिगत दृष्टीने पाहतात, पण लौकिकतेच्या अभावमुळे वास्तविक दृष्टीतून ती समस्या सोडवायचा विचारच ते करत नाहीत. अशा स्वभावामुळे ऐन

## वेताळाच्या गोष्टी



मौक्याच्या वेळी आपल्या श्रमाचं फळ मात्र त्यांच्या हातून निसटून जातं. तुला सावधगिरीची सूचना मिळू शकेल अशी अमरेन्द्र नावाच्या महान् शिल्पकाराच्या अव्यवस्थित आणि बुध्दिहीन वागणुकीबद्दलची कथा मी आता सांगतो. ऐकता ऐकता तुला आपल्या श्रमांचाही विसर पडेल. नीट ऐक." अन् वेताळ गोष्ट सांगू लागला

कीर्तिचन्द्र हा चन्द्रगिरी राज्याचा राजा होता. तो मोठा कलाप्रिय होता.

कीर्तिचन्द्रला सर्व कला आवडत. परन्तु शिल्पकलेवर त्याचे विशेष प्रेम असे. त्याला एक सुन्दर नृत्यशाळा बांधायची होती. ही नृत्यशाळा कशी असावी, तीत कुठे कुठे नृत्यमुद्रा दाखवणाऱ्या सुन्दर स्त्रियांची शिल्पे मांडावीत अन् कोणत्या बाजूला देवी-देवतांची शिल्पे असावीत, याबद्दल तो खूप विचार करी.

आशातच एकदा त्याला अमरेन्द्र नावाच्या शिल्पकाराबद्दल माहिती मिळाली. राजधानीपासून दूर असलेल्या एका लहानशा गावात हा अमरेन्द्र रहात असे. शिल्प-कलेतला तो एक असामान्य असा कलाकार होता.

हा शिल्पकार केवळ 'स्वान्तःसुखाय' छिन्नी-हातोडा हातात घेई. त्याचा हस्तस्पर्श होताच अगदी कठिणात कठीण दगडही जणू मृदु बने, अन् त्यातून एक सुन्दर शिल्प आकार घेई.

राजा कीर्तिचन्द्रने ठरवले की अमरेन्द्रला राजशिल्पी पदावर नेमून घेऊन त्याच्या हातूनच आपल्या अदभुत नृत्यशाळेचे स्वप्न साकार करवावे. आणि आपले काही राजकर्मचारी त्याने अमरेन्द्रकडे पाठवले. त्याने त्यांना अशीही आज्ञा दिली होती की त्यांनी अमरेन्द्रला मोठ्या सन्मानाने राजधानीत आणावे.

राजकर्मचारी पालखी घेऊन जेंव्हा अमरेन्द्रकडे पोचले, तेव्हा तो त्यांना म्हणाला, "मला राजाकडून सन्मानाचा



किंवा पदवीचा मुळीसुध्दा मोह नाही. महाराजांना कृपा करून सांगा की, मला हा प्रस्ताव मान्य नाही; अन् या नकाराबद्दल त्यांनी मला क्षमा करावी." इतके मोठ्या मर्यादेने सांगून अमरेन्द्रने राजकर्मचाऱ्यांना परत पाठवले.

निरोप मिळाल्यावर खुद्द राजा कीर्तिचन्द्र स्वतःच शिल्पकार अमरेन्द्रकडे गेला व म्हणाला, "तू एक महान् शिल्पकार आहेस, पण तू आपली कला स्वतःपुरतीच मर्यादित ठेवस आहेस. परंतु कोणत्याही कलाकाराला हा हक्क नाही की त्याने आपली कला अशी लपवून ठेवावी. कला विश्वव्यापी व्हावी, यातच कलेची सार्थकता असते."

यावर अमरेन्द्र म्हणाला, "महाराज, आपलं बोलणं वास्तविक नाही, असं माझं म्हणणं नाहीय. पण सामान्यतः असं घडतं की राजे-महाराजे आपली कीर्तिपताका फडकत ठेवण्यासाठीच कलाकारांचा मोहऱ्यांप्रमाणे अपयोग करतात."

अमरेन्द्रच्या या विधानाबद्दल राजाला वाईट वाटले. तो म्हणाला, "अमरेन्द्र, तुझ्यासारखे कलाकार हे माझ्यासारख्या राजा-महाराजापेक्षाही महान् असतात. कृपा करून माझ्या प्रस्तावाला मान्यता दे. कित्येक वर्षांपासून एक सुन्दर नृत्यशाळा बनवायचं स्वप्न पहातोय मी.



ते स्वप्न तू साकार कर ना."

जरासा विचार करून अमरेन्द्र म्हणाला, "अच्छा महाराज, मी या खास नृत्यशाळेची जबाबदारी स्वीकारत आहे."

नन्तर अमरेन्द्र राजधानीला आला. आणि त्या सुरेखशा नृत्यशाळेच्या कामाला लागला. जराही विश्रान्ती न घेता तो एका पाठोपाठ एक देखण्या मूर्ति बनवू लागला.

एके दिवशी राजकन्या विजयमाला त्या घडत असलेल्या नृत्यशाळेत आली आणि तिने त्या देखण्या मूर्ति पाहिल्या. अगदी सजीव भासणाऱ्या त्या मूर्ति पाहून ती भारावून गेली.



पहाता पहाता हातात छिन्नी घेऊन काम करणाऱ्या अमरेन्द्रकडे तिची नजर वळली. त्याचे सुन्दर रूप व चेहऱ्यावरचे तेज पाहून तिला असे वाटले की आपण एकाद्या अपूर्व व अद्‌भुत् व्यक्तीला आयुष्यात प्रथमच पहात आहोत. प्रथम दृष्टीतच तिचे त्याच्यावर प्रेम बसले! विजयमालेला असेही वाटले की या शिल्पकाराशी आपला विवाह व्हावा.

त्या दिवसापासून राजकन्या शिल्पकला व वास्तुशास्त्राबद्दल अमरेन्द्रशी चर्चा करू लागली. परन्तु आपल्या मनची गोष्ट मात्र ती त्याच्या समोर कधी बोलू शकली नाही.

काही दिवसांनी नृत्यशाळेचे काम पूर्ण झाले. राजा कीर्तिचन्द्र व अन्य राजप्रमुख येऊन नृत्यशाळेच्या अद्‌भुत् सौन्दर्याची प्रशंसा करू लागले. दोन आठवड्यांनी नृत्यशाळेच्या वास्तुशान्तीचा मुहूर्त मुक्रर केला गेला होता. अन् त्यानिमित्त नृत्यांगना हेमसुन्दरी हिच्या नृत्याचा कार्यक्रमही आयोजित केला होता.

अशातच एकदा राजकन्या विजयमाला अमरेन्द्रला भेटायला आली अन् धैर्य एकवटून तिने आपल्या मनातली इच्छा त्याच्याजवळ व्यक्त केली.

तिचे बोलणे ऐकून अमरेन्द्र चक्रावून गेला अन् थोडा वेळ विचारात मग्न झाला! नन्तर म्हणाला, "तू एक राजकुमारी आहेस, अन् मी एक सामान्य नागरिक आहे. कोणत्याही राजघराण्याशी माझं दूरचंही नातं नाही. अगदीच सामान्य माणूस आहे मी."

राजकुमारी हसून म्हणाली, "या वंशमर्यादा आणि कीर्ति वगैरेंची तुम्ही चिन्ता नका करू. तुम्ही एक महान् शिल्पकार आहात, हीच महान् कीर्ति आहे तुमची!"

"ठीक आहे; पण असं सांग—आपल्या विवाहाला तुझ्या पित्याच्या संमतीची आवश्यकता आहे नं? मग आजपासून सात दिवसांच्या आत तू ती परवानगी मिळव अन् मग येऊन मला इथं भेट." अमरेन्द्र म्हणाला.

परन्तु चार दिवस झाले नाहीत, तोच एका रात्री अचानक अमरेन्द्र राजधानी सोडून निघून गेला!

इतकी गोष्ट सांगून वेताळ म्हणाला, "राजा, अमरेन्द्रमधे लौकिक ज्ञान आणि बुध्दि यांचा अभावच दिसून येतो की नाही? राजकन्येला विवाहासाठी परवानगी विचारायला त्याने सात दिवसांची मुदत दिली होती ना? अन् तो स्वत: मात्र मुदत संपण्यापूर्वी चारच दिवसात तेथून निघून गेला. आपल्या जीवनाबद्दल वास्तविक दृष्टी त्याला नसल्याचंच हे लक्षण नव्हे का?" या प्रश्नांचं उत्तरं माहीत असूनही तू दिलं नाहीस, तर तुझं मस्तक फुटून जाईल."

यावर विक्रम उत्तरला, "तू म्हणतोस, तसा अमरेन्द्र लौकिकज्ञानशून्य, किंवा जीवनाबद्दल वास्तवदृष्टी नसलेला वगैरे मुळीच नव्हे. अमरेन्द्रने एक आठवड्याची मुदत दिली यातच मानवी स्वभावाची त्याला चांगली पारख आहे, हे दिसून येतंय. युवराणीचं जर असं म्हणणं आहे, की अमरेन्द्रवर आपल खरं प्रेम आहे! तर ते आपल्या पित्याला सांगायला एका आठवड्याच्या मुदतीची जरूरच काय? इतका वेळ तिने मुळी घालवलाच नसता. अमरेन्द्रशी बोलून परत जाताच तिने आपल्या पित्याला सांगितलं असतं. तेव्हा अमरेन्द्रच्या अन्दाजाप्रमाणे, राजाची अनुमति मिळायचीच असती, तर ती एक किंवा दोन दिवसातच मिळायला हवी होती. तसं न घडता, चार दिवसपर्यन्त वाट पाहूनही युवराणीचा पत्ता नव्हता; म्हणजेच राजाची अनुमति नव्हती. त्यामुळेच त्याने तावडतोब राजधानी सोडली."

अशा तऱ्हेने योग्य उत्तर दिले तेव्हा राजाचा मौनभंग झाल्यामुळे वेताळ प्रेतासह अदृश्य होऊन, पुन्हा त्या झाडाकडे गेला. (कल्पित.)





# अधिकार लालसा

शिव नावाच्या तरुणाने शहरात आपले अुच्च शिक्षण पूर्ण केले, व तो स्वग्रामी-विजयपुरीला परत आला. शिवचे वडील त्याच्या लहानपणीच वारल्यामुळे आईनेच त्याला वाढवले होते, शहरात पाठवून अुच्च शिक्षणही दिले होते.

गावात येअून एक आठवडा लोटल्यावर, कुठे तरी नोकरी करायचा आपला मानस त्याने आईजवळ व्यक्त केला. ती म्हणाली, "शिव, तुझ्यायोग्य नोकरी तुला जमीनदारांच्या कचेरीत नक्की मिळेल. तुझ्या बाबांचे लहानपणचे मित्र धनंजय तुला या बाबतीत मदत करू शकतील. रघुनाथपुरला जाअून त्यांची भेट घे शिवा."

दुसऱ्याच दिवशी शिव रघुनाथपुरला जाअून धनंजयला भेटला. ते म्हणाले. "जमीनदाराच्या कचेरीत काम मिळवणं सोपं नव्हे. कारण तिथे असणारा भैरवनाथ नावाचा माणूस प्रत्येक बाबतीत आपलं नाक खुपसत असतो, अन् जमीनदार नेहमी त्यांचंच बोलणं मानत असतो."

"मग त्या भैरव नाथला खुश करण्याचा काही अुपाय असला तर सुचवा न काका!" काही विचार करत शिव अुत्सुकतेने म्हणाला.

"भैरवला अधिकार दाखवायची भारी हौस आहे." धनंजय अुत्तरले.

"ठीक आहे. मी त्यालाच गाठून माझं भाग्य आजमावून पाहीन. मला आशिर्वाद द्या काका!" असे म्हणून शिव तेथून निघून जमीनदाराच्या कचेरीकडे वळला.

जमीनदार ज्या शहरात रहात असे, तेथेच शिवचा एक मित्रही रहात असे. मित्राचे नाव होते चलपति. त्याला आपल्या कामाबद्दल अन् भैरवबद्दल सांगून शिव म्हणाला, "कचेरीत नोकरी मिळवायची, तर प्रथम या भैरवनाथला आपलंसं करायला हवं. पण यासाठी काय करायला हवं, ते मात्र समजत नाहीय मला!"

नन्तर दोघा मित्रांनी काही विचार करून एक योजना बनवली. त्याप्रमाणे दुसऱ्या दिवशी सकाळी शिव कचेरीत गेला अन् त्याने भैरवला भेटायचा प्रयत्न केला. भैरव काही कामात आहे असे सांगून, काही वेळ बसवून ठेवल्यानंतर नोकर त्याला जेवणाच्या वेळी भैरवकडे घेअून गेला.

मोठ्या नम्रतेने भैरवला नमस्कार करून म्हणाला, "महाराज, कृपा करून आपण मला जमीनदारांच्या कचेरीत एकादं काम मिळवून द्या ना. आपण शिफारस केलीत तर जमीनदार 'नाही' म्हणत नाहीत असं अैकलंय मी!"

मोठ्या ऐटीत डोके हलवत भैरवनाथ म्हणाला, "हं! ठीक आहे, अुद्या ये परत. पाहू काही जमतंय का."

शिव तेथून निघून चलपतीकडे गेला. त्याला कचेरीत घडेलली वार्ता त्याने सांगितली. चलपती म्हणाला, "आपण अन्दाज केला होता तसंच झालं की नाही? अुद्याही जा त्याच्याकडे. मग अुतरू मैदानात आपण!"

दुसऱ्या दिवशी शिवला भैरवची भेट लवकर मिळालीच नाही. चांगली चार पाच तास वाट पहायला लावून त्याने



नोकराकरवी शिवला बोलावून घेतले अन् म्हणाला, "अुद्या ये, पाहू आपण."

दुसऱ्या दिवशी शिव जेंव्हा भैरवला भेटला, तेंव्हा अगोदरच तिथे चार मोठी माणसे बसलेली होती, अन् ती सारी भैरवची मोठ्या अहमहमिकेने स्तुति करत होती.

त्याचवेळी चलपति तेथे आला व घाबऱ्या घाबऱ्या इकडे तिकडे पाहू लागला. शिव त्याला विचारू लागला. "अरे काय झालं? इथे का आलास? कुणाला शोधतो आहेस तू?"

"काही नाही. मी रामदादाला शोधतो आहे. त्यानं मला कचेरीत नोकरी द्यायचं

सौ. शीला कानविंदे

कबूल केलं होतं." चलपतीने सांगितले.

हे ऐकताच भैरवनाथ रागाने लाल होत म्हणाला, "मला काहीच न सांगता त्या नालायकानं तुला इथं कसं पाठवलं? बागेत काम करणारा रामदादा काय तुला नोकरी देण्याइतक्या मानाचा झाला? अन् कायरे, इथे कचेरीत नोकरी देववण्याइतका लायक माणूस कोण, हे तुला नाही माहीत?"

तेंव्हा चलपति शान्तपणे त्याच्याकडे पहात विचारू लागला, "आपण कोण महाराज?"

यावर आपली मान जोराने शिवकडे वळवत तो विचारू लागला. "गेला आठवडाभर रोज तू नोकरीसाठी माझ्याकडे येतोयस, होय ना? या येडपटाला सांग, मी कोण आहे ते!" भैरवने त्याला आज्ञा केली.

शिवने चटकन सांगितले, "यांचं नाव भैरवनाथ अन् यांचा सल्ला घेतल्यावाचून जमीनदार कुणाला ही नोकरीला ठेवून घेत नाहीत."

तेंव्हा शिवकडे तुच्छतेने पहात चलपति म्हणाला, "ओहो! हे भैरवमहाराज आहेत! पण रामदादापेक्षा यांची हुकुमत इथे जास्त चालते, यावर माझा विश्वास नाही बसत."

चलपतीचे बोलणे ऐकून, त्या मोठ्या लोकांसमोर आपले नाक कापले गेल्यासारखे भैरवला वाटले. चलपतीकडे तीक्ष्ण नजरेने पहात तो म्हणाला, "मीही पाहूनच घेतो तुझा रामदादा तुला या कचेरीत कशी नोकरी देतो ते! आता नीट कान अुघडून अैक, मी या मुलाला अुद्याच संध्याकाळपर्यंत इथे नोकरी देववत आहे; साधीसुधी नव्हे—इतर सर्व लहानमोठ्या नोकरांवर देखरेख ठेवायची नोकरी! आत्ता पहाच कि इथं माझा शब्द चालतो, की त्या नालायक रामदादाचा!"

अन् अशा प्रकारे शिवला त्या कचेरीत एक छान नोकरी मिळाली.



# चान्दोबा पुरवणी—५३

**भारतातील पशुपक्षी :**

## रंगीत बगळे




रंगीत बगळे हे आपल्या देशाचेच वैशिष्ट्य होय. अुंचीला एक मीटर असणाऱ्या या बगळ्यांचे शरीर रंगीबेरंगी असते. यांचा चेहरा फिकट पिवळा असतो व त्यावर लव नसते. याची लांब चोच पिवळीच असते; पंखांवर काळे डाग असतात. शेपूट फिक्या गुलाबी रंगाची असते. शरीरावरची लव वरून पांढरी अन् काही काही ठिकाणी गडद हिरवी असून, शरीराच्या खालच्या भागावर काळी रेघ असते. आकाराने हे बगळे गिधाडाएवढे असतात.

हे रंगीत बगळे इतर साध्या बगळ्यांप्रमाणेच अुथळ व चिखलभरल्या जमिनीवर थव्या-थव्याने फिरत असताना दिसतात. खाणे मिळण्याच्या आशेने बिलकुल न हलता अुभे असलेलेही हे कधीकधी दिसतात. अुथळ पाण्यातून मासे, बेडूक, खेकडे व गोगलगायी वगैरे पकडून ते पोट भरतात.

ते पाण्याजवळ असणाऱ्या झाडांच्या फांद्यांवर बसतात. अुडून येअून ते जेंव्हा फांदीवर बसतात, तेंव्हा मोठ्या ऐटीने पंख फडफडवत ते थोडा वेळ अुडत रहातात व मगच फांदीवर बसतात.

वाळक्या बारीक काटक्या व गवताने बनवलेली यांची घरटी मोठी व नीटनेटकी असतात; चांगली मजबूतही असतात. काटक्या व गवत यांतली मोकळी जागा ते पाणवनस्पती व शेवाळे वगैरेंनी भरून काढतात. एकेका झाडावर अशी वीसपर्यंत घरटी असतात.

या रंगीत बगळ्यांना स्वरयन्त्र नसल्याने ते बहुधा मुकेच असतात. क्वचित् ते कण्हल्यासारखा आवाज काढतात. खालचा जबडा हलवून ही एक प्रकारचा आवाज ते काढू शकतात.

'अमावस्येच्या मध्यरात्री एक दिवा हातात घेऊन अंधारातून एकटेच जात असताना, तो दिवा अचानक विझून जावा' असे एकच एक आधार असणाऱ्या आईच्या मृत्यूमुळे भाऊला वाटले.

पुण्यातील बालक भाऊचे वडील रावजी खूप दिवसांपूर्वी घर सोडून निघून गेलेले असतात. एकाद्या दूरस्थ ग्रहाचा आपल्यावरचा वाईट प्रभाव जेंव्हा दूर होईल, तेंव्हा आपण एक करोडपती बनू, असे स्वप्न पहात भाऊ मुंबईच्या गल्ल्या-बोळातून आणखी इतर काही संस्थातून फिरत रहात असतो. परन्तु तो ज्या क्षणाची वाट

# हरी नारायण आपटे यांची कादम्बरी 'मी'

पहात असतो, तो कधी येतच नाही. भाऊहून दीड वर्षांने मोठी असणाऱ्या बहिणीचे नाव होते गंगी. तिचा विवाह वयाने प्रौढ असणाऱ्या एका माणसाशी केला जातो; तोपर्यन्त अगोदरच त्याच्या दोन बायका मरून गेलेल्या असतात. या तिजवराची बायको बनून आलेल्या गंगीला तो गुलामासारखी मानून तिचा फार छळ करतो. नवऱ्याच्या छळाला कंटाळून गंगी घर सोडून आपल्या लहान भावाच्या आश्रयाला येते.

भाग्याने भाऊ व गंगीला शिवराम नावाच्या एका मोठ्या माणसाचा आश्रय मिळतो. तो एक आदर्श विचारांचा भला माणूस असतो व त्याची पत्नीही त्याच्या विचारांप्रमाणेच वागत असते. शिवराम दाम्पत्याला सुन्दरी नावाची एकुलती एक मुलगी असते. तीही आपल्या आई-वडलांप्रमाणेच आदर्श जीवन जगू इच्छिते.

भाऊ व गंगी यांना शिक्षणासाठी शिवराम मदत करतो. त्या काळी समाज स्त्रीशिक्षणाविरुद्ध होता. पती कितीही दुष्ट असला तरी, त्याला सोडून रहाणाऱ्या स्त्रीची समाज हेटाळणी करत असे. त्यामुळे भाऊ व गंगीबरोबरच शिवरामच्या कुटुंबालाही खूप जाच सहन करावा लागे. तरीही आपण करत आहो ते ठीकच आहे असा विश्वास असल्याने ते सर्वजण हा त्रासही हसत हसत सहन करीत.

भाऊ मोठा झाला. शिकून वकील बनला. तरीही वकिली करण्यापेक्षा त्याला सामाजिक विषमतांचे निर्मूलन करण्यात जास्त रुचि होती. सामाजिक कुरीतींचे निर्मूलन व्हावे म्हणून तो नेहमी भाषणे देई आणि समाज सुधारण्यासाठी त्याने एक मासिकही चालू केले. त्यामुळे काहीजण त्याचे मित्र बनले, तर काही शत्रु.

असा परिणाम पाहून भाऊला फार दुःख वाटे. तरीही त्याने निश्चय केला होता की, आपण स्वार्थाकरता नव्हे, तर समाजाच्या भल्याकरताच जगायचे, अन् त्यासाठीच आपले सारे जीवन समर्पित करायचे. या उच्च आदर्शासाठी त्याने असाही निर्णय घेतला की आपण आजन्म ब्रह्मचारीच रहायचे, विवाह करायचा नाही.

असा निश्चय केल्याच्या दुसऱ्याच दिवशी शिवराम भाऊला आपल्या मुलीशी विवाह करण्याची विनंती करतो. आता मात्र भाऊ विचारात पडतो, कारण शिवराम बद्दल त्याच्या मनात फारच आदर असतो व त्याच्या ऋणातून आपण कधीच मुक्त होऊ शकणार नाही अशी त्याची धारणा असते. तरीही नाइलाजाने तो हा प्रस्ताव नाकारतो. पण तशी त्याला सुन्दरी फार आवडतही असते. शिवराम-दांपत्य किंवा गंगी, सुंदरी भाऊच्या निर्णयापुढे काहीही बोलू शकत नाहीत, उलट त्यांना भाऊबद्दल आदरच वाटतो.



भाऊ आता 'भावानन्द' असे नाव धारण करतो. आपल्याबरोबर काही सहकारी घेऊन तो एका आश्रमाची स्थापना करतो आणि समाजसुधारणेच्या कार्यात आपला वेळ घालवू लागतो. काही दिवसांनी त्याची तब्येतही बिघडते. परन्तु 'आपल्या नन्तरही आपले कार्य अबाधित चालू ठेवू' असे आपल्या अनुयायांकडून वचन घेऊन तो डोळे मिटतो.

'मी' नावाची आदर्शभावनांनी भरलेली मराठी कादम्बरी १९१६ मधे प्रकाशित झाली अन् तिचे लेखक होते हरी नारायण आपटे. आत्मकथेच्या रूपात व नवीन साहित्य-शैलीत लिहिलेली ही कादम्बरी आरशाप्रमाणे त्यावेळच्या समाजाचे दर्शन घडवते. मराठी कथा-साहित्यावर आजही तिचा प्रभाव दिसून येतो.

# तुम्हाला माहीत आहे काय?

१. प्राचीन इजिप्तमधे सुरक्षित ठेवण्यात येणाऱ्या प्रेतांवर लपेटण्यासाठी एक खास कापड भारतातून मागवले जात असे. ते कापड कोणते?
२. पाश्चिमात्य देशात 'वैद्य-पितामह' म्हणून कोणाला मानले जाते?
३. एलोराच्या पुढे असणाऱ्या एका हिन्दु मन्दिराच्या बांधणीला शंभर वर्षे लागली होती. ते मंदिर कोणते?
४. महम्मद पैगंबराचे जन्मस्थान कोणते?
५. 'पवनार आश्रमा'ची स्थापना कोणी केली?
६. बंगालवर राज्य केलेल्या एका मुसलमान राजाने 'महाभारता'चे बंगालीत भाषांतर करायची आज्ञा दिली होती. तो राजा कोण?
७. युनेस्कोच्या देखरेखीखाली मुलांसाठी पर्यटन करणाऱ्या एका अभिनेत्रीचे नुकतेच देहावसान झाले. तिला तिच्या पहिल्याच फिल्ममधे 'ऑस्कर अॅवॉर्ड' मिळाले होते. ती नटी कोण? तो सिनेमा कोणता?
८. कळसूत्री बाहुल्यांचा खेळ प्रथम कोणत्या दोन देशात सुरू झाला?
९. कुतुबमीनार, ताजमहाल, खजुराहो, अजंता लेणी-यात सर्वात जुने कोणते?
१०. अणुबॉम्ब प्रथम केव्हा व कुठे बनवला गेला?
११. 'परमवीर चक्र' सर्वात प्रथम कुणाला मिळाले?
१२. लेनिनग्राडला पुन्हा आपले जुने नाव प्राप्त झाले, ते कोणते?
१३. आग्रा प्रथम कोणत्या नावाने ओळखले जात असे?
१४. मियानमार (भूतपूर्व ब्रम्हदेश)ची राजधानी कोणती?
१५. दक्षिणभारतात हिन्दूंनाही आकर्षित करणारा मुस्लिम 'दर्गा' कोणता?

## उत्तरे

१. मुलमुलखास.
२. हिप्पोक्रेटीस.
३. कैलासमन्दिर.
४. मक्का.
५. विनोबा भावे.
६. नुसरतशाहा.
७. ऑड्रे हेपबर्न-रोमन हॉलिडे.
८. भारत व इजिप्त.
९. अजिण्ठ्याची लेणी.
१०. १९४५. जपानमधील हिरोशिमा व नागासाकी.
११. मेजर सोमनाथ शर्मा (१९४७).
१२. सेण्ट पीटर्सबर्ग.
१३. अकबराबाद.
१४. यांगून (रंगून).
१५. नागोर मधील क्वादीनबाबी साहेबचा दर्गा.



# गर्वाचं घर खाली

कमलावती गावात कैलासशास्त्री नावाचा एक ज्योतिषी रहात असे. भविष्य सांगून, शिवाय ग्रहपीडेतून लोकांना मुक्त करण्यासाठी तो लोकांकडून कसल्याकसल्या पूजा वगैरेही करवत असे. जिथे कुठे महावृक्ष नसेल तिथे एरंडालाच महावृक्ष मानलं जातं. 'गावढ्या गावात गाढवी सवाष्ण' या नात्याने गावात दुसरा कोणी ज्योतिषी नसल्याने कैलासशास्त्रीचं महत्त्व अकारणच वाढलं होतं.

कैलासशास्त्रीकडे आपल्या अडचणी घेऊन कोणी आलं, की तो म्हणे, "मी म्हणीन ते नक्की होणारच समजा! तेव्हां मी जे सांगेन त्यावर विश्वास ठेऊन सांगितल्याप्रमाणं तुला करावंच लागेल."

एकदा अशीच कैलासशास्त्रीची चेष्टा केल्यामुळे दोन-तीनजणांवर त्याची खप्पा मर्जी झाली; अन् पुढे त्यांच्या दुर्भाग्यानं त्यांच्यावर अशी काही संकटपरंपरा कोसळली की, त्यांना वाटू लागलं की हा सगळा कैलासशास्त्रीचा आपल्यावरील रागाचाच प्रताप असला पाहिजे.

कैलासशास्त्री सांगू लागला, "एक कर्णपिशाच्च मला वश आहे. रोजच्या शिवपूजेमुळे मला वाक्शुद्धि मिळालीय. त्यामुळे माझ्या तोंडातून जे निघेल, ते खरंच होईल." लोकांच्यात त्याचा दरारा यामुळे अधिकच वाढला.

रामनाथ नावाचा एक माणूस कमलावतीत नवीनच आला होता. त्याने तेथे काही जमीन खरेदी केली आणि शेती करूनं तो आपल्या बायकोमुलांसह तिथे राहू लागला. एक विकाऊ घर होतं, ते त्याने खरीदलं. गृहप्रवेश करण्यापूर्वी त्याने कैलासशास्त्र्याला, त्या वास्तूत काही

कौशल बामले

दोष असेल, तर पहायची विनंती केली.

कैलासशास्त्री घराचं निरीक्षण करून म्हणाला, "हे घर खरीरदण्यापूर्वीच तू मला विचारलं असतंस, तर बरं झालं असतं. या घरात तू राहिलास तर तूच मालक असल्यामुळे तुझं मरण ओढवेल. तेव्हा माझं ऐक; हे घर सोडून दे तू तावडतोब!"

पण जवळच रामनाथची सासू होती, ती मात्र रागाने कैलासशास्त्रीवर तुटून पडली, "काय म्हणालास? घरमालकाचं मरण ओढवेल? घरात प्रवेश करताना, जमलं तर शुभ बोलावं; नाहीतर गप्प बसावं. असली अपशकुनी भाषा बोलल्याबद्दल तुझे हात-पाय तुटून जातील. कंबरच मोडेल बघ तुझी!"

तेव्हा कैलासशास्त्रीही भुखडला. आपली शेंडी धरून त्याने जोरात हलवली, अन् गळ्यातलं जानवं वरखाली झटकत तो ओरडला, "वाहवा! कैलासशास्त्र्यासारख्या दिग्गज पंडितालाही शिक्षा देण्याचं धाडस हं! ठीक आहे, ऐकून घ्या-एकच पूजा करून, आणि एकच मन्त्र म्हणून मी तुम्हा लोकांना यमयातना भोगायला न लावल्या, तर माझं नाव कैलासशास्त्री नव्हेच!" रागानं कापत तो तसाच घरातून बाहेर पडला.

तरीही रामनाथची सासू गप्प न रहाता बडबडतच राहिली, "अरे, जा जा! तूच खाट पकडून यमयातना भोगताना पाहू आम्ही याची देही, याची डोळा!"

आता मात्र या अपमानामुळे कैलासशास्त्री जोरात बोलू लागला, "मी यांचा डाकिणी, पिशाच्चांचा मदतीने सत्यानाशच करून टाकीन." अन् दातओठ खात तो त्या बोळातून इकडेतिकडे न पहाताच जात राहिला अन् समोरून येणाऱ्या एका बैलगाडीशी त्याची टक्कर झाली!

या टक्करीमुळे कैलासशास्त्री जबर जखमी झाला. त्याची कंबर मोडल्यातच जमा झाली, अन् हातापायांवरही त्याचा ताबा राहिला नाही. लोकांनी उचलून त्याला घरात आणून खाटेवर झोपवलं. त्या दिवसापासून सहा महिने निरनिराळ्या वैद्यांकडून इलाज करवून घेत कैलासशास्त्रीने खरोखरच अगदी यमयातना भोगल्या.

या अवधीत रामनाथच्या सासूच्या शिव्यांच्या प्रभावाबद्दल निरनिराळ्या कथा पसरू लागल्या. लोकांना वाटू लागले की ती जर कोणाला काही शिव्या शाप देईल, तर ते खरेच होऊन राहील. कैलासशास्त्रीसारखा प्रकांड ज्योतिषीसुद्धा नाही का तिच्या शिव्याशापांनी सहा महिने खाट पकडून बसला?

कैलासशास्त्री जेंव्हा चांगला खडखडीत बरा झाला, तेंव्हा तो आपल्या बायकोला म्हणाला, "गावची भोळीभाबडी माणसं आता रामनाथच्या सासूच्या वचनात, शाप किंवा





वरदानासारखी शक्ती आहे असा अंधविश्वास ठेवू लागलेत. मी आता सहस्ररुद्राभिषेक करून त्या भांडकुदळ बाईचं तोंड कायमचंच बन्द करून टाकीन, मुकीच करून टाकीन मी तिला! पूजेची सारी तयारी कर लवकर." हे सारं बोलत असताना त्याचं मन सुडाने पेटलं असल्याचं जाणवत होतं.

हे सारं बोलणं अैकून घेअून हसतच कैलासशास्त्रीची बायको शांतपणे म्हणाली, "भांडण असो, वा मैत्री-हे सारख्या सारख्या माणसांच्यातच व्हायला हवं. तुम्ही पूजा केल्यावाचून कुणाला शापू शकत नाही. पण रामनाथची सासू मात्र पूजाबिजा न करताच, फक्त तोंडाने काही अपशब्द बोलून ते करू शकते. माझं एक सोडा, पण लोकांच्या दृष्टीनेही तीच तुमच्यापेक्षा जास्त श्रेष्ठ ठरली. तेंव्हा आता तिच्याशी शत्रुत्व सोडून, तुम्ही मैत्री करा. तुम्हाला जी माणसं आवडत नसतील, त्यांना तिच्या तोंडून शिव्याशाप देववा. तुमच्या पूजा वगैरे तुम्ही अुत्तर पुण्यकर्मांसाठी राखून ठेवाव्या हेच बरं."

बायकोचं हे बोलणं ऐकून कैलासशास्त्री विचारात पडला. 'पंडित असूनही त्याचा अुपयोग आपण लोककल्याणासाठी न करता असा अडाणीपणा दाखवणं हे आपल्यालाच अपमानकारक होईल. आपल्या गर्वामुळेच रामनाथच्या सासूसारख्या एका मामुली बाईकडून आपला अपमान झाला.' या विचारांबरोबरच त्याचा सारा गर्व गळून पडला.

यानंतर त्या गावात रहाणंही कैलासशास्त्रीला लज्जास्पद वाटू लागलं. मग एका रात्री तो चंबूगबाळं आवरून दुसऱ्याच एका गावी निघून गेला. त्यानं गाव का सोडलं, हे मात्र गावकऱ्यांना कधीच समजू शकलं नाही.





# भित्यापाठी ब्रह्मराक्षस

केरळ प्रान्तातील तालंगोडु नावाच्या गावात पार्वतम्मा नावाची एक गृहिणी रहात होती. तिचा नवरा रामकुट्टी हा राजदरबारात नोकर होता. एकदा तो दरबारात पोचला की घरी परत केंव्हा जाअू शकेल, याचा काही नेम नसे. त्याची नोकरीच अशी काही विचित्र होती. त्यामुळे पार्वतम्माला मात्र खूप वेळ घरात एकटीनेच काढावा लागे.

मग ती आपला खूपसा वेळ भगवान सुब्रह्मण्यम्च्या भक्तीत पूजेत घालवत असे. सुब्रह्मण्यम्च्या भक्तीत स्वतःला विसरून ती खूपदा प्रार्थना करी, "स्वामी सुब्रह्मण्यम्! कधी मला दर्शन द्याल? कधी माझ्या हातचा प्रसाद स्वीकारायला माझ्या घरी याल?"

एक दिवशी पार्वतम्मा नेहमीप्रमाणे प्रार्थना करत असताना पुजारी मूर्तीमागे दडून बोलला, "हे भक्तिणी! मी तुझ्या भक्तीवर प्रसन्न आहे. आज सूर्यास्ताच्या वेळी मी तुझी इच्छा पूर्ण करीन."

साक्षात् भगवान् सुब्रह्मण्यमच हे बोलला असे पार्वतम्माला वाटले. भराभरा घरी जाऊन देवाला खायला घालण्यासाठी विविध पक्वान्ने, खीर, खिचडी वगैरे बनवायच्या मागे लागली. सर्व तयार ठेवून ती भगवान सुब्रह्मण्यमची वाट पाहू लागली.

इतक्यात केरळमधे 'पंडार' म्हणवला जाणारा एक भिक्षुक 'जय सुब्रह्मण्यम्!" असे ओरडत पार्वतम्माच्या दारापुढे अुभा राहिला. त्याला पाहून पार्वतम्माला वाटले की प्रत्यक्ष भगवानच या रूपात आपल्याकडे आला आहे. ती त्याला

केरळमधील लोककथा



म्हणाली, "या स्वामी! अभागिनीच्या आतिथ्याचा स्वीकार करा."

पार्वतम्माने त्याला घरात येअून भोजन करायचा आग्रह केला.

पंडार मजेने जेवू लागला. एकीकडे त्याला भीतीही वाटत होती, की कोणी आपल्याला असे पाहिले, तर मारच खावा लागेल!

आता सूर्यास्ताची वेळ झाली आणि तिने घरात दिवाही लावला. इतक्यात दरवाजा अुघडला, तर बाहेर मंदिराचा पुजारी खूप सजून धजून अुभा! तो तर साक्षात् सुब्रह्मण्यस्वामीच दिसत होता. आता पार्वतम्माला वाटले की, 'पंडार' सांगत होता ते खरेच तर होते! चूक पंडारची नसून आपलीच आहे!' मग तिने आत येअून पंडारला घराच्या अंधाऱ्या माळ्यावर लपवले.

नंतर पुन्हा बाहेर येअून पार्वतम्माने पुजाऱ्याला मोठ्या आदराने घरात आणले अन् त्याला आसनावर बसवून ती त्याला जेवायला वाढून त्याची सेवा करू लागली. नंतर खरा स्वामी आला, म्हणून त्याचेही तिने खूप गुणगान केले.

इतक्यात बाहेर घोड्याच्या टापांचा आवाज ऐकू आला! खुद्द पार्वतम्माचा पतीच घोड्यावरून खाली अुतरला. तेव्हा घाई घाईने आपल्या पुजारी -भगवानाला नमस्कार करून ती त्याला म्हणाली, "स्वामी! माझ्या पतीचा देवावर विश्वास नाहीये अन् तो मोठा रागीटही आहे. तो शांत होईपर्यन्त तुम्ही कृपा करून माळ्यावर लपून रहा न!"

पुजाऱ्याला बाहेर पळून जाण्यासाठी कुठे रस्ता दिसेना, म्हणून तो माळ्यावर चढून तिथल्या मिट्ट काळोखात एका बाजूला हातपाय आखडून पडून राहिला. पंडारचे पोट चांगले भरलेले असल्यामुळे त्याला लवकरच झोप लागून गेली होती. आणखी थोड्या वेळाने पुजारीही तेथे झोपून गेला.

पार्वतम्माचा पति जेवायला बसला. त्याने बायकोला विचारले, "हे काय! आज इतकी सारी पक्वान्नं आणि खीरही?" पार्वतम्मा अुत्तरली, "रात्री मला स्वप्न पडलं की आज तुम्ही येणार आहात. म्हणून तुमच्यासाठीच मी हा सारा खटाटोप केला."

मध्यरात्रीच्या सुमारास माळ्यावर झोपलेल्या पंडारला तहान लागली. अर्धवट झोपेत तो ओरडला, "तहान लागली! पाणी, पाणी!" आवाज ऐकून पार्वतम्माचा पति जागा झाला. त्याने बायकोला विचारले, "हा आवाज कुणाचा?"

पार्वतम्मा धिटाईने म्हणाली, "आपण पितरांची श्राध्दकर्मं करत नाही ना, म्हणून मागचे दोन दिवस ते असे ओरडत आहेत!" तिचे हे सयुक्तिक अुत्तर ऐकून तिचा पति रामकुट्टी हात जोडून म्हणाला, "हे माझ्या पितरांनो! यापुढे तुमच्यासाठी जी काही क्रियाकर्मं वगैरे करायची, ती मी यथासांग करीन. आत्तापुरतं माफ करा न मला!"

पार्वतम्मा माळ्याकडे तोंड वळवून म्हणाली, "हे देवा! पूर्वेकडे नारळ आहे, तिथेच एक दगडही आहे. त्यावर नारळ फोडून आपली तहान भागवा! शान्त व्हा!"

पंडारला या सूचनेचा अर्थ समजला.



माळ्यावर अंधारातच त्याने शोधले, तेंव्हा त्याला नारळ सापडला. तिथेच झोपलेल्या पुजाऱ्याच्या डोक्याचा चम्मनगोटाही त्याच्या हाताला लागला. पंडारने तोच दगड समजून नारळ फोडला. हाताला मार लागून जखम झाली आणि त्यातून रक्त वाहू लागले.

'अयोय्यो, अयोय्यो!' करत पंडार ओरडू लागला. अन् तो त्या मिट्ट काळोखात शोधू लागला, तेंव्हा पंडारच्या हाताचा त्याला स्पर्श झाला. दोघेही आता एकमेकांना भिडून मारामारी करू लागले अन् माळ्यावर गोंधळ अुडाला!

खाली रामकुट्टी सारे काही ऐकत होता. हे सगळे प्रेतात्म्यांचेच काम आहे असे वाटून तो फारच घाबरला!

इतक्यात आपसात भांडणारे पंडार व पुजारी माळ्यावरून खाली पडले. 'धम्म' आवाज झाला! आपले पितर आपल्यावर फारच रागावले आहेत असे समजून रामकुट्टी फारच घाबरून गेला. त्याला कसले भानच राहिले नाही अन् तो तसाच घराबाहेर पळाला. अन् घोड्यावर अुडी मारून तो त्याला चाबूक मारू लागला. पण त्या अवस्थेत चाबकाचे फटकारे त्याच्या स्वतःच्याच पाठीवर बसू लागले!

आपली पितरंच आपला पाठलाग करत आहेत असे समजून तो आणखीनच घाबरून जोरात म्हणाला, "हे पितरांनो! सोडा न मला आता! इथून पुढे मी सारी क्रियाकर्म नीट करायचं वचन देतो!"

इकडे पार्वतम्माने पंडार व पुजारी या दोघांनाही घरातून बाहेर काढून लावले. तिला बिचारीला हेच कळेना की, ज्या देवाची आपण इतकी आराधना केली, त्याच्याकडून आपल्याला असा वाईट अनुभव का मिळावा? पुजाऱ्याचे कपट तिच्या लक्षातच आले नाही.





# वीर हनुमान

सूर्योदयाचे वेळी वानर-सेना व राक्षस-सेना यांच्यामध्ये युद्ध सुरू झाले. बाण, परिघ व तलवारींच्या साह्याने राक्षस वानरांशी लढू लागले. आणि वानर मोठमोठे वृक्ष व शिला यांचा उपयोग करू लागले. दोन्हीकडील घायाळ योद्ध्यांचे रक्त रणांगणावर वाहू लागले आणि त्यामुळे उडणारी धूळ थोडी दबली.

राक्षसांच्या हल्ल्यामुळे घाबरून गेलेल्या वानर-सेनेत रामाने प्रवेश केला नि अग्नि-ज्वालांप्रमाणे आपले बाण राक्षसांवर सोडू लागला. रामाच्या बाणांपुढे राक्षसांचा टिकाव लागेना. राम केव्हा बाण सोडीत होता हेच त्यांना समजेना. त्या बाणांनी निर्माण होणाऱ्या वाऱ्यात जेव्हा मोठमोठे वृक्ष हालत तेव्हा त्यांना बाणांचा पत्ता लागे. प्रलयकालीन झंझावाताप्रमाणे प्रखर वारे वाहू लागत. यात अनेक राक्षस मृत्यु-मुखी पडले.

तेव्हा आपल्या जवळ असलेल्या सुग्रीव, बिभीषण, जांबवान व हनुमान यांना उद्देशून राम म्हणाला—"मी ज्या प्रकारच्या बाणांचा उपयोग करीत आहे, ते शिवजी व मी सोडून कोणाला ही माहीत नाहीत."

लंकेतील राक्षस-स्त्रियांना युद्ध-

## ३४. देवेन्द्राचे रामाला साह्य



भूमीवर चालू असलेल्या राक्षस-संहाराची वार्ता समजली. रणांगणावर मृत्यु-मुखी पडलेल्या राक्षसांपैकी अनेक पति होते, पुत्र होते. त्या ओक्सा-बोक्षी रडू लागल्या. 'त्या पापिणीची नजर रामाकडे का गेली आणि तिला रामाबद्दल का आकर्षण वाटले? त्या शूर्पणखेचे ऐकून रावणाने सीतेचे अपहरण का केले? रामाशी शत्रुत्व का स्वीकारले? निदान सीता रावणाची पट्ट राणी व्हावी, ते ही झाले नाही. सीतेला उचलून आणण्यासाठी गेलेला विराधाचा रामाने संहार केला! आता ही रामाचाच जय होणार: पण हे रावणाच्या लक्षात येत नाही. इतका नाश झाला तरी! उफ्, आम्ही दुःखसागरात बुडत आहोत!'-असं म्हणून आपले पति, पुत्र व बंधूंच्या वियोगाने त्यांनी रडून थैमान घातले.

एकीकडे राम जंगली आगीप्रमाणे राक्षस सेनेचा विनाश करीत होता, तर दुसरीकडे रावण आपल्या जवळ असलेल्या महोदर, महापार्श्व व विरूपाक्ष यांना गर्वाने सांगत होता-"खर, कुंभकर्ण, प्रहस्त व इंद्रजित यांचा अंत करणाऱ्या शत्रूचे निर्मूलन मी आता करायला निघालो आहे. माझ्या बाणांनी आता पृथ्वी व आकाश अंधकारमय होऊन जाईल आणि वानर-सेनेच्या झुंडी रणभूमीवर मरून पडतील."

रावण ज्या रथावर स्वार झाला होता, त्याला आठ घोडे जुंपलेले होते. रावण भयंकर तेजाने प्रकाशमान दिसत होता. त्याच्या बरोबर रथावर महापार्श्व, महोदर व विरूपाक्ष होते. वानर सेनेत घुसून रावणाने भयंकर युद्ध सुरू केले.

रामाने एकदा राक्षसांच्या सेनेचा जसा विध्वंस केला होता, तशाच प्रकारे रावणाने वानर-सेनेचा नाश करायला सुरुवात केली. हे पाहून वानर-सेनेच्या संरक्षणाची जबाबदारी सुग्रीवाने सुषेणवर टाकली





आणि तो स्वतः ही युद्धासाठी निघाला. त्याने एक भयंकर आरोळी ठोकून अनेक सामान्य राक्षसांचा वध केला नि मग प्रमुख राक्षस-वीरांचा संहार करायला तो तयार झाला.

हे पाहून विरूपाक्ष रथाजवळील हत्तीवर उडी मारून बसला आणि त्याने वानर-सेनेत प्रवेश केला. तेथे त्याची सुग्रीवाशी गाठ पडली व तो त्याला आपल्या बाणांनी घायाळ करू लागला. तेव्हा सुग्रीवाने विरूपाक्षचे प्राण घेण्याचे ठरवून एक मोठा वृक्ष त्याच्या हत्तीच्या डोक्यावर मारला. त्यासरशी विरूपाक्षचा हत्ती मरून पडला.

विरूपाक्ष हत्तीवरून खाली आला व ढाल-तलवार हाती घेऊन युद्धासाठी सज्ज झाला. त्याने तलवारीने सुग्रीवावर एक वार केला. बराच वेळ सुग्रीव व विरूपाक्ष एकमेकांवर कुरघोडी करीत राहिले. शेवटी सुग्रीवाने विरूपाक्षवर असे जोरदार प्रहार केले की त्याच्या नाका-तोंडातून रक्त वाहू लागले. अशा रीतीने सुग्रीवाने विरूपाक्षचा अंत केला.

विरूपाक्ष मृत्युमुखी पडल्यावर वानर-सेनेशी युद्ध करण्यासाठी आता रावणाने महोदराची नियुक्ति केली. वानर-सैन्याचा फडशा पाडीत महोदर जेव्हा पुढे आला, तेव्हा सुग्रीवाने त्याला रोखले. त्याने एका परिघाने महोदराच्या रथाला जुंपलेले घोडे मारून टाकले. यावर महोदराचा चेहरा रागाने लाल झाला आणि त्याचा आपादमस्तक थरकाप झाला. महोदर हातात गदा घेऊन सुग्रीवाशी लढायला तयार झाला.

लवकरच सुग्रीवाच्या हातचा परिघ आणि महोदराच्या हातातील गदा मोडून खाली पडली. तेव्हा सुग्रीव आणि महोदर मुष्टियुद्धासाठी तयार झाले. थोडा वेळ एकमेकांशी लढून आता दोघेही थकले. तेव्हा रणांगणावर जे हत्यार सापडेल



त्याचा उपयोग करून ते युद्ध करू लागले. एवढ्यात महोदराच्या हातातील तलवार सुग्रीवाच्या ढालीत घुसली. महोदर ती बाहेर काढण्याच्या प्रयत्नात असताना संधी साधून सुग्रीवाने महोदराचे डोके उडविले, आणि अशा रीतीने त्याचा अंत केला.

तोपर्यंत महापार्श्व अंगदाच्या सेनेवर तुटून पडला होता, वानर वीरांचा तो नाश करू लागला. यामुळे अंगदाचा राग अनावर झाला आणि त्याने एक लोखंडाचा गोळा महापार्श्ववर फेकला. तो लागताच महापार्श्व व त्याच्या रथाचा सारथी दोघे ही बेशुद्ध झाले. याच वेळी गवाक्ष आणि जांबवान तेथे आले, त्यांनी मोठमोठे दगड महापार्श्वाच्या रथावर टाकले. रथाचे तुकडे-तुकडे झाले व घोडे मरून पडले.

एवढ्यात महापार्श्व शुद्धीवर आला. तो जांबवान व गवाक्ष यांच्यावर बाणांची वर्षा करू लागला. यावर अंगद खूप रागावला व दुरूनच त्याने एक परिघ महापार्श्ववर फेकला. महापार्श्वने आपल्याला परिघापासून बाचवले तर समोरून अंगद त्याच्यावर चालून आला. त्याने थोडा वेळ महापार्श्वशी युद्ध केले आणि शेवटी मुष्टि-प्रहारांनी त्याला ठार केले.

आता नाइलाजाने रावणाला स्वतःच युद्ध-भूमिवर यावे लागले. सामान्य वानरांबरोबर लढण्याची त्याची इच्छा नव्हती. या युद्धाच्या मुळाशी असलेल्या रामाचाच त्याला अंत करायचा होता. रामाच्या दिशेने जाता जाता रावणाने आपल्या तामसास्त्राचा उपयोग करून अनेक वानरांचा अंत केला. हे अस्त्र फार भयंकर होतं, त्याच्या केवळ स्पर्शानेच अनके वानर घायाळ झाले. घाबरून ते पळून जाऊ लागले. हे सर्व पाहून राम स्वतः युद्धासाठी तयार झाला. रामाबरोबरच लक्ष्मण ही युद्ध करायला सज्ज झाला.



प्रथम लक्ष्मणाने रावणावर बाण सोडले, पण रावणाने ते सर्व मधेच खंडित करून टाकले. नंतर रावण रामाकडे वळला व बाण फेकू लागला. रामाने हे सर्व बाण मधेच खंडित केले. रावण व राम यांच्यात बराच वेळ तुंबळ युद्ध झाले. ते एकमेकांच्या अस्त्रांचा नाश करीत राहिले.

रावणाने रामावर असुरास्त्र टाकले. ते फारच भयानक होते. रामाने आपल्या आग्नेयास्त्राने त्याचा भंग केला. हे पाहून सुग्रीव व अन्य वानर-वीर आनंदित झाले.

यानंतर रावणाने रौद्रास्त्राचा उपयोग केला. रामाने आपल्या गांधर्वास्त्राच्या साह्याने रौद्रास्त्राचा नाश केला. तेव्हा रावणाने आपले सौरास्त्र रामाच्या दिशेने फेकले. रामाने आपल्या अस्त्राने त्याचे ही वाटेतच खंडन केले.

नंतर बराच वेळ राम व रावण एकमेकांवर बाण सोडत राहिले. रामाच्या बाणांनी रावण खूप घायाळ झाला व थोडा आराम करण्यासाठी खाली बसला.

तेव्हा लक्ष्मणाने प्रथम आपल्या बाणांनी रावणाच्या रथाचा ध्वज मोडून टाकला, त्याच्या रथाच्या सारथ्याचे डोके उडवले आणि नंतर त्याने रावणाच्या धनुष्याचे तुकडे-तुकडे करून टाकले.

जेव्हा लक्ष्मण थांबला तेव्हा विभीषण पुढे आला. त्याने रावणाच्या रथाच्या घोड्यांना मारून टाकले. आता रावण खूप रागावला व त्याने विभीषणावर एक शक्ति फेकली. पण लक्ष्मणाने आपल्या बाणांनी मधेच त्या शक्तीचे तीन तुकडे करून टाकले.

आता रावण याहून अधिक भयानक शक्तीचा उपयोग करणार आणि विभिषणावर तिचा वापर करणार हे लक्ष्मणाच्या लक्षात आले. तो आपली जागा सोडून विभीषणाच्या पुढ्यात येऊन उभा राहिला, एक प्रकारे तोच विभीषणाचे कवच बनला आणि रावणावर बाणांचा वर्षाव करु लागला. त्याचा उद्देश



असा की रावणाला त्या शक्तीचा उपयोग करता येऊ नये.

तेव्हा रावण लक्ष्मणाला म्हणाला-"लक्ष्मणा, तू विभीषणाच्या पुढे येऊन उभा राहिला आहेस, म्हणून आता या शक्तीचा प्रयोग मी तुझ्यावरच करतो. ही शक्ति तुझे प्राण घेईल." मग रावणाने त्या शक्तीचा प्रयोग लक्ष्मणावरच केला.

त्या शक्तीला शाप देत राम म्हणाला-"तू व्यर्थ हो!" तरी पण ती शक्ति सरळ येऊन लक्ष्मणाच्या छातीत घुसली व दुसऱ्या बाजूने बाहेर येऊन खाली पडली. रामाने रागाने त्या शक्तीचा विनाश करून टाकला. या वेळी रावण रामावर बाण सोडीतच राहिला. रामाने त्या बाणांची मुळीच पर्वा केली नाही. रामाने एकदा हनुमानाला आलिंगन दिले. नंतर हनुमान, सुग्रीव इत्यादींना राम म्हणाला-"तुम्ही लक्ष्मणाचे संरक्षण करा, आता या रावणाचा वध करण्याची वेळ येऊन ठेपली आहे."

परंतु लक्ष्मणाची स्थिति पाहून रामाची युद्ध करण्याची इच्छा कमी होत चालली. हे ओळखून सुषेण आता रामाला म्हणाला-"तुम्ही लक्ष्मणाची चिंता करु नका. तो जिवंत आहे. त्याचे प्राण वाचवता येतील." नंतर हनुमानाकडे वळून तो म्हणाला-"एकदा जो औषधि-पर्वत तू उचलून आणला होतास, त्याच्या उजव्या



बाजूच्या शिखरावरील औषधि वनस्पति घेऊन ये. आपल्याला लवकरच लक्ष्मणाचे प्राण वाचविले पाहिजेत."

हनुमान त्या औषधि-पर्वतावर गेला, पण कोणत्या वनस्पति आणाव्यात हे त्याला समजेना, म्हणून तो पर्वताचे शिखरच उचलून घेऊन आला. तो सुषेणला म्हणाला-"ज्या औषधि वनस्पति आपल्याला पाहिजेत त्या मी ओळखू शकलो नाही. म्हणून मी शिखरच उचलून घेऊन आलो आहे. तुला ज्या वनस्पति पाहिजेत त्या यातून घे."

सुषेणने हनुमानाच्या बुद्धि व पराक्रमाची प्रशंसा केली व आवश्यक त्या वनस्पति

काढून घेतल्या. नंतर त्याने वनस्पतींचा रस काढून तो लक्ष्मणाच्या नाकात घातला. आता लक्ष्मण शुद्धीवर येऊन उभा राहिला.

रामाच्या डोळ्यातून अश्रू वाहू लागले. आनंदाने त्याला मिठी मारून राम म्हणाला-"लक्ष्मणा, तू मृत्यूच्या दाढेतून परत आलास. जर खरोखरीच तुला मृत्यु आला असता, तर या युद्धापासून मला काय मिळते? तू जिवंत होऊन उठलास हे माझे सुदैव!"

तेव्हा लक्ष्मण उद्‌गारला-"आपण असे दुबळ्यासारखे बोलणे इष्ट नाही. रावणाचा वध करून विभीषणाला लंकेचा राजा बनविण्याचे वचन आपण दिलेले आहे. आपण कृपया माझी काळजी करू नका. प्रथम त्या रावणाचा अंत करून, आपण आपल्या वचनाचे पालन करावे. विभीषणाला लंकेचा राजा बनविणे हेच आपले ध्येय असले पाहिजे. सूर्यास्तापूर्वी रावणाचा वध आपण करावा अशी माझी इच्छा आहे."

लक्ष्मणाचे हे शब्द ऐकून रामाने आपले धनुष्य उचलले व तो रावणावर बाण सोडू लागला. राम-रावणाच्या या युद्धात एक गोष्ट विचित्र होती. रावण रथारूढ होऊन युद्ध करीत होता, तर राम जमिनीवरूनच!

हे पाहून इन्द्राने आपला रथ व सारथी मातली यांना पृथ्वीवर पाठविले. मातली थेट रामाकडे येऊन म्हणाला-

"हे राम, आपला विजय व्हावा म्हणून भगवान इन्द्राने हा रथ आपणाकडे पाठविला आहे. या रथाबरोबरच इन्द्राने आपले धनुष्य, कवच, बाण व शक्ति आपणासाठी पाठविले आहेत. यावेळी मीच या रथाचा सारथी आहे. आता आपण या रथावर आरूढ व्हावे व रावणाचा संहार करावा."

मातलीचे बोलणे ऐकून रामाने नम्रपणे रथाला प्रदक्षिणा घातली व त्यावर आरूढ झाला. नंतर राम व रावण यांच्यात असं युद्ध झालं की पाहणारे पहातच राहिले.



# विफल हुषारी

फार पूर्वी सुलतान नूरशहा बगदादवर राज्य करत होता. त्याचा स्वभाव मोठा चेष्टेखोर होता. एकदा बगदादमधील एक मोठा व्यापारी रहमतुल्ला हा अचानक मृत्यु पावला. तो एकटाच होता. त्याच्या इस्टेटीला कोणी वारस नसल्यामुळे ती सारी सरकारजमा केली गेली.

बगदादमधेच रहाणारा अब्दुल्ला नावाचा युवक फारच गरीब होता. पण त्याबरोबरच तो मोठा धूर्तही होता. रहमतुल्लाची इस्टेट गडप करण्यासाठी त्याने एक युक्ती योजली, अन् तो सुलतान नूरशहाच्या दरबारात हजर झाला.

दरबारात सुलतानला मोठ्या अदबीने सलाम करून अब्दुल्ला म्हणाला, "जहाँपनाह! मला माफी असावी. आपल्या शहरातल्या रहमतुल्ला या व्यापाऱ्याची सारी संपत्ती, त्याला वारस नसल्यामुळे, सरकारजमा झाल्याची वार्ता मला नुकतीच समजली. खरं म्हणजे तो एकटाच होता, अन् मीही एकटाच आहे. ज्याला आपलं असं कोणी नसेल, त्याचे आईबाप अल्लाच असतो ना? तेंव्हा अशा प्रकारे रहमतुल्ला आणि मी 'अल्लाची मुलं' असल्याने भाऊभाऊच लागतो नं एकमेकांचे? रहमतुल्ला हा तसा माझा थोरला भाऊच! माझी आपणाला अशी विनंती आहे की माझा मोठा भाऊ रहमतुल्ला याचा भाऊ म्हणून माझं नाव घोषित केलं जावं, अन् आपल्या खजिन्यात पोचलेली त्याची इस्टेट मला दिली जावी."

"होय! तू बरोबरच बोलत आहेस! तुझ्या मोठ्या भावाची इस्टेट तुला नक्कीच मिळायला हवी." असे म्हणून सुलतानाने खाजिनदाराला बोलावून घेतले, अन् त्याला आज्ञा दिली, "रहमतुल्लाच्या संपत्तीतला एक दिनार आणून त्याचा छोटा भाऊ अब्दुल्ला याला आणून दे."

सुलतानची आज्ञा ऐकून अब्दुल्लाने आश्चर्याने विचारले, "काय फक्त एकच दिनार?"

"होय! कारण तुझ्यासारखेच रहमतुल्लाचे भाऊ आपल्या राज्यात कित्येक हजार आहेत नं! मग त्यांनाही आपापला हिस्सा मिळायला नको का?" सुलतान गालात हसत बोलला.

हे ऐकून अब्दुल्ला एकदम चुप झाला. कारण सुलतानच्या प्रश्नाला त्याच्याजवळ उत्तरच कुठे होते?





# पूर्णिमेच्या रात्रीचे पिशाच्च

मधुपुरीच्या जंगलात एक लाकुडतोड्या आपल्या झोपडीत रहात असे. त्याला दोन मुली होत्या चंपा नि चुन्नी. चंपा एक वर्षाची होती तेव्हा तिची आई वारली. तेव्हा तिच्या वडिलांनी दुर्गा नावाच्या एका बाईशी लग्न केले. चुन्नी दुर्गाची मुलगी होती.

दुर्गा मोठी कठोर होती. ती चंपाला फार त्रास देई. सावत्र आईच्या शिव्यांनी चंपाचे अंत:करण फार दु:खी होई, नि ती परमेश्वराला प्रार्थना करी की त्याने सावत्र आईच्या शिव्यांपासून तिला मुक्त करावे, लवकरच आपले लग्न व्हावे.

एका पूर्णिमेच्या रात्री वारा पडला होता, त्यामुळे चंपाची झोपमोड झाली. ती बाहेर जायला निघाली, इतक्यात तिला आपल्या वडिलांचे व सावत्र आईचे बोलणे ऐकू आले.

वडील म्हणत होते—"आपल्या मुली आता मोठ्या झाल्या. कर्ज काढून का होईना यंदा चंपाचे लग्न केलेच पाहिजे."

हे ऐकून दुर्गाच्या रागाचा पारा चढला. ती म्हणाली-"वेड तर नाही लागलं ना तुम्हाला? चुन्नीच्या लग्नाचा आता विचार करा, दुसरे काही मनात आणू नका, सांगून ठेवतेय!"

हे ऐकून चंपाला फार वाईट वाटलं. आता तिला भीति वाटली की या घरातील कामांमधून आपली सुटका कधीच होणे शक्य नाही. त्या पूर्णिमेच्या रात्री झोपडीबाहेर पडली नि जंगलाकडे निघाली.

एका ठिकाणी तिला एक विहीर दिसली. तीत उडी मारून आत्महत्या करावी अशा विचाराने ती विहिरीकडे गेली. तेव्हा झाडावरून एका पिशाच्चाने खाली उडी मारली नि ते म्हणालं-"थांब! थांब!"

अविनाश साठे

पिशाच्चाने मोठ्या प्रेमाने खोद-खोदून विचारले तेव्हां चंपाने त्याला आपली रामकहाणी ऐकवली.

"छे छे! एवढ्याशा गोष्टीसाठी आत्महत्या करायला निघालीस?" असं म्हणून पिशाच्च्याने त्या पडक्या विहिरीत उडी मारली, अन् एक जुनं पोतं आणून ते चंपाला दिलं.

आश्चर्याने चंपाने विचारले-"याचा मला काय उपयोग?"

"हे पोतं तू आपल्यापाशी ठेवलंस तर तुझ्या सावत्र आईच्या शिव्या सुद्धा तुला गोड वाटतील. बाकीचं जाऊं दे, तिने शिव्याच द्याव्यात असं तुला वाटेल. कारण तिने एक शिवी दिली की या पोत्यात एक सोन्याचं नाणं पडेल." पिशाच्च म्हणाले.

चंपाने पिशाच्च्याजवळ कृतज्ञता प्रकट केली, नि ती झोपडीत परत आली.

दुसऱ्या दिवशी भल्या पहाटे दुर्गा रागा-रागाने ओरडत चंपाजवळ आली आणि तिच्या पाठीवर एक चपराक मारीत शिव्या देऊ लागली-"काय ग आळश्यांची राणी, अजून झोपून राहिली आहेस? ऊठ, गोठ्यात जाऊन सफाई कर नि धार काढून दूध आण."



त्या दिवशी रात्री लाकुडतोड्या जेव्हा घरी आला तेव्हा दुर्गाच्या शिव्यांनी पोतं दोनशे नाण्यांनी भरून गेलं होतं. चंपाने वडिलांना पोतं दाखवलं नि म्हणाली-"पूर्णिमेच्या रात्रीच्या पिशाच्च्याचं हे वरदान आहे!"

दुर्गाने सोन्याच्या नाण्यांनी भरलेली पिशवी झोपडीत नीट लपवून ठेवली. लाकुडतोड्या चंपासाठी स्थळं शोधू लागला.

पुन्हा पूर्णिमेची रात्र आली. दुर्गाने आपली मुलगी चुन्नी हिला सगळं काही समजून सांगितलं. चंपा प्रमाणेच चुन्नी विहिरीकडे जायला निघाली, जशी काही



जीव द्यायला निघाली आहे.

पौर्णिमेच्या रात्रीच्या पिशाच्चाने तिला आडवले. चुन्नीने सांगितलं की आपल्या आईच्या शिव्या सहन होत नसल्याने ती आत्महत्या करायला निघाली आहे.

पौर्णिमेच्या रात्रीच्या पिशाच्च्याने विहिरीतून पोतं आणलं नि म्हणालं-या पोत्याची एक विशेषता आहे, पण ती फक्त एकच दिवस टिकते.

ठीक याच वेळी त्या देशावर राज्य करणारा वृद्ध राजा आपल्या एकुलत्या एक मुलाला दटावून विचारीत होता-"बोल, शेवटी तू लग्न करणार आहेस की नाही? आतापर्यंत अनेक देशांच्या राजकुमारींची चित्रे तू पाहिलीस, पण एकीला ही तू पसंत केले नाहीस. माझ्या प्रश्नाचं उत्तर दे." राजाला बराच राग आला होता, तो चिडलेला दिसत होता.

हंसून युवराज म्हणाला-"पिताजी, माझी लग्न करण्याची इच्छा नाही असं तर मी म्हणत नाही. पण या सर्व राजकुमारींमध्ये मला पाहिजे अशी सुंदर कोणी ही नाही. यांच्या तुलनेत तर त्या डोंगरी मुलखात राहणाऱ्या लाकुडतोड्याच्या मुली अधिक सुंदर वाटतात मला!"

राजाच्या लक्षात आलं की युवराज विजय नेहमी शिकारीसाठी जंगलात जातो, अन् तिथं त्याने या मुलींना पाहिलं असलं पाहिजे. म्हातारा राजा विजयचं लग्न करू इच्छित होता, म्हणून तो विजयला म्हणाला—"तर मग, लाकुडतोड्याच्या मुली तुला पसंत असल्या जर त्यांच्या पैकी एकीशी लग्न कर. मी नाही म्हणणार नाही. त्यांच्या पैकी कोणत्या मुलीशी लग्न करशील बोल?"

तेव्हा राजकुमार विजय म्हणाला-"तशा त्या दोघी ही सुंदर आहेत. मी दोघींशी जरा जवळून परिचित होऊन माझी पत्नी होण्यास कोण अधिक



योग्य आहे ते ठरवीन!"

दुसऱ्या दिवशी राजा आणि राजकुमार गुप्त वेषात त्या लाकुडतोड्याच्या घरी पोचले. सूर्योदयाची वेळ होती. लाकडे तोडण्यासाठी लाकुडतोड्या जंगलात गेलेला होता. झोपडी समोर स्वच्छता करून, सडा घालून चंपा रांगोळी घालत होती.

दोन अनोळखी पाहुण्यांना पाहून चंपाने अंगणात खाट टाकली, पाहुण्यांना बसायला सांगितलं नि म्हणाली-"आपण माझ्या वडिलांना भेटायला आलेले दिसताहात. ते तर कामाला गेलेले आहेत. आता ते संध्याकाळीच येतील. माझ्या आईशी बोलण्याची आपली इच्छा असेल तर बोलवू तिला?"

आत झोपडीत दुर्गा चुन्नीला शिव्यांची लाखोली वहात होती. तिची इच्छा होती की आज एक क्षण ही वाया जाऊं नये आणि अशा रीतीने पोतं सोन्याच्या नाण्यांनी तुडुंब भरावं. म्हणून ती शिव्या देत राहिली.

कोणी तरी दोन अपरिचित माणसं आल्याची वार्ता चंपाने आईला दिली. तेव्हा दुर्गा म्हणाली-"त्यांना सांग की चालते व्हा इथून! ती फार कामात आहे इथे. या देशाचा राजा जरी आज माझ्या घरी आला, तरी मला बोलायला



फुरसत नाही."

झोपडी बाहेर येऊन चंपा राजाला म्हणाली-"माझी आई फार कामात गुंतली आहे, तुमच्याशी बोलायला वेळ नाही तिला. कृपा करून रागावू नका."

"तर मग जातो आम्ही!" असं म्हणून राजा नि राजकुमार परत निघाले.

रस्त्यात विजयला राजा म्हणाला-"आता आपण ज्या मुलीला पाहिलं ती ठीक आहे. तरी पण दुसरीला एकदा पाहिलेलं बरं. आपण उद्या पुन्हा येऊ या."

तेव्हा विजय म्हणाला-"पिताजी, तसं करायची जरूर नाही. आपल्या आईच्या

तोंडून इतक्या शिव्या खाणाऱ्या मुलीला पाहण्याची सुद्धा आवश्यकता मला वाटत नाही."

दुसऱ्या दिवशी राजाचे सैनिक आले नि ते लाकुडतोड्याच्या सर्व कुटुंबाला सम्मानपूर्वक राजधानीत घेऊन गेले. राजवाड्यात पोंचल्यावर दुर्गाने चंपाचा हात पकडून तिची क्षमा मागितली. ती म्हणाली-"चंपा, मला माफ कर. कठोरपणे मी तुला खूप त्रास दिला. आपल्या दुष्टपणाचा परिणाम मी हा आता पहातेच आहे. आपली उदारता नि सहनशक्तीच्या बळावर तू आता या देशाची महाराणी बनणार आहेस. पूर्णिमेच्या रात्रीच्या पिशाच्च्याच्या दयेने खूप सोनं घरात जमलं आहे. चुन्नीचं लग्न एकाद्या लाकुडतोड्याशी करण्याऐवजी कोणा लाकूडव्यापाऱ्याशी मी आता करून देईन." दुर्गा दुःखी स्वरात चंपाला समजावत राहिली.

तिचे शांतवन करीत चंपा म्हणाली-"काही वाईट वाटून घेऊं नकोस आई! आपल्या बहिणीसाठी चांगलं स्थळ शोधून तिचा विवाह करण्याची जबाबदारी आता माझी!"

मधेच दखल देत राजकुमार विजय म्हणाला-"हे तू काय सांगताहेस चंपा? मी या देशाचा राजा होणार आहे. माझ्या होणाऱ्या पत्नीच्या बहिणीचं लग्न एकाद्या लुंग्या-सुंग्याशी मी कसं होऊन देईन? तिचा नवरा ही एक राजकुमारच असेल."

आणि दुर्गाकडे पहात तो म्हणाला-"सासूबाई, तुम्ही मुळिच चिंता करू नका. चुन्नीचं लग्न एकाद्या राजकुमाराशी मी नक्की घडवून आणीन."

हे ऐकून दुर्गाला फार आनंद झाला. आणि चुन्नीचा चेहरा फुलासारखा चमकू लागला.



# चान्दोबाच्या बातम्या

## कोलम्बस नव्हे, फाहियान!

आज सारी दुनिया असे समजते की ५०० वर्षांपूर्वी इटलीतला एक नाविक क्रिस्तोफर कोलम्बस यानेच अमेरिका शोधून काढली. ही ऐतिहासिक घटना घडल्याला ७०० वर्षे पूर्ण झाल्याबद्दलचा समारंभही मागील १२ डिसें. रोजी थाटामाटाने साजरा झाला. परंतु अमेरिकेत पोचलेल्या लियान युनशान नावाच्या चिनी इतिहास-संशोधकाने या धारणेचे खंडन करून नुकतेच असे जाहीर केले की कोलम्बसाच्याही १०००० वर्षांपूर्वी चिनी बौध्द संन्यासी फाहियान (३३६-५२२) हा 'एपोटी' नावाच्या राज्यात पोचला होता. हे एपोटी नावाचे राज्य, त्या काळात अमेरिकेतल्या पश्चिम तटवर्ती प्रान्तात, आजच्या लासएन्जिलसच्या जवळ होते. चौथ्या शतकात भारतात आलेला फाहियान तो हाच. १५०० वर्षांपूर्वी फाहियानने लिहिलेल्या आत्मकथेच्या आधारे लियान युनशानने एका अंतर्राष्ट्रीय अधिवेशनात आपला हा विचार प्रकट केला.

## कॅलेण्डर बालक



या वर्षी गणतन्त्र दिवस कोणत्या वारी आला? मंगळवारी. जानेवारीची पहिली तारीख कोणत्या वारी आली? शुक्रवारी! अच्छा, मग १९०० मधील जानेवारीच्या पहिल्या तारखेला कोणता वार होता? हां! हे सांगायला आपल्याला कॅलेण्डर उलटून पहावे लागेल नं? पण कोणत्याही कॅलेण्डरची मदत न घेताच अविनाश नटराजन् नावाचा पाच वर्षांचा मुलगा झटकन उत्तर देईल की, तो दिवस होता सोमवार. हा बालक तमिळनाडूतील ईरोड येथे रहातो, आणि हा अद्भुत् मेधावी बालक झटपट सांगू शकतो की कोणत्या सालची, कोणती तारीख कोणत्या वारी आली किंवा येईल। त्यामुळे या बुध्दिमान् बालकाला 'कॅलेण्डर बॉय' असे संबोधले जाते. हा अद्भुत् बालक पुढे आणखी काय चमत्कार करील किंवा आणखी काय काय शोध लावील हे आपल्याला पहायचे आहे.

## एकटाच दक्षिण ध्रुवावर!



इसवी सन १९९० मधे नॉर्वेतील अर्लिंग काग नावाच्या एका युवकाने आपल्या मित्रासमवेत उत्तरध्रुवाची यात्रा पूर्ण केली. २९ वर्षांच्या या साहसी युवकाने आता एकट्यानेच ५० दिवसांचा प्रवास केला व या वर्षाच्या जानेवारीच्या पहिल्या आठवड्यात तो दक्षिण-ध्रुवावर पोचला! हा साहसी युवक १२० किलो वजनाचे आवश्यक सामान स्लेज (बर्फावर घसरत जाणारी गाडी) वर ठेवून ती खेचत, दिवसाकाठी जवळजवळ २६ कि. मी. इतके अंतर चालत, एकूण १,३९० कि. मी. चा हा प्रवास ठरवलेल्या वेळेच्या दहा दिवस अगोदरच पूर्ण करून, एकटाच दक्षिण ध्रुवावर पोचला!



# ज्याचे त्याचे काम

एका गावात एक धनगर रहात असे. तो अगदीच भोळाभाबडा होता अन् बिचारा एकटाच होता. एकदा त्याला जरूरी कामासाठी बाजारात जाणे भाग पडले. पण त्याच्या मेंढ्यांची राखण करायला कोण होते? तेंव्हा मेंढ्यांच्या रक्षणाचा भार परमेश्वरावर सोपवून तो बाजाराकडे निघाला.

थोडे दूर चालल्यावर रस्त्यात त्याला एक ओळखीचा इसम भेटला. त्याने विचारले, "अरे कुठे निघालायस?"

"बाजारात काही खरेदी करायचीय मला." धनगर अुत्तरला.

"ते ठीक आहे रे! पण मग तुझ्या मेंढ्या कोण राखतंय आज?" त्या हुशार माणसाने विचारले.

"कोणी नाही. आहेच कोण माझं? त्यांची राखण आज परमेश्वरच करील."

असे म्हणून तो भोळा धनगर पुढे गेला.

"असं काय? मग आता परमेश्वर कशी राखण करतो, ते पाहूनच घेतो मी!" असे मनात म्हणून तो दुसरा माणूस सरळ धनगराच्या मेंढ्यांच्या कळपाकडे गेला. तेथे त्याने चांगल्या तगड्या, गुबगुबीत पोसलेल्या वीस मेंढ्या निवडल्या अन् त्यांना हाकून नेत तो आपल्या गावाकडे निघून गेला.

धनगर बाजारातून परतल्यावर आपल्या वीस मेंढ्या कमी झाल्याचे समजायला त्याला वेळ नाही लागला. त्याने विचार केला-इथून पुढे मेंढ्या राखायचं काम परमेश्वरावर सोपवणे बरे नव्हे.

नंतर त्याने मेंढ्या राखण्यासाठी दोन कुत्रे खरेदी केले. ज्याच्याकडून त्याने ते कुत्रे घेतले, तो इसम धनगराला म्हणाला कि यांना रोज फक्त एक एक अुन्दीर खायला घाल म्हणजे पुरे!

पण कुत्रे आल्यानंतरही धनगराचे नुकसान होतच राहिले. तिथे जवळपास काही लांडगे होते. ते रात्री येअून कळपातल्या मेंढ्या मारून खात असत. कुत्रे त्यांना पाहूनही मुळीच भुंकत नसत, कारण मेंढ्यांचे अुरलेसुरले मांस कुत्र्यांनाही खायला मिळे.

काही दिवस गेल्यावर धनगराच्या लक्षात आले की अजूनही आपल्या कळपातल्या मेंढ्या कमीच होत आहेत!

इतक्यात तिकडून जाणारा एक म्हातारा थांबून धनगराला विचारू लागला. "काय झालं भोळ्या मुला? कसलं संकट आलं तुझ्यावर?"

"रडू नाही तर काय करू बाबा? परमेश्वरावर विश्वासून कळप सोडून बाजारला गेलो, तर माझ्या वीस मेंढ्या चोरीला गेल्या; अन् दिसत असूनही परमेश्वराने काहीही केलं नाही. नन्तर कळपाच्या रक्षणासाठी दोन कुत्रे खरेदी केले मी, तरीही ये रे मागल्या! कुत्रे असून-नसून सारखेच!" धनगराने आपले दुःख म्हाताऱ्यापुढे ओकून टाकले.

"कुत्र्यांना खायला काय घालतोस भोळ्या?" त्या म्हाताऱ्याने विचारले.

"दोघांना एक एक अुन्दीर खायला घातला म्हणजे बास, असं त्या कुत्रे विकणारानंच सांगितलं होतं मला! मी



रोज त्यांना एक एक अुन्दीर पकडून आणून देतो.'' धनगर बोलला.

''ओहो! असं आहे होय? म्हणूनच तर तुझ्यावर असं संकट ओढवलं! तू कधीतरी एकादी मेंढी मारतच असशील ना? मग आपल्या कुत्र्यांनाही पोटभर खाअू घाल ना! म्हणजे, ते खातील तितकं! तू आपलं काम नीटपणे कर, अन् बघ कुत्रेही आपलं काम नीट करतात की नाही! एका अुंदराने त्यांना काय कात होणारेय?'' म्हाताऱ्याने सल्ला दिला.

तेंव्हापासून धनगर आपल्या कुत्र्यांना पोटभर खायला घालू लागला. आणि कुत्र्यांना पोटभर मिळू लागल्यावर मेंढ्या नाहीशा होणेही आपोआप थांबले! पहिल्या दिवशी लांडगे आलेच नाहीत. दुसऱ्या दिवशी जेंव्हा दोन लांडगे आले तेंव्हा कुत्र्यांनी त्यांना पाहिलेच.

एक कुत्रा भुंकत म्हणाला, ''जा, जा! आमचा मालक आता आम्हाला पोटभर देतो खायला. तुमचं अुष्टं खायची आम्हाला आता काही गरज नाही.''

''नका रे जाअू माझ्या बांधवांनो! या, आपलं पोट भरून घ्या-अन् पूर्वीपासून चालत आल्याप्रमाणे आम्हाला ही द्या थोडं!'' दुसऱ्या कुत्र्याने भुंकून त्यांना सांगितले.

क्षणभर लांडगे जरा विचारातच पडले, कारण आजपर्यन्त या कुत्र्यांना त्यांनी भुंकताना कधी पाहिलेच नव्हते! अन् आता ते भो-भो करून परस्परविरुद्ध बोलत आहेत! पण या कुत्र्यांनी आजपर्यन्त त्यांच्यावर कधी हल्ला केला नव्हता, म्हणून दुसऱ्या कुत्र्याच्या सांगण्यावर विश्वासून ते धैर्याने कळपाजवळ सरकले.

दुसऱ्याच क्षणी कुत्रे वाघासारखे त्यांच्यावर तुटून पडले! जोरजोराने भुंकून पहातापहाता कुत्र्यांनी त्या लांडग्यांना फाडून मारून टाकले!





## वाघांचा विनाश

दोन दशकांपूर्वी आपल्या सरकारने 'वाघांच्या संरक्षणा' साठी जी योजना हाती घेतली, तिच्या परिणामामुळे देशातल्या एकूण १७ अभयारण्यांमधे मिळून रहाणाऱ्या वाघांची संख्या १,८०० वरून ४,३०० पर्यन्त वाढली. परन्तु अलिकडे या अभयारण्यांमधूनही चोरून या जनावरांची शिकार केली जात आहे. अशा तऱ्हेने आपल्याच देशात नव्हे, तर आपले अुपखंड असणाऱ्या नेपाळ, भूतान व बांगला देशातही अशी शिकार चालू आहे. संपूर्ण जगात असणाऱ्या सात-आठ हजार वाघांपैकी जवळजवळ साठ टक्के वाघ आपल्या या चार भूखंडातच आहेत. गेल्या डिसेंबरमधे वातावरण विशेषज्ञांनी दिल्लीत झालेल्या आंतरराष्ट्रीय अधिवेशनात अशी घोषणा केली आहे की वाघांच्या संरक्षणासाठी तावडतोब पाअुले अुचलली नाहीत, तर २०२० सालापर्यन्त वाघ हा प्राणी केवळ प्राणिसंग्रहालयातच पहायला मिळण्याची वेळ येईल!

## निर्मूल होत असणारे जीवजंतु

केवळ वाघच नव्हे, तर १५० जातींचे निरनिराळे सस्तनप्राणी, पक्षी, सरपटणारें प्राणी, अुभयचर व अनेक तऱ्हेचे किडे आज निर्मूलनाच्या भयग्रस्त कड्यावर अुभे आहेत! वैज्ञानिक म्हणत आहेत की विशेषत: सिंह, हत्ती, जंगली गाढव, सिंहाच्या शेपटीचा वानर व इंडस डॉल्फिन या साऱ्या प्राण्यांचे निर्मूलन होण्याचा धोका निर्माण झालेला आहे. ही सारी जनावरं आपल्याच देशातली आहेत. त्यामुळे जनतेने निसर्गानुकूल जीवन जगायला हवे, नाहीतर आपले मित्र असणारी ही जनावरे नक्कीच नष्ट होतील.

## दोन मते

एका काळी डायनोसर नावाच्या राक्षसी पाली साऱ्या जगात अस्तित्वात होत्या. त्यांच्या अचानक नाहीसे होण्याची दोन कारणे दिली जात आहेत. प्रथम वैज्ञानिकांनी असे मत प्रकट केले की, जवळजवळ ४०,००,००९ वर्षांपूर्वी ज्वालामुखींचा स्फोट झाला. विशाल ज्वालामुखी पर्वत अशा तऱ्हेने अुद्दीपित झाल्यामुळे प्रचंड प्रमाणात लाव्हारस भूमीवर सर्वत्र पसरला; अन् त्यामुळे या विशालकाय डायनोसर प्राण्यांचा विनाश ओढवला. मेक्सिकोमधे १७० कि.मी. रुंद अशा ज्वालामुखीचा शोध लावण्यात आला. आणि असे अनुमान काढण्यात आले की अंतरिक्षातून पृथ्वीवर आलेल्या एकाद्या विशाल ग्रहामुळे किंवा धूमकेतूच्या टकरीमुळे हा ज्वालामुखी



तयार झाला. आणि वैज्ञानिकांनी असे मत प्रकट केले की जवळजवळ ६,५०,००,००० वर्षांपूर्वी अशा तऱ्हेची टक्कर झाल्यामुळेच त्यावेळी भूमीवर असणारे ७० टक्के प्राणी या राक्षसी पालींसह नष्ट झाले. सध्या मानव जनावरांबाबत जे क्रौर्य किंवा अप्रेम दाखवत आहे, तेच जनावरांच्या विनाशाला कारण होत आहे.








# कॅनडा मधील वाद



इंग्रज आणि फ्रेंच लोक अन्यत्र कोठे मित्र असले तरी कॅनडा मध्ये गेली दोनशे वर्षे त्यांच्यात वाद-विवाद चालू आहे. इंग्लंड आणि फ्रान्स यांच्यामधील हा कॅनडा-विवाद संपविण्यासाठी नि कॅनडात एकता स्थापित करण्यासाठी एक 'सार्वमत' आयोजित करण्यात आले. एकूण दहा राज्यांपैकी सात राज्यांनी प्रतिकूल व बाकीच्या तीन राज्यांनी अनुकूल मत दिले.

सुमारे ५०० वर्षांपूर्वी म्हणजे सन १४९७ मध्ये इंग्रज नाविक जॉन कॅबोट याने आजच्या कॅनडाचा शोध लावला. तेव्हा तो न्यूफाउंडलंड व नोवास्काशिया मधे पोचला होता. तेव्हापासून या प्रांतांवर इंग्लंडचे आधिपत्य सुरू झाले. यानंतर चाळीस-पन्नास वर्षांनी जॉकेस कार्टियर नावाचा एक फ्रेंच संशोधक आजच्या क्युबेकच्या दक्षिणेकडील एक गावात पोचला होता आणि त्याने असं ऐकलं की स्थानिक रेड इंडियन लोक त्या प्रांताला 'कनाथा' नावाने संबोधित असत. हा ह्यूरन भाषेतील एक शब्द आहे आणि आजचे 'कॅनडा' हे नाव त्याचो एक रूपांतर आहे. फ्रेंच सरकारनेआपल्या ताब्यातील या भागाला 'न्यू फ्रान्स' असे नाव दिले.

१७ व्या शतकात इंग्लंड व फ्रान्स यांच्यात प्रत्यक्ष वाद सुरू झाला. सन १७१३ मध्ये झालेल्या 'युट्रेक्ट तह'ा-नुसार इंग्लंडने काही प्रांतावर अधिकार प्रस्थापित केला होता. यानंतर सात वर्षे युद्ध होऊन सन १७६९ मध्ये झालेल्या 'पॅरिस तह'ानुसार कॅनडा ब्रिटनच्या ताब्यात आला आणि शंभर वर्षात क्यूबेक, अंटारियो, नोवास्काशिया व न्यू ब्रान्स्विक ही राज्ये एक झाली. काही काळानंतर मनीटोबा, ब्रिटिश कोलंबिया, अल्बेटो नि सस्कच्युवान ही राज्ये ही त्यात सामिल झाली.

सन १९३९ मध्ये वेस्ट मिनिस्टर विधानानुसार हा विशाल देश ब्रिटिश कॉमनवेल्थ मधील एक स्वतंत्र देश झाला. परंतु क्युबेक मध्ये फ्रेंच भाषा बोलणारांची संख्या अधिक असल्यामुळे आपली भाषा व संस्कृति यांचे संरक्षण हे फ्रेंच लोक करीत राहिले. यामुळे विभाजनाचे वातावरण

वाढू लागले.

गेल्या दोन वर्षात हा विभाजनवाद संपुष्टात आणण्यासाठी जोरदार विचार-विमर्श, वादोपवाद आणि चर्चा होत राहिली. विशेषतः क्यूबेक मधे प्रधान मंत्री ब्रियान मलरोनी आणि दहा राज्यांचे मुख्य मंत्री यांच्यात विचार-परामर्श झाला व घटनेत काही बदल करण्याचे प्रयत्न झाले. क्यूबेकला विशेष स्थान द्यावे, सेनेटचे सभासद नॉमिनेट न करता त्यांची निवडणूक व्हावी, आणि स्थानिक रेडइंडियन व एस्किमो लोकांना स्वपालनाधिकार दिले जावेत हे विशेष बदल होते. अशा रीतीने २८ ऑगस्ट, १९९२ रोजी एक निर्णय घेण्यात आला.

नुकत्याच झालेल्या सार्वमतात एक प्रश्न विचारला होता-"२८ ऑगस्टच्या निर्णयानुसार घटनेत बदल होईल अशी आपली अपेक्षा आहे?"




क्यूबेकने हा निर्णय मान्य केला नाही. कारण घटनेत हे बदल झाले तरी यात क्यूबेकला काही विशेष अधिकार मिळत नव्हते. कॅनडा मध्ये सर्वाधिक लोकसंख्या असलेला प्रांत आहे ॲंटारियो, त्याने पण हा निर्णय स्वीकारला नाही. नोवास्काशिया, मनीटोबा, सस्कान्युवान, अल्बर्टा व ब्रिटिश कोलंबिया यांनी पण निर्णय अस्वीकृत केला. न्यूफौंडलंड, न्यूब्रान्स्विक आणि प्रिन्स एडवर्ड आयलंड या तीन राष्ट्रांनी मात्र निर्णय स्वीकारला. पण फेडरल पार्लमेंट आणि दहा राष्ट्रांच्या विधान-सभांनी स्वीकृति दिली तरच घटनेत बदल होऊ शकत होता.

सार्वमतातच नव्हे तर अन्य काही बाबीतही जनतेचा पाठिंबा गमवलेले मलरोनी यांनी आपल्या प्रधान मंत्री पदाचा राजीनामा दिला.



# आळशी भूत

पार्वतीपुर मध्ये परमेश्वर नावाचा एक आळशी माणूस रहात असे. लहानपणीच त्याची आई वारली होती. तेव्हा पासून वडिलांनी अत्यंत प्रेमाने त्याला लहानाचा मोठा केला. आता परमेश्वर पंचवीस वर्षांचा झाला. पण असा आळशी झाला की इकडची काडी तिकडे करीत नसे.

परमेश्वराच्या या आळशीपणाची गावात सर्वत्र कीर्ति पसरली होती, त्यामुळे आपली मुलगी देऊन त्याला जावई करायला कोणी तयार नव्हतं. शेवटी दूरच्या एका गावातील नागमणि नावाच्या मुलीशी कसं तरी त्याचं लग्न झालं.

नागमणि सासरी येऊन कसा-बसा एक महिना गेला. एकदा ती नवऱ्याला म्हणाली-"असं खाऊन-पिऊन स्वस्थ बसून कसं होईल? तुमच्या वडिलांचं वय साठ वर्षांचं आहे, तरी ते बिचारे किती मेहनत करतात. तुम्ही त्यांना काही मदत का करीत नाही?"

परमेश्वरला बायकोच्या बोलण्याचा राग आला. तावातावाने तो म्हणाला-"वा! आज वडिलांना मदत करायला सांगतेस, उद्या स्वयंपाकघरात तुला मदत करायला सांगशील! ते आपल्याला नाही बुवा जमणार."

अशा रीतीने दीड वर्ष गेलं. परमेश्वराला एक मुलगा झाला. तरी पण त्याच्यात काही बदल झाला नाही. नागमणि आपल्या बाळाला संभाळून घरातील सर्व कामे करी, आणि नंतर शेतावर ही काम करायला जाई.

एक दिवशी कडक उन्ह पडलं होतं. नागमणीने आपल्या दहा महिन्यांच्या मुलाला नवऱ्याच्या हाती दिलं आणि ती

सोनाली पंडित

कामासाठी शेतावर गेली. संध्याकाळी ती जेव्हा शेतावरून परत आली, तिने पाहिले की कठडा नसलेल्या विहिरीच्या दिशेने आपला मुलगा रांगत येत आहे. आणि थोड्या अंतरावर नवरा स्टुलावर बसून निश्चिंतपणे मुलाकडे पहात आहे.

हे सर्व पाहून नागमणि घाबरून जोरात किंचाळली. हातातील पोतं तिने खाली टाकून दिलं आणि झटकन जाऊन मुलाला कडेवर घेतलं. रागा-रागाने तिने नवऱ्याला विचारले- "मी जर एक मिनिट उशीरा आले असते तर मुलगा विहिरीत पडला असता! तुम्ही नुसते मुकाट्याने पहात बसला. बाप आहात की कसाई?"

आरामात परमेश्वर म्हणाला- "अग, तुझी आता यायची वेळच होती की!"

"छी! तुमचा आळशीपणा पाहून एक क्षण भर ही मी आता इथं राहणार नाही. आज माझ्या मुलाचं काही बरं-वाईट झालं असतं तर!" असं म्हणून नागमणि मुलाला घेऊन तावडतोब माहेरी जायला निघाली.

थोड्या अंतरावर उभी केलेली खाट पाडायला कोणी नव्हतं म्हणून परमेश्वर रात्र भर स्टुलावरच बसून राहिला. अर्धवट झोपेतून जागा झाला, तेव्हा त्याला आपल्या घराच्या चबुतऱ्यावर एक भूत बसलेलं दिसलं.

भुताला पाहून परमेश्वर जरा ही घाबरला नाही. तो भुताला म्हणाला- "ती खाट टाकून अगोदर बस. मग सांग कसा आलास?"

"मी एक आळशी भूत आहे. मला थोडी मदत पाहिजे. आपण दोघे ही आळशी आहोत, तेव्हा तू माझ्याबद्दल गैरसमज करून घेणार नाहीस अशी आशा आहे." आळशी भूत म्हणालं.

जांभई देत परमेश्वराने विचारलं- "बरं, मग सांग काय मदत करू तुला?"

"एक कुदळ आणि फावडं घेऊन चल माझ्या बरोबर, सांगतो तुला सगळं!" आळशी भुताने उत्तर दिलं.

"त्या चीजा तूच आपल्याबरोबर घे." असं म्हणून परमेश्वर भुताबरोबर निघाला.

"तुझे श्रम थोडे हलके व्हावेत म्हणून मी तुला माझी गोष्ट सांगतो. मी भूत कसा झालो? लक्षपूर्वक ऐक हं." भूत म्हणालं.

तो जेव्हा भूत झाला नव्हता तेव्हा त्याचं नाव होतं सोमेश्वर. तो घरातील मोठा मुलगा होता, तरी पण कसली ही काळजी न करता खाऊन-पिऊन तो व्यर्थ आपले दिवस घालवीत असे. त्याला तीन मित्र होते. एक मोठा पापी होता, त्याने केलं नाही असं कुठलं ही पाप नसेल. दुसरा म्हणजे सर्व दुर्गुणांचं आगर होतं. तिसरा ही असाच होता, जगातील सर्व वाईट सवयी त्याला होत्या.

सोमेश्वरला एकच बहीण होती. तिचं लग्न करण्यासाठी वडिलांनी शेजारच्या गावातील आपले शेत विकले आणि







विक्रीची रक्कम घेऊन रात्रीच्या वेळी ते आपल्या गावी जाण्यासाठी निघाले. कुणी तरी त्यांचा पाठलाग करताना दिसले. सोमेश्वरच्या वडिलांना संशय आला की हे चोर असावेत. म्हणून त्यांनी आपल्या जवळची रक्कम वडाच्या झाडाखाली गाडून ठेवली आणि आपल्या गावाकडे निघाले. गावापर्यंत पोचताच चोरांनी त्यांना घेरले, आणि रक्कम न मिळाल्याने वडिलांना मार-पीट करून ते पळून गेले.

झालेल्या जखमांमुळे सोमेश्वरच्या वडिलांनी खाट पकडली आणि दोन चार दिवसात त्यातच त्यांचा अंत झाला. मरणापूर्वी सोमेश्वरला जवळ बोलवून वडाच्या झाडाखाली लपवलेल्या रक्कमेबाबत त्यांनी माहिती दिली. आणि सांगितलं-''ती रक्कम आणून योग्य मुहूर्तावर बहिणीचं लग्न करून टाक.''

सोमेश्वर इतका आळशी होता की वडाच्या झाडाखालची रक्कम आणण्याचे तो टाळत राहिला. आता जेव्हा बहिणीचं लग्न दोन दिवसांवर आलं आणि आईने पुन्हा-पुन्हा पैसे आणायला सांगितलं, तेव्हा रात्रीच्या वेळी कुदळ घेऊन सोमेश्वर त्या कामगिरीवर निघाला. दिवस भराच्या गप्पात दुष्ट मित्रांना हे सर्व समजलं होतं. म्हणून रात्री त्यांनी सोमेश्वरचा पाठलाग केला. सोमेश्वरला याचा काही पत्ताच नव्हता.

पण लवकरच सोमेश्वरच्या लक्षात आलं की आपल्या मागे कोणी येत आहे. म्हणून दुसऱ्याच एका वडाखाली जाऊन तो जमीन खोदू लागला. तेव्हा त्या दुष्ट मित्रांनी मागून एक मोठा दगड उचलून सोमेश्वरावर फेकला. त्या दगडाने झालेल्या खोल जखमेमुळे सोमेश्वर तेथेच मरून पडला.

त्याच वेळी कोठूनसे तीन वाघ तेथे आले. धर्मदेवीने जसं काही त्याना पाठवलं होतं. आणि त्या तीन वाघांनी दुष्ट मित्रांना मारून टाकलं.

आळशी भूत अशा रीतीने आपली कहाणी सांगून म्हणालं-''पैसे आणण्यासाठी गेलेला मी जेव्हा असा मरून गेलो, तेव्हा माझ्या बहिणीचं लग्न व्हायचं राहून गेलं. आणि या दुःखाने माझी आई व बहीण यांनी प्राण सोडले. माझ्या तिन्ही दुष्ट मित्रांचे आत्मे नरकात गेले. मी प्रेतात्मा बनून असा इकडे-तिकडे भटकत आहे.''

एवढ्यात ते एका वडाच्या झाडापाशी आले. भूताने जिथे खोदायला सांगितले तिथे खोदून परमेश्वराने काही पैसे काढले. आता भूत परमेश्वराला म्हणालं-''आज संध्याकाळी आपल्या रडणाऱ्या मुलाला घेऊन जाताना मी तुझ्या बायकोला रस्त्यात पाहिलं. भुकेने रडत असलेल्या तुझ्या मुलाला ती म्हणत होती-''एका आळशी माणसाचा मुलगा म्हणून तू जन्माला आलास न? हा त्रास तुला आता भोगायलाच लागणार. मी तरी काय करू बाळा?'' असं म्हणून तुझी बायको ही रडू लागली. माझ्या ही डोळ्यात अश्रू आले. आता हे पैसे घेऊन तू एक छोटा धंदा सुरू कर. आळशीपणामुळे माझं कसं नुकसान झालं. तू पाहिलसंच!'' एवढं बोलून भूत आल्या वाटेने निघून गेलं.

परमेश्वरने पैसे नीट पारखून पाहिले. ते जुने होते. प्रचारात नसलेल्या या नाण्यांचा काही उपयोग नव्हता. आता तो घरी आला नि मेहनतीने काम करू लागला. त्याने आपल्या बायकोला पत्र लिहिले-''मी शेतीच्या कामात गुंतलो आहे. तू मुलाला घेऊन ताबडतोब इकडे ये. आळशीपणाच्या चुकीबद्दल मला क्षमा कर.''

नवऱ्यात बदल झालेला पाहून नागमणि खुश झाली. मोठ्या आनंदाने आपल्या नवऱ्याच्या घरी जाण्याची तयारी करू लागली.



# हजरजबाबी भिकारी

महिमापुरीतील एका देवळासमोर बसून एक भिकारी भीक मागत असे. 'मी आंधळा आहे! भीक द्यावी''. अशी अक्षरे लिहिलेली एक फळी त्याच्याजवळ होती. त्याच्या बाजूने जाणारे लोक त्याच्या समोर पसरलेल्या फडक्यावर नाणी टाकून जात असत.

एकदा एका भक्ताने जरा दुरून एक नाणे फेकले. ते घरंगळत जाऊन फडक्यापासून जरा दूर पडले. तेंव्हा तो भिकारी ताबडतोब आपल्या जागेवरून अुठला, अन् त्याने ते नाणे अुचलून आणून फडक्यावर टाकले.

हा सारा प्रकार पाहून त्या भक्ताला समजून चुकले की भिकारी आंधळा तर मुळीच नाहीये! त्याला फारच राग आला, अन् भिकाऱ्याला दरडावत तो म्हणाला, ''अरे तुला तर चांगलं दिसतंय ना? मग फळीवर 'आंधळा' असं का लिहिलेयस? लोकांना असं फसवायला लाज नाही वाटत?''

यावर जराही न डगमगता तो भिकारी म्हणाला, ''माफ करा महाराज! मी खरं म्हणजे 'मुका' आहे. पण फळीवर लिहिणाराने चुकून 'आंधळा' असं लिहिलंय!''

''ओहो! असं आहे होय? बरं इथून पुढे नीट लिहिता वाचता येणाऱ्याकडून बरोबर लिहून घे! कळलं?'' असा सल्ला देऊन भक्त आपल्या वाटेने निघून गेला.





# अद्भुत फूल

आपल्या देशाच्या ईशान्येला माणिक्यपुरी राज्य होते. वसन्त ऋतुच्या स्वागताप्रीत्यर्थ या राज्यात एक महिनाभर वसन्तोत्सव साजरा केला जाई. पहाडां-जंगलांनी वेढलेले हे माणिक्यपुरी राज्य वसंतऋतु सुरू होताच निसर्गसौन्दर्याने भरून जाई. सर्वत्र पसरलेली हिरवळ, हिरवीगार झाडेझुडपे आणि रंगीबेरंगी फुलांवर अुडणारी सुन्दर फुलपाखरे, तऱ्हेतऱ्हेचे पशु-पक्षी यांच्या साह्याने निसर्गदेवी राज्यावर सौन्दर्याची अुधळण करी. यामुळेच तेथे वसंतोत्सव थाटामाटाने साजरा होई. वसंतोत्सव पाहण्यासाठी शेजारच्या राज्यातून ही लोक येत. अशा वेळी लोकांच्या उत्साहाला उधाण येई.

माणिक्यपुरीवर राजा प्रतापवर्मा राज्य करीत होता. एक आदर्श राजा म्हणून त्याची प्रसिद्धी होती. पिता पुष्यवर्मा याची आज्ञा पाळून लहान वयातच प्रतापवर्माने राज्याची धुरा समर्थपणे आपल्या खांद्यावर अुचलली अन् प्रजारंजक पालक म्हणून प्रजेबरोबरच आपल्या पित्यालाही आनंदित केले व त्याची शाबासकी मिळवली.

जनप्रिय राजा म्हणून प्रतापवर्माला कीर्ति मिळाली. आपल्या राज्यात शांति व सुरक्षा स्थापन करून त्याने आसपासच्या



राज्यांशीही स्नेहसंबंध प्रस्थापित केले. त्यामुळे युद्धभय नसलेले नागरिक सुखाने कालक्रमणा करू लागले.

अशा प्रकारे शांति व संरक्षण असल्यामुळे प्रजा अुत्सव-समारंभ वगैरे मोठ्या अुत्साहाने साजरे करी. विशेषतः दरवर्षी येणारा वसन्तोत्सव आबालवृद्ध सारेच अत्यन्त थाटामाटाने व अहमहमिकेने साजरा करीत. क्रीडा स्पर्धा, विविध रंजन-कार्यक्रम, नाटके, संगीत-सभा, व्याख्याने इत्यादि कार्यक्रमांची रेल-चेल होई.

प्रतापवर्मा माणिक्यपुरीचा राजा बनून पंचवीस वर्षे पूर्ण होत असल्याने, या वर्षीचा वसन्तोत्सव तर खासच वैभवाने करायचे ठरले व अनेकानेक योजना बनू लागल्या. केवळ क्रीडाच नव्हे, तर संगीत-साहित्य व ललितकलांच्या स्पर्धांच्याही योजना तयार झाल्या. कवि-पंडितांची पंडित-सभा बोलवायचेही ठरले. या सर्वांमधे भाग घेण्यासाठी आसपासच्या राज्यांतल्या क्रीडापटु, कलाकार व कवि-पंडितांनाही आमन्त्रणे गेली.

प्रथम क्रीडा स्पर्धा झाल्या. या स्पर्धांमधे एका पहाडी जातीच्या युवकाने सर्वात अधिक चढाओढी जिंकून सर्वांचे लक्ष वेधून घेतले. आधी तो मल्लयुद्धात विजयी झाला; नंतर हातात वेत घेअून त्याच्या साह्याने खेळण्यात येणाऱ्या 'कुंजे' नामक खेळातही त्याने आपले अतुल प्राविण्य दाखवले. या वर्षी एक नवीन स्पर्धाही सुरू करण्यात आलेली होती. एक कडक-मजबूत व पक्का नारळ मैदानात ठेवण्यात आला. स्पर्धकाने घोड्यावरून येअून आपल्या हातातल्या काठीने जोराचा तडाखा मारून नारळ चेंडूसारखा हवेत अुडवायचा-अशी ती स्पर्धा होती. या खेळाचे नाव होते लक्पी. या स्पर्धेतही आपल्या जत्थ्याचा नेता म्हणून भाग घेअून तो नारळ-चेंडू घोड्यावरून काठीने अुडवण्यात तो युवक



सफल झाला. त्याचा हा विजय पाहून प्रेक्षकांनी आनन्दाने टाळ्यांचा कडकडाट केला.

क्रीडा-स्पर्धांनंतर बक्षिसे वाटण्यात आली. राजा प्रतापवर्माने स्वहस्ते सर्व स्पर्धकांना बक्षिसे दिली. सर्वात जास्त बक्षिसे पटकावणाऱ्या त्या पहाडी युवकाकडे प्रेमाने पहात राजाने विचारले, "नाव काय बेटा तुझं?"

"माझं नाव अुत्तुंग आहे महाराज!" त्या युवकाने नम्रतेने नाव सांगितले. नंतर आपल्या मित्रांच्या टोळीकडे निर्देश करीत तो म्हणाला, "महाराज, हे सगळे माझ्याबरोबर आलेले माझे मित्र आहेत. आम्ही सारे शृंगमाय पहाडात रहाणाऱ्या कबिल्यातले आहोत. आपल्या राज्यात होणाऱ्या स्पर्धात आम्ही यावेळी प्रथमच भाग घेत आहोत."

राजाच्या चेहऱ्यावर मन्द हसू तरळले. तेंव्हा अुत्तुंगने आपल्या मित्रांपैकी एकाच्या हातातून झटकन एक पुष्पगुच्छ घेतला व चौथऱ्याच्या पायऱ्या चढून युवराणीच्या हातात तो देत अुत्तुंग म्हणाला, "राजकुमारीजी, आपल्याला फुलांचं फार वेड आहे, असं ऐकतोय मी! आमच्या प्रान्तातल्या या अपूर्व अशा फुलांचा आपण स्वीकार करावा." नंतर तो चौथऱ्यावरून खाली अुतरला.

पुष्पगुच्छाकडे एकवार प्रेमाने पाहून आनन्दाने आपल्या पित्याकडे वळून राजकुमारी म्हणाली, "बाबा, असली सुन्दर फुलं मी पूर्वी कधीच पाहिली नाहीत. या फुलांची रोपं आपल्या अुद्यानात नाहीत. ती आणण्याची व्यवस्था करायला हा युवक नक्कीच आपल्याला मदत करील. त्यांना फुलं आली म्हणजे आपली बाग अनुपम सौंदर्याने खुलेल!"

राजाने मान हलवून ते कबूल केले. थोड्या वेळाने सारा बक्षिस-समारंभ पूर्ण झाल्यावर अुपस्थित लोकांना अुद्देशून राजा प्रतापवर्मा म्हणाला, "माझ्या प्रिय





प्रजाजन हो! या वर्षीच्या वसन्तोत्सवाचे कार्यक्रम खूप थाटामाटाने साजरे होत आहेत. विशेषतः क्रीडास्पर्धा तर फारच आकर्षक झाल्या. त्यात भाग घेअून पहाडी जत्थ्याच्या नायक अुत्तुंगने जे विशेष प्राविण्य दाखवले, ते फारच कौतुकास्पद आहे. त्यामुळे या वर्षी सुरू केलेल्या नव्या खेळांचं नाव या पहाडी प्रजेचं निवासस्थान शृंगमायवरून 'मायक्रीडा' असं मी ठेवत आहे. इतकंच नव्हे, तर या वर्षापासून मी आपल्या सैन्यात या पहाडी जातीच्या युवकांना भरती करणार. अुद्याही राजद्वार सर्वांना खुलं ठेवण्यात येईल. तुम्हापैकी ज्यांना राजप्रासादात यायचं असेल त्यांनी बेधडक यावे आणि राजपरिवाराबरोबर आपला वेळ आनन्दात घालवावा. लैरंबी-माता आपलं रक्षण करो! तुम्हा सर्वांना माझे आशीर्वाद!"

राजाचे हे बोलणे ऐकून तेथे जमलेल्या हजारो लोकांनी आरोळ्या दिल्या, "राजा प्रतापवर्माचा विजय असो! युवराणी प्रियंवदाचा जयजयकार असो!"

राजा व युवराणी निरनिराळ्या रथातून राजवाड्याकडे परतले. राजाच्या रथात त्याच्याबरोबर सेनापती गंभीरसिंह आणि राजकुमारी बरोबर तिच्या रथात तिच्या दोन सख्या होत्या. राजमार्गावरून रथ जाअू लागले. तेंव्हा रस्त्याच्या दुतर्फा अुभे राहून प्रजाजन त्यांना नमस्कार करून सदिच्छा व्यक्त करत होते.

राजवाड्यात पोचल्याबरोबर राजकुमारीने पुष्पगुच्छ नीट आकर्षकपणे लावून ठेवण्यासाठी काचेचे मोठे फूलदान मागवून घेतले आणि मोठ्या प्रेमाने ती सारी फुले त्यात लावून ठेवली. अुत्तुंगकडून मिळालेल्या त्या सुन्दर फुलांमुळे युवराणीचे कक्ष अधिकच सुन्दर दिसू लागले.

दुसऱ्या दिवशी सकाळी चहूदिशांनी नागरिक राजवाड्याकडे येअू लागले.



राजा युवराणी व राजपरिवारातील अन्य लोक वरच्या मजल्याच्या सज्जात अुभे राहून त्यांच्या शुभकामनांचा हात हलवून स्वीकार करू लागले.

तरूण-तरुणी एकमेकांवर रंगीत पाणी व गुलाल अुधळून आनन्दाने नाचू-गाअू लागले अन् अशा प्रकारे त्यांनी आपला सारा दिवस मौज-मजेत घालवला.

संध्याकाळी अुत्सवाची गर्दी कमी झाल्यावर सेनापतीला बोलावून घेअून राजा म्हणाला, "परवा श्रृंगमाय पर्वतभागातून आलेल्या अुत्तुंगने युवराणीला दिलेला पुष्पगुच्छ पाहिलात ना? त्या फुलांची रोपं आपल्या अुद्यानात लावावी अशी प्रियंवदेची इच्छा आहे. आपल्या सैन्यातल्या दोन समर्थ अशा शिपायांना निवडून त्यांना ताबडतोब श्रृंगमाय पर्वताकडे पाठवून ती रोपं आणायची व्यवस्था करा. त्यांना अुत्तुंग मदत करू शकेल. तेंव्हा तेथे पोचल्याबरोबर प्रथम अुत्तुंगला भेटण्याबाबत त्यांना आदेश द्या."

"जशी आज्ञा." असे म्हणून सेनापती गंभीरसिंह तेथून निघाला. आणि थोड्याच वेळात दोन चांगल्या धडधाकट अन् बळकट शिपायांना बरोबर घेअून तेथे आला. युवराणीच्या महालातली ती फुले दाखवून, त्यांनी काय कामगिरी करायची आहे ते त्यांना समजावून दिले.

ती फुले पाहून शिपाई फारच खूश झाले. ते म्हणाले, "ही फुलं फारच झकास आहेत. ती ओळखणं तर खूपच सोपं आहे!" नंतर राजकुमारीकडे वळून ते म्हणाले, "युवराणी, या फुलांची रोपं घेअूनच आम्ही परत येअू. निरोप द्या आम्हाला, निघतो आम्ही!" अन् ते निघून गेले.

शिपायांना श्रृंगमाय पर्वताकडे जाअून एक आठवडा लोटला, तरी ते परत न आल्याने युवराणी काळजीत पडली. अन् ती अधिकच अुतावीळपणे त्यांची वाट पाहू लागली. अुत्तुंगने दिलेली फुले



दहा दिवस गेले, तरी जशीच्या तशी ताजी, टवटवीत राहिली होती. ती पाहून युवराणीला फार आनन्द होई.



पहाता पहाता तीन आठवडे लोटले आणि फुलझाडांच्या शोधात गेलेले शिपाई आणखी फुले घेअून राजधानीला परत आले. सेनापती गंभीरसिंह त्या दोघांना बरोबर घेअून राजवाड्यात आला. राजा व युवराणी या मंडळींना पाहून आनन्दित झाले. ती फुले युवराणीच्या हाती देअून गंभीरसिंह राजाला म्हणाला, "महाराज, या शिपायांना ही फुलंच तेवढी मिळाली, रोपं नाही मिळू शकली."

राजाने प्रश्नार्थक दृष्टीने शिपायांकडे पहाताच त्यांच्यातला एकजण म्हणाला, "महाराज, अनेक अडचणींना तोंड देत आम्ही शृंगमाय पर्वतभागात पोचलो आणि अुत्तुंगला भेटलो. आम्हाला पाहून तो फारच खूश झाला. त्याने मग आम्हाला तिथून बरंच दूर असलेल्या डोंगराळ भागात नेलं. त्या डोंगरांवर लहान रोपं म्हणून बांबूसारखी अुत्तुंग आकाशाला भिडणारी रोपं होती; अन् त्यांच्या टोकांवर चमकणारी ही फुलं दिसली. यांच्या चमकत्या रूपामुळे तिथले लोक यांना 'विजेची फुलं' असं म्हणतात. अन् ही शंभर वर्षातून एकदाच फुलत असल्याने यांना 'शताब्दी फुलं' असंही म्हणतात. त्या माणसांनाही ही फुलं त्यांच्या आयुष्यात प्रथमच दिसत आहेत महाराज! फुलं लागल्यानंतर दोन वर्षांनी त्या जागी थव्या थव्यांनी यांची रोपं येतात. त्यांना फुलं लागायला पुन्हा शंभर वर्षं लागतात. तिथल्या म्हाताऱ्या माणसांकडून ही गोष्ट आम्हाला कळली महाराज! युवराणीची निराशा होअू नये म्हणून आम्ही त्यातलं एक झाड कापायला लावून ही फुलं आणलीत."

शिपायाचे हे बोलणे ऐकून राजाला मोठे आश्चर्य वाटले. तो म्हणाला, "मोठ्या नवलाची गोष्ट आहे ही! ठीक

आहे, दोन वर्षांनी जेंव्हा ती रोपं उगवून येतील, तेंव्हा ती मागवून आपण आपल्या उद्यानात लावू या."

"आणि त्या रोपांना शंभर वर्षांनी फुलं लागतील, ती पहाणं काही माझ्या भाग्यात नसेल!" निराशेने राजकन्या उद्गारली.

राजा त्या शिपायांना म्हणाला, "ठीक आहे. तुम्ही खूप कष्ट करून बरीचशी माहिती मिळवलीत, अन् ही फुलंही आणलीत. आभारी आहे मी तुमचा." अन् त्यांचा उचित गौरव करून राजाने त्यांना निरोप दिला.

फुलांबाबतची ही शिपायांकडून मिळालेली माहिती जनतेत प्रसृत झाली. राजगुरू गौरीनाथच्या कानीही ही बातमी गेली. 'शताब्दी फूल' हे शब्द ऐकताच तो चमकला. या राजगुरूने अनेक शास्त्रे अभ्यासली होती; तो चांगला विद्वान असून राजघराण्याचे भले चिंतणारा होता तो. ताबडतोब आपले ताडपत्रांचे ग्रंथ चाळून काही माहिती मिळते का, हे शोधू लागला. नंतर आपण काही आवश्यक बोलणं करण्यासाठी येत आहोत असा निरोप त्याने राजाकडे पाठवला.

राजगुरु आपल्याकडे आत्ता का येत आहे याबद्दल राजाला आश्चर्य वाटले. राजगुरू राजवाड्यात आले, तेंव्हा स्वतः पुढे होऊन राजाने त्यांचे स्वागत केले, आणि त्यांना आसन दिले. "आपलं असं अचानक येण्याचं कारण....." राजाने आपले वाक्य अर्धवटच सोडले. "एक विशेष समाचार देण्यासाठी आलोय मी राजा!" राजगुरु म्हणाले.

राजा प्रश्नार्थक दृष्टीने पाहू लागला, तेंव्हा गुरुजी म्हणाले "मी शताब्दि फुलांबद्दल ऐकलं. ही झाडं लावणं हे राजपरिवार व राजघराण्याला अशुभ आहे."

"अशुभ? आपण काय म्हणता आहात?" आपल्या कानांवर विश्वास बसत नसल्यासारख्या चेहेऱ्याने राजा राजगुरूकडे पाहू लागला. क्रमशः



# विशेष योग्यता

दृढनिश्चयी राजा विक्रम पुन्हा त्या झाडाकडे गेला अन् फान्दीवरून प्रेत काढून ते आपल्या खांद्यावर लादून नेहमी प्रमाणे मौन धारण करून तो स्मशानाची वाट चालू लागला. तेंव्हा त्या प्रेतातला वेताळ बोलू लागला, "राजा काही लोकांना खूप प्रामाणिकपणे अन् मेहनतीने प्रयत्न करूनही आपला हेतु साधण्यात यश मिळत नाही. ते अनेकदा अविवेकपूर्ण निर्णय घेऊन, एक प्रकारे आत्मवंचनाच करत असतात. उदाहरण म्हणून आपल्या मुलाच्या विवाहाच्या बाबतीत अविवेकपूर्ण निर्णय घेणाऱ्या राजा विशालशर्माची गोष्ट मी तुला सांगतो. सावध चित्ताने ती ऐक." आणि वेताळ गोष्ट सांगू लागला-

खूप वर्षांपूर्वी वैशालिनी देशावर राजा विशालशर्माचे राज्य होते. त्याला एक बहीण होती. एका मुलीला जन्म देऊन

## वेताळाच्या गोष्टी



लगेच या बहिणीने 'राम' म्हटला. विशालशर्माने मेहुण्याची परवानगी घेऊन आपल्या लहानग्या भाचीला आपल्याकडे ठेवून घेऊन तिचा मोठ्या प्रेमाने सांभाळ केला. त्याने तिचे नाव 'वैशाली' असे ठेवले. राजाच्या मनात होते, की वैशाली उपवर झाली की आपल्या एकुलत्या एक मुलाचा-विजयवर्माचा-विवाह तिच्याशी करून द्यावा.

विजयवर्मा वैशालीकडे विशेष लक्ष देत नसे, ही गोष्ट ध्यानी आल्यामुळे राजाच्या मनात शंका येई की - विजयवर्मा या विवाहाला नकार तर नाही देणार ना? शेवटी एकदा विशालवर्माने आपल्या मनची गोष्ट विजयवर्मासमोर प्रकट केली.

विजयवर्माने जरा वेळ गप्प राहिल्यानंतर म्हटले, "वैशाली कदाचित एक चांगली सहधर्मचारिणी होऊ शकेल! पण बाबा, माझ्या मते भावी राजाची महाराणी बनण्याची योग्यता मात्र तिच्यात मुळीच नाहीये."

"मुला," त्याला टोमणा देत राजा म्हणाला, "ओहो! चांगली सहधर्मचारिणी होण्यापेक्षाही, महाराणी होण्यासाठी मुलीत आणखी काही विशेष योग्यता असावी लागते हे मला नव्हतं माहीत! मग सांग ना, तशी योग्यता वैशालीत नाही, तर आणखी कोणात आहे?"

विजयवर्मा बिलकुल मागेपुढे न पहाता सरळ उत्तरला, "माझ्याच बरोबर शिक्षण घेतलेली, आपल्या महासेनापतींची कन्या सौमित्री, ही माझ्या दृष्टीने यासाठी पूर्ण लायक आहे."

या उत्तराने राजा विशालवर्मा चांगलाच भडकला. रागाने तो म्हणाला, "सौमित्री वैशालीपेक्षा अधिक लायक आहे? दिसण्यात की सुशीलतेत? कोणती विशेष लायकी आहे तिच्यात?"

विजयवर्मा ने शांतपणे म्हटले, "बाबा, माफ करा मला! पण आत्ता तुम्ही रागात आहात. माझं बोलणं तुम्हाला नक्कीच कडू वाटेल."

हे ऐकून राजा तेथून उठून निघून गेला. पण यानंतरही तोच प्रस्ताव राजाने दोन-चार वेळा मुलासमोर मांडला असता, त्याने प्रत्येक वेळी आपले पहिले उत्तरच ऐकवले.

विजयवर्माचे तेच ते उत्तर ऐकून राजा विशाल वर्मा वैतागून एकदा म्हणाला, "तू आपला हट्ट सोडणार नाहीस असं दिसतंय. तुझं लग्न म्हणजे अशी एक मोठी समस्या होईल, असं मला स्वप्नातही कधी वाटलं नव्हतं."

यामुळे आपल्या पित्याच्या मनाला किती क्लेश होत आहेत हे विजयवर्माला कळून चुकले. तो म्हणाला, "बाबा, या कठीण समस्येचं उत्तर मी शोधून ठेवलंय. तुम्ही असं करा, मी तुम्हाला एक गोष्ट सांगतो. तिच्या शेवटी मी काही प्रश्न विचारीन. अंहं, त्याची उत्तरं तुम्ही नाही द्यायची. वैशाली अन् सौमित्री या दोघींनाही तुम्ही ती गोष्ट ऐकवायची. त्या जी उत्तरं देतील, ती ऐकूनच तुम्हाला या समस्येचं उत्तर सापडेल."

विशालवर्माचा निरुपायच होता! त्याने ती संपूर्ण गोष्ट ऐकली: अन् दुसऱ्या दिवशी अंतःपुरात जाऊन वीणावादनात



मग्न असलेल्या वैशाली व सौमित्रीशी प्रथम काही इकडच्या-तिकडच्या गप्पा मारल्या. नंतर सहज विषय काढून तो त्यांना म्हणाला, "मी तुम्हा दोघींना एक छानशी गोष्ट सांगतो. नीट सावध चित्ताने ऐका." राजा गोष्ट सांगू लागला-

खूप वर्षांपूर्वी अवंतीवर राज्य करणाऱ्या राजा सिंहकेतूला दोन राण्या होत्या. वंशरीतीप्रमाणे वडीलधाऱ्यांनी पसंत केलेली स्वर्णलता त्याची थोरली पत्नी-धर्मपत्नी-होती. पण धाकटी पत्नी श्रीलेखा हिच्याशी राजाने स्वतःच तिच्या गुण व व्यक्तित्वावर खूष होऊन विवाह केला होता.



थोरली पत्नी स्वर्णलता हिला वाटे, की राजा श्रीलेखेवरच अधिक प्रेम करतो, अन् त्यामुळे ती दुःखी असे. श्रीलेखा खूपदा पुरुषवेष धारण करून राजाबरोबर फिरत असे, शिकार व राज्यकारभार यात बरोबरीने भाग घेत असे. खूप विचार करून स्वर्णलतेने एक विचार पक्का केला व तिने राजाला सांगून टाकले की, आपली पुरुषवेष धारण करून राजाबरोबर फिरायची इच्छा आहे.

यावर राजा विशालवर्मा मन्दस्मित करून म्हणाला, "ठीक आहे, आपण तुझ्या म्हणण्याप्रमाणे करू."

यानंतर एका आठवड्यानेच स्वर्णलता पुरुषवेषात आपल्या पतीबरोबर शिकारीसाठी जंगलात गेली. जंगलात भिल्लांच्या झोपड्या एकमेकींपासून तुटक, अशा खूप दूरवर पसरलेल्या होत्या. शिकार करताना थकलेला राजा आपल्या पत्नीसह एका झोपडीत गेला. झोपडीत भिल्ल स्त्री एकटीच होती. तिने मोठ्या आदराने राजदम्पतीला बसवून घेतले, अन् मातीच्या दोन पेल्यातून दोघांना एक काहीसा निराळाच पदार्थ देत म्हटले, "आम्हा भिल्लांच्या घरी, खास करून हा पदार्थ बनवला जातो महाराज!" अन् असे सांगताना त्या स्त्रीच्या चेहऱ्यावर विशेष संतोष दिसत होता.

सिंहकेतूने हसतच तिच्या हातून मातीचा पेला घेतला व तो खास पदार्थ प्रेमाने खाऊ लागला. स्वर्णलतेने मात्र त्या पदार्थाचा पहिला घास घेताच तिला कसेसेच होऊ लागले. राजा मात्र आनन्दाने खात राहिला.

पेल्यातला सारा पदार्थ संपल्यावर राजा त्या स्त्रीला म्हणाला, "तुझा हा पदार्थ खूपच छान आहे हं माई! तुझ्याकडे थोडा जंगली मध असेल, तर तो ही दे ना."

हे ऐकून भिल्ल स्त्रीला फारच आनन्द वाटला. तिने लगेच दोन पेल्यातून मधही आणून तो त्यांच्यासमोर ठेवला. मध प्यायल्यानन्तर तिथेच जरासा आराम करून राजदांपत्य झोपडीतून बाहेर पडले.

स्वर्णलता राजाला म्हणाली, "महाराज, एक मिनिट थांबा, आलेच मी." अन् ती भिल्ल स्त्रीला पुन्हा झोपडीत घेऊन गेली व तिने तो पदार्थ कसा बनवायचा याची कृति विचारून घेतली.

एका आठवड्यानन्तर राजा सिंहकेतु जेंव्हा आपली थोरली राणी स्वर्णलता हिच्या अंतःपुरात गेला, तेंव्हा तिथे एका मोठ्या सुवर्णपात्रात खूपसा एक पदार्थ त्याला खायला दिला व म्हटले, "त्या दिवशी भिल्लाच्या झोपडीत तुम्ही जो पदार्थ मोठ्या प्रेमानं खाल्लात, तोच आहे हा."

तेंव्हा हसत हसत सिंहकेतूने ते सुवर्णपात्र जवळच्या टेबलावर ठेवले आणि आपल्या गळ्यातली मोत्याची माळ काढून राणीच्या गळ्यात घालत म्हटले, "माझ्याबद्दल तुझ्या मनातलं प्रेम अन् श्रद्धा पाहून मला फार बरं वाटतंय देवी! तुझ्यासारख्या अशा सुकोमल शिरीषपुष्पासारख्या स्त्रीने अंतःपुरातच रहाणं बरं. माझ्याबरोबर बाहेर भटकून तुझं कष्ट सहन करणं मला मुळीच आवडणार नाही."

पतीच्या या बोलण्यांवर खूश व्हावं की दुःखी, हे स्वर्णलतेला कळेना. ती तशीच





गप्प राहिली.

ही गोष्ट पूर्ण करून वैशाली अन् सौमित्रीकडे पहात विशालवर्माने विचारले, "राजा सिंहकेतूचं स्वर्णलता अन् श्रीलेखा यांच्याशी वागणं अगदी परस्परविरोधी आहे, असा मला संशय येतोय. पण हे वागणं बरोबर आहे की नाही?"

वैशाली ताबडतोब उत्तरली, "सिंहकेतूचं स्वर्णलतेशी वागणं बरोबर नाही, यात काही संशयच नाही. दोघीही बायका घोड्यावर बसू शकतात, तलवार चालवू शकतात; तेंव्हा दोघीही सारख्याच आहेत न! मग राजा फक्त श्रीलेखेला आपल्या बरोबर बाहेर नेऊ इच्छितो अन् स्वर्णलतेला मात्र अंतःपुरातच डांबून ठेऊ पहातो. यावरूना कळून चुकतं, की त्याचं वागणं बरोबर नव्हे!"

आता विशालवर्माने सौमित्रीला विचारले, "तुझं काय म्हणणं आहे बाळ? तुलाही असंच वाटतंय का?"

थोडेसे हसत नकारात्मक डोके हलवत सौमित्री उत्तरली, "सिंहकेतूचं वागणं योग्यच आहे. त्याच्या वागण्यावरून त्याची शासन-कुशलता आणि मानवतावादी दृष्टिकोन दिसून येतोय महाराज!"

हे उत्तर ऐकून राजा विशालदेव काहीसा चमकलाच, पण गप्प राहून तो काही विचार करत राहिला. अन् थोड्या वेळाने तिथून निघून गेला.

यानन्तर एक महिन्याने सौमित्री-विजयवर्मा यांचा विवाह मोठ्या थाटामाटात पार पडला. अन् राजाने राज्यकारभार आपल्या पुत्रावर सोपवला.

इतकी गोष्ट सांगितल्यावर वेताळने विक्रमराजाला प्रश्न केला, "राजा, वैशाली आणि सौमित्री यांच्या उत्तरांमधे असा काय फरक आहे, की ज्यामुळे राजा विजयवर्माला संतोष वाटला? सारख्याच सुशील व विद्वान बायकांमधे सिंहकेतुने श्रीलेखालाच जास्त मान का दिला? त्याचं हे वागणं अनुचित नव्हे का? अन् अशा परिस्थितीत राजा विशालवर्माला सौमित्रीचं उत्तर अधिक पसन्त का पडलं? तिलाच आपली सून म्हणून त्यानं का पसंत केलं? पुत्राचं मत तर अगोदर पासूनच वैशालीच्या विरुद्ध होतं, मग सौमित्रीचं उत्तर पसंत करून राजाने एक प्रकारे आत्मवंचना नाही का केली? या प्रश्नांची उत्तरं माहीत असूनही देण्याचं टाळलंस, तर हे विक्रमराजा, तुझ्या मस्तकाचे शतशः तुकडे होतील!"

राजा विक्रम उत्तरादाखल बोलू लागला, "सर्वसाधारण माणूस व देशाचा शासक असणारा राजा यांच्या वागणुकीत पुष्कळसा फरक असतो. पूर्ण राज्य म्हणजे राजाचे कुटुंबच असते. स्वतःला मुळिच न आवडलेला पदार्थ राजाने त्या भिल्ल स्त्रीला संतोष देण्यासाठीच प्रेमाने खाल्ला. स्वर्णलतेने ही गोष्ट ओळखलीच नाही. त्याच जागी श्रीलेखा असती, तर तिनं याबद्दल राजाचे कौतुक केले असते, त्याच्या राजदक्षतेची प्रशंसा केली असती. भिल्ल स्त्रीने दिलेला पदार्थ मुद्दाम बनवून राजाला खाऊ घालण्यात स्वर्णलतेचं अज्ञानच प्रकट होतं. अशा बायकांनी अंतः- पुरात रहाणंच श्रेयस्कर. योग्य परीक्षा करण्याची शक्ति असणाऱ्या श्रीलेखेसारख्या स्त्रियाच फक्त पतीबरोबर सदासर्वकाळ वावरायला लायक असतात. या गोष्टीत सिंहकेतूची भूमिका विजयवर्माची, व सौमित्री आणि वैशाली अनुक्रमे श्रीलेखा अन् स्वर्णलता आहेत. खरी गोष्ट जाणूनच राजा विशालवर्माने पुत्राचे म्हणणे मान्य करून हा विवाह घडवून आणला. यात आत्मवंचनेचा कुठे प्रश्नच नाही."

परंतु असे योग्य उत्तर देऊनही राजा विक्रमकडून मौनभंग घडलेच. अन् म्हणूनच पुन्हा त्याच्या हातावर तुरी देऊन वेताळ प्रेतासह अदृश्य होऊन आपल्या झाडावर लटकू लागला.



## चान्दोबाच्या बतम्या

*नुकत्याच तीन मुलांबद्दल विशेष बातम्या आल्या. ही तीन्ही मुले अमेरिकेतील आहेत. त्यातला सर्वात मोठा आहे अमेरिकेत स्थायिक झालेला, भारतीय कुटुंबातला एक मुलगा.*



### आशाज्योति

२० जानेवारीला अमेरिकन अध्यक्ष बिल क्लिंटन यांच्या अध्यक्षपदावर येण्याच्या संदर्भात एक मेजवानी आयोजित केली गेली. या मेजवानीसाठी पन्नास खास लोकांना आमंत्रण होते. या खास लोकातच एक होता एकोणीस वर्षीय रोजर कुट्टन! बिल क्लिंटनने याचा 'आशाज्योति' असा अुल्लेख केला होता. भारतातल्या केरळ प्रान्तातून अमेरिकेत जाअून स्थायिक झालेल्या डॉ. अधुकुट्टन यांचा हा मुलगा. रोजर कुट्टन म्हणाला, ''अध्यक्षांचे आमन्त्रण आल्याचा मला, आईवडिलांना, बहिणीला-आम्हा सर्वांनाच फार आनन्द वाटला. माझ्या आईला तर इतकं गहिवरून आलं, की थोडा वेळ तिला काही बोलताच येईना!'' मेजवानीहून परत आल्यावर हा मुलगा म्हणाला, ''या ऐतिहासिक घटनेत भाग घेणं, ती पहाणं-हा एक फारच सुखद आणि हर्षदायक अनुभव आहे.''

रोजरचे खरे नाव आहे राज. तो तीन वर्षांचा असतानाच मोटारींचे नंबर पाहून लक्षात ठेवी. ते तो मुळीच विसरत नसे. त्याच्या वडिलांनी हॉर्किन्स विश्वविद्यालयात नेअून त्याची तपासणी करवली. प्रवेश परीक्षेत शंभर टक्के गुण मिळवून वयाच्या नवव्या वर्षीच त्याने गणित विषयातील पदवी मिळवली. नंतर 'वॉल्स्ट्रीट' च्या काही करोडपतींचा तो 'मनीमॅनेजर' बनला. आता तो बिल क्लिंटनच्या आर्थिक सल्लागारांपैकी एक आहे.

### अमेरिकन सरकारला अनुदान

अमेरिकेतील अुत्तर डकोटा-फार्गोच्या 'लॉयी ब्रिव्लेला' नावाच्या मुलाचे वय आहे चौदा. त्याने झाडांच्या रोपांच्या व्यापारात जी कमाई केली, त्यातले १००० डॉलर्स त्याने अमेरिकन सरकारला अनुदान म्हणून पाठवले. अध्यक्षपद ग्रहण केल्याबरोबर बजेटमधील तूट भरून काढण्यासाठी त्याने लोकांना अनुदान देण्यासाठी आवाहन केले होते; त्याची प्रतिक्रिया म्हणून चौदा वर्षांच्या या मुलाने आपल्या कष्टाच्या पैशातून ही रक्कम पाठवून असे सुचवले की तिचा अुपयोग ह्रि व ए इड्स-संशोधनासाठी अुपयोग केला जावा.



### सर्वात कमी वयाचा प्रकाशक

अमेरिकेतील 'लट नाईट' टी. व्ही. कार्यक्रमांचे संचालक डेव्हिड लेटरमन यांनी ग्लेनिएल्लिनच्या क्लॉक स्लँकी नावाच्या दहा वर्षे वयाच्या मुलाची मुलाखत घेतली. हा मुलगा चौथ्या इयत्तेतला विद्यार्थी असून तो 'आअुट ऑफ द वर्ल्ड' नावाची पत्रिका गेली चार वर्षे चालवत आहे. जगात सर्वत्र या पत्रिकेचे वर्गणीदार असून ही मुलाखत घेणारा डेव्हिड हा सुध्दा या वर्गणीदारांपैकीच एक आहे.

## चान्दोबा पुरवणी — ५४

**भारतातील पशुपक्षी :**

### मार्जार परिवाराचे सख्खे बांधव

वाघाप्रमाणेच चित्ता आणि बिबळ्या वाघ हेही मार्जार परिवारातलेच प्राणी होत. परंतु या दोघांच्यात थोडासा फरक आहे. बिबळ्याच्या ज्याला इंग्रजीत लिओपार्ड म्हणतात-अंगावर गोल गोल डाग असतात. पण चित्त्याच्या-ज्याला इंग्रजीत पँथर म्हणतात-अंगावर चांगले मोठे आणि कमी-जास्त आकाराचे डाग असतात. त्याच्या चेहेऱ्यावर आणि मानेवर लहान-मोठ्या रेषा असतात आणि शेपटीवर वलयाकृति रेषा असतात. वाघापेक्षा हे बिबळे आणि चित्ते लहान-म्हणजे २०० ते २१५ सें. मी. लांबीचे असतात. या दोन्हींचा रंग पिवळाच असतो. काळ्या रंगाचे चित्तेही क्वचित आढळतात. भारतात वाघांची संख्या हल्ली कमी होत चाललीय, पण बिबळे आणि चित्ते मात्र त्या धोक्यातून वाचले आहेत. भारतात सर्वत्र हे आढळतात. जेथे लोकवस्ती असते, अशा मुलुखांतूनही त्यांचा वावर असल्याच्या बातम्या ऐकायला मिळतात.

हिमालय प्रान्तात दोन प्रकारचे चित्ते आढळतात. पूर्व हिमालयाच्या शिखरांच्या अुतरणीवर भुऱ्या रंगाचे चित्ते आढळतात, तर बर्फाळ भागात राहाणारे हिम-चित्ते (स्नोलिओपार्ड) पांढरे असतात. हा हिमचित्ता मोठा सुरेख डौलदार दिसतो. अुतरणीवरच्या काही चित्त्यांचे कातडे काळ्या-भुऱ्या रंगाचे असून त्यावर सुंदरसे काळे डाग असतात. यांच्या कातड्याला खूप मागणी असल्याने शिकाऱ्यांना या चित्त्यांचे फार आकर्षण असते. परिणामतः ही जात नष्टप्राय होण्याच्या मार्गावर आहे. हे दोन्ही प्रकारचे चित्ते अन्य सर्वसाधारण चित्त्यांपेक्षा लहान, म्हणजे १०० सें. मी. लांबीचे असतात.

लोककथांमधे मांजराला 'वाघाची मावशी' म्हटले जाते आणि तिने म्हणे वाघाला सर्व काही शिकवले, पण झाडावर चढायला मात्र शिकवले नाही. चित्त्यांना मात्र ही कला अवगत असते.





# आधुनिक भारतातील साहित्य

रात्रीचा मिट्ट काळोख! एक एकटा वाटसरू आपली वाट चालत होता इतक्यात एका मोकळ्या मैदानात काही डाकू त्याला सामोरे आले. त्याला कळून आले की हे जवळचा एक गाव लुटायला निघाले आहेत.

"थांब, नाहीतर गोळीनं उडवीन बघ!" डाकूंचा सरदार कर्कश्यपणे ओरडला, अन् त्याने विचारले, "कोण आहेस तू?"

## मनासाई ना-दिया

"मी एक बंडखोर आहे. आपल्या देशावर घाला घालून आपल्यावर जबरदस्तीनं राज्य करणाऱ्या परदेशी अत्याचाऱ्यांशीच फक्त मी लढत असतो. अबोध, सर्वसामान्य जनतेला मी कधीच पिडत नाही." त्या एकांड्या वाटसरूने सांगितले.

"आम्हीही निष्पाप जनतेला नाही छळत! श्रीमन्त बदमाशांनाच फक्त लुटून आम्ही मारून टाकतो." डाकूंचा सरदार म्हणाला.

"काय? खरंच तुम्ही आम जनतेला त्रास देत नाही? आपल्या मनालाच खरं खरं विचारा! तुम्ही लुटालूट करायला येताय असं कळताच ते भीतीनं कापू लागतात; घरंदारं सोडून बिचारे जंगलात पळून जातात लोक! तुला नक्कीच माहीत आहे की ते आपली काम शांतीने करूच शकत नाहीत. तुम्ही निघून गेलात की पुन्हा त्या बिचाऱ्यांच्या डोक्यावर पोलिसांची टांगती तलवार! हे सगळं 'त्रास देणं' नव्हे तर काय?" वाटसरूने डाकू-सरदाराला विचारले.

हा त्यांचा वाद बराच वेळ चालला; पण शेवटी चोरांच्या सरदाराला आपलं समर्थन करता येईना, तो काही बोलूच शकेना! त्याला आपले कुकृत्य घृणास्पद वाटू लागले. त्या डाकूंचे हृदयपरिवर्तन झाले. वाटसरूही आपल्या वाटेने निघून गेला. अन् अशा तऱ्हेने गावावरचा हल्ला टळला.

तो वाटसरू महान समाजसेवक व सुधारक होता. तो म्हणजेच गुजराथेतील रविशंकर महाराज!

सन् १९२७ मधे लोकांचा असा विश्वास होता की या रविशंकर महाराजांना काही अद्भुत शक्ति अवगत आहेत. ते असे म्हणत की रविशंकर महाराज पुराच्या पाण्यावरून चालू शकतात. महाराज योग्य वेळी लोकांची सेवा करत, त्यांच्या उपयोगी पडत. दुष्ट लोकांवरच नव्हे तर क्रूर जनावरांवरही त्यांच्या जादूचा प्रभाव पडतो. ते असेही म्हणत, की अगदी



दुष्यातले दुष्ट लोकही महाराजांच्या प्रयत्नाने सज्जन बनतात.

शंभर वर्षांपेक्षाही अधिक काळ जगून अलिकडेच स्वर्गवासी झालेल्या कै. रविशंकर महाराजांचे चरित्र गुजराथी भाषेत 'मन्साय ना दिवा' या नावाने प्रकाशित झालेले आहे. एकाद्या रोचक कादम्बरी प्रमाणे वाचल्या जाणाऱ्या या चरित्राचे लेखक होते झवेरचन्द मेघानी (१८९७-१९४७). त्यांनी गुजराथी भाषेत कथा, कविता, नाटक, कादंबऱ्या वगैरे अनेक साहित्य प्रकारात लेखन केलेले आहे.

# तुम्हाला माहीत आहे काय?

१. ताजमहालाला लागून वहाणारी नदी कोणती?
२. भारतातील कोणत्या राज्यातून लोकसभेसाठी जास्तीत जास्त अुमेदवार पाठवले जातात?
३. कोणत्या पक्ष्याला प्रेम व शान्तिचे चिन्ह मानले जाते?
४. जगातला मोठ्यात मोठा सजीव प्राणी कोणता?
५. 'कुचिपुडी' नृत्यप्रकाराशी संबंधित राज्य कोणते?
६. 'विश्वाचा प्रकाश' असे कोणाला म्हटले जाते?
७. 'काराकोरम राजमार्ग' कोणत्या दोन देशांना जोडतो?
८. भारतीय पुराणांनुसार आगीचे अधिदैवत कोणते?
९. चीनची राजधानी बिजिंग आहे. परंतु त्या देशातले सर्वात मोठे शहर कोणते?
१०. आधुनिक इमारतींतून अुपयोग केल्या जाणाऱ्या 'लिफ्ट' चा शोध कोणी लावला?
११. अधिकात अधिक चांदी कोणत्या देशात मिळते?
१२. नोबेल शांति पुरस्कार मिळवणारा अमेरिकेतील निग्रो पुढारी कोण?
१३. 'एफेल टॉवर' कोठे आहे?
१४. तुर्क मधील इस्तंबूल शहर पूर्वी कोणत्या नावाने ओळखले जाई?
१५. ब्रिटनने भारताला स्वातंत्र्य देण्याचे मान्य केले, तेंव्हा तेथील पंतप्रधान कोण होता?
१६. 'रेखागणिताचा पिता' कोणाला मानले जाते?
१७. दक्षिण अमेरिकेच्या चिली प्रान्तात कोणती भाषा बोलली जाते?
१८. एका देशाचा राष्ट्रध्वज पांढरा असतो-तो देश कोणता?
१९. आधुनिक बँकिंग पद्धतीचा जन्म कोठे झाला?
२०. दरवाजांना कुलूपे लावून ती किल्ल्यांनी अुघडण्याची पद्धत कोणत्या देशाने सुरू केली?

## उत्तरे

१. यमुना.
२. अुत्तर प्रदेश.
३. कबुतर.
४. ब्लू व्हेल.
५. आन्ध्र प्रदेश.
६. येशू ख्रिस्त.
७. पाकिस्तान व चीन.
८. अग्नि.
९. शांघाय.
१०. एलिशा ओटिस.
११. मेक्सिको.
१२. मार्टिन लूथर किंग.
१३. फ्रान्सची राजधानी पॅरिस शहर.
१४. कॉन्स्टॅंटिनोपल.
१५. क्लेमंट ॲटली.
१६. युक्लिड.
१७. स्पॅनिश भाषा.
१८. पश्चिम सहारा.
१९. इटली.
२०. मिश्र देशीय (इजिप्शियन).



# गर्विष्ठ सिद्धेश

राजापूर मधे सिद्धेश नावाचा एक गर्विष्ठ माणूस रहात असे. त्याच्या रागाचा पारा चढला की तो आपला-परका हा विचार न करता समोरच्या माणसाला शिव्या देई व त्याला मारायला धावे. गावातील लोकांना हे माहीत असल्यामुळे ते त्याच्यापासून दूरच रहात.

एकदा चन्दर नावाच्या माणसाची म्हैस सिद्धेशच्या शेतात शिरून चरत असताना सिद्धेशने पाहिले. त्याने आपल्या लाठीने म्हशीला खूप चोपले. नंतर तो चंदरच्या घरी गेला नि ओरडून म्हणाला-"अरे चन्दर, तुझी म्हैस माझ्या शेतात शिरली नि तिने पिकाची नासाडी केली. आता मी आपल्या गायी तुझ्या शेतात घुसवतो आणि तुझं पीक नष्ट करून टाकतो."

सिद्धेशचा रागीट स्वभाव चन्दरला माहीत होता, तो शांतपणे म्हणाला-"म्हैस शेवटी निर्बुद्ध जनावर! अन् तुझ्या शेतात पीक आहेच कोठे? माझ्या म्हशीने थोडे गवत खाल्ले असेल नर यावेळी मला माफ कर झालं!"

तरी सिद्धेशच समाधान झालं नाही. तो गर्वाने म्हणाला- "हे, म्हैस म्हणे एक निर्बुद्ध जनावर आहे! जरा कान उघडे ठेवून ऐक-एक आठवडाभर या म्हशीचं सगळं दूध माझ्याकडे पाठव. नाही तर हा मी चाललो, माझ्या गायी देतो तुझ्या शेतात घुसवून!"

सिद्धेश होता मोठा हट्टी, नाइलाजाने चंदर एक आठवडा दूध देत राहिला.

एक दिवशी सिद्धेशने गावातील वाण्याकडून गूळ खरेदी केला, गूळ वजनात थोडा कमी होता. जेव्हा सिद्धेशच्या ते लक्षात आलं, तेव्हा रागाने लाल होऊन तो वाण्याच्या दुकानावर गेला

सदाशिव साठे



आणि गर्जना करीत म्हणाला-''काय रे, मला बनवलंस? आसपासच्या गावातील सगळे लोक मला घाबरतात, नि तू या गावात येऊन मला फसवतोस?''

वाण्याने सफाई दिली-''सिद्धेश, चूक घडते एकाद्या वेळी माणसाच्या हातून. मी जाणून-बुजून काही तुला गूळ कमी दिला नाही. जर तुला मी धोकेबाज वाटत असलो, तर माझ्याकडून माल खरेदी करू नकोस. अशी शिवीगाळ नि आरडा-ओरड कशाला?'' वाण्याने नम्रतापूर्वक समजून सांगितलं.

''मला शिकवतोस हो? बरं, मी पण पाहून घेईन!'' असं म्हणून पाय आपटीत सिद्धेश तिथून निघून गेला.

वाण्याने ज्या झोपडीत आपली भुश्श्याची पोती ठेवली होती त्या झोपडीला आग लागली आणि सर्व माल जळून खाक झाला. हे काम सिद्धेशचंच हे सगळ्या गावाला माहीत असलं तरी त्याच्या विरुद्ध कोणी ब्र काढायला तयार नाही.

त्या गावात एक संन्यासी आला. त्याच्यापाशी अनेक महान् शक्ति होत्या. हे जाणून गावातील लोक रोज एकेक करीत त्याला भोजनासाठी बोलवू लागले. हा सर्व प्रकार पाहून सिद्धेश गर्वाने आपल्या बायकोला म्हणाला-''गावात सगळे गरीब-श्रीमंत लोक या संन्याशाला जेवायला बोलवीत आहेत. आपण प्रसिद्ध आहोत, चुप राहून कसे चालेल? आज दुपारी संन्यासी आपल्या घरी जेवायला येणार. तुला जी पक्कान्नं बनवता येतात ती बनव.''

मग सिद्धेश संन्याशाकडे जाऊन म्हणाला-''मला पाहून गावातील सर्व लोक घाबरतात हे आपणास माहीतच असेल. आज दुपारी माझ्याकडे भोजनासाठी या.''

तिथे हजर असलेल्यांपैकी एकाने अमळ धाडसाने विचारले-''सिद्धेश, हेच अधिक गौरवपूर्वक नसतं का





सांगता आलं?''

संन्याशाने आपला भाव व्यक्त केला-''माझ्या दृष्टीने सर्वजण समानच आहेत. कोणी कसं आमंत्रण द्यावं हा ज्याचा त्याचा प्रश्न आहे. बोलवणाराच्या घरी मी अवश्य जाऊन अन्नब्रह्माची आराधना करीन.''

तेव्हा सिद्धेश घमेंडीने म्हणाला-''वा! त्या नादानाला चांगलं उत्तर दिलं आपण! होय, मी जेव्हा जे काम योजतो, तेव्हाच ते करून टाकतो. आपण ठीक बारा वाजता माझ्या घरी या.'' असं सांगून सिद्धेश घरी परतला.

सिद्धेशच्या सूचनेप्रमाणे संन्यासी बरोबर वेळेवर जायला उठला, पण तेवढ्यात साप चावलेल्या एका माणसाला लोक घेऊन आले आणि मंत्र घालण्याची त्यांनी संन्याशाला विनंती केली. संन्यासी म्हणाला-''शुद्ध मनाने सर्वांचे कल्याण चिंतणे म्हणजेच मंत्र घालणे होय.'' नंतर आपल्या झोळीतून थोडी विभूति काढून त्याने ती साप चावलेल्या माणसाच्या कपालाला लावली. तो माणूस असा उठून उभा राहिला, जणू काही आताच झोपेतून जागा झाला आहे.

यामुळे सिद्धेशच्या घरी जायला संन्याशाला थोडा उशीर झाला. सिद्धेश रागाने संन्याशाकडे पहात म्हणाला-''मी ठरलेल्या वेळी माझी सगळी कामं करतो. मी बारा वाजताच जेऊन घेतलं. आता वाजले आहेत साडे बारा! आता तुम्ही परत जा.''

''अतिथि परमेश्वरासारखा असतो. पाहुण्याला बोलवून त्याची थोडी ही वाट न पाहता स्वतः भोजन करणं गृहस्थाला शोभत नाही. जे झालं ते झालं! पाहुण्याला परत जायला सांगायचं पाप निदान नको करूस.'' संन्यासी म्हणाला.

सिद्धेशच्या रागाचा पारा चढला. तो म्हणाला-''वा, उलट मलाच शिकवताय होय?'' आणि रागाने त्याने संन्याशाच्या तोंडावर एक जोरात थप्पड मारली.

हा सर्व प्रकार पाहून तेथील लोक सिद्धेशला मारायला उठले. त्यांना थांबवीत संन्यासी म्हणाला-"माणसाला अहंकार गर्व नसावा. माझं ऐकत असलास तर हा गर्व सोड. परमेश्वरच तुला आपल्या अहंकाराबद्दल योग्य ती शिक्षा करील."

लोकांनी सिद्धेशला सोडलं. असे सहा महिने गेले. ज्या हाताने सिद्धेशने संन्याशाला मारलं होत, त्या हातावर एक फोड आला. तो चांगला टमटममला, आत विष पसरीत राहिला. वैद्य म्हणाले-यावर काही उपचार नाही.

आता सिद्धेशला पश्चात्ताप वाटू लागला. त्याला वाटलं, आपण अकारण संन्याशाला मारलं, म्हणून आपले असे हाल होत आहेत. हात कापून टाकायला त्याचं मन तयार नव्हतं, कारण अपंग अवस्थेत तो जेव्हा गावात हिंडेल तेव्हा लोक त्याची टिंगल करतील. तरी पण अहंकार संपूर्ण नष्ट झालेला नव्हता.

काही दिवसांनंतर सिद्धेशचे जीवन पूर्ण अंधकारमय झाले. तेव्हा एक दिवशी संन्यासी त्याला भेटायला आला, त्याने प्रेमाने विचारले-"काय सिद्धेश, कसा आहेस?"

"स्वामीजी माझी अशी दुर्दशा आहे! ही शिक्षा आपण मला दिली की परमेश्वराने कोणास ठाऊक?" असे म्हणून सिद्धेशने संन्याशाच्या पायांवर डोके ठेवले आणि क्षमा मागितली.

"बेटा, आता तू आपल्या अहंकाराला जिंकलस, तुला पश्चात्ताप झाला आहे. तुझ्या अहंकारानेच तुला ही शिक्षा दिली होती." असे म्हणत संन्याशाने सिद्धेशचा हात आपल्या हाती घेतला नि त्यावर थोडी विभूति फुंकली.

हा हा म्हणता सर्व विषारी प्रभाव नष्ट झाला. सिद्धेश खडखडीत बरा झाला. संन्यासी पण तिथून निघाला, तो पुन्हा कधी परत आला नाही. सिद्धेश आता नम्र झाला होता, याचं लोकांना मोठं आश्चर्य वाटलं. सिद्धेश आता सर्वांचं हितचिंतन करु लागला, याचा सर्वांना आनंद वाटला.







# निर्भय सलमा

प्राचीन काली टर्की देशात अमीरखान नावाचा एक गरीब माणूस रहात असे. त्याची मुलगी सलमा आता उपवर झाली होती.

सलमा लहानपणापासून भूत-प्रेतांच्या गोष्टी खूप ऐकत असे. त्या ऐकून ती आता अगदी बेडर झाली होती.

एक दिवशी अमीरखानच्या घरी एक मेजवानी होती. त्यावेळी अमीरखानचा मित्र अहमद पण तिथे आला होता. अहमदने कातड्यांच्या व्यापारात खूप पैसा मिळवला होता. मेजवानी मध्य-रात्रीपर्यंत चालू राहिली आणि दुकानातून आणलेल्या मधाच्या पोळ्या संपल्या. अहमदची भूक अजून भागलेली नव्हती, त्याने आणखी पोळ्या मागितल्या, तेव्हा अमीरखानने सलमाला बोलवून सांगितले-"बेटा, दादाच्या दुकानात जाऊन चार मधाच्या पोळ्या घेऊन ये."

हे ऐकून अहमदला मोठं आश्चर्य वाटलं, त्याने विचारले-"दादाचं दुकान स्मशानाच्या पलिकडे आहे. सलमाला भीति नाही वाटणार?"

अमीरखान अभिमानाने म्हणाला-"तीला जगात कशाचं ही भय वाटत नाही!"

त्या अंधाऱ्या रात्री सलमाने दादाच्या दुकानी जाऊन जेव्हा मधाच्या पोळ्या आणल्या, तेव्हा अहमद अमीरखानला म्हणाला-"उद्या आवस आहे. उद्या रात्री स्मशानात जाऊन ती एक कवटी घेऊन येईल?"

अमीरखान हसत म्हणाला-" पैज लावतोस?"

अहमदने खरोखरीच पैज लावली.

**टर्कीची एक लोककथा**



नंतर अख्तर नावाच्या एका गरीब म्हाताऱ्याला अहमदने पैशाची लालूच दाखवली आणि स्मशानात लपून बसून त्याने काय करावे हे समजून सांगितले. नंतर मध्य-रात्री अहमद सरळ अमीरखानच्या घरी गेला नि स्मशानात जाऊन एक कवटी आणायला सांगितली.

अमीरखानने सलमाला जायला सांगितले. सलमा लगेच स्मशानाकडे जायला निघाली. ठरल्याप्रमाणे अख्तर अगोदरच स्मशानात एका कबरीमागे लपून बसलेला होता.

सलमा स्मशानात आली नि अंधारात तिने एक कवटी शोधून काढून हातात घेतली. अख्तर विचित्र आवाजात तिकडून म्हणाला-"ए छोकरी, ती कवटी घेऊ नकोस. ती माझ्या आईची कवटी आहे!"

सलमाने लगेच ती कवटी खाली ठेवली नि दुसरी आपल्या हाती घेतली. अख्तरने ती कवटी ओळखून तशाच विचित्र आवाजात तो म्हणाला-"नाही, ती पण नको घेऊस. ती माझ्या अब्बाजानची आहे!"

हे ऐकून सलमाने रागाने ती कवटी खाली फेकून दिली आणि ज्या कबरीमागून हा आवाज येत होता, तेथे पोचली. त्या अंधारात एका खड्ड्यात लपलेल्या अख्तरचं टक्कल तिला दिसलं.

सलमा त्या टकल्याच्या जवळ जाऊन रागाने ओरडली-" पुन्हा जर तोंड उघडलंस तर मी या तुझ्या टक्कलाचे तुकडे-तुकडे करून टाकीन अन् तेच बरोबर घेऊन जाईन. खबरदार!" असं म्हणून तिने त्याला दोन-चार लाथा ही घातल्या.

सलमाच्या लाथा खाऊन बिचारा अख्तर तिथे खड्ड्यातच बेशुद्ध होऊन पडला, आणि मिळेल ती कवटी घेऊन सलमा घरी आली. अशा रीतीने अहमद पैज हारला

त्या दिवसापासून सलमाचे नाव तर आसपासच्या मुलुखात ही 'निर्भयतेचा





नमुना' म्हणून प्रसिद्ध झाले. त्या गावाच्या जवळच्या एका गावात सुलेमान नावाचा एक श्रीमंत तरुण रहात असे. तो मोठा सुंदर होता. पण त्याचे लग्न झालेले नव्हते. त्याच्या घरी नोकर-मोलकरणी एक-दोन आठवड्यांहून अधिक टिकत नसत. कारण त्या घरात सुलेमानच्या मृत आईचा प्रेतात्मा हिंडत-फिरत असे, त्याचा त्यांना खूप त्रास होई.

सुलेमानला सलमाच्या बेडरपणाबाबत समजल्यावर त्याने चांगला पगार देऊन तिला आपल्या घरी नोकरी दिली व तो आता निश्चिन्त झाला. सलमा सुलेमानला जेव्हा भोजन वाढी तेव्हा त्याच्या मृत आईच्या प्रेतासाठी पण एक ताट वाढून ठेवी. आणि प्रेमाने सांगे-"मनसोक्त जेवा आई, आज शोरबा फार चांगला झालाय!" अशा रीतीने गोड गोड बोलून सलमाने प्रेतात्म्याला वश करून घेण्यात यश मिळवलं.

एक दिवशी सुलेमान बाहेर गावी गेला. त्या दिवशी रात्री सलमा एकटीच घरात काम करीत होती. तेव्हा सुलेमानच्या आईचा प्रेतात्मा तिला दिसला. सलमा मुळीच घाबरली नाही. प्रेतात्म्याने तिला विचारले-"काय ग मुली, मला पाहून तुला भीति नाही वाटत?"

सलमा आत्मविश्वासाने म्हणाली- "भय? भय कशाशी खातात हेच मला माहीत नाही. आणि तुम्ही तर किती चांगल्या आहात आई, तुम्हाला पाहून कसलं भ्यायचं?"

यावर हसून प्रेतात्मा म्हणाला-"बेटा, तुझं हे रूप नि तुझा धाडशीपणा मला फार आवडला. पण माझ्या या श्रीमंत मुलाच्या घराची मालकीण बनण्यासाठी तुझ्यात आणखी बुद्धिमत्ता असली पाहिजे. तू इतकी योग्य आहेस की नाही कोणास ठाऊक?"

सलमा हसून गप्प बसली. प्रेतात्मा काही विचार करून म्हणाला-"या

घराच्या खाली एक अंधार-कोठडी आहे. न भीता तू माझ्या बरोबर येशील तिथे?"

सलमा म्हणाली-"माताजी, मी तर अगोदरच सांगितलं ना की मला कसली ही भीति वाटत नाही?" नि ती प्रेतात्म्याच्या मागे चालू लागली. प्रेतात्म्याच्या शरीरातून निघणाऱ्या प्रकाशात ती अंधार-कोठडीत उतरली. तिथे एका ठिकाणी विटांचे ढीग होते.

या विटा बाजूला सरकवण्याबाबत प्रेतात्म्याने सलमाला सांगितले. सलमा विटा हलवू लागली, तेव्हा तिला त्या ढिगात दोन पितळी सुरया दिसल्या. एक चांगली मोठी होती, दुसरी छोटी. दोन्ही सुरायात सोन्याची नाणी भरलेली होती.

प्रेतात्मा म्हणाला-"सलमा, मी आतापर्यंत माझ्या मुलाच्या संरक्षणासाठी इथे भटकत असे. आता मी इथे राहण्याची आवश्यकता नाही. तू मला खूप आवडलीस. ही मोठी सुरई माझ्या मुलाला दे व छोटी तू घे. आता मी इथं पुन्हा येणार नाही. तुझ्यावर माझा पूर्ण विश्वास आहे." आणि प्रेतात्मा अदृश्य झाला.

सकाळी सुलेमान परत आला तेव्हा सलमाने रात्रीची सर्व घटना त्याला सांगितली नि म्हणाली-"मोठी सुरई मी घ्यावी व छोटी आपल्याला द्यावी असं पण आईनं सांगितलंय!"

हे सर्व ऐकून सुलेमानने एकदा सलमाकडे निरखून पाहिलं, नि हसून म्हणाला-"सलमा, तुझ्याशी लग्न करायची माझी इच्छा आहे. आता मोठ्या नि छोट्या सुरईतलं सोनं आपलंच आहे. होय की नाही?"

लग्नाची गोष्ट ऐकून सलमाने लाजून मान खाली घातली. वडिलांकडे जाऊन तिने सर्व वृत्तांत सांगितला. आपल्या मुलीचं भाग्य जाणून अमीरखान खुश झाला. तिची हुशारी वडिलांना ही समजली नाही.

एका आठवड्यात सुलेमान व सलमा यांचे मोठ्या थाटामाटात लग्न झाले.






रथावर उभा राहून राम जेव्हा रावणावर बाण सोडू लागला तेव्हा रावणाला मोठा राग आला. त्याने रामावर गंधर्वास्त्र सोडले. रावणाचे हे अस्त्र रामाने लगेच ओळखले व आपल्या गंधर्वास्त्राने ते ताबडतोब नष्ट करून टाकले. यानंतर रावणाने दैवास्त्र फेकले, रामाने आपल्या दैवास्त्राचा उपयोग करून त्याचा ही नाश केला.

आता रावणाने रामावर अत्यंत भयानक राक्षसास्त्र फेकले. अनेक विषसर्प त्या अस्त्रातून बाहेर पडत होते. त्यांच्या तोंडातून अग्निज्वाला निघत होत्या. असे ते भयंकर अस्त्र रामाच्या दिशेने येऊ लागले. तेव्हा रामाने ताबडतोब गरुडास्त्राचा उपयोग केला. त्या अस्त्रातून निर्माण झालेल्या गरुड पक्षांनी ते विषारी साप मारून टाकले.

हा सर्व प्रकार पाहून रावणाचा राग अधिक अनावर झाला. आता तो रामावर बाणांचा वर्षाव करू लागला. एका शक्तिशाली बाणाच्या साह्याने त्याने रामाच्या रथाचा ध्वजस्तंभ कापून टाकला. आणखी काही बाण फेकून त्याने रथाचे घोडे घायाळ केले.

रामाचा संहार करण्यासाठी ही वेळ योग्य आहे असा विचार करून रावणाने वज्रायुधासारखा शक्तिशाली एक

३५. रावणाचा मृत्यु



त्रिशूल हाती घेतला. काळाकुट्ट धूर ओकून लाल-पिवळ्या ज्वालांनी युक्त तो त्रिशूल महाभयंकर दिसत होता.

त्या जळत्या त्रिशूलाला हातात धरून रावण म्हणाला-"रामा, हा तुझा मृत्यु बघ! एका क्षणात हा तुला नि लक्ष्मणाला जमिनीवर लोळवील. माझ्या बहिणीचा अपमान, पुत्रांचा वध व अनेक राक्षस-वीरांचा संहार करणाऱ्या तुझा मी आता सूड घेणार आहे." असं म्हणून रावणाने रामाच्या दिशेने त्रिशूल फेकला.

चारी बाजूंना अग्निज्वाला पसरवीत, दाट धूर ओकून सर्वत्र अंधकार पसरवीत तो त्रिशूल महान वेगाने रामाकडे येऊ लागला. रामाने आपले जे बाण त्याच्यावर टाकले, ते सर्व जळून भस्म झाले. रावणाचे हे महास्त्र किती बलाढ्य आहे हे जाणून रामाने तावडतोब इंद्राने रथा बरोबर पाठवलेल्या महाशक्तीचा त्या अस्त्राविरुद्ध उपयोग केला. इन्द्राच्या महाशक्तीशी टक्कर झाल्यावर रावणाचे अस्त्र निस्तेज झाले. दोन तुकडे होऊन ते खाली पडले.

आता रामाचा उत्साह वाढला, त्याने रावणाविरुद्ध अनेक अस्त्रांचा उपयोग केला. आपल्या त्रिशूलाचा भंग झालेला पाहून रावणाचे अंतःकरण धडधडू लागले, भयाने त्याचा थरकाप झाला. रामाच्या बाणांपासून आपले संरक्षण करणे त्याला दुरापास्त झाले. रावणाच्या रथाच्या सारथ्याने ही गोष्ट ओळखली व तो रणांगणापासून रथ दूर घेऊन गेला. राक्षस भिऊन हाहाकार करू लागले.

रथ युद्धभूमीवरून जरा दूर गेल्यावर रावण शुद्धीवर आला. गरावून तो सारथ्याला म्हणाला-"अरे दुष्टा, माझ्या आज्ञेवाचून तू असा रथ रणांगणापासून दूर का आणलास? तू मला भ्याड नि असमर्थ का समजतोस? मला काय शक्ति युक्ति माहीत नाही? मी काय पराक्रमी नाहीय? माझा अपमान होईल असं हे निर्बुद्ध काम तू का केलंस? हे काम करण्यासाठी शत्रूने तुला लाच तर दिली नाही? चल, तावडतोब रथ युद्ध-भूमीवर घेऊन चल."

या कठोर बोलण्याने सारथ्याचा चेहरा पडला, तो रावणाला म्हणाला-"प्रभु, मी आपला हित-चिंतक आहे. म्हणूनच रथ मी रणांगणावरून इकडे घेऊन आलो. रामाशी प्रखरपणे लढणे आपणास शक्य नव्हते. आपण बरेच थकलेले आहात. इतकेच नव्हे तर रथाचे घोडे ही थकलेले आहेत. सर्वांनाच थोडी विश्रांति आवश्यक होती. म्हणून मी रथ बाजूला घेऊन आलो. मला वाटते आपण ही थोडा आराम करावा. याशिवाय माझ्या मनी अन्य कोणता ही विचार नाही. जे झालं ते झालं, आता आपली काय आज्ञा आहे?"

सारथ्याचं हे सर्व बोलणं ऐकून रावणाने त्याची राजभक्ति व समयसूचकता यांची मनातल्या मनात प्रशंसा करीत आपल्या हातातील बहुमूल्य रत्नकंकण त्याच्या हातात घातले व म्हणाला-"तुझ्या राजभक्तीवर खुश होऊन मी तुला हे बक्षिस देत आहे. आता मी केवळ एकाच बाणाने रामाचा संहार करणार आहे. मी दमलो-भागलो आहे असा विचार जरा सुद्धा मनात आणू नको. तावडतोब रथ युद्धभूमीवर घेऊन चल."



तेव्हा सारथ्याने रावणाच्या रथाला रणांगणावर नेऊन रामाच्या रथासमोर उभे केले.

त्यावेळी राम खूप थकलेला होता, रावणाशी युद्ध करण्याच्या स्थितीत तो नव्हता. राम-रावणाचं युद्ध पाहण्यासाठी जमलेल्या देवात महर्षि अगस्त्य ही होते, त्यांच्या लक्षात ही गोष्ट आली. ते त्रिकालज्ञ होते. ते रामाला म्हणाले-"हे राम, तुझा थकवा दूर करण्यासाठी नि तुझ्यात पुन्हा युद्धोत्साह जागृत करण्यासाठी मी तुला आदित्य स्तोत्र सांगतो. हे एक प्रभावकारी सर्वोत्तम स्तोत्र आहे. त्याचा जप करून तू बलशाली हो



आणि रावणाशी युद्ध कर." असं म्हणून त्यांनी रामाला आदित्य हृदय स्तोत्राचा उपदेश केला नि ते अंतर्धान पावले.

रामाने भक्तिपूर्वक त्या स्तोत्राचा तीनदा जप केला. तेव्हा त्याच्यात नवीन शक्ति व उत्साह संचारला. तो मोठ्या उत्साहाने आपले धनुष्य-बाण सावरून महाप्रतापी इंद्राच्या रथासह रावणाशी युद्ध करण्यासाठी सज्ज झाला.

राम रथाचा सारथी मातलीला म्हणाला-"मातली, आता मी या रावणाचा निश्चित वध करणार! तू सावधान राहून हुषारीने रथ चालव. तू देवेन्द्र इंद्राचा सारथी असल्यामुळे मी तुला काही अधिक सांगण्याची गरज नाही. तरी पण तुला सावधान करण्यासाठी मी आपलं कर्तव्य करीत आहे. चूकून तू कुठे घसरू नकोस."

मातली मंदस्मित करीत म्हणाला-"आपण जरा ही काळजी करू नका, चला."

राम रथावर बसताच मातलीने घोड्यांना टाच दिली. घोडे वायुवेगाने दौडू लागले. रथाच्या प्रचंड गतीमुळे रणभूमीवर धूळ उडू लागली व ती रावणाच्या चारी दिशांना पसरून राहिली. मातलीच्या हुषारीने हे सर्व घडून आले होते.

हे सर्व पाहून रावणाचा क्रोध भडकला आणि रामावर तो बाणांचा वर्षाव करू लागला.

आता रामाने इन्द्राने पाठवलेले धनुष्य हाती घेऊन रावणावर बाण सोडायला सुरुवात केली. मोठ्या उत्साहाने तो रावणाशी युद्ध करू लागला.

पाहता पाहता राम-रावणाच्या या युद्धाने भयानक रूप धारण केले. दोन्ही पक्षातील नामांकित वीर हे भयानक युद्ध आश्चर्याने पाहू लागले. त्यांच्या चेहऱ्यांवर भय स्पष्ट दिसत होते. राम नि रावण-युद्धात अशी शर्थ करीत होते की जणू हेच त्यांचे अंतिम युद्ध आहे.

अशा रीतीने दोघात काही वेळ युद्ध



चालू राहिले. तेव्हा रामाने एक तीक्ष्ण बाण सोडला. त्याने रावणाचे डोके धडापासून अलग केले. पण त्याच क्षणी रावणाच्या शरीरावर आणखी एक शीर्ष उगवले.

रामाने आणखी एक बाण फेकून ते डोके ही उडवले. ते खाली पडत होते, एवढ्यात रावणाच्या धडावर आणखी एक डोके उगवले.

अशा रीतीने रामाने रावणाची एकशे एक डोकी उडवली. तरी प्रत्येक वेळी एक नवीन डोके उगवत राहिले. रावणाला मृत्यु आला नाही. हे पाहून रामाला फार आश्चर्य वाटले. यापूर्वी दंडकारण्यात विराधाला मारण्यासाठी नि क्रौंचारण्यात कबंधाला मारण्यासाठी ज्या बाणांचा उपयोग रामाने केला होता, ते बाण आता निरुपयोगी ठरत होते. असं का होतंय हे रामाच्या लक्षात येईना.

राम व रावण यांनी अशा रीतीने सात दिवस व सात रात्री अविश्रान्त युद्ध केले. रामाचे बाण रावणावर का यशस्वी होत नाहीत याचं रहस्य मातलीला माहीत होतं. कारण अजून रावणाच्या मृत्यूची वेळ आलेली नव्हती.

आठव्या दिवशी ती वेळ आली. हे जाणून मातली रामाला म्हणाला-"रामा, आता हीच वेळ आहे. उशीर न करता या रावणावर ब्रह्मास्त्र टाकून याचा वध करावा."

मातलीच्या या सूचनेनुसार रामाने एकाद्या भयानक सापासारखा एक बाण हाती घेतला. तेच ब्रह्मास्त्र होतं आणि महान तेजाने प्रज्वलित झालं होतं. ब्रह्मदेवाने इंद्रासाठी एकदा हे अस्त्र बनवलं होतं. ते फार जड होतं आणि त्याला पंख होते. वज्रासमान कठोर शस्त्रांचा ही ते नाश करून टाकीत असे.

अशा सर्वशक्तिमान महास्त्राला रामाने वेदोक्त मंत्रांनी अभिमंत्रित केले आणि आपल्या धनुष्याची प्रत्यंचा खेचून ते अस्त्र रावणावर फेकले. तो बाण रावणाच्या छातीत घुसला आणि रावण गतप्राण झाला.

रावण आपल्या रथाखाली पडला. त्याचे धनुष्य व बाण ही त्याच्या हातातून सुटले.

आपल्या राजाचा मृत्यु झालेला पाहून राक्षस ओक्साबोक्षी रडू लागले आणि लंका-नगरीकडे पळून जाऊ लागले. वानर रामाचा जयजयकार करू लागले नि वृक्ष व शिला हाती घेऊन राक्षसांना पिटाळून लावू लागले.

रावणाचा वध झाल्यावर देवदुंदुभी वाजू लागल्या. आकाशातून पुष्पवृष्टि झाली. वानरांबरोबर आकाशातून देव, गंधर्व, यक्ष, किन्नर, किंपुरुष व चारण यांनी रामाची तोंड भरून स्तुति केली.

सुग्रीव नि अंगद यांना अत्यानंद झाला. विभीषण आणि वानर-नेत्यांनी राम-लक्ष्मणाचा जयजयकार केला.

आपल्या मोठ्या भावाच्या मृत्यूमुळे विभीषणाचे मन कष्टी झाले. सीतेच्या अपहरणाचे पाप केल्यामुळेच रावणावर हे दुर्मरण ओढवले, अन्यथा तो एक महापुरुष होता. तो विद्वान्, निष्ठावान्, पराक्रमी व महातपस्वी होता.

भावाच्या मृत्यूमुळे दुःखी झालेल्या विभीषणाचे शांतवन करीत राम म्हणाला-"रावण भ्याडाप्रमाणे मेलेला




नाही. वीराप्रमाणे युद्ध करून त्याने वीरगति मिळवली. किती ही महान् वीर असला तरी युद्धभूमीवर मृत्यु येणे क्रमप्राप्त आहे, वीरगति मिळालेल्या अशा हुतात्म्यासाठी त्याच्या नातेवाईकांना दुःख वाटू नये."

रामाचे हे बोलणे ऐकून विभीषण मनात शांत झाला. नंतर रामाची परवानगी घेऊन विभीषणाने आपल्या मोठ्या भावाची उत्तरक्रिया विधिवत् करण्याची व्यवस्था केली.

रावणाच्या मृत्यूची वार्ता समजल्यावर त्याच्या बायका अंतःपुराच्या उत्तर-मार्गे रणांगणावर आल्या व प्रेताला विलगून

आक्रोश करू लागल्या. रावणाची ही दुर्दशा पाहून शोकावेगात त्या काही बोलत ही राहिल्या.

हृदय विदारक स्वरूपात रडत मंदोदरी दु:खाने म्हणाली-''तिन्हीं लोकांवर विजय प्राप्त करून देवतांनी प्रशंसा केलेल्या आपली ही दुर्दशा! आणि ती ही एका सामान्य माणसाच्या हातून! प्राणनाथ, हा क्षण आपल्या नशीबी असेल असं मला कधी ही वाटलं नव्हतं!''

''विभीषणा, या दु:खी बायकांना लवकर अंत:पुरात पाठव आणि आपल्या भावाची अंत्येष्टि-क्रिया शक्य तितक्या लवकर होऊ दे.'' रामाने विभीषणाला सुचवले.

विभीषणाच्या मनात एक धर्म-शंका उत्पन्न झाली. मोठा भाऊ रावण महान् ज्ञानी आणि धर्मनिष्ठ असला तरी परस्त्रीचे अपहरण करून अत्यंत कुकर्मी झाला होता. अशा नीच पुरुषाच्या प्रेताचा अग्नि-संस्कार आपण स्वत: करणं धर्मसंमत होईल का? या कार्यामुळे आपण अधर्मी तर म्हणविले जाणार नाही न?

ही शंका त्याने रामापुढे व्यक्त केली, तेव्हा राम म्हणाला ''रावणाचे दुसरे सद्गुण आपण विसरून चालणार नाही. त्यांची प्रशंसाच केली पाहिजे. आपल्या थोरल्या भावाची उत्तर-क्रिया तुझ्या हातून घडणं पूर्ण धर्मसंमत आहे. विभीषणा, आता उशीर करू नकोस.''

ब्राह्मणांनी चंदनाच्या लाकडांची चिता रचली. त्यावर एक वस्त्र टाकून रावणाचे शव चितेवर ठेवले. शास्त्रोक्त संस्कार करून विभीषणाने चितेला अग्नि दिला. यानंतर स्नान करून जल-तर्पण केल्यावर रावणाच्या बायकांना लंकेत परत पाठविण्याची व्यवस्था केली. हे सर्व झाल्यावर विभीषण थेट रामाकडे पोचला.





# दोन मित्र

अरविंदपूर मध्ये अतुल नावाचा एक तरूण रहात असे. वीस वर्षांचा अतुल अनेक विद्या व कलात प्रवीण होता. त्याच्या वडिलांनी एक दिवशी त्याला काही पैसे दिले नि म्हणाले-''बेटा, तू शहरात जा आणि आपल्या बुद्धीच्या बळावर खूप पैसे मिळवून परत ये.''

पित्याचे आशीर्वाद घेऊन अतुल शहराकडे जायला निघाला. जंगलातील रस्त्याने जाता जाता मधेच एका झाडाखाली थोडा आराम करण्यासाठी तो बसला.

थोड्याच वेळात त्याच्याच वयाचा एक दुसरा तरूण तेथे आला. गप्पा-गोष्टी करीत असता अतुलच्या लक्षात आले की त्याचं नाव आहे अब्दुल्ला. तो पण अनेक विद्या व कला शिकला आहे आणि त्याच्या वडिलांनी ही त्याला पैसे कमवण्यासाठी शहराकडे पाठवलंय!

अतुल नि अब्दुल्ला यांची चांगली दोस्ती जमली. दोघांनी निश्चय केला की शहरात दोघे ही एकत्र राहू. आपला कधी ही विरह होऊ नये. दोघे एकमेकांना खूप आवडले.

ते दोघे गप्पा मारीत बसले होते, एवढ्यात काही जंगली माणसं तिथं आली. त्यांचा पुढारी म्हणाला-''आमच्या देवीला बळी देण्यासाठी आम्ही एक माणूस शोधीत आहोत. आम्हाला एकच माणूस पाहिजे. तुम्ही दोघे विचार करून ठरवा की आमच्या बरोबर यायला कोण तयार आहे. नाहीतर आम्ही दोघांना ही घेऊन जाऊ.''

अतुल आणि अब्दुल्ला दोघांनी आपापसात विचार-विनिमय केला. दोघे ही आस्तिक होते. दोघांचा ही



प्रामाणिकपणावर विश्वास होता.

दोघे जण चर्चा करीत होते आणि वेळ जात होता. हब्शांचा पुढारी उतावळेपणाने म्हणाला-''असंच किती वेळ बोलत राहणार? आम्हाला उशीर होतोय.''

''मी तुमच्याबरोबर येणार! याला राजी करा न.'' अब्दुल्लाने विनंती केली.

''नाही, मी येणार तुमच्या बरोबर! याला राजी करा न.'' अतुलने प्रार्थना केली.

हब्शांच्या सरदाराला मोठं आश्चर्य वाटलं. मरण्यासाठी यांच्यात ही चढाओढ! तो म्हणाला-''तुमच्यासारखी माणसं विरळाच! आता तुमच्यापैकी एकाला प्रथम बळी देऊं, आणि सहा महिन्यांनतर पौर्णिमेच्या यात्री दुसऱ्याला. आमची देवी खुश होऊन जाईल नि आमचं कल्याण करील.'' असं म्हणून हब्शांनी त्या दोघांना आपल्या बरोबर घेतलं नि ते आपल्या घरी निघाले.

सर्व जण जेव्हा हब्शांच्या वस्तीत पोचले तेव्हा काही विचार करीत अब्दुल्लाने अतुलला विचारले-''माणसाने माणसाचा बळी दिला म्हणजे काय देवी प्रसन्न होते?''

अतुलने सांगितलं-''हे यांचं सर्वांचं अज्ञान आहे.''

दुसऱ्या दिवशी हब्शांचा पुढारी जेव्हा त्यांच्याकडे आला तेव्हा ते म्हणाले-''पूर्णिमेला अजून दहा दिवस आहेत. तोपर्यंत आमच्या कडून तुमचा खूप फायदा होऊ शकेल. आम्ही पुष्कळ अशा गोष्टी जाणतो ज्या तुम्हाला ठाऊक नाहीत. तुम्ही त्या जाणून घेतल्या तर तुमचा फायदा होईल.''

सरदाराने त्यांचं हे म्हणणं मान्य केलं. तेव्हा अतुल व अब्दुल्ला यांनी प्रथम हब्शांना स्वयंपाक करायला शिकवलं. दोनच दिवसात चांगले पदार्थ खायला मिळाल्यावर हब्शी लोकं खुश झाले नि म्हणाले-''असं जेवण आम्हाला यापूर्वी



कधी मिळालं नव्हतं. हे तर फारच छान आहे.''

अतुल नि अब्दुल्ला यांनी त्यांना पुराणातील नीतिकथा ऐकवल्या. सर्व गोष्टींचा उद्देश एकच होता. माणसातील स्वार्थ गुण नष्ट व्हावा आणि त्याच्यात मानवतेचा अंकुर रुजावा.

खुश होऊन तो त्यांना म्हणाला-''दोघांच्या गोष्टी ऐकून मला नगरवासियांच्या जीवनाबद्दल बरीच माहिती मिळाली. आता मला पटलंय की आमचं नरबलि देणं हे चुकीचं आहे. पण दुसरीकडे अशी भीति पण वाटती आहे की जर देवीला क्रोध आला, तर ती आमच्या जातीचा सत्यानाश करील.''

''नरबळी दिल्याने कोणती ही देवी प्रसन्न होत नाही. जर तुम्ही ही प्रथा मोडून टाकली तर तुम्ही ही चांगले नागरिक व्हाल व सुख-शांतीचं जीवन जगाल!'' अब्दुल्लाने आपला पाठ दिला.

''नरबळी न दिला तर देवी रागावणार नाही हे तू सिद्ध करून दाखव.'' असं सांगून हब्शांचा सरदार तेथून निघून गेला.

अतुल आणि अब्दुल्ला यांनी बराच विचार करून एक योजना तयार केली. दुसऱ्या दिवशी हब्शांचा सरदार जेव्हा आला तेव्हा अतुल त्याला



म्हणाला-''येत्या पूर्णिमेला तू देवीला माझा बळी दे. त्या वेळी माझा मित्र अब्दुल्ला तुला एक मंतरलेली तलवार देईल. जर देवीला माझा बळी इष्ट असेल तर मी मरून जाईन आणि जर देवीची तशी इच्छा नसेल, तर तुझी तलवार मला मारायला असमर्थ सिद्ध होईल!''

हब्शांच्या सरदाराला ही गोष्ट अद्भुत वाटली. तो म्हणाला ''जर खरोखरीच तलवार तुला मारू शकली नाही तर मी मान्य करीन की देवीला नरबळी पसंत नाही.''

मध्यंतरी अबुल्लाने सरदाराकडून एक तलवार मागून घेतली. आपल्या जवळ



असलेला लोहचुंबक त्या तलवारीवर तो असा घासत राहिला की ती तलवार चुंबक बनून गेली. तसेच एका लोखंडी तारेवर त्याने आपला चुंबक घा-घासून तिला ही चुंबक बनवून टाकलं. नंतर ती लोखंडी तार अतुलच्या गळ्यात बांधली. प्रथम निरनिराळे प्रयोग करण्यात आले. बळी देण्याची तलवार अतुलच्या गळ्यापाशी येताच विकर्षणामुळे मागे ढकलली जाऊ लागली. आपल्या प्रयोगाचा हा परिणाम पाहून विज्ञानाच्या चमत्काराच्या आधारे हब्शांना बदलून टाकण्याचा त्यांनी निश्चय केला. शेवटी त्यांच्या ही जीवन-मरणाचा प्रश्न होताच!

चुंबकाला उत्तर व दक्षिण ध्रुव असतात आणि सजातीय ध्रुव एकमेकांपासून दूर फेकले जातात व विजातीय ध्रुव एकमेकांकडे आकर्षिले जातात. विज्ञानातील या सिद्धांताच्या आधारावर दोस्तांनी बळीची तलवार व गळ्यात बांधण्याची तार यांची योजना केली. आता प्रयोगाच्या दिवसाची ते दोघे ही वाट पाहू लागले.

पूर्णिमेचा दिवस आला. अतुल बळी जाण्यासाठी तयार झाला. मित्रांनी जसा विचार केला होता, तसंच सर्व काही घडलं. हब्शांचा सरदार जेव्हा तलवार अतुलच्या माने पर्यंत आणी, तेव्हा विकर्षणामुळे तलवार मागे ढकलली जाई. आणि सर्वांहून अधिक सरदाराला वाटलं की देवी या बळीला अनुकूल नाही.

तीन वेळा प्रयत्न करून जेव्हां असंच घडलं तेव्हा सरदाराने हातातील तलवार फेकून दिली आणि अतुलला बलिवेदीवरून उठवून बाजूला उभे केले. दोन्ही मित्रांच्या पायांवर डोकं ठेवून तो म्हणाला-''तुम्ही दोघे खरोखर महान् आहात. आमच्या देवीच्या मनातील विचार आमच्यापेक्षा तुम्हालाच अधिक चांगले माहीत आहेत. शेवटी तुम्ही दोघांनी हे सप्रमाण सिद्ध करून दाखवलं. आम्ही आता नरबळी देणार नाही व



सुनागरिक बनून जीवन जगू; पण एक अडचण दिसतीय. नागरिकांमध्ये जाऊन राहण्यासाठी आमच्यापाशी पैसा कोठे आहे? तुम्ही आमच्यावर एक उपकार करा. इथे जवळच डोंगरात एक लेणे आहे. त्या लेण्यात डोंगरी राक्षस राहतात. आम्ही कधी त्यांना पाहिलं नाही, पण आमच्या जमातीत वर्षानुवर्षे असे बोलले जात आहे. त्या राक्षसांकडे पुष्कळ सोनं व पैसा आहे असं ही आम्ही एकतो. त्या लेण्यात कोणी गेलं तर जिवंत परत येत नाही. तुम्ही दोघे जण तेथे जाऊ शकाल असं मला वाटतं. तुमच्याकडून आम्हाला एवढीच मदत पाहिजे की तुम्ही तिथे जा आणि तेथील धन आम्हाला आणून द्या.

सरदाराला आपल्या पायांवरून उठवीत दोन्ही मित्रांनी वचन दिलं की ते त्याचा मनोरथ पूर्ण करतील. लेण्यात जाण्याचं धाडस कुणी तरी एकानंच करावं असं त्यांना वाटलं, कारण प्रत्येक जण दुसऱ्याचा जीव वाचवू इच्छित होता. पण जेव्हा ते जमलं नाही तेव्हा दोघांनी मिळून हे धाडस करण्याचा निर्णय घेतला.

हब्शांच्या सरदाराने दोघांना डोंगरी लेण्यापर्यंत नेऊन सोडलं. लेण्यात मिट्ट अंधार होता. धाडसपूर्वक दोन्ही दोस्त आत गेले. आंधळ्यासारखे दोघे ही काही अंतर चालून गेले.



काही अंतर गेल्यावर त्यांना एक उंच सडपातळ माणूस दिसला. खोकत-हसत तो म्हणाला-''तुम्ही दोघे ही गा, छान गाणे गा. मला ज्याचं गाणं आवडेल त्याला मी खजिना दाखवीन आणि ज्याचं गाणं मला आवडणार नाही, त्याला ठार मारून टाकीन.''

दोन्ही मित्रांनी गोड आवाजातच गीते गायिली. त्यांची गाणी ऐकून तो दुबळा-हाडकुळा माणूस आनंदाने नाचू लागला. गायन संपताच अतुल खाली पडला. हे पाहून अब्दुल्ला रडत म्हणाला-''जर माझा मित्र जिवंत राहणार नसेल, तर माझी ही जगण्याची



इच्छा नाही. माझा मित्र केव्हा जिवंत होईल सांग झटपट!"

तो काडी-पैलवान काहीच बोलला नाही. अब्दुल्लाला घेऊन तो तेथून निघाला. अब्दुल्लाला एक विशाल महाल दिसला. त्या महालात जेथे पहाल तेथे सोनं, चांदी नि रत्नजडित दागिने दिसत होते. इतकी सारी संपत्ति पाहून अब्दुल्लाचे डोळे दिपून गेले.

त्या दुबळ्या माणसाने सांगितले-"हा सर्व खजिना आता तुझा झाला, समज. अजून ही तू आपल्या मित्राला ज़िवंत पाहू इच्छित असलास, तर तो जिवंत होईल. पण त्याच क्षणी ही सर्व संपत्ति अदृश्य होऊन जाईल. नीट विचार करून मला सांग की तुला संपत्ति पाहिजे की मित्र?"

क्षण भर सुद्धा विचार न करता अब्दुल्ला ताबडतोब म्हणाला-"मला माझा मित्रच पाहिजे!"

दुसऱ्याच क्षणी तो महाल, त्यातील ती संपत्ति नि तो दुबळा माणूस सर्व दिसेनासे झाले आणि अब्दुल्लाच्या समोर त्याचा मित्र अतुल येऊन उभा राहिला.

जे घडलं, ते सारं ऐकून अतुल म्हणाला-"सिद्ध झालं की जो परमेश्वरावर विश्वास ठेवतो, त्याचं कोणी ही काही नुकसान करू शकत नाही."

आता आणखी काय काय अद्भुत पहायला मिळणार आहे याचा विचार करीत दोन्ही मित्र पुढे निघाले. थोडं अंतर गेल्यावर त्यांना एक विशालकाय राक्षस दिसला. अतुल नि अब्दुल्ला यांच्याकडे प्रेमाने पहात तो म्हणाला-"तुमची दोघांची मैत्री महान् आहे. तुम्ही संपत्तीवर पाणी सोडलं! तुमच्या दोघांच्या पैकी कोण अधिक श्रेष्ठ हे विचार करून ही माझ्या लक्षात येत नाही. तुम्ही दोघे ही नीट विचार करा आणि मला सांगा की तुम्हा दोघात कोण अधिक महान् आहे?"

अतुलने धाडस करून विचारले-"तुम्ही कोण?"

"मला म्हणतात पर्वत राक्षस. ही लेणी ही माझी संपति आहे. तुमच्या पैकी कोण महान् हे समजलं म्हणजे मी माझ्या सुंदर कन्येचे त्याच्याशी लग्न लावून देणार आहे आणि येथील सर्व संपत्ति हुंडा म्हणून देणार आहे. दुसऱ्याला जिवंत जाळून खाऊन टाकून मग मी पाताळ लोकात जाईन." राक्षसाने आपल्या मनातील विचार सांगितला.

जरा बाजूला होऊन दोन्ही मित्रांनी आपापसात चर्चा केली. ते एका निर्णयावर आले-"आता पर्यंत आपल्यावर झालेले साम-दाम प्रयोग यशस्वी झाले नाहीत. हा राक्षस भेदोपायाचा प्रयोग करू पाहतो आहे."

दोन्ही मित्रांनी नम्रपणे सांगितलं-"या जगात सगळे सारखेच आहेत. कोणी श्रेष्ठ, कोणी कनिष्ट नाही. महान कोणी असेल तर तो परमेश्वर! त्या परमेश्वराची आज्ञा आहे की तुझ्या सुंदर कन्येचा विवाह त्या हब्शांच्या सरदाराशी कर आणि तुझी सर्व संपत्ति त्याला हुंडा म्हणून दे. आम्हाला दोघांना शहरात जायचंय, आम्हाला शहराची वाट दाखवण्याची कृपा कर."

बस, दोन्ही मित्रांचे डोळे क्षण भर दिपून गेले. काय झालं हे त्यांना कळलंच नाही. त्यांनी जेव्हा डोळे उघडले तेव्हा ते शहराच्या वाटेवर होते.

दोघे काही अंतर चालून गेल्यावर त्यांना रस्त्याच्या एका बाजूला एक मंदिर नि दुसऱ्या बाजूला मशीद दिसली. परमेश्वराची प्रार्थना करायची संधि मिळाली म्हणून दोघांना ही आनंद झाला.

अतुल मंदिराकडे निघाला नि अब्दुल्ला मशिदीकडे. दोघे चार पाउले पुढे गेले असतील, तेवढ्यात एका विचाराने परत फिरले-"अरे, आपण तर अलग होत आहोत!"

दोघांकडे पाहून परमेश्वर विचार करू लागला-"हे दोघे ही किती चांगले आहेत. यांच्यात थोडा ही स्वार्थ नाही. अनेक अग्नि-दिव्यात यांची मैत्री तावून-सुलाखून निघाली. आपली मैत्री टिकून रहावी म्हणून यांनी मला प्रार्थना ही केली. पण आता माझ्या नावावर दोघे अलग होताना दिसताहेत!"





# शिव्या आणि शाप

एका गावात **पैसे व्याजाने** देणारा एक सावकार रहात असे. तो महादुष्ट अन् पापी माणूस होता. त्यामुळे त्याला स्वप्नातही कधी परमेश्वर दिसत नसे; पण भुतंखेतं मात्र भरपूर दिसत.

या सावकाराने गावातल्या एका गरीब बाईला कर्ज दिलं होतं. ती बिचारी सहा मुलांची आई होती. तिचा नवरा अचानकच मरून गेला होता. एके दिवशी आपल्या कच्च्या बच्च्यांना एवढीशी पेज खाऊ घालण्याइतके ही पैसे हाती नसल्याने तिनं या सावकाराकडून तीस रुपये कर्जाऊ घेतले, अन् त्या रकमेपोटी तिने आपलं घर गहाण लिहून दिलं. त्याच्या पुढल्या वर्षी ती काही ते कर्ज फेडू शकली नाही. अुलट तिने आणखी पंधरा रुपये त्याच्या कडून कर्जाऊ घेतले. सावकाराने या कर्जाच्या व्याजाचा हिशोब करून व्याजावरही व्याज चढवून सगळा मिळून शंभर रुपये इतका हिशोब मांडला. बाईला धमकावून, कर्जाच्या एवजात सारं घरच घशात घालायचा विचार सावकाराच्या मनात, आला.

एके दिवशी सकाळीच त्या बाईकडून घर रिकामं करून घ्यायच्या विचाराने सावकार आपल्या घराबाहेर पडला. त्यावेळी आपल्या घराजवळून एक भूत जात असलेलं त्याला दिसलं.

आपण एका गरीब बाईचं घर जप्त करायला निघाल्याबद्दल सावकारानं भुताला सांगितलं. नंतर तिनं किती रक्कम कर्जाअू घेतली, अन् त्यावर व्याज कसं चढत गेलं, अन् ती सारी रक्कम द्यायला ती कशी असमर्थ आहे, वगैरे हकिकत सावकाराने भुताला सांगून टाकली.

"बापरे! दोन वर्षंही नाही झाली अन् मुद्दलापेक्षा व्याजच जास्त झालं! तुम्ही माणसं आम्हाला अुगीचच 'वाईट' म्हणून शिव्या देता, पण आमच्यापेक्षाही महान् व्यक्ति तुमच्यात आहेत की!" भूत म्हणालं.

त्याच्या या बोलण्याचा सावकाराला जरा सुद्धा राग नाही आला. अुलट ती स्तुतीच मानून तो मनातल्या मनात मोठा खूश झाला.

दोघं बोलत बोलत चालत राहिले. वाटेत एका झोपडीतून एक आई आपल्या मुलाला रागावत असल्याचं ऐकू येत होतं, "अरे मूर्खा, तुला एकादं भूत गिळून टाकील तर बरं वाटेल बघ मला! दार लावायला सांगितलं होतं ना मी तुला? बघ ते मेलं मांजर येअून सारं लोणी खाऊन पण गेलं! आता काय करू बाई मी?"

हे बोलणं ऐकून सावकार भुताला म्हणाला, "अरे बघ, भोजनाची सोय झाली तुझी! ही बाई आपला मुलगा तुला देअून टाकायला तयार आहे. जा, अन् मजेनं त्या मुलाला खाअून टाक."

भूत हसून म्हणालं, "केवळ बोलण्यासाठीच बोलली ती बाई असं! खरंखुरं काही ती आपला मुलगा माझ्या हवाली नाही करणार. इतपत अनुभव आहे म्हटलं मला, इतकी छोटीशी बाबही कळत नाही होय मला?"

मग दोघं आणखी थोडे पुढे गेले.



**चांदोबात २५ वर्षांपूर्वी प्रकाशित झालेली गोष्ट**

एका ठिकाणी नवराबायकोंचं एक जोडपं भांडताना एकमेकांना म्हणत होतं, "भुतानं खाल्लं तुला तर बरं होईल!" ते ऐकून सावकार म्हणाला. "अरे ही तर फारच छान संधी! एकाच वेळी दोघांनाही गिळून टाकू शकतोस बघ तू! मग आता अुशीर कशाला?....."

पण तसं न करता भूत म्हणालं. "अरे या तर फक्त शिव्याच आहेत. शाप नव्हे काही, मला काय खरा शाप कळत नाहीं? तुला नसेल ते कळत! चल, पुढे जाअू."

ते पुढे चालू लागले. चालता चालता आता त्या गरीब बाईचं घर आलं. सावकारानं दरवाजा ठोठावला, तेंव्हा त्या बाईनं दार अुघडत विचारलं, "काय झालंय बेटा!"

सावकार मख्खपणे म्हणाला, "काही नाही काकू! तुझं कर्ज तसंच आहे, मारुतीच्या शेपटा सारखं व्याजावर व्याज वाढत आता सारी रक्कम मिळून शंभर रुपये झालेत. दोन वर्षात तू तर एक दमडी ही फेडली नाहीस. हं तू तरी कशी देणार म्हणा! चल ठीक आहे, आता कर्जाची अन् घराच्या किंमतीची बरोबरी होअून गेलीय. घर रिकामं करून माझ्या हवाली करून आपलं कर्ज फेडून टाक पाहू!"

सावकाराचं हे बोलणं ऐकून मात्र ती बाई रागानं लाल होत जोरानं म्हणाली, "अरे निर्लज्या! तुझ्यासारख्याला एकाद्या भुतानं खाल्लं तर समाधान होईल बघ माझं! पंचेचाळीस रुपये देअून माझं घर हडप करू पहातोस होय मेल्या! पाजी कुठचा!" अन् झाडू आणायला ती आत वळली. इतक्यात तिथंच हजर असणाऱ्या भुतानं सावकाराला गिळून टाकलं. झाडू घेअून बाहेर आलेल्या बाईला सावकार न दिसल्याने हैराण होअून ती बडबडू लागली, "निर्लज्ज मेला! घाबरून पळून गेला असणार!" अन् ती आपल्या घरात निघून गेली.



# बहुरूपा वसुन्धरा




## राक्षसी पालींच्या जातीशी संबंध

एके काळी पृथ्वीवर अस्तित्वात असलेल्या 'डायनोसोर' नावाच्या राक्षसी पालीच्या जातीशी आजच्या मगरी-सुसरींचे रूप व आकारात बरेच साम्य दिसून येते. या मगरी व सुसरी बहुधा मोठमोठे तलाव व नद्या यांच्या पाण्यात रहातात. या दोन प्रजाति म्हणजे 'क्रॉकाडोईल डी' व 'गॅविआली डी.' यांच्या खाण्यापिण्याच्या सवयी अगदी एकसारख्या असल्या, तरी त्यांच्या चेहेऱ्याच्या आकारात मात्र फरक असतो. मगरींचे तोंड विशाल असून त्यांच्या खालच्या जबड्यातले सुळे खूप मोठे व तोंडाबाहेर आलेले दिसतात. सुसरींचे नाक पातळ व लांब असून त्यांच्या नाकपुड्या अुंच, अुचललेल्या अशा दिसतात. यांचे दात (सुळे) मात्र तोंडाबाहेर दिसत नाहीत.



## डरकाळी फोडणारे वाघ

रागात आलेल्या वाघाचे कान अुभे असलेले दिसतात. अन् त्यांच्यावर गोल वळ्याही दिसतात. असे वाघ समोर आलेल्यावर एकदम झडप घालतात. वाघाचे कान जेंव्हा अुभे झालेले दिसत नाहीत, तेंव्हा समजावे की तो रागात आलेला नाहीय. अशा वेळी त्यांच्यासमोर कोणी आले तर अगोदर ते दादा विचकून डरकाळी फोडतात, अन् मगच हल्ला चढवतात. भुंकणारे कुत्रे चावत नाहीत म्हणतात नं? तसेच हे डरकाळी फोडणारे वाघ लगेच झडप नाही घालत! कळले ना?



## अतिप्राचीन आम्रवृक्ष

सर्वसाधारणपणे आंब्याचे झाड पन्नास वर्षे जगते. १७९२ मधे कृषिविद्यालयासाठी कोईमतूरला जी जमीन खरीदली गेली, त्यावर त्यावेळपर्यंत पन्नास वर्षे पूर्ण झालेला एक आम्रवृक्ष होता. तो आजही जिवन्त असून त्यावर अजून दरवर्षी २००० आंबेही लागतात. या झाडाचे वय जवळजवळ १४० वर्षे असावे असे अनुमान केले जाते. आपल्या देशातल्या या अतिप्राचीन आम्रवृक्षाच्या खोडाचा घेर २४ फूट असून अुंची आहे ४० फूट! याच्या फांद्या वजनामुळे तुटू नयेत, यासाठी योग्य ती खबरदारी घेतली जात आहे.

विश्व-समाचार

# सहाव्यांदा राष्ट्रपति



लागोपाठ सहा वेळी आपल्या देशाचा राष्ट्रपति म्हणून निवडला जाणे कोणत्या ही राजनीतिज्ञाला काही सामान्य गोष्ट नव्हे. इंडोनेशियाचे राष्ट्रपति सुहार्तो गेल्या मार्च महिन्यात सहाव्यांदा निवडून आले ही विशेष महत्त्वाची घटना नाही का? कोणे एके काळी सेनापति पण असलेल्या या ७२ वर्षांच्या व्यक्तीला १००० सभासद असलेल्या लोक सल्ला-समितीने निवडले. निवड करण्यासाठी राजधानी जकार्ता मध्ये समितीची बैठक दहा दिवस चालू होती. निवड ही एकमताने झाली, कारण समिती समोर विचारार्थ एकच एक नाव होते. दुसरे असे की सहाव्यांदा यांची निवड तशी अपेक्षितच होती.

जेव्हा १६ व्या शतकात पोर्तुगीज व्यापारी इंडोनेशियात पोचले व तेथील १३,५०० बेटांवर तळ ठोकला, तेव्हा जगाला इंडोनेशिया माहीत झाला. येथील गरम मसाल्यांनी जगाचे लक्ष इंडोनेशियाकडे वेधून घेतले. पुढे लवकरच इंग्रजांनी पोर्तुगीजांना तेथून हाकून दिले. नंतर १५९५ मध्ये डच लोकांनी इंग्रजांना पळवून लावले. पुढील २०० वर्षे डच ईस्ट इंडिया कंपनीने या बेटांवर राज्य केले. १७१८ मध्ये ही बेटे नेदरलँडची वसाहत बनली.

दुसऱ्या विश्व-युद्धाच्या वेळी (१९३९-४५) म्हणजे सन १९४२ मध्ये जपानने या बेटांवर आपला अधिकार स्थापित केला आणि तेथे राष्ट्रीय सरकारची स्थापना केली. परंतु १९४५ मध्ये जेव्हा जपानने मित्र राष्ट्रांपुढे हात टेकले, तेव्हा इंडोनेशियातील राष्ट्रवादी लोकांनी सुकर्णो यांच्या नेतृत्वाखाली आपल्याला स्वतंत्र घोषित केले. औपचारिक रीत्या हे सर्व सन १९४९ मध्ये झाले.

नंतर १९६३ मध्ये नेदरलँडने न्यू गिनीचा पश्चिमी भाग पण इंडोनेशियन सरकारच्या ताब्यात दिला. सन १९६६ मध्ये कम्यूनिस्टांनी सुकर्णो यांच्याशी लढा आरंभिला. राडन सुहार्तो त्यावेळी सेनापति होते. त्यांनी देशातील बंड मोडून काढून संकटकालीन सरकारची स्थापना केली. १९६७ मध्ये सुहार्तो कार्यकारी राष्ट्रपति म्हणून सुकर्णोच्या जागी आले, आणि १९६८ मध्ये पुन्हा त्यांची निवड करण्यात आली.

राष्ट्रपति सुहार्तो मितभाषी असले तरी काम करण्याची धमक असलेले एक प्रशासक म्हणून प्रसिद्ध आहेत. ते उगाच बडबड करीत नाहीत. आणि त्यांच्या यशाचे हेच रहस्य आहे. गेल्या २५ वर्षांत इंडोनेशियात जी आर्थिक व राजनैतिक प्रगति झाली, त्यामुळे त्यांचे नाव केवळ आपल्या देशात नव्हे तर बाहेर ही सुप्रसिद्ध झाले आहे.

पुढील २५ वर्षांचा काळ लक्षात घेऊन त्यांनी ज्या पंचवार्षिक योजना राबवल्या त्यांनी जगातील अनेक राष्ट्रांचे लक्ष इंडोनेशियाकडे वेधले. देशाचा वार्षिक विकासाचा दर सरासरी शेकडा ६ टक्के राहिला. राष्ट्रपति सुहार्तो अभिमानाने सांगतात की असा विकास जगातील अन्य दहा देशच करू शकले आहेत.




एक काळ असा होता की इंडोनेशिया जगात सर्वात अधिक तांदूळ खरेदी करीत असे. पण १९८४ मध्ये तो स्वावलंबी झाला. याशिवाय गेल्या २० वर्षात तेथील बाल-मृत्यूचे प्रमाण हजारी १४० वरून ६० पर्यंत आले आहे. आता प्राथमिक शिक्षण वयानुरूप सर्व बालकांना मिळते. १९७१ मध्ये इथ निरक्षरतेचे प्रमाण शेकडा ३९ होते, ते आता शेकडा १६ टक्क्यांवर आले आहे. त्याच प्रमाणे लोकसंख्येतील वाढ शेकडा २.३ वरून आता शेकडा १.६ वर आली आहे. म्हणून राष्ट्रपति सुहार्तो यांना आधुनिक इंडोनेशियाच्या 'विकासाचा जनक' म्हणून संबोधले गले तर ते सर्वस्वी योग्यच होय. येत्या २५ वर्षांसाठी त्यांनी आजच योजना तयार केल्या आहेत आणि येत्या १० वर्षांना त्यांनी 'भरारीचा काळ' संबोधले आहे.

पण एका मुद्यावर इंडोनेशियातील जनतेत आताच चर्चा सुरू झाली आणि ती म्हणजे राष्ट्रपति सुहार्तो आपला सहावा कार्यकाल पुरा करू शकतील का? आणि सातव्यांदा निवडीसाठी ते तयार आहेत, की आताच त्यांनी आपला वारस शोधायला सुरुवात केली आहे?

### इंडोनेशिया बाबत अधिक माहिती

१. इंडोनेशियात १३,५०० बेटे आहेत नि ती ५,१५० किलोमीटर पर्यंत पसरलेली आहेत. त्यांच्या पैकी काही हिंदी महासागरात आहेत,.तर काही प्रशांत महासागरात आहेत.

२. इंडोनेशिया जगातील १६ वे सर्वात मोठे राष्ट्र आहे (१९,१९,४४० चौरस किलोमीटर). याशिवाय हा जगातील सर्वात अधिक लोक-संख्या असलेला पाचवा देश आहे (१६.१ कोटी).

३. सैन्य-बळाचा विचार केला तर याचा नंबर अकरावा लागतो. याच्या अगोदर कॅनडाचा नंबर लागतो.

४. विकास-गतीचा विचार केला तर याचा क्रमांक पाचवा लागतो.

५. अधिकाधिक तांदूळ उत्पादन करणाऱ्या देशात इंडोनेशियाचा तिसरा क्रमांक आहे.

६. येथील सरकारी काम-काजाची भाषा 'बहासा इंडोनेशिया' आहे. ही रोमन मध्ये लिहिली जाते. प्रादेशिक भाषा व उपभाषांची संख्या सुमारे २०० आहे.

७. या देशाची मुद्रा आहे 'रुपियाह'.



# ग्रहण सुटलं

'शौरी नावाचा तरुण सरोजपुरच्या जमीनदाराच्या काही कामासाठी गाव सोडून निघाला अन् अन्धार पडण्यापूर्वी त्याने जंगल पार केले. इतक्यात आकाशात एकाएकी ढग भरून आले अन् गडगडाट होऊन पाऊसही सुरू झाला.

शौरी 'आता काय करावं?' असा विचार करू लागला, इतक्यात विजेच्या उजेडात त्याला काही घरे दिसली. तो भराभरा त्या घरांकडे पळाला अन् एका जुन्या कौलारू घराचा दरवाजा त्याने खटखटावला.

हातात एक छोटासा दिवा घेऊन आलेल्या एका म्हाताऱ्याने दरवाजा उघडला व शौरीला आत येऊन खाटेवर बसायला सांगितले. नंतर त्याने विचारले, "या असल्या पावसातनं कुठे निघाला आहेस तू?"

जरा कंटाळूनच शौरी उत्तरला, "मी सरोजपुरच्या जमीनदाराचा नोकर आहे, अन् त्याच्या छोट्या मुलासाठी त्याच्या मामाकडून एक मांजराचं पिल्लू आणायला निघालो आहे. ते पिल्लू एका खास जातीच्या मांजराचं आहे, अन्'ते मिळाल्यावाचून आपण जेवणार नाही' असा त्याचा हट्ट आहे."

ते ऐकून तो म्हातारा हसला आणि म्हणाला, "तुझं वय तर अजून पुरं पंचवीस वर्षांचंही दिसत नाहीये. तू चांगला तगडा, सहा फूट उंचीचा आहेस. हातात ढालतलवार घेऊन रणात उतरण्यासारखा शक्तिमान दिसतोयस अन् आपला वेळ असा कुत्रीमांजरं आणून

महेश करमरकर



देव्यात फुकट घालवतोयस?"

म्हाताऱ्याने हसून बोललेल्या शब्दांनी शौरीच्या हृदयाला घरे पडली; ते ओळखून प्रेमाने त्याचा खांदा थोपटत म्हातारा म्हणाला, "एका महिन्यापूर्वी या राज्यात एक अत्याचार घडलेला माहीत आहे तुला?"

"होय, आहे ठाअूक. समुद्रावर सफरीसाठी गेलेल्या महाराजांचं नावेच्या अपघातात निधन झालं. हाच ना? याहून मोठा अत्याचार आणखी कोणता असणार?" शौरी दुःखी आवाजात अुत्तरला.

म्हातारा दोन चार क्षण डोके हलवून नंतर म्हणाला, "हं! यापेक्षा जास्त काही तुला माहीत नाही, असंच वाटतंय. ऐक. राजाला एक मुलगी आहे, एकुलती एक. तिचं नाव आहे अलकनन्दा. जो कोणी तिचा पती होईल, तोच या राज्याचा भावी राजा बनेल. आता या अलकनन्दाने घोषणा केली आहे की, तिच्या तीन निरनिराळ्या प्रश्नांचे एकच एक अुतर देणाराशी ती लग्न करील. अन् ज्याचे अुत्तर बरोबर येणार नाही, अशा अभाग्याला मगरीसुसरींचं खाद्य म्हणून नदीत ढकलले जाईल.

"पण तुम्हाला कसं हे ठाअूक?" शौरीने आश्चर्याने विचारले.

"मी राजाचा अंगरक्षक म्हणून पंधरा वर्षं काम केलंय. एकदा रथाच्या अपघातात मी लंगडा झालो अन् आपल्या गावावरच्या प्रेमामुळे मी इथे आपले दिवस काढतोय. पण तरीही राजमहालातली प्रत्येक गोष्ट सांगणारी माझी खास माणसं आहेत. तू ही मांजराच्या पिल्लाची गोष्ट बाजूला ठेव, अन् सरळ राजधानीला जा. राजकुमारीच्या दुष्टपणाचा शेवट कर."

जरा विचार करून शौरी म्हणाला, "तुम्ही मला आशिर्वाद देत असाल, तर हा निघालो मी राजधानीला."

"भले अच्छे! खूप आवडलास बघ तू





मला." प्रेमाने शौरीच्या मस्तकावरून हात फिरवत म्हातारा म्हणाला.

दुसऱ्या दिवशी शौरी राजधानीकडे निघाला. संध्याकाळी अंतःपुरात पोचून त्याने सांगितले की आपण राजकुमारीच्या प्रश्नांचे अुत्तर द्यायला तयार आहोत.

"अुत्तर बरोबर न आलं, तर काय परिणाम होईल, ते माहीत आहे न?" राजकुमारीच्या दासीने त्याला विचारले.

"मृत्यू, सुसरीमगरींचं भोजन बनेन." शौरी निर्भयतेने अुत्तरला.

मग दोन दासींनी येअून शौरीच्या डोळ्यांवर पट्टी बांधली अन् त्याला महालातल्या एका खोलीत घेअून गेल्या. तिथे पोचल्यावर त्यांनी शौरीला स्वतःच पट्टी काढायला सांगितले.

पट्टी काढल्यावर शौरीला राज्य सिंहासनावर बसलेली, राजकन्या अलकनन्दा दिसली. ती अत्यंत सुन्दर असून तिच्या चेहऱ्यावर दुःखाची छाया दिसत होती.

"आकाशाहूनही विशाल काय? सागराहूनही खोल काय? अन् लोण्याहूनही मअू काय? या तीन्हीं प्रश्नांचं एकच अुत्तर मला हवं." अलकनन्दाने प्रश्न विचारले.

आश्चर्याने तिच्याकडे पाहून शौरी अुत्तरला, "स्त्रीचं हृदय । हे काय प्रश्न झाले? राजकुमारी, केंव्हातरी खूप काळापूर्वी सामान्यज्ञानाच्या अभावी काही भावुक लोकांनी हे प्रश्न आणि त्यांची अुत्तरं तयार करून ठेवली होती. आपल्याला काय याहून कठीण प्रश्न सुचले नाहीत का?"

अलकनन्दा दुःखाने यावर म्हणाली, "मी स्वतन्त्र असते, तर असले प्रश्न विचारलेच नसते. एका दुष्टाने मला हे प्रश्न विचारायला लावून, काहीही अुत्तर आलं तरी, येणाऱ्याला सुसरीमगरींच्या हवाली करायला भाग पाडले आहे. तुलाही त्याच वाटेने जावं लागणार आहे."



शौरीने तेव्हाच आपला डावा हात अुचलून मूठ आवळत म्हटले, "राजकुमारी, मला त्या दुष्टाचं नाव सांगा. तो कितीही बलवान असला तरी मी त्याचा संहार करतो."

"तू समर्थ आणि बुद्धिमान दिसतोस. पण आता त्या दुष्टाच्या बाबतीत फार अुशीर झालाय. आता केवळ एकच दिवस अुरलाय." नन्तर अलकनन्दाने ती स्वतः व राजा कोणत्या भयानक स्थितीत अडकले आहेत, याबद्दल सांगितले.

एक महिन्यापूर्वी अलकनन्दा आपल्या पित्यासह समुद्रविहाराला निघाली होती. त्यावेळी 'सेनापती वीरवर्माही त्यांच्याबरोबर होता. खोल पाण्यात असतानाच वीरवर्माच्या मनात काही नीच विचार आहे, हे त्यांच्या लक्षात आले. नौका चालवणारे सर्वजण त्याचेच हस्तक होते. ते ती नाव एका लहानशा बेटाकडे घेअून गेले. अन् राजाला वीरवर्माने तिथल्या एका पहाडी गुहेत बांधून ठेवले. नंतर केवळ अलकनन्दालाच राजवाड्याच्या अंतःपुरात घेअून जाअून, असा प्रचार केला की, 'अपघाताने नाव समुद्रात बुडली अन् आपण फक्त अलकनन्दालाच वाचवू शकलो. राजाला वाचवणं शक्य झालं नाही' नंतर वीरवर्माने प्रश्नांची ही नवी कहाणी सुरू केली. त्याचा विचार आहे की, कोणालाही अुत्तर देणे शक्य झाले नाही म्हणजे स्वतःच ते अुत्तर द्यायचे, अन् राजकुमारीशी विवाह करायचा.

हे सर्व सांगून अलकनन्दाने शौरीला म्हटलं, "काल रात्री मला झोप येईना, म्हणून मी अुद्यानात गेले. तिथे सेनापती आणि त्याचा विश्वासू साथीदार नागेन्द्र यांच्यातलं बोलणं मी ऐकलं. सेनापती नागेन्द्रला म्हणाला, "तू त्या बेटावर जाअून तिथल्या पहारेकऱ्यांना म्हण- 'ग्रहण सुटलं' तेव्हः या शब्दाच्या आधारे ते राजाला तुझ्याबरोबर पाठवतील. त्याला तिथून आणताना



समुद्रात बुडवून मारून टाक. परवा चांगला मुहूर्त आहे. मी राजकन्येशी लग्न करीन अन् तुला सेनापती करीन."

अलकनन्दाचे बोलणे ऐकून शौरी फारच संतापला. तो म्हणाला, "इतका मोठा राजद्रोह! माझा तर विश्वासच बसत नाहीय राजकुमारी!"

"तो वीरवर्मा तर नररूपातला राक्षस आहे. रात्री तो तुला मगरीसुसरींच्या हवाली करायला येईल, तेंव्हा मी त्याला सांगेन की-तुझं अुत्तर बरोबर नाही'. असं मी म्हटलं की तू खिडकीतून अुडी मारून पळून जा. तू आता तसंच कर अन् पळ काढ इथून."

शौरीने खिडकीतून अुडी मारली आणि झाडाझुडपांच्या आडोश्याने तो राजवाड्यातून बाहेर पडला. नंतर तो सागरकिनारी पोचला.

दुसऱ्या दिवशी एका नावाड्याला काही पैसे देअून, त्याच्या मदतीने शौरी त्या बेटावर पोचला. शौरी बेटावर पोचल्याबरोबर मोठी पगडी घातलेल्या आणि हाती तलवार असलेल्या एका माणसाने त्याच्या पुढ्यात अुडी घेतली. शौरीला थांबवून त्याने विचारले, "कोण आहेस तू? समुद्रातल्या चाच्यांचा नेता तर नव्हेस?"

पण जराही न भिता शान्तपणे शौरीने



परवलीचा शब्द अुच्चारला 'ग्रहण सुटलं!'

ते ऐकून तो माणूस दचकला अन् म्हणाला, "हा संकेत मी अन् नागेन्द्र यांशिवाय कुणालाही माहीत नाहीय. तुला कसा कळला तो?"

तेंव्हा शौरी उच्च आवाजात बोलला, "इथे येताना माझी ढाल अन् तलवार समुद्रात पडली. नाहीतर मी आत्ताच तुझे दोन तुकडे करून टाकले असते. तो नागेन्द्र नव्हे, नागेन्द्रसिंह, म्हणजे भावी राजा."

पगडीवाल्याचा चेहरा एकदम पांढरा पडला. त्याने विचारले, "काय म्हणलास? हे तर सारं आश्चर्यजनक वाटतंय. जरा सविस्तर सांग."

"ऐक तर मग, काल रात्री नागेन्द्रसिंहने सेनापती वीरवर्माच्या जेवणात द्वादश-विषांचं लेह्य मिसळून त्याला खायला घातलं. बारा वाजल्या नन्तर विष आपला परिणाम दाखवू लागेल. अशा तऱ्हेनं सेनापती खतम झाल्यावर नागेन्द्र या बेटावर येऊन, राजाला सोडवू----" शौरी पुढे काही बोलण्यापूर्वीच पगडीवाल्याला जोरदार अुलटी झाली अन् तो बेशुद्ध पडला!

शौरीने ताबडतोब त्याची ढाल तलवार काढून घेअून त्याला बांधून टाकले अन् तिथेच जरा दूर असलेल्या पहारेकऱ्यांना आवाज दिला- 'महाराजांना इकडे घेअून या.'

पहारेकारी राजाला घेअून आले व त्याची बंधने सोडली गेली.

परत येत असतांना, सावध झाल्यावरही थरथर कापत असणाऱ्या वीरवर्माकडे पहात शौरीला विचारले, "हाच वीरवर्मा हे तू कसं ओळखलंस?"

शौरी अुत्तरला, "महाराज, मी विचार केला की, मी खिडकीतून पळून गेल्याची वार्ता कळल्याबरोबर, कदाचित मला काही जास्त माहिती असावी अशा विचाराने हा प्रथम बेटाकडेच धावेल. मी परवलीचा शब्द सांगितल्याबरोबर हा म्हणाला की, 'हा संकेत नागेंद्र अन् मी यांच्याशिवाय तिसऱ्याला माहीतच नाही!' तेंव्हाच मी याला बरोबर ओळखलं, माझ्याजवळ काहीच शस्त्र वगैरे नसल्यामुळे मी युक्ती वापरून विष-प्रयोगाची खोटीच गोष्ट याला सांगितली. हा लगेच घाबरून बेशुद्ध पडला."

शौरीची बुद्धिकुशलता अन् बहादुरीवर राजा फारच प्रसन्न झाला. दुसऱ्या दिवशी दरबारात ही सारी गोष्ट सर्वांना सांगून राजा म्हणाला, "या शौरीच्या साहसामुळेच राज्यावरचं 'ग्रहण सुटलं'! हाच आता माझा जावई अन् भावी राजा आहे.

सारी कथा ऐकून दरबारी लोकांनी संतोषाने हर्षध्वनी केला.





# अद्‌भुत फूल
## २

(माणिक्यपुरीत साजऱ्या झालेल्या वसंतोत्सवातील सर्व स्पर्धांमध्ये अुत्तुंग नावाचा तरूण विजयी झाला. तो हिमालयातील शृंग्माय प्रांतातून आलेला होता अन् त्याने एक विचित्रसा पुष्पगुच्छ राजकुमारीला भेट दिला. त्या फुलांची रोपे आणण्यासाठी तिने काही सैनिकांना शृंग्माय प्रान्तात पाठवले. पण ते फक्त फुलेच घेअून परत आले. राजगुरूने राजाकडे येअून ती फुले अशुभकारक आहेत असे राजाला सांगितले. या पुढे-)

"इतकी सुन्दर फुलं अशुभकारक कशी असतील? मला तर काहीच कळत नाहीय गुरुदेव!" राजा प्रतापवर्मा गुरुदेवांना म्हणाला.

"ते मी मागाहून सांगेन. सैनिकांनी ती फुलं आणल्याचं मला समजलं. सैनिक ईशान्येकडे का गेले? अन्य एकाद्या दिशेला का गेले नाहीत. त्यांना ईशान्येकडे कोणी जायला सांगितलं? सीमाप्रान्तात कुठे काही भांडणतंटा तर नव्हे?" राजगुरु गौरीनाथने विचारले.

"नाही गुरुदेव! आपल्या राज्यात आपल्या कृपेनं सर्वत्र सुख समृद्धी अन् शांतता आहे." असे सांगून सैनिकांनी



'शताब्दि फुलां' बद्दल जी माहिती दिली होती तिचे ही वर्णन राजाने त्यांना ऐकवले. ते ऐकून घेतल्यावर राजगुरुंनी विचारले, "सध्या ती फुलं कुठे आहेत?"

"युवराणीच्या महालात आहेत गुरुजी! इतके दिवस झाले, तरी ती अजून तशीच टवटवीत असून सुगंधही देत आहेत. आम्हा सर्वांनाच ही फुलं फार आवडली. असली फुलं आतां पर्यंत कधी आमच्या पाहण्यात आली नव्हती." राजाने माहिती दिली.

"ती तावडतोब तिथून हलवा. ती जर राजवाड्यात राहिली, तर त्रास होईल. ती फुलं राजवाड्याच्या परिसरात राहिली तर सर्वांनाच फार अशुभ आहेत. राजकुमारीला 'मी सांगितलंय' असं सांगा." राजगुरु बोलले.

"आपलं आज्ञापालन अवश्य करीन मी गुरुदेव! पण ती फुलं अशुभसूचक कशी, हे नाही सांगितलंत आपण? राजकुमारीचं तर त्या फुलांवर प्राणांपेक्षा अधिक प्रेम बसलंय. त्यामुळे त्याबद्दलचं सत्य जाणून घेणं तिला आवश्यक आहे. आपण आज्ञा दिलीत, तर प्रियंवदेला मी इथे बोलावून घेतो. आपण या फुलांच्या अशुभ असण्याची माही मीमांसा विषद केली तर फार बरे होईल. आम्हांला सर्वांनाच त्याबाबत जाणून घेण्याची मनःपूर्वक इच्छा आहे." राजाने सुचवले.

राजगुरुंनी होकारात्मक मान हलवली अन् राजाने ताबडतोब राजकन्येला बोलवायला नोकर पाठवला. युवराणी प्रियंवदेने येऊन राजगुरुंच्या पायांना स्पर्श करून त्यांना वन्दन केले. त्यांनी आशिर्वाद दिल्यावर ती एका आसनावर बसली. आपल्याला कशासाठी बोलवलं आहे याबाबतचं प्रश्न-चिन्ह तिच्या मुद्रेवर स्पष्ट दिसत होतं.

युवराणीकडे पहात राजा म्हणाला, "बेटी, शताब्दी-फुलां बद्दल काही खास बोलण्यासाठी राजगुरू इथे आले आहेत. ते जे काही सांगणार आहेत, ते तुलाही माहीत असावं, म्हणून मी तुला इथं बोलावलंय. ही फुलं व त्यांचा सुगंध आपल्याला सर्वांना आवडल्याबाबत मी यांना सांगितलं आहे."

राजकुमारी उत्सुकतेने राजगुरूंकडे पाहू लागली. सर्वांची जिज्ञासा जाणून राजगुरु बोलू लागले.

"कोणे एके काळी ही शताब्दी फुलंही इतर फुलांप्रमाणे दरवर्षी फुलत असत. एकदा फुलल्यानंतर बरेच दिवस ती कोमेजत नसत. शेकडो वर्षांपूर्वी आपल्या वंशातले महाराज चन्द्रकान्तवर्मा माणिक्यपुरीवर राज्य करत असत. ते एक धर्मपालक व साहसी वीर म्हणून प्रसिद्ध होते. त्यांना चन्द्रकेतु नावाचा एक धाकटा भाऊ होता. पण तो मात्र प्रत्येक बाबतीत आपल्या थोरल्या भावाच्या अुलट प्रकारचा होता. राज्यकारभारात आपल्या मोठ्या भावाला मदत करणं दूरच, पण अुलट त्याने राज्याला नुकसान पोचवण्याचाच प्रयत्न केला. अनेक राज्यं अन् नगरं यांतून तो भटकत रहात असे. शेवटी तो आपल्या राज्याच्या अुत्तर सीमेवरील प्रांताच्या डोंगराळ भागात पोचला. तिथे त्याने पहाडी लोकांशी मैत्री जमवली. त्यांच्यात नागांबी नावाचा एक मन्त्र-तन्त्र जाणणारा माणूस होता. त्याच्याशी मैत्री



करून चन्द्रकेतुने काही मन्त्र-तन्त्र शिकून घेतले. एकदा त्याने नागांबीला काही विशेष फुलं तोडून वाफाळल्या पाण्यात टाकताना पाहिलं. नागांबीने नंतर ते पाणी रोज थोडंथोडं अुकळून त्यापासून एक सुगंधी तेल बनवलं. अन् त्यानं असं सांगितलं की त्यातलं थोडंसं तेल आपण कोणावर शिंपडलं तर ती व्यक्ति आपल्याला वशीभूत होअून आपल्या आज्ञा पाळू लागते. चन्द्रकेतु मोठ्या अुत्साहाने ती फुलं घेअून माणिक्यपुरीला परतला. नागांबीने बनवल्याप्रमाणेच त्याने त्या फुलांपासून तेल बनवलं. चन्द्रकेतुचा असा विचार होता की,



अगोदर परीक्षा म्हणून एकाद्या सामान्य माणसावर तेलाचा प्रयोग करून पाहून, नंतर खुद्द राजावरच तो प्रयोग करून त्याला आपल्या कह्यात ठेवायचे अन् मग स्वतःच सिंहासनावर बसायचे. त्यासाठी त्याने एक योजना आखली."

मधेच युवराणीने गुरुजींना विचारले, "त्याची योजना सफल तर नाही ना झाली?" राजगुरु अुत्तरले, "नाही राजकुमारी! त्याची ती कुटिल योजना सफल नाही झाली. तेच तर सांगणार आहे मी पुढे. दुष्टांच्या कारवाया काही काळ चालतात. कधी कधी त्यांना यश ही मिळतं. पण शेवटीं त्याच्या पदरी पराभवच असतो."

"त्यावेळीं लैरंबी मातेच्या मंदिरात कुलश्रेष्ठ नावाचा एक पंडित मुख्य पुजारी होता. त्याला एक सुंदरशी मुलगी होती. तिचं नाव होतं भाग्यश्री. तिला पहाताच चन्द्रकेतु तिच्यावर मोहित झाला. ती पुजाऱ्याची मुलगी आहे, हे त्याला माहीत नव्हते. वशीकरण तेलाचा तिच्यावरच प्रयोग करून तिच्यावर ताबा मिळवायचा असं त्यानं ठरवलं. एकदा भाग्यश्री आपल्या दासींसह जाअून जवळच्या नदीत स्नान करून मंदिराकडे आली. इतक्यात चन्द्रकेतूनं झाडामागून तिच्यावर ते तेल शिंपडलं. तेंव्हा ती इतक्या जोराने किंचाळली की तो आवाज चारी दिशांना प्रतिध्वनित झाला. ती एकाएकी चहूकडे धावू लागली, तेंव्हा दासींनी तिला पकडायचा प्रयत्न केला. काही लोक पुजाऱ्याला हे सांगायला मंदिरात गेले. हातात एक पात्र अन् पानांची डहाळी घेअून झाडामागून पळू पहाणाऱ्या चन्द्रकेतुला काही लोकांनी पकडले अन् खेचून मंदिरात घेअून गेले.

पूजेची वेळ होत आली होती अन् तो पुजारीश्रेष्ठ देवीला सजवण्यात मग्न होता. इतक्यात काही बायकांचा आर्त आवाज ऐकून तो गाभाऱ्याबाहेर आला अन् समोरचं दृश्य पाहून त्याने आपल्या मुलीचे दंड घट्ट पकडले. तिला सावध करायचा प्रयत्न करीत त्यांनी विचारलं, "काय झालं भाग्यश्री? तू अशी सैरावैरा पळत का सुटली आहेस? तुझी प्रकृति अशी कशामुळे बरे बिघडली? काही सांग तर बाळ!"

भाग्यश्रीच्या तोंडून शब्दच फुटेना! इकडे तिकडे पहात ती बेशुद्ध होअून पडली. तिच्याबरोबरच्या एका परिचारिकेनं "आम्ही नदीवरून स्नान करून येत होतो, इतक्यात त्या माणसाने भाग्यश्रीवर काहीतरी शिंपडलं अन् त्या क्षणापासून ही अशी वेड्यासारखं करते आहे." असं बोलत लोकांनी पकडून आणलेल्या चन्द्रकेतुकडे इशारा केला.

रागावून चार पावलं पुढे टाकत पुजाऱ्यानं चन्द्रकेतुला विचारलं, "कोण आहेस तू? माझ्या मुलीवर काय शिंपडलंस तू? आणि हे असं काही करण्यामागे तुझा उद्देश काय? नीट सांग, नाहींतर याचा परिणाम फार भयंकर होईल!"

"महात्मन्, मला माहीत नव्हतं, की ती आपली मुलगी आहे. माझ्याकडून चूक झाली. एका भिल्लानं सांगितल्याप्रमाणे काही अद्भुत् फुलांपासून मी वशीकरण तेल बनवलं. अन् त्याचा प्रभाव जाणून घेण्यासाठी मी चुकून ते हिच्यावर शिंपलं. ही आपली मुलगी, हे मला माहीत नव्हतं. तेल शिंपल्याशिवाय मी आणखी काहीच





केलं नाही. कृपा करून मला..." असं काहीतरी चन्द्रकेतु सांगू लागला.

पण पुजाऱ्याने त्याच्या बोलण्याकडे लक्ष दिले नाही. गाभाऱ्यात जाऊन त्याने देवीच्या गळ्यातला हार काढून बाहेर आणला अन् क्रोधाने तो ओरडला, "माते लैंरबी! मी तुझ्यावर विश्वासून राहिलो अन् लोककल्यापासाठी तुझी पूजाअर्चा करत राहिलो. आजपर्यन्त स्वतःसाठी मी तुझ्याकडे काही मागितलं नाही. आज माझ्या एकुलत्या एका मुलीची स्थिति पहा! तिचं रक्षण कर माते! अन् तिची ज्यानें अशी अवस्था केली तो नरराक्षस नष्ट होवो; ज्या फूलांमुळं हे सारं रामायण घडलं ती फुलंच कधी फुलणं बन्द होऊन जाऊ दे!" अशी जणू शापवाणी उच्चारून पुजाऱ्याने हातातला हार जोराने चन्द्रकेतुकडे फेकला.

दुसऱ्याच क्षणी पुजाऱ्याच्या डोळयापुढे तेजस्वी असा प्रकाश फाकला अन् त्यातून लैरंबी देवी प्रकट झाली. ती म्हणाली, "पुत्रा, तुझी प्रार्थना मी ऐकली. तुझी मुलगी लवकरच ठीक होईल, अन् तिच्यावर असा अत्याचार करणाऱ्याचं एका भुतात रूपान्तर होईल. त्या फुलांचा काही दोष नाही, पण ती एका दुष्ट माणसाच्या उपयोगी पडली, म्हणून तुझ्या इच्छेप्रमाणे ती यापुढे दरवर्षी फुलणार नाहीत. अन् पुढे जेंव्हा केंव्हा ती फुलतील, तेंव्हा निसर्गाविरुद्ध वागणारांना त्यांच्यामुळे खूप त्रास होईल. ठीक आहे, सध्या तू हे सारं विसरून जा आणि आपल्या पूजा-कामाला लाग." इतके बोलून देवी अन्तर्धान पावली.

पुजारी नंतर गाभाऱ्यात गेला अन् सर्व काम संपवून आरती करून तो बाहेर आला, तेंव्हा त्याची कन्या भाग्यश्री, जणु काहीच घडलं नाही अशी, हसत हसत त्याच्यासमोर आली. लोक असं म्हणतात की चन्द्रकेतु भूत होऊन पळून गेला.

हे सर्व कळल्यावर महाराज चन्द्रकान्त आपल्या भावाच्या कृत्याबद्दल फारच



लज्जित झाले. पुजाऱ्याकडे जाऊन आपल्या भावातर्फे त्यांनी क्षमा मागितली, अन् त्याला सान्त्वना देत महाराज म्हणाले, "तुमची मुलगी मोठी झाली की तिला एकदा राजवाड्यात पाठवा. माझ्या मुलीबरोबर काही वेळ राहिली की ती लवकरच बरी होऊन जाईल."

इतकी गोष्ट सांगून राजगुरू म्हणाले, "मी हे सारं चन्द्रकान्त महाराजांची कीर्ती गाणाऱ्या ताडपत्रातून वाचलं. मी पुढे असंही वाचलं की देवीकडून शापित झालेली ती फुलं शंभर वर्षांतून एकदाच फुलतील अन् म्हणून त्यांना 'शताब्दि फूल' असं नाव मिळेल. या फुलांबाबत मी आत्ता जेंव्हा ऐकलं, तेंव्हा ग्रंथात वाचलेळं सारं काही मला आठवलं. प्रजेला शांति अन् सुख प्रदान करणं हे आपलं कर्तव्य आहे महाराज! म्हणूनच आपणाला सावध करण्यासाठी आलो मी!"

राजगुरूने आपले निवेदन संपवताच राजा प्रतापवर्मा आपल्या कन्येकडे पहात म्हणाला, "प्रियंवदा, राजगुरूंचं म्हणणं आहे की ती फुलं राजभवनात ठेवणं ठीक नाही, तेंव्हा ती बाहेर राजोद्यानात पाठवून देणं उचित होईल."

प्रियंवदा उत्तरली, "होय पिताजी, मी लगेच ती इथून पाठवून द्यायची व्यवस्था



करते." अन् राजगुरुकडे पहात ती म्हणाली, "इतका मधुर सुगंध पसरवणाऱ्या फुलांच्या मागे अशी विषादगाथा असणं फार खटकतंय मनाला!"

इतक्यात एक शिपाई तेथे आला अन् राजाला मुजरा करून म्हणाला, "महाराज, सेनापति आपल्या दर्शनासाठी प्रतीक्षा करत आहेत."

"पाठव त्यांना इकडे." राजा म्हणाला. शिपाई गेल्यावर थोड्याच वेळात सेनापतीने येऊन राजा व राजगुरु या दोघांनाही प्रणाम केला.

"काही अडचण घेऊन आला आहात

असं वाटतंय. काय झालंय?" सेनापतीच्या चेहऱ्याकडे संशयाने पहात राजाने विचारले.

"होय महाराज! मोठीच अडचण आहे, आज सकाळपासून आपल्या राज्यातल्या दक्षिण सीमाप्रांतातले लोक आपली घरंदारं सोडून पळून जात आहेत. काही लोक राजधानीकडेच येत आहेत. सागरतीरावरील सारी घरं जमीनदोस्त झालीत-ना भूकंप ना समुद्री वादळ! जनहानी तर कुठे झालेली नाही; पण हे सगळं कसं घडलं, तेही कुणाला सांगता येत नाहीय." सेनापतीने सांगितले. "मग तुम्ही काय केलंत?" राजाने विचारले.

"कोणी संशयित असेल, तर सापडावं म्हणून समुद्र किनाऱ्यावर काही सैनिकांना पहारा द्यायला पाठवलंय. आणखी काही सैनिक अडचणीत सापडलेल्या लोकांच्या मदतीसाठी पाठवलेत, आपली घरंदारं नष्ट होऊन शिबिरात येणाऱ्या लोकांना आश्रय देण्यासाठी आणखी काही सैनिक नेमलेत."

"घरांना मुकलेल्या स्त्रिया अन् मुलांना आपल्या मंदिरातही मी आश्रय देऊन शकेन नं? त्यांना माझ्याकडे पाठवा." राजकुमारी प्रियंवदा बोलली.

यासाठी होकार देऊन राजा सेनापतीला म्हणाला, "सध्या त्या दुःखितांना मदत देण्यासाठी जरूर ते सर्व करा. पुढे त्यांना कशी मदत देता येईल ते नंतर सांगेन मी."

नंतर राजाने राजगुरूंना विचारले, "आपला काय सल्ला आहे गुरुजी?"

"आपण जे करत आहात ते सर्व ठीकच आहे महाराज!" अन् जरा थांबून नंतर ते म्हणाले, "सेनापतीच्या या वार्तेनं मला भीती वाटतेय की हा सर्व शताब्दि फुलांचाच प्रताप असावा!" हे बोलताना राजगुरुंच्या आवाजात दुःख होते. (क्रमशः)



# मित्रपरीक्षा

दृढनिश्चयी विक्रमराजा पुन्हा झाडाकडे गेला. प्रेत उतरवून त्याने ते आपल्या खांद्यावर टाकले आणि नेहमीप्रमाणे मौन धारण करून तो स्मशानाची वाट चालू लागला. तेंव्हा प्रेतात रहाणारा वेताळ बोलू लागला, "राजा, काहीजणं कसला विचार न करताच आपलं कर्तव्य मानून वडीलधाऱ्यांचं आज्ञापालन करतात. पण ती वडीलधारी माणसं मात्र आपलं काम साधून घेतल्यावर, ते सारं आपल्या स्वतःच्याच प्रयत्नांचं फळ आहे; असं सांगत सुटतात. म्हणजेच त्याचा अर्थ असा की मेहनत करणारा एक अन् त्याचं श्रेय घेणारा दुसराच कोणी असतो. उदाहरण म्हणून मी तुला धनदत्तची गोष्ट सांगतो." अन् वेताळ गोष्ट सांगू लागला:-

## वेताळाच्या गोष्टी



एका शहरात धनदत्त नावाचा एक व्यापारी रहात असे. आपला माल जहाजांवर लादून तो परदेशी पाठवण्याचा त्याचा धन्दा होता. आपल्या जवळचे सारे पैसे खर्चून त्याने एक जहाज विकतच घेतले. परन्तु त्याला अशी बातमी मिळाली की आपला व अन्य काही व्यापाऱ्यांचा माल घेऊन जाणारे ते जहाज, पहिल्याच फेरीत 'समुद्रस्तृप्यन्तु' झालेय!

काही व्यापारी असे होते की धनदत्तची संपत्ति पाहून ते आधीपासूनच त्याचा हेवा करत असत. आता त्यांनी आपल्या बुडालेल्या मालाची नुकसान भरपाई करण्यास धनदत्तला भाग पाडले. धनदत्तने प्रथम साऱ्या नोकरांना रजा देऊन टाकली. त्याची कोठी ही त्याने दहा हजारांसाठी गहाण लिहून दिली होती. ती रक्कम दोन महिन्यात चुकवली नाही, तर कोठीही हातून जाण्याची शक्यता होती. पण आता ती विकायला काढली तर धनदत्तची हलाखी पाहून कोणी वीस हजारापेक्षा जास्त द्यायला तयार झाले नसते.

त्याने आपल्या मुलाला-देवदत्तला-समोर बोलावून म्हटले, "हे बघ बेटा! आता तू माझ्या कामात मला मदत करण्याइतपत मोठा झाला आहेस. आता वाईट दिवस आलेयत. मी सारा कारभार आता तुझ्यावर सोपवू इच्छित होतो, अन् अचानक हा सारा घोळ होऊन बसला. आपल्याला कुठून तरी थोडंसं भांडवल मिळालं तरी पुरे, मी पहिल्याच्या दुप्पट कमाई करू शकेन. तू आपलं स्वतःचं गाव रत्नपूर इथे जा, तिथे आपला एक दूरचा नातेवाईक चन्द्रशेखर रहातो. नात्याने तो तुझा आजोबा लागतो. तू त्याच्याकडून पंचवीस हजार रुपये मागून आण. त्यातून मी अगोदर आपलं कर्ज देऊन टाकून, बाकी रकमेतून कसा व्यापार करायचा ते तुला समजावून सांगेन."



देवदत्त लगेच आपल्या गावाकडे जायला तयार झाला. निघण्यापूर्वी त्याला त्याचे वडील म्हणाले, "तू आज संध्याकाळ-पर्यन्त मोतीपूरला पोचू शकशील. तेथे माझा जिवश्चकंठश्च दोस्त रमाकान्त असतो. त्याच्याकडे रात्र काढ; अन् पहाटेच निघालास, तर दुपार होण्यापूर्वी रत्नपूरला पोचशील. काही कारणानं चन्द्रशेखर गावात नसेल तर तो परत येईपर्यन्त माझा बालमित्र विनयसेन याच्याकडे रहा. पण चुकूनही रमाकान्त किंवा विनयकडे पैसे मागू नकोस. ते तुला पैसे देतील. पण त्यांना त्रास देऊ नये, म्हणून मी तुला मनाई करतोय."

पित्याच्या आदेशानुसार प्रवास करून देवदत्त प्रथम मोतीपूरला जाऊन रमाकान्तकडे पोचला. त्याच्या तोंडून घरची परिस्थिती जाणून घेतल्यावर रमाकान्त म्हणाला, "अरे, मग अशा परिस्थितीत आमच्याकडे पैसे मागण्या-ऐवजी त्या चन्द्रशेखरकडे मागायची दुर्बुद्धी तुझ्या बापाला कशी झाली? धनदत्तच्या लहानपणीच त्याचे आईबाप वारले. तेंव्हा हा चन्द्रशेखर त्याच्या घरात घुसला, कपटाने त्यानं तुमची संपत्ती लुटली अन् शेवटी तुझा बाप पोट भरण्यासाठी शहरात जाऊन राहिला, तो चन्द्रशेखर



केवळ कपटीच नव्हे, तर महा कंजूष प्राणी आहे. तो तुला पैसे कसे देईल?"

"पण चुकूनही मी तुमच्याकडे पैसे न मागावेत, असं बाबांनीच बजावलंय मला." देवदत्त उत्तरला.

थोडासा विचार करून रमाकान्त यावर म्हणाला, "मी तेंव्हा त्याच्याकडून पाच हजार रुपये घेतले होते. ते जर आता मी यावेळी परत केले नाहीत, तर ते कर्ज पुन्हा केव्हा परत करायची संधी मिळणार मला? तू ती रक्कम घेऊन जा माझ्याकडून, अन् बाबांना सांग की आता काही माझी पहिल्यासारखी वाईट परिस्थिती नाही राहिली."



रमाकान्तने जबरदस्तीने ते पैसे त्याच्या हातावर ठेवून म्हटले, "तू आत्ता माझं ऐकलं नाहीस, तर जन्मात कधी तुझ्या बापाचं तोंड नाही पहाणार."

देवदत्त तेथून निघून रत्नपुरला गेला. त्यावेळी चन्द्रशेखर गावात नव्हता; त्यामुळे पित्याच्या आदेशानुसार तो विनयसेनच्या घरी गेला. विनयसेन देवदत्तला म्हणाला, "चंद्रशेखरनं तुमची इस्टेट हडपली अन् त्यात आता तो भरच घालत राहिला आहे. त्याला चांगलं ओळखत असूनही तुला तुझ्या बाबांनी त्याच्याकडे का पाठवलं हेच कळत नाहीय मला! बहुतेक तू येत असल्याचं कुठूनसं कळलं असावं. म्हणूनच बहुधा तोंड लपवण्यासाठी तो इथून पळून गेला असावा. कारण आता या परिस्थितीत तो तुला पैसे द्यायला 'नाही' ही म्हणू शकणार नाही न! तू त्याच्यासाठी वाट पहात रहाण्यात काहीच हशील नाही. तुझ्या पैशांची सोय मी करतो."

पित्याचा आदेश आठवून देवदत्त म्हणाला, "माझ्या बाबांनी तुमच्याकडून पैसे घ्यायला मनाई केलीय. तुमच्यासारखी चांगली माणसं इथे असताना त्यांनी मला चन्द्रशेखरकडे का पाठवलं समजत नाहीय. मोतीपूरच्या रमाकान्त काकांच्या बाबतीतही अगदी अस्संच घडलं." अन् मग त्यानं आपला मोतीपूरचा अनुभव विनयसेनला सांगितला.

तेंव्हा विनयसेन हसून म्हणाला, "वा गावाहून कोणीही शहरात गेला, तरी धनदत्त त्याला मदत करत असे. मग आताच्या परिस्थितीत आम्ही त्याला मदत न केली, तर आम्ही मित्र कसले? हां, अन् जो पैसा आम्ही तुझ्या बाबांकडून घेतला होता, तो परत केला, तर ती मदत कशी म्हणायची? माझ्यासह इथे असे बरेचसे लोक आहेत की ज्यांनी धनदत्तकडून लहानमोठ्या रकमा घेतलेल्या आहेत. त्या सगळ्या मी वसूल करून आणून दिल्या तर आम्हाला त्यामुळे काहीच त्रास नाही होणार."



विनयसेनने ज्या रकमा वसूल केल्या, त्यात स्वतः देणं असलेली रक्कम घातली, तेंव्हा एकूण तीस हजार रुपये इतकी रक्कम जमली. ते सारे पैसे त्याने देवदत्तला दिले. ती रक्कम अन् मोतीपूरच्या रमाकान्तने दिलेले पैसे घेऊन देवदत्त घरी परतला. घरी त्याला त्याने पूर्वी कधी न पाहिलेला एक म्हातारा इसम दिसला.

त्या म्हाताऱ्याची ओळख करून देत धनदत्त देवदत्तला म्हणाला, "यांचं नाव चन्द्रशेखर.काही कामासाठी ते रत्नपूरहून इथे आले, अन् आजारी पडले. आपल्या घरी ठेवून घेऊन मीच त्यांची चिकित्सा करवली. आपल्या बरोबर आणलेली त्यांची सारी रक्कम खर्च झाल्यामुळे त्यांना परत पाठवायची व्यवस्था आपणच करायला हवी. यांच्या पायावर डोकं ठेव, नात्याने हे तुझे आजोबा आहेत."

देवदत्तने चन्द्रशेखरला चरणस्पर्श करून नमस्कार केला. अन् त्याला परत पाठवायची व्यवस्था केली. नंतर त्याने बरोबर जी रक्कम आणली होती ती पित्याच्या हाती दिली. तो म्हणाला, "बाबा तुमचे तर कित्येक चांगले चांगले मित्र आहेत. अशा परिस्थितीत तुम्ही मला त्या कंजूष चन्द्रशेखरकडे का



पाठवलं हे कळत नाही मला."

तेंव्हा धनदत्त म्हणाला, "मी तुला दुनियादारीबरोबरच व्यापाराची पद्धतही शिकवू इच्छित होतो. तुला जे शिक्षण द्यायचं त्यातलाच 'तुला चन्द्रशेखरकडे पाठवणं' हा एक भाग होता."

इतकी गोष्ट सांगून वेताळ विक्रमला म्हणाला, "राजा, न मागताच मदत करायला तयार असणारे इतके सारे चांगले मित्र असताना, मुलाला कपटी अन् कंजूष चन्द्रशेखरकडे पाठवण्याची काय जरूर? इतकंच नव्हे, तर त्यानं आपल्या मुलाच्या प्रश्नाला उत्तरही सरळ दिलं नाही; फिरवून दिलं. म्हणे आपल्या

मुलाला दुनियादारी अन् व्यापारांतली मेख समजावून देतोय! काम फत्ते करून आला मुलगा; पण धनदत्तनं असा देखावा केला की या सर्व यशाचं कारण आपण स्वत:च आहोत! त्याच्यात प्रामाणिकपणा नसण्याचंच लक्षण नव्हे का हे? या प्रश्नांची अुत्तरं माहीत असून ती सांगायचं टाळलंस, तर लक्षात ठेव राजा, तुझ्या मस्तकाचे तुकडे तुकडे होअून जातील."

राजा विक्रम अुत्तरादाखल बोलला-"धनदत्तने साऱ्या जीवनांचा पूर्ण अनुभव घेतलेला होता. जणू सारा अनुभव पिळून काढून त्याचं सार तेवढं त्यानं मिळवलं होतं. त्यानं जेंव्हा मुलाला चन्द्रशेखरकडे मदत मागायला पाठवलं, तेव्हा अन्य सारे लोक व त्याचे मित्र यांना त्याच्या चालू हलाखीबद्दल माहिती मिळून जाणार नं आपोआप? अन् तरीही त्यानं मित्रांकडे पैसे मागितले नाहीत, म्हणून त्यांच्या लेखी त्याच्याबद्दलचा आधीच असलेला आदर व गौरवभाव दुणावेल की नाही? अन् न मागताच घेतलेला पैसा परत देअून, 'अडचणीच्या वेळी जो मदत करतो तोच खरा मित्र' हे सूत्र त्यांनी खरं असल्याचं दाखवून दिलं. धनदत्तने हा सारा विचार आधीच केला होता, अन् घडलंही तसंच! त्याने चन्द्रशेखरचं नाव फक्त आपल्याच अुपयोगाला आणलं, त्यामुळेच धनदत्तनं, देवदत्तला दिलेलं अुत्तर फिरवून-बिरवून दिलं, असं मुळिच नव्हे, अन् त्याच्यात प्रामाणिकपणा नाही, असं म्हणणंही सयुक्तिक नव्हे!"

अशा तऱ्हेने योग्य अुत्तर देअूनही, त्यामुळे राजाकडून मौन-भंग झाल्याच्या आरोपावरून वेताळने त्याला बरोबर गोत्यात आणले, अन् तो अदृश्य होअून पुन्हा त्या झाडाच्या फांदीला लटकू लागला.

(कल्पित)





# शेरास सवाशेर

गोपालसिंह चांगला धनवान होता, पण कर्ज घेअून नंतर ते परत करताना खूप त्रास द्यायचा-अशी एक वाईट खोड होती त्याला. आपल्या बरोबर हांजी हांजी करणारी माणसं बाळगण्याची त्याला मोठी हौस! त्याच्याबरोबर असली काही माणसं नेहमी त्याचे स्तुतिपाठ गात फिरत रहात असत. यामुळे गोपालसिंहला कधीकधी काही लाभही होत असे.

एक दिवशी गोपालसिंह आपल्या परिवारासह, हातातली छडी हलवत रस्त्याने चालला होता. तेंव्हा कामराज हलवायाच्या दुकानाकडे त्याची नजर गेली. तेथून तऱ्हेतऱ्हेच्या मिठायांचा सुगंधही येत होता. गोपालसिंहच्या मनात मिठाई खायचा विचार आला.

गोपालसिंह लगेच त्या मिठायांवर तुटून पडला. हाताला लागेल, तो तो पदार्थ अुचलून 'गट्टम्' करायला त्याने सुरुवात केली.

खूपशी मिठाई खाल्ल्यानन्तर गोपालसिंह कामराजची तारीफ करत म्हणाला, "वा! मिठाई तर खूपच छान होती की! ठीक आहे, आता हिशोब करून किती पैसे द्यायचे ते सांग बाबा!"

हलवायाने पाटीवर लिहून हिशोब केला अन् म्हटले, "पन्नास रुपये!"

गोपालसिंहने खिशात हात घालायचा अभिनय करत चेहरा पाडून म्हटले, "अरे, हल्ली मी बराच विसरभोळा बनत चाललोच की! पैसे ठेवले एका कमीजच्या खिशात, अन् घालून आलो दुसराच! तरी काही बिघडलं नाही हं! मी पुन्हा जेंव्हा या रस्त्याने जाईन तेंव्हा तू मुद्दाम हाका

चन्द्रहास बुधकर

मारून आपला हिशोब चुकता करून घे माझ्याकडून!"

कामराजने तर गोपालसिंहच्या या खराब सवयीबद्दल अगोदरच बरेच ऐकले होते. बोलताना तो किती गोड बोलला, तरी वेळ आली की तो हुशारी करायचा प्रयत्न करतो. आता कामराजने ठरवले की काट्यानेच काटा काढायला हवा! तो म्हणाला, "गोपालजी, तुम्हाला माहीत नसेल, पण मीही तुमच्यापेक्षा विसरभोळा आहे. तेंव्हा मी तुमचं नाव अन् अुधारीची रक्कम या भिंतीवर लिहून ठेवतो. जेंव्हाजेंव्हा माझं तिकडं लक्ष जाईल, तेंव्हातेंव्हा मला या अुधारीची आठवण राहील." अन् तो मोठ्या-मोठ्या अक्षरात दुकानच्या भिंतीवर गोपालसिंहचे नाव लिहू लागला.

"अरे, अरे! इतक्या मोठ्या अक्षरात तू माझं नाव अन् अुधारीची रक्कम लिहितोयस. दुकानात जो कोणी येईल, त्याच्या नजरेला माझं नाव पडेल नं, माझा अपमान नाही का तो?"

तेंव्हा खोटेच वाईट वाटल्यासारखे करत कामराज म्हणाला, "हां मालक! तुमचं हे म्हणणं तर शंभर टक्के खरंच आहे. माझ्या हे अगोदर ध्यानी आलं नाही. मग आता असं करा. आपलं ते रेशमी अुपरणं काढून माझ्याकडे द्या. ते मी इथं खुंटीला लावून ठेवतो. मी तिकडे पाहीन तेंव्हा तेंव्हा मलाही आठवण होईल; अन् आपल्या खांद्यावर अुपरणं नसल्याचं जाणवून आपणही माझी अुधारी विसरू शकणार नाही. आपणा दोघाही विसरभोळ्यांना ही युक्ती छान होईल की नाही?"

आतामात्र गोपालसिंहची बुद्धी ठिकाणावर आली. त्याने कामराजला मिठाईची रक्कम ताबडतोब देअून टाकली अन् तो सपरिवार तेथून निघून गेला.



# चांदोबा पुरवणी-५५

**भारतातील पशुपक्षी :**

## घरट्यांऐवजी फान्दीतील पोकळी किंवा भोके



पक्ष्यांच्या अशा फारच कमी जाती आहेत की ज्या आपली घरटी झाडात बनवण्याऐवजी जमिनीवरच बनवतात. अशा पक्ष्यांपैकीच एक आहे खंड्या. हा पक्षी बहुधा आपले घरटे नदी-नाल्याच्या किनाऱ्यावर बनवतो. किनाऱ्याच्या मऊ जमिनीत हा भुयार खोदतो. हे भुयार एक मीटर किंवा त्याहूनही अधिकच लांबीचे असते. त्याची रुंदी इतकी भरपूर असते की ते एकाद्या खोलीसारखेच वाटते. या भुयाररूपी खोलीत एका वेळी पाच ते सात अंडी घालता येतात. घरटे बनवण्याचा काळ मार्च ते जूनपर्यंतचा असतो.

जगात खंड्याच्या शंभरापेक्षा अधिक जाती आहेत. परन्तु सर्वात अधिक आढळणाऱ्या जातीतील खंड्याची छाती पांढरी असून आकार मैनेएवढा असतो. याचे पंख खूप चमकदार निळे असतात. त्या खालचा भाग भुरकट असतो. त्यामुळे छातीचा पांढरा भाग चांगलाच अुठून दिसतो. याची चोच लाल रंगाची असून ती खूपच तीक्ष्ण व मजबूत असल्याने तो मासा, बेडूक व किडे अगदी सहजपणे पकडू शकतो. तो माशाला एकाद्या दगडावर आपटून आपटून मारून, नंतर गिळून टाकतो. माशाला प्रथम तो डोक्याकडून गिळतो.

हिमालयाच्या पर्वतश्रेणीत आढळणारा खंड्या या दोन्ही जातींपेक्षा आकाराने मोठा असतो. तो समुद्रसपाटीपासून जवळजवळ ८०० मीटर अुंचीवरील भागात आढळतो.



# आधुनिक भारतातील : साहित्य

# स्वप्न साकारले

पुलैया एक बहादुर ग्रामीण युवक आहे. स्वभावाने तो मोठा चांगला आहे. लाठी चालवून दाखवणे अन् वाघ नृत्य करणं यात तो प्रवीण आहे.

एकदा त्याने स्वप्नात पाहिले की आपले लवकरच लग्न होणार आहे; अन् नंतर आपल्याला जो मुलगा होईल, तो आपल्याहून बहादुर निघेल. तो चोरांना पकडून देऊन चांगलं नाव मिळवेल. पुलैयाला खोटे बोलणाऱ्या व चोर लोकांबद्दल फार चीड असते. नंतर पुलैया आपल्या आवडीच्या एका मुलीशी विवाह करतो. मुलीचे नाव आहे निल्ली. पति-पत्नी गरिबीत दिवस घालवत असले तरी दोघेही मोठे प्रामाणिक अन् कामसू असतात. पतीप्रमाणे निल्लीलाही खोटेपणाची चीड असते. आपली जमीन नांगरून त्यांना जेवढं धान्य मिळतं त्यात दोघंही खूप असतात. परंतु जमीन त्यांची स्वत:ची नसल्यामुळे उत्पन्नात मालकाचाही काही वाटा असतोच.

असो. पुढे त्यांना एक गोडसा मुलगा होतो. त्याचे नाव ठेवतात मल्लू. पण आता परिस्थिती झटझट बदलत जाते. राज्यात अनेक ठिकाणी दुष्काळामुळे सरकारला नाइलाजाने जाहीर करावे लागते की शेतकऱ्यांनी धान्याच्या रूपात काही सारा द्यावा. पुलैयाच्या वाट्याला जेवढी धान्याची मागणी आहे, ती त्याला न्यायोचित वाटत नाही. त्यामुळे कर्मचारी जेंव्हा सारा-वसुलीसाठी येतात तेंव्हा तो त्यांचा रस्ता अडवतो. पोलीस या प्रकरणात हस्तक्षेप करू पहातो, तेंव्हा तो मारामारीला उभा ठाकतो. त्यामुळे पोलीस त्याला कैद करतात.

इकडे आपल्या पतीला सोडवण्यासाठी गावचा राजू नावाचा एक धनी गावकरी निल्लीला काही पैसे देतो. पण त्याबरोबरच तो तिच्यावर आपले पाश आवळायला सुरुवात करतो. शेवटी पुलैया जी जमीन नांगरत असे, तिची वहिवाट तो आपल्या ताब्यात घेतो. अन् पुलैयाचा हक्क बरखास्त होतो.

त्याच गावात एक आंधळा म्हातारा रहात असतो. राजूने त्याच्यावरही बराच जुलूम केलेला असल्याने म्हातारा त्याला चांगला धडा शिकवायच्या विचारात असतो. एका रात्री तो राजू वर हल्ला करतो. पण पुलैयाच्या सांगण्यावरूनच हल्ला झाला, असे गृहीत धरले जाऊन त्याच्यावर पुन्हा गिरफदारीचे संकट ओढवते. आता तुरुंगवास चुकवण्यासाठी आपले छोटेसे घरही त्याला राजूलाच देऊन टाकावे लागते.



आता पुलैया घर व जमीन दोन्हींनाही मुकलेला आहे. ते कुटुंब आता शहरात राहू लागते. एके काळी पुलैया प्रामाणिक व सदाचारी म्हणून ओळखला जाई; पण आता त्याची परिस्थिती फार नाजुक आहे. हां, त्याला आपल्या बायकोकडून खूप प्रोत्साहन मिळते. छोटा मल्लूही त्याचा खूप लाडका आहे.

कुठे काम मिळावे म्हणून पुलैया खूप प्रयत्न करतो, पण कुठेच काही जमत नाही. त्याची बायको व मुलगा भुकेने हैराण होतात. शेवटी पुलैया दोन डाकूंच्या जाळ्यात सापडतो अन् लवकरच त्याचा संकोच संपून जातो. तोही एक चोर बनतो.

एका रात्री तिघे मिळून एका धनवान माणसाच्या घराच्या वरच्या मजल्यावर चोरी करायचे ठरवतात. पण अचानक मालक जागा होऊन त्यापैकी दोघांवर आपली बन्दूक रोखतो. हे चोर एका पाईपवरून वर चढत असतात. आपल्या या साथीदारांना वाचवण्यासाठी पुलैया त्या मालकावर हल्ला करतो. या गडबडीत बंदुकीचा आवाज होऊन गोंधळ माजतो अन् तिघेही चोर पळून जातात.

छोट्या मल्लूचे बापावर फार प्रेम असल्याने तो नेहमी मुकाट्याने बापामागे फिरत असतो. पुलैयाला हे काही माहीत नसते. बाप आपल्याला बरोबर न्यायला तयार नसतो, म्हणूनच मल्लूला तो कुठे जातो हे जाणायची उत्सुकता असते.

त्या रात्रीही मल्लूने पुलैयाला बिल्डिंगवर चढताना पाहिलेले असते. तो परत न आल्याने मल्लूला वाटते की त्याला तिथेच कोणी थांबवून घेतले असावे; म्हणून तेथे जाऊन मोठ्या भाबडेपणाने तो बापाची चौकशी करतो. पोलीसच त्याच्याशी प्रश्नोत्तरे करतात, अन् आपण काय काय पाहिले, ते मल्लू त्यांना सांगून टाकतो. आपल्या पित्याच्या दोन दोस्तांची नावेही तो सांगतो.

आता पोलीस अगदी सहजपणे चोरांना पकडतात. अशा तऱ्हेने आपला मुलगा चोरांना पकडून देणारा निघेल हे पुलैयाचे स्वप्न खरे होते! काय विडंबना ही!

या कादम्बरीत निल्ली हे एकच पात्र असे आहे की सगळ्या तऱ्हेच्या संकटांना तोंड देऊनही ती कलंकरहित अन् आपल्या तत्वांना धरून राहिलीय!

बी. कंठाराव यांची ही कादम्बरी तेलगूत लिहिलेली आहे. तिचे नाव आहे 'डगापडिना तम्मगु'-म्हणजे पराजित नायक. आन्ध्रप्रदेश मधील एका गावाचं यात बरंच हुबेहूब वर्णन आलेले आहे. त्याबरोबरच तेथील शहरी जीवनाचेही चित्रण त्यात आहे. पण हे चित्रण एका अशा माणसाच्या माध्यमातून केलंय, की जो अगदी भोळा असा खेडुत आहे. ही कादम्बरी चालू काळातीलच असून तिचे भाषान्तर अनेक भारतीय भाषात झालेले आहे.

# तुम्हाला माहीत आहे का?

१. बारा वर्षातून एकदाच साजरा केला जातो, अशा भारतीय सणाचे नाव सांगा.
२. एका पौराणिक प्राण्याचे डोके व हात माणसाचे असून, धड तेवढे घोड्याचे असते. त्या प्राण्याचे नाव सांगा.
३. खजुराहोची विश्वविख्यात मंदिरे कोणत्या प्रान्तात आहेत?
४. डेन्यूब नदी पूर्व युरोपमधील एका शहराच्या मध्यावरून वहाते. त्या शहराचे नाव सांगा.
५. दक्षिण भारतातील चोल वंशाची राजधानी कोणती होती?
६. दक्षिण आशियात असाही एक देश आहे, की जो कधी ही कोणत्या देशाची वसाहत बनून राहिला नाही. तो देश कोणता?
७. 'भारतीय शेक्सपियर' असे कोणाला म्हटले जाते?
८. महासागराच्या तळातूनच वर आलेल्या सर्वात अुंच पर्वताचे नाव व त्याची अुंची सांगा.
९. ग्रीसच्या एका राजाने मॅगेस्थेनिसला भारतातील एका राजाकडे दूत म्हणून पाठवले. या राजाचे नाव सांगा.
१०. रेफलेशिया नावाचे फूल कशासाठी प्रसिद्ध आहे?
११. अकबराशी विवाह करणाऱ्या राजपूत राजकन्येचे नाव सांगा.
१२. आपल्या घरात आढळणाऱ्या माशांचे सरासरी आयुष्य किती?
१३. आफ्रिकेतील सर्वात मोठे सरोवर कोणते?
१४. माणसाच्या डोक्याची कवटी किती हाडांनी बनलेली असते?
१५. पोर्तुगीज लोक प्रथम जेंव्हा श्रीलंकेच्या भूमिवर अुतरले. तेंव्हा त्यांनी या बेटाला काय नाव दिले?
१६. हिन्दूंच्या पुराणात अुल्लेखलेला हत्तीवर स्वार होणारा देव कोणता?
१७. हुकूमशहा बनण्यापूर्वी एक शिक्षक व पत्रकार असणारी व्यक्ती कोण?
१८. शांति नोबेल पुरस्कार सर्वात प्रथम कोणाला मिळाला?
१९. खिश्चन लोकांचा धर्मग्रन्थ बायबल आहे. शिखांच्या धर्मग्रन्थाचे नाव काय?
२०. मलेरियावर इलाज म्हणून वापरात येणारे क्विनाइन एका झाडाच्या सालापासून मिळते. त्या झाडाचे नाव सांगा?

## अुत्तरे

१. कुंभ मेळा.
२. सेन्टॉर. याचा अुल्लेख ग्रीक पुराणात आढळतो.
३. मध्य प्रदेशात.
४. बुडापेस्ट. नदीच्या एका बाजूच्या भागाचे नाव बुडा व दुसऱ्या भागाचे पेस्ट.
५. तंजावर.
६. थायलंड. (पूर्वीचे सयाम)
७. अनेक नाटके लिहिणारा कालिदास.
८. हवाई बेटांपैकी मौनाकली. याची एकूण अुंची ३२,००० फूट आहे.
९. ग्रीसचा राजा पहिला सेल्यूकस व भारतातील राजा चंद्रगुप्त मौर्य.
१०. दुनियेतील हे सर्वात मोठे फूल आहे. ते केवळ इंडोनेशियातच अुगवते.
११. जोधाबाई.
१२. चार दिवस.
१३. व्हिक्टोरिया सरोवर (२७,००० वर्गमैल) हे युगांडा, केनिया व टांझानिया यांच्या मधे पसरलेले आहे.
१४. माणसाची कवटी २९ निरनिराळ्या हाडांनी बनलेली असते.
१५. 'जिलान', याचंच पुढे इंग्रजांनी 'सिलोन' केले.
१६. भगवान इन्द्र.
१७. इटलीतील मुसोलिनी.
१८. जॉन हेन्री दुनान्त. याने १९०१ मधे रेड क्रॉसची स्थापना केली होती.
१९. आदिग्रंथ. याला 'गुरु ग्रन्थ साहेब' असेही म्हणतात.
२०. सिंकोना.



# कृपणाचे धन

खूप वर्षांपूर्वी एका शहरात वीरभद्र नावाचा एक धनवान माणूस रहात होता. तो भारीच कंजूष होता. 'वीरभद्र इतका कृपण गृहस्थ साऱ्या दुनियेत शोधून सापडणार नाही.' असे लोक म्हणत.

एके दिवशी वीरभद्र कुठेसा जात होता. रस्त्यात तो पाय घसरून पडला. तेंव्हा त्याच्या खिशातली रुपायाची नाणी बाहेर पडून इकडे तिकडे घरंगळत गेली. वीरभद्रने अगदी काळजीपूर्वक ती शोधून अुचलली, पण ती मोजली तेंव्हा नअू रुपयेच भरले. खिशातल्या दहापैकी एक नाणे कमी होते! पुन्हा खूप शोधाशोध करूनही तो रुपया काही सापडेना! वीरभद्र फारच काळजीत पडला.

नंतर त्याने विचार केला की, 'रुपया वाटलं तर आपल्याला न सापडू दे! पण तो दुसऱ्या कुणाला तरी सापडेलच ना!' म्हणून जरा दूर जाअून, तो कुणाला सापडतोय का-हे बघत वीरभद्र अुभा राहिला. त्या रस्त्याने बरीच माणसे नंतर इकडून तिकडे गेली, पण नाणे कुणाला सापडल्याचे दिसले नाही.

हताश होअून वीरभद्र घरी गेला! अन् आपल्या बायकोला त्याने सगळी हकिकत सांगितली. ती म्हणाली, "तुम्हाला तर माहीतच आहे की या गावात धर्म नेहमीच चैकसपणे पहाऱ्याला असतो. तो कधी कुणावर अन्याय होअू देत नाही. तेंव्हा आता तुम्ही न्यायाधीशाकडे जा. ज्याला कुणाला रुपया सापडेल, तो न्यायाधीशाजवळ आणून देईल."



इकडे वीरभद्रचा तो रुपया घरंगळत एका झाडोऱ्यात जाऊन पडला. साप पकडण्यासाठी तिथे आलेल्या नागराज गारुड्याला तो सापडला. नाणे हातात आल्याबरोबर त्याला आयुष्यात प्रथमच दारू प्यायची इच्छा झाली. तो लगेच गुत्याकडे वळला.

"अरे नागराज! तू तर कधीच इकडे येत नाहीस. आज कसा आलास?" गुत्याच्या मालकाने त्याला विचारले.

"मला नाही ठाऊक. पण आत्ता थोड्याच वेळापूर्वी माझ्या मनात इच्छा उत्पन्न झाली." असे म्हणून नागराजने तो रुपया दुकानदाराला दिला अन् दारू पिऊन तो निघून गेला.

समोरून पुजारी येताना दिसला. दुकानदाराने तो रुपया पुजाऱ्याला ठेऊन पूजा करायला सांगितले.

पुजाऱ्याच्या हातात ते नाणे आल्याबरोबर त्याच्या मनात आले, की शेजारच्या गल्लीतल्या वसंता नावाच्या बाईकडे जाऊन तिचे गाणे ऐकावे. ती कृष्णभजने छान गायची; पण ती पैसे घेतल्याशिवाय कोणासमोर गात नसे. पुजाऱ्याने देवळाचे दार बंद केले, अन् वसंताकडे जाऊन तिच्या हातावर नाणे देत आपली इच्छा प्रकट केली.

पुजाऱ्याकडून रुपया मिळाल्यावर गाणे गाऊन वसंताने त्याला रवाना केले. नंतर ती तो रुपया उचलायला गेली. पण ते नाणे गायब झालेले होते! सारे घर शोधूनही रुपया सापडला नाही, तेंव्हा तिला वाटले की, आपली मोलकरीण गौरी हिनेच ते नाणे चोरले असावे.

वसन्ताने ही गोष्ट आपल्या आईच्या कानावर घातली. तेंव्हा आई पटकन म्हणाली, "तू आत्ता जाऊन न्यायाधीशाकडे तक्रार गुदर. आज त्या निलाजरीनं रुपया चोरला, उद्या दागिनेही चोरील की!"

वसंताने एका दुसऱ्या मोलकरणीला न्यायाधीशाकडे पाठवून तक्रार केली.



गौरीने खरोखरच तो रुपया चोरला होता. आतापर्यन्त तिने कधीही चोरी केली नव्हती. आता तिने त्या रुपयाचं चोळीचे कापड घ्यायचे ठरवले. ते घेण्यासाठी ती एका दुकानात गेली. त्या दुकानात ती वसंताबरोबरच जात असे, एकटी कधीच गेली नव्हती ती! त्यामुळे दुकानदाराला संशय आला अन् त्याने वसंताकडे बातमी कळवली; अन् गौरी पकडली गेली.

त्या संध्याकाळी न्यायाधीशाने वसन्ताला बोलावणे पाठवले, अन् तिला तो म्हणाला, "हिनं एक रुपया चोरला खरा, पण तेवढ्यासाठी तिला तुरुंगात पाठवणं योग्य नव्हे. तुम्ही तिला कामावरून काढून टाका. इतकी शिक्षा पुरे होईल तिला!"

"तो रुपया माझ्यासाठी जरा विशेषच आहे. मन्दिराचा पुजारी आदिशेष माझ्याकडे कधीच येत नसे. प्रथमच तो आला, अन् मला हा रूपया देऊन गाणं ऐकून गेला." वसन्ता म्हणाली.

हे ऐकून न्यायाधीश म्हणाला, "वा:! इतक्या दिवसांनी त्या आदिशेषच्या मनात श्रवणभक्ती उपजली? म्हाताऱ्याचं मन इतकं पालटलं?"

मग काही विचार करून त्याने पुजाऱ्याला बोलावून घेतले. म्हणाला, "या रुपयात कसला तन्त्रमन्त्र आहे कुणास ठाऊक! पण तो हाती आल्याबरोबर माझ्या मनात ही इच्छा उद्भवली!"



अशा तऱ्हेने एकेकाकडे चौकशी करत गेल्यावर शेवटी गोष्ट गारुड्यापर्यन्त पोचली. नागराजाचे कथन ऐकून न्यायाधीश 'तो रुपया कोणाचा असावा?' याविषयीच्या विचारात बुडाला. इतक्यात वीरभद्र आणि एक गरीब शेतकरी असे दोघे पाठोपाठच तेथे आले. शेतकऱ्याने रडत-रडत आपला एक रुपया हरवल्याचे सांगितले. त्याचबरोबर वीरभद्रनेही आपला एक रुपया हरवला आहे असे सांगितले.

मोठ्या सहानुभूतीने शेतकऱ्याकडे पहात न्यायाधीषाने सांगितले की, "बाबा, तुझा रुपया काही माझ्याकडे आलेला नाही. तू दुर्दैवी दिसतोस. माझ्याकडे एक रुपयाचं नाणं आलंय खरं. पण ते या वीरभद्रचं आहे."

शेतकऱ्याने आश्चर्याने विचारले. "रुपया माझा नसून तो वीरभद्रचाच आहे, असं आपण कसं म्हणू शकता?"

यावर हसतहसत न्यायाधीश म्हणाला, "असं पहा बाबा, हा रूपया नक्की वीरभद्रचाच. तो आपल्या जवळचा पैसा नेहमी पेटीत बन्द करून ठेवतो. त्या कैदेला कंटाळून त्याच्या या रुपयाला 'आपल्याला स्वातंत्र्य हवं' असं वाटू लागलं. म्हणूनच तो कोणाजवळ स्थिर राहीना. इतकंच नव्हे, तर स्वातन्त्र्य मिळवू इच्छिणारं ते नाणं ज्याच्या ज्याच्या हातात गेलं, त्या प्रत्येकाच्या मनात वाईट विचार अुपजला, अन् तो त्यांना कुमार्गाला नेअू लागला. 'हा रुपया वीरभद्रचाच आहे' हे सिद्ध करायला याहून निराळा पुरावा कशाला हवा?"

न्यायाधीशाच्या या निकालावर सर्वच अुपस्थितांना हसू फुटले. वीरभद्रला या निकालामुळे एक धडा मिळाला; तो खोल विचारात गढला. शेवटी तो रुपया त्याने शेतकऱ्यालाच देअून टाकला. अन् त्यापुढे तो. आपल्या धनाचा लोककल्याणासाठी अुपयोग करू लागला.





# शरभचा सल्ला व भैरवची चिकित्सा

जगन्नाथपुर गावात शरभ नावाचा एक पुरोहित रहात असे. त्याला फक्त एक मुलगीच तेवढी होती. म्हणून त्याने भैरव नावाच्या एका अनाथ मुलाला घरी आणून त्याचे लालनपालन सुरू केले. भैरवला रोज आपल्या बरोबर घेऊन जाअून शरभ त्याला पौरोहित्य शिकवू लागला.

एके दिवशी शरभला एका जुन्या पंचांगाची गरज पडली, म्हणून त्याने आपल्या वाडवडलांच्या वेळची जुनी पंचांगे माळ्या वरून खाली काढली.

नंतर एक एक पंचांग अुचलून, वरची धूळ झटकून शरभ ती नीट पाहू लागला. त्यातच त्याला एक जुना वैद्यकग्रंथ सापडला. अनेक रोगांची पाळामुळांच्या साह्याने कशी चिकित्सा करावी याबद्दल त्या ग्रन्थात सविस्तर माहिती दिलेली होती. तो ग्रंथ त्याने आपल्या बायकोला दाखवला, ग्रन्थ पाहून ती फारच खूष झाली! म्हणाली, "या! देव मोठा दयाळू आहे हं! त्याची कृपा अन् आपलं भाग्य म्हणूनच हा ग्रन्थ हाती आला आपल्या. खाटेला खिळून मरणासन्न झालेल्या रोग्यांची या ग्रंथाच्या आधारनं अुद्यापासूनच चिकित्सा करायला सुरुवात करा तुम्ही. रोगी जगला, तर तुम्हाला भरपूर फी मिळेल. मेला, तर तुम्ही पुरोहित सुद्धा असल्याने गोदान मिळेल. तेंव्हा 'तळ्यात पडो, की मळ्यात,' आपला लाभ हा होणारच! हाच एक असा पेशा आहे की ज्यात आपलं नुकसान कधीच होणार नाही."

आपल्या बायकोचा सल्ला शरभला फार आवडला. पण अचानक अशी वैद्यकी सुरू केली, तर लोक आपल्यावर

शीला भागवत



विश्वास ठेवणार नाहीत, असे वाटून त्याने हे काम भैरवच्या हातून सुरु केले.

थोड्याच वेळात भैरवला शरभच्या सांगण्याचे सार समजून चुके व त्याप्रमाणे तो चिकित्सा करी. अशा तऱ्हेने भैरव थोड्याच दिवसात एक छोटासा वैद्य बनला. शरभ सांगेल त्याप्रमाणे जडीबुटी शोधून आणून डोकेदुखी, त्वचारोग, ताप इत्यादि लहानसहान रोगांची चिकित्सा करण्यात तो प्रवीण बनला. गावात एक मोठा वैद्यही होताच, म्हणून शरभ ग्रन्थाच्या आधारे मोठ्या रोगांची चिकित्सा सांगू धजत नसे.

एके दिवशी शरभ व भैरव जवळच्या गावच्या एका लग्नाचे पौरोहित्य अुरकून परत येत होते. वाटेतच त्यांना आपल्या ग्रामाधिकाऱ्याचा नोकर दृष्टीस पडला. घाबरतच तो सांगू लागला, "पंडितजी, आपल्या मालकांची अचानकच वाचा बसून गेलीय. नेमक्या या अडचणीच्या वेळी आपले वैद्य गरुडाचारी गावात नाहीयेत. लोक तर मालकांना पाहून म्हणत आहेत की, ते आता थोड्या वेळाचेच सोबती आहेत. पण मालकिणीला आशा वाटतेय की कदाचित भैरवजी काही अुपाय करू शकतील. बराच वेळ मी तुमची वाट पहात होतो."

शरभने प्रथम माहिती काढली ती अशी-हा गावपाटील जेवण अुरकून शेतावर गेला. नोकराने त्याला चांगला झाडावर पिकलेला आंबा आणून दिला, तो त्याने खाल्ला. मग तहान लागली, म्हणून एका शहाळ्याचे पाणी प्यायले. नंतर लगेच दक्षिण बाजूच्या शेतातल्या निंबाच्या झाडाला लागलेल्या पोळ्यातला मध काढून तो खाल्ला अन् पान खाण्याचं व्यसन असल्याने लगेच पानही खाल्ले. थोड्याच वेळात त्याची वाचा बसली आणि डोळे फिरवत तो खाली पडला. नोकराने काही लोकांच्या मदतीने त्याला घरी पोचवले.

ही माहिती कळल्यावर घरी जाऊन शरभ ग्रंथाची पाने चाळू लागला. एके ठिकाणी त्याला असे वाचायला मिळाले की, आंबा शहाळं अन मध खाल्ल्यानंतर निदान तासभर तरी पान खाऊ नये. तसे खाल्ले गेल्यास त्याचा विषारी परिणाम होतो. नंतर त्यावर अुपाय काय करावा हे ही ग्रंथात लिहिलेले आढळले. शरभने ताबडतोब भैरवला बरोबर घेअून 'शिरीषपुष्पाचे पंचचूर्ण' हे औषध सिद्ध केले.

नंतर शरभ भैरवला म्हणाला, "वेळ आली की माणसाला लाभच लाभ होतो. आता तुला संधी आहे. माझ्या बरोबर चल अन् पाटलाला हे औषध देअून चांगलं नाव मिळव."

शरभ व भैरव पाटलाकडे गेले. तो खाटेवर पडून होता, त्याला बराच त्रास होतोय असे दिसत होते. औषध घेअून भैरव सरळ खाटेजवळ पोचला.

तेथे जमलेल्या लोकांपैकी एक म्हातारा बोलू लागला, "महान वैद्य गरुडाचारी गावात नसल्याने या पोरसवदा वैद्याची गोळी पाटलाला खावी लागतेय. आता काही अुपयोग झाला, तर छानशी फी मिळेल याला. नपेक्षा शरभला गोदान मिळेल. आयुष्य संपलं नसेल तर यमपाशही काही करू शकत नाही."

ते ऐकून म्हाताऱ्याकडे रागाने बघत भैरवने पाटलाचे तोंड जोराने अुचकटले अन् औषधाबरोबरच तोंडात पाणी ही



घातले. थोड्याच वेळात पाटलाची अस्वस्थता कमी झाली अन् तो खाटेवर अुठून बसला. नंतर लगेच अुतरून चांगला हिंडाफिरायलाही लागला!

या घटनेमुळे भैरवचं नाव चांगलेच प्रचलित झाले. त्याला 'साक्षात् धन्तन्तरी' संबोधून लोक त्याची प्रशंसा करू लागले. पाटलाने शरभ व भैरवला चांगली मोठी रक्कम बक्षिस देअून वर भैरवचा सत्कारही केला.

गावपाटलाचा रोग व भैरवची चिकित्सा याबद्दल जमीनदाराच्या दरबारी वैद्याच्या ही कानावर पडले. एका अनुभवशून्य व्यक्तीला इतका चांगला औषधोपचार करता आला. याचाच अर्थ असा की, त्याच्याजवळ एकादा अद्भु वैद्यकग्रन्थ असला पाहिजे-असे त्याच्या मनात आले.

वैद्याने भैरवला बोलावून घेअून, थोडा धाक दाखवत त्याच्याशी बोलायला सुरुवात केली अन् आपला अन्दाज खराच असल्याचे त्याच्या लक्षात आले.

तो मग भैरवला म्हणाला, "हे बघ बेटा! कोणतीही विद्या गुरु मुखातून शिकली, तरच त्याचा खरा लाभ होतो. तुझ्या जवळच्या वैद्यक ग्रंथातल्या गोष्टी अनुभवी वैद्यानेच लिहिल्या आहेत हे मान्य आहे मला. पण दर वेळी अशी चिकित्सा सफल होतेच असे नाही. मी तुला शास्त्रीय पद्धतीने वैद्यक शिकवीन. त्यानंतरच तू त्या ग्रन्थाचा अुपयोग करशील असं वचन दे मला बेटा!"

दरबारी वैद्याचे म्हणणे भैरवला पटले अन् त्याने ते मान्य केले. त्याने त्या वैद्याजवळ संथा घेतली अन् तो आता प्रमाणित वैद्य बनला.

यानंतर शरभने आपल्या मुलीचा भैरवशी विवाह करून दिला. दरबारी वैद्याजवळ शिकलेल्या ज्ञानाशी त्याने सापडलेल्या ग्रंथाचीही जोड दिली अनं एक 'अुत्तम वैद्य' म्हणून त्याचे नाव त्या पंचक्रोशीत गाजत राहिले.






राम आणि रावण यांचे युद्ध पाहण्याषाठी जे देव, यक्ष, किन्नर, किंपुरुष आणि गंधर्व तेथे जमले होते, ते रामाच्या पराक्रमाचे गुणगान करून आपापल्या ठिकाणी परत गेले.

या नंतर रामाने मातलीचा यथोचित सत्कार केला आणि आपल्या रथासह त्याला स्वर्ग-लोकात पाठवून दिले.

नंतर लक्ष्मण नि सुग्रीव यांना आपल्या बरोबर घेऊन राम आपल्या शिबिरात आला. तेथे तो लक्ष्मणाला म्हणाला- "लक्ष्मणा, विभीषणाचा राज्याभिषेक, त्याला लंकेचा राजा बनविणे, आपले प्रथम कार्य आहे. त्यासाठी आवश्यक ती तपयारी करण्याची तजवीज तावडतोब कर."

लक्ष्मणाने वानरांना सुवर्ण-कलश दिले आणि समुद्र-जल आणायला सांगितले. तसेच अन्य सर्व व्यवस्था केली. विभीषणाला राजसिंहासनावर बसवून सागरी-जलाने त्याला अभिषेक करवला. विभीषणाचे मंत्री आणि त्याच्या राक्षस-भक्तांनी उच्चरवाने त्याचा जयजयकार केला. विभीषणाने आपल्या राक्षस-प्रजेला अभय-दान दिले आणि भविष्यांत लंकेत सुख-शांतीचे राज्य असेल असे अभिवचन दिले. काही विशेष राक्षस-नागरिकांनी आपल्या नवीन

**३६. विभीषणाचे राज्यारोहण**



राजाला मूल्यवान भेटी अर्पण केल्या. कृतज्ञतापूर्वक विभीषणाने ही राम व लक्ष्मण यांना अनेक पुरस्कार दिले.

राम व लक्ष्मण यांची विभीषणाकडून मिळालेल्या पुरस्कारंबाबत जरा ही आसक्ति नव्हती, तरी पण विभीषणाचे मन राखण्यासाठी त्यांनी भेट-वस्तूंचा स्वीकार केला.

यानंतर जवळच हात जोडून उभ्या असलेल्या पर्वतप्राय हनुमानाला राम म्हणाला-''राक्षसांचा राजा विभीषण याची परवानगी घेऊन तू सीतेकडे जा आणि आपली विजय-वार्ता तिला देऊन रावणाच्या मृत्यूची बातमी सांग. लक्ष्मण आणि सुग्रीव यांच्या सह मी येथे असल्याचे ही तिला सांग आणि तिच्याकडील शुभ-समाचार घेऊन ये.''

हनुमान तेथून निघाला. राक्षसांच्या नमस्काराला प्रतिनमस्कार करीत लंका-नगरीत जाऊन पोचला. रावणाच्या महालात एका ठिकाणी सीता मुकाट्याने बसलेली होती.

हनुमानाने तिच्याजवळ जाऊन नमस्कार केला आणि आपला परिचय देऊन नम्रपणे उभा राहिला. प्रथम सीतेने त्याला ओळखले नाही. थोड्या वेळात ओळखल्यावर मात्र तिचा चेहरा प्रसन्न झाला. नंतर हनुमानाने तिला रामाचा संदेश ऐकवला.

''सीता मातोश्री, राम खुशाल आहेत. विभीषण व सुग्रीव यांच्या समवेत ते वानर-सेनेत आहेत. शत्रूचा अंत करून आपल्या ध्येयाची पूर्ति त्यांनी केलेली आहे, आणि हीच शुभ-वार्ता घेऊन मी इथे आलो आहे. विभीषणाचे साहृय, वानर-वीरांचा पराक्रम व आणि लक्ष्मणाचे अचंचल प्रेम यांच्या बळावरच रावणाचा अंत होऊ शकला. आपले कुशल-क्षेम जाणण्याची रामाची इच्छा असून त्यांनी असा निरोप दिला आहे की-''पतिव्रता अशी तू अजून जिवंत आहेस! माझ्या पराक्रमामुळे मी विजयी





झालो, आता तू निश्चिंत रहा. रावणाचा अंत करून मी आता लंका-नगरी वश करून घेतली आहे. समुद्रावर सेतु बांधून रावणाचा वध करण्याची मी प्रतिज्ञा केली होती व ती पूर्ण केली. आता विभीषण लंकेचा राजा आहे. तेव्हा तू रावणाच्या राज्यात आहेस असे समजून घाबरू नकोस. आता हे तुझेच घर आहे. लवकरच विभीषण तुला येऊन भेटेल.''

हे ऐकून सीतेला फार आनंद झाला. पण तिच्या तोंडून एक शब्द ही फुटेना. काही विचार करत ती गप्पच बसली. तेव्हा हनुमान तिला म्हणाला-''सीतामाई, आपण एवढा कसला विचार करीत आहात? मी आणलेल्या संदेशाच्या उत्तरादाखल काही सांगा ना. आपण बोलत का नाही?''

तेव्हा कंपित आवाजात सीता म्हणाली-''माझ्या पतीच्या विजयाची वार्ता जाणून मला फार आनंद झाला. आनंदातिरेकाने माझ्या तोंडातून शब्द बाहेर पडेना. तू इतका सुरेख समाचार आणला आहेस की कृतज्ञतापूर्वक काही सांगायला शब्दच सांपडत नाहीत. तिन्ही लोकात दुर्लभ अशी एकादी तुझ्या योग्य वस्तु मी तुला बक्षिस म्हणून देऊं इच्छिते!''

नमस्कार करीत हनुमान म्हणाला-



''आपण प्रेमाने जे बोलत आहात, तोच माझा अत्युतम पुरस्कार! पतिव्रता आपणच असे सर्व बोलू शकता. रावणाचा अंत झाल्यावर मला विजयी रामाचे दर्शन घडले. तेव्हा इंद्राचे पद मिळाल्याचा मला आनंद झाला.''

सीतेने हनुमानाची प्रशंसा केली. हनुमान तिला म्हणाला-''मातोश्री, ज्या राक्षसिणींनी आपणाशी क्रूर व्यवहार केला, त्यांना ठार करू का? आपण तशी आज्ञा द्यावी.''

त्या राक्षसिणींबाबत तो जितका विचार करू लागला, तितका त्याचा आवेश वाढू लागला. हे ओळखून ती



हनुमानाला म्हणाली-"या राक्षसिणी रावणाच्या सेविका आहेत. राजाच्या सेविकांनी राजाज्ञेचे पालन करायला नको का? त्यांनी आपलं काम ठीक न केलं, तर त्यांना शिक्षा होईल. म्हणून त्या दासींनी जे काही केलं ते ठीकच केलं, त्यांच्यावर रागावणं योग्य नाही. मला वाटतं माझं दुर्दैव होतंआणि मला आपल्या पूर्व-जन्मीच्या पापांचं फळ मिळालं. या राक्षस-सेविकांवर माझा मुळिच राग नाही. रावणाचा अंत झाला, आता या मला मुळिच त्रास देणार नाहीत. या राक्षसिणींनी आपल्या बुद्धीने मला त्रास दिला असला तरी त्यांना शिक्षा देणे योग्य होणार नाही."

सीतेच्या या वचनांची हनुमाने खूप तारीफ केली. तो म्हणाला–"आपण खरोखर रामाला अत्यंत योग्य पत्नी आहात. आता रामाला काही निरोप असेल तर तो सांगून मला रवाना करावे."

सीता म्हणाली–"माझी एकच इच्छा आहे, मला आपल्या पति-देवाचं दर्शन घडावं!"

सीतेचा निरोप घेऊन हनुमान निघाला तो थेट रामाकडे येऊन सांगू लागला–"जिच्यासाठी सेतु बांधून लंका- प्रवेश करून आपण भयानक युद्ध केले, त्या सीता माईचे दर्शन मला घडले. तिने मला ओळखलं. आपल्या विजयाची वार्ता कानी पडल्यावर तिला खूप आनंद झाला. रावणाचा वध करणाऱ्या रामाचं लवकरच दर्शन घडावं अशी तिची इच्छा आहे."

हे सर्व ऐकून काही वेळ राम गप्प राहिला, त्याच्या डोळ्यात अश्रू तरळले राम म्हणाला–"इतके दिवस रावणाच्या घरी राहिलेल्या सीतेचा मी स्वीकार केला, तर जगातील लोक काय म्हणतील? पण निर्दोषी सीतेचा मी त्याग केला. तर मला पाप लागेल. मी आता काय करावं?"

असा विचार करीत विभीषणाला रामाने सांगितले–"तू जा. सीतेला सुगंधी पाण्याने स्नान घडविण्याची व्यवस्था कर. तिच्या शरीरावर चंदनलेप करून स्वर्णाभूषणांनी सुशोभित करून तिला इकडे घेऊन ये."

विभीषण लगेच लंका-नगरीत गेला नि अंतःपुरातील स्त्रियांना निरोप पाठविला–"सीतेला आपल्या पतीकडे पाठवायचे आहे, तिला न्हाऊ-माखू घालून अलंकृत करून तयार करा."

सीतेने यावर सांगितले की ती आहे तशीच आपल्या पतीकडे जाऊ इच्छिते. पण विभीषणाने सांगितले की रामाच्या इच्छेनुसारच तिने सर्व काही करावे. सीतेने ते मान्य केले.

विभीषणाने सीतेच्या अभ्यंग-स्नान व सोळा शृंगारांची व्यवस्था केली. अशा रीतीने शृंगारित सीतेला पालखीत बसविण्यात आले. नंतर अनेक राक्षसांच्या पहाऱ्यात तिला रामापर्यंत पोचविण्यात आले.

विभीषण रामाला म्हणाला– "आपल्या आज्ञेनुसार सीतेला इथपर्यंत पोचविले आहे." हे सर्व माहीत असून ही राम उदासवाणा बसून राहिला. त्याच्या मनात एकाच वेळी तीन प्रकारचे विचार काहूर माजवीत राहिले. इतक्या दिवसांनंतर सीतेचे दर्शन होत असल्यामुळे त्याला आनंद वाटत होता.



तिचा त्याग करणे कसे शक्य होईल या विचाराने त्याचे अंतःकरण दुःखी होते. इतका दीर्घ काळ एका राक्षसाकडे राहिलेल्या सीतेला काय भेटायचंय? असा थोडा राग ही त्याच्या मनात होता.

थोडा विचार करून रामाने विभीषणाला सांगितले–"सीतेला माझ्या समोर घेऊन ये."

विभीषणाने तेथील वानर, भल्लूक वगैरेंची गर्दी हटविण्याचा प्रयत्न केला. जणू काही तो या सर्वांना पळवून लावीत होता. तेव्हा रामाने विभीषणाला तसे न करण्याबाबत सुचविले. तो म्हणाला–"ही सर्व आपलीच मंडळी



आहेत, त्यांना पळवून लावणे योग्य नाही. सीतेला पाहण्याची त्यांची इच्छा ही स्वाभाविकच आहे.

हे ऐकून विभीषणाला पश्चात्ताप झाला. तो सीतेला रामाकडे घेऊन आला.

रामाकडे पाहून लक्ष्मण न सुग्रीव यांना वाटलं की आता रामाच्या मनात सीतेबद्दल प्रेम राहिलं नाही. त्यांना या गोष्टीचे फार दुःख वाटले. रामाची वागणूक त्यांना मोठी विचित्र वाटली.

सीता लाजून विभीषणाच्या मागे राहून रामापुढे आली. या सर्व गर्दीत पदरामागे आपले तोंड लपवून ती रडू लागली. तिच्या तोंडून फक्त एक शब्द बाहेर पडला–"आर्यपुत्र!" अनेक दिवसांनंतर आपल्या पतीची भेट होणार असल्याचा तिला संतोष होता. हळू हळू तिचे दुःख कमी होत होते.

सीतेला पाहताच प्रथम रामाला राग आला. तो म्हणाला–"सीते, युद्धात शत्रूचा वध करून, तुला मुक्त करून मी पुरुषार्थ दाखविला. शत्रूने माझा अपमान केला होता, मी त्याचा सूड घेतला. शत्रूचा सपरिवार अंत करून मी आपल्या प्रतिज्ञेची पूर्ति केली. मी आपला अपमान धुऊन काढला. हनुमानाने समुद्र पार केला, लंकेचं दहन केलं ही सर्व महत्कार्ये सफल झाली. सुग्रीवाने ही युद्धात खूप मदत केली. विभीषणाने माझ्यावर विश्वासून केलेले परिश्रम यशस्वी झाले.

राम आपल्या स्वतःच्या परक्रमाबद्दल काहीच बोलला नाही, याचे सीतेला फार दुःख वाटले. सीतेचे दुःख पाहून रामाचा राग अधिकच वाढला. राम म्हणाला- "सीते, अपमानाचा सूड उगवण्यासाठी मी हे सर्व काही केले.

तुझ्यासाठी मी काही केले नाही, हे लक्षात ठेव. सदाचाराच्या दृष्टीने तू आता माझ्या विरोधात आहेस. बरेच दिवस परक्या पुरुषाच्या घरी राहिलेल्या आपल्या पत्नीचा कोण पराक्रमी व स्वाभिमानी पुरुष स्वीकार करू शकेल? तू रावणाच्या घरातून इथे आली आहेस. तुझ्या रूपाने रावणाच्या डोळ्यांना सुखविले आहे. उच्च कुलात जन्मलेल्या मी तुझा स्वीकार केला, तर माझी काय प्रतिष्ठा राहील याचा विचार कर. माझ्या मनात तुझ्याबद्दल थोडा ही संशय नाही. तू वाटेल तिथे जाऊ शकतेस. वाटलं तर लक्ष्मणाजवळ रहा, अथवा भरताजवळ वा सुग्रीवाजवळ रहा. वाटलं तर बिभीषणाकडे रहायला ही हरकत नाही. तुला जिथे योग्य वाटेल तेथे रहा. शत्रूचा संहार करून मी धर्माचे पालन केले. तुला आश्रय देणे मला शक्य नाही.'' रामाच्या तोंडून असे कठोर शब्द यापूर्वी सीतेने ऐकले नव्हते.

हे कठोर शद्ब ऐकून सीता निराश झाली. आपल्या पतीच्या तोंडून असे शद्ब कोणती स्त्री ऐकू शकेल? अनेक दिवस रावणाच्या घरी हाल-अपेष्टा सहन करून आपल्या पतीजवळ आल्यानंतर दोन गोड शद्ब ऐकायला मिळतील अशी तिला आशा होती. पण याच्या विपरीत अत्यंत अप्रिय शद्ब ऐकण्याची पाळी तिच्यावर आली. तिला दिशाभ्रम झाला. एखाद्या वृक्षावरील वेल तलवारीने कापून टाकली जात आहे असे तिला वाटले. दुःखातिरेकाने तिला कंप सुटला आणि तिच्या डोळ्यातून अश्रू वाहू लागले.



# मोफत प्रवेश

हेमन्तपुरमधे विश्वेश्वरची एक सुप्रसिद्ध नाटकमंडळी होती. पण हळूहळू नाटके पहायला येणाऱ्या प्रेक्षकांची संख्या घटत गेली. अशातच विश्वेश्वरने 'पारिजातापहरण' नावाचे नवे नाटक लिहिले अन् त्याचे प्रयोग करण्यासाठी लागणाऱ्या पैशांबद्दल बोलायला तो आपला मित्र सुदर्शन याच्याकडे गेला.

सुदर्शनने पाहिजे तितका सारा पैसा विश्वेश्वरला देऊन म्हटले, ''पुढल्या शुक्रवारी नाटकाच्या पहिल्या प्रयोगाची व्यवस्था कर.''

मधल्या काळात सुदर्शनने जाहिरात केली. ''पारिजातापहरण या सुंदर नाटकाचा पहला प्रयोग! प्रवेश मोफत.''

नाटकाच्या दिवशी नाट्यमंदिरात प्रेक्षकांची तोबा गर्दी झाली! कारण प्रवेश फुकट होता ना! नाटक संपल्यावर मात्र बाहेर पडायच्या दारांवर सुदर्शनची माणसे हजर होती, अन् ती नाटक पहाण्याचे पैसे वसूल करण्यासाठी लोकांवर दडपण आणीत होती.

''हा तर धडधडीत अन्याय आहे! तुम्ही लोकांनी 'प्रवेश मोफत'च्या जाहिराती लावल्या होत्या ना!'' असे ते म्हणू लागले.

''अरे होय होय! सबूर! प्रवेश मोफतच आहे, हे बरोबर! पण बाहेर जायची वर्गणी देणं अनिवार्य आहे!'' नाइलाज होऊन प्रेक्षक वर्गणी देऊन बाहेर पडले!







# जादूचे चित्र

खूप वर्षां पूर्वी राजस्तानात जयसिंह नावाचा राजा होता. त्याला चित्रकलेबद्दल विशेष आदर व आवड होती. त्याच्या दरबारात एक महान् चित्रकार होता. त्याच्याकडून स्वतःची तसबीर बनवून घ्यायची राजाची फार इच्छा होती. परन्तु अकस्मातच तो चित्रकार मृत्यु पावला. तेंव्हापासून त्याचे दरबारातले स्थान बरेच दिवस रिक्त राहिले.

याच काळात हिमालय प्रान्तात रहाणाऱ्या हेमचन्द्र नावाच्या एका चित्रकाराला कळले की, जयसिंहचा दरबारी चित्रकार मृत्यु पावल्यामुळे ते स्थान रिक्त आहे. त्या जागी आपली नेमणुक व्हावी अशा आशेने तीन दिवस व तीन रात्री आपल्या खेचरावरून वाळवंट तुडवून भुकेला तहानलेला हेमचन्द्र जयसिंहच्या राजवाड्याशी पोचला.

द्वारपाल प्रथम त्याला दरबारात जाऊ द्यायलाच तयार होईना. परंतु हेमचन्द्राने 'आपण चित्रकार असून राजाला दाखवायला काही चित्र आणली आहेत' असे जेंव्हा सांगितले तेंव्हा द्वारपालाने त्याला आत सोडले.

राजाला भेटून हेमचन्द्र म्हणाला, "राजा, ही चित्रं मी रेखाटली आहेत. ती पाहिलीत की माझ्या प्रतिभेची ओळख पटेल आपल्याला." असे म्हणत त्याने काही चित्रे पुढे केली.

ती चित्रे राजाला खूपच आवडली. इतका चांगला चित्रकार इतक्या लांबून हातावर पोट घेऊन, नाइलाजाने इतक्या दूर आपल्याकडे का आला असावा हे त्याला कळेना.

"छान चित्रं आहेत तुझी! किती किंमत हवी तुला यांची?" राजाने विचारले.

"महाराज, आपल्या दरबारात चित्रकाराची जागा रिकामी आहे. ती आपण मला दिलीत, तर माझ्यावर तीच मोठी कृपा होईल." हेमचन्द्र उत्तरला.

राजाने त्याची विनन्ती मान्य केली. दुसऱ्याच दिवसापासून हेमचन्द्र दरबारातले चित्रकाराचे स्थान भूषवू लागला.

आता पुन्हा दरबारी चित्रकाराची प्राप्ती झाल्यामुळे राजाला आपले चित्र काढवून घेण्याची इच्छा पुरी करायची संधी मिळाली. तो हेमचन्द्रला म्हणाला, "शाही दिवाणखान्यात आमच्या साऱ्या पूर्वजांच्या रंगीत तसबिरी आहेत. माझंच फक्त चित्र त्यात अजून दाखल झालेलं नाही. तू माझी ही इच्छा पूर्ण केलीस म्हणजे आमच्या पुढच्या पिढ्यांना माझीही तसबीर पहायला मिळेल."

हेमचन्द्र म्हणाला, "आपले एकट्याचेच का महाराज, मी आपल्याबरोबर महाराणी, मन्त्री, दरबारी या साऱ्यांचीच चित्रं रंगवीन. मला एकादी चांगलीशी भिंत नेमून द्या, म्हणजे मी साऱ्या दरबारच्या लोकांची



चित्रं रंगवतो त्यावर."

हेमचन्द्रचे हे आव्हान ऐकून राजा फारच खूष झाला. त्याने त्याला साऱ्या दरबारचे एकत्रच चित्र बनवायला परवानगी दिली.

राजाच्या दरबारात बरेचसे ढेरपोटे होते, एक कुबडा होता, एक एकाक्ष, तर एक चकणा! ते सारे एकएक करून चित्रकार हेमचन्द्रकडे आले अन् त्यांनी प्रत्येकाने त्याला धमकावले. "माझं चित्र नीट काढ हं! माझा फुटका डोळा त्यात दिसायला नको, माझं कुबडेपण दिसायला नको. नाहीतर तुझी धडगत नाही बघ! हां, माझं म्हणणं ऐकलं नाहीस, तर तू

राजस्तानातील लोककथा



जिवन्त नाही राहायचास! समजलं?" अशा प्रकारे त्याला भीती दाखवून ते निघून गेले.

राजाला ही बातमी कळल्यावर हेमचन्द्रला बोलवून तो म्हणाला, "दरबारातल्या प्रत्येकाचं तो आहे तसंच चित्र काढ!"

ज्या भिंतीवर चित्र काढायचे होते, तिच्यापुढे एक पडदा टांगण्यात आला! आपल्या बरोबर आणखी तीन लोक मदतीला घेऊन हेमचन्द्र पडद्यामागे राहू लागला, अन् तेथे फक्त मौजमजा करू लागला.

असाच एक महिना निघून गेला. एके दिवशी हेमचन्द्रला बोलावून घेऊन राजाने चित्र कुठवर आलंय याची चौकशी केली. हेमचन्द्रने 'लवकरच संपेल' असे मोठ्या विश्वासाने, सांगितले.

यानंतर पुन्हा थोड्या दिवसांनी राजाने चौकशी केली, तेंव्हाही पहिल्यासारखेच अुत्तर मिळाले त्याला. प्रत्येक वेळी तो असेच सांगत राहिला की, 'अजून थोडंच काम अुरलंय, लवकरच संपेल.'

असेच तीन महिने संपले; तरीही चित्र काही सुमाप्त झाले नाही. शेवटी राजा रागाने हेमचन्द्रला म्हणाला, "आता मी एक आठवड्याचा वेळ देत आहे; तोपर्यंत तुझं काम संपलं नाही, तर तुला कठिणात कठीण अशी शिक्षा मिळेल."

हेमचन्द्र अुत्तरला, "महाराज, चित्र तयार आहे. अुद्या एक चांगला मुहूर्त आहे. अुद्याच चित्राचं अनावरण केलं जाईल. आपण सहपरिवार आलात, तर हे शुभकार्य अुद्या सकाळीच साजरं करू."

हे ऐकून राजाचा चेहरा आनन्दाने अुजळला. त्याने दरबारी लोकांनाही ही खबर कळवली.

दुसऱ्या दिवशी राजा, राणी, राजपरिवार आणि दरबारी मंडळी अनावरण-समारंभासाठी आले. भिंतीवर पडदा अजून तसाच लटकत होता.

अुपस्थित लोकांना अुद्देशून चित्रकार हेमचन्द्र म्हणाला, "मी आपणा सर्वांचे चेहरे या चित्रात रंगवले आहेत. आपापले चेहरे सर्वांनी स्वतः ओळखून घ्यावेत. पण सर्वांत अगोदर मी एक गोष्ट जाहीर करू इच्छितो. ज्यांची आजवरची आयुष्यं अुत्तम आहेत, अशाच व्यक्ति ही चित्रं पाहू शकतील. नाहीतर माझी ही चित्रं कोणाला दिसणार नाहीत."

खरे तर भिंतीवर एकही चित्र चितारलेले नव्हते. पण कोणीच प्रकटपणे काही बोलले नाही. राजापासून सर्वचजण हे प्रकट करायला धजावेनात. प्रत्येकाला असे वाटत होते की चित्र फक्त आपणालाच दिसत नाहीय, अन् बाकी सर्वजण बघत आहेत!

परंतु राजाबरोबर नेहमी असणारा विदुषक मात्र अचानक बोलला, "अरेरे! माझा जन्म किती नीच असावा! मला भिंतीवर काहीच दिसत नाहीये."

आता हळूहळू आणखी काही माणसे सांगू लागली की त्यांनाही भिंतीवर काहीच दिसले नाही. अुपस्थितांपैकी जवळजवळ सर्वांनीच जेंव्हा हेच सांगितले, तेंव्हा राजा रागाने म्हणाला, "नीच, हरामखोर! इतक्या लोकांना फसवायचा प्रयत्न केलास तू? तुला आता फाशी दिलं तर काही पाप होणार नाही!"

हेमचन्द्र हात जोडून चटकन बोलला, "होय महाराज! मला फाशीच द्या. मी जिवन्त राहीन, असा मी स्वप्नात ही विचार केला नव्हता. हां, पण कृपा करून मला सोन्याच्या दोरीने फाशी नका देऊ! कारण ती तुटली तर मी मरणार नाही."

त्याच्या या बोलण्याने राजाचा राग एकदम मावळून तो जोरजोराने हसू लागला. राजाला कळून चुकले की. हेमचन्द्र अुत्तम चित्रकार असला तरी दरबारात रहायच्या लायकीचा नाही; म्हणून त्याला थोडे सोने देऊन अन् पुन्हा त्याच्या खेचरावर बसवून आपल्या वाटेने रवाना करून दिले.





### शुक्र ग्रहा वर पाणी

अमेरिकेच्या 'नासा ॲम्स रिसर्च सेंटरने' अंतरिक्षात पाठविलेल्या उपग्रह 'पयोनीर-१२' ने शुक्र ग्रहासंबंधी बरीच माहिती गोळा करून पाठवली आणि गेल्या ऑक्टोबर महिन्यात ध्वस्त झाला. या उपग्रहाने पाठविलेली चित्रे पाहून ही गोष्ट लक्षात येते की सुमारे लाख कोटी वर्षांपूर्वी शुक्रावर महासागरा सारखे पाणी विद्यमान असावे. शास्त्रज्ञांचा याबद्दल असा अंदाज आहे की त्या काळी शुक्रावर जीव-सृष्टि ही असण्याची शक्यता आहे.

### चष्म्यावर टी. व्ही.

आपण घरात टी. व्ही. पाहतोच. हल्ली आपण जावे तेथे निरनिराळ्या प्रकारचे पोर्टेबल टी. व्ही. सेट ही पाहतो. हे टी. व्ही. सेट बैटरी वर चालतात. मोटर कार मध्ये लावण्यायोग्य छोटे टी. व्ही. सेट ही तयार करण्यात आलेले आहेत. आता हंगेरीतील दोन हुषार एंजिनियरांनी मिळून चष्म्याच्या फ्रेम वर लावता येतील असे चिमुकले टी. व्ही. सेट बनवले आहेत. चष्म्याच्या दोन कांचांच्या मदतीने आता टी. व्ही. चे कार्यक्रम पाहणे शक्य आहे.

### इन्स्टंट फोटोग्राफ

वृत्तपत्रांच्या फोटोग्राफरने कॅमेऱ्याने फोटो घ्यायचा व नंतर डेव्हलप करून फोटो छापायचा, इतके सर्व करण्याची आता गरज राहिलेली नाही. कोणत्या ही अंतरा वरून वृत्तपत्राच्या कचेरीत फोटो पाठविण्याचे अद्भुत तंत्र 'सॅटेलाइट सांकेतिक विज्ञान' आता उपलब्ध झाले आहे. कॅमेऱ्याच्या मागे लावलेले 'इलेक्ट्रॉनिक उपकरण' रेडिओ- फोनच्या साहृयाने सॅटेलाइटशी जोडलेले असते. या व्यवस्थेमुळे कॅमेऱ्यावरील चित्रे सेंटर कॉम्प्यूटर वर येतात आणि नंतर पाहिजे तेथे पाठविता येतात.



# न्याय-सूत्र

जुन्या काळची गोष्ट आहे. राजा धर्मपाल धवलगिरि राज्यावर राज्य करीत असे. अत्यंत उदारपणे तो दान-धर्म करी. न्याय-निर्णय करते वेळी तो आपला-परका असा मुळीच विचार करीत नसे.

त्याचं न्याय-सूत्र होतं-"डोळ्याला डोळा नि दाताला दात!" कुणी कुणाचं काही नुकसान केलं, तर उलट दुसऱ्याने त्याचे तेवढेच नुकसान करावे-असं न्याय-सूत्र त्या राज्यात लागू असे. अशा रीतीने सूड घेणें धवलगिरीत न्याय-संमत मानले जाई.

एके दिवशी धर्मपाल आपल्या दरबारात बसला होता, सर्व मंत्री व दरबारी समोर बसले होते. राज्य-कारभारासंबंधी काही विशेष बाबींवर चर्चा चालू होती. त्याच वेळी दरबारात एक साप शिरला.

सापाला पाहताच सर्वांची घाबरगुंडी उडाली. त्याला मारून टाकण्यासाठी सर्व जण उतावळे झाले. तेव्हा वडिलांजवळ बसलेला युवराज उठला आणि त्याने आपल्या तलवारीने सापाचे दोन तुकडे करून टाकले.

सापाचा डोक्याकडील भाग तेथून बाहेर सटकला आणि मोठ्या कष्टाने आपल्या वारुळापाशी पोचला वारुळात सर्पिणी होती. आपल्या नवऱ्याची दशा पाहून तिला फार दुःख झाले. तेव्हा साप आपल्या बायकोला म्हणाला-"मी चुकून दरबारात गेलो, नि राजकुमाराने माझे दोन तुकडे करून टाकले. या राज्यातील न्याय तुला ठाऊकच आहे. येथील

२५ वर्षांपूर्वी चांदोबात प्रसिद्ध झालेली गोष्ट



न्याय-सूत्रानुसार राजा राजकुमाराला शिक्षा देईल. राजाच्या निर्णयानुसार तू रामकुमाराला चाव नि त्याला मारून टाक. तरी पण अगोदर राजाला आपला न्याय-निर्णय घोषित करू दे. उतावळेपणाने जाऊन राजकुमाराला चावू नकोस." असं बायकोला समजावून सांगून सापाने आपले प्राण सोडले.

सर्पिणी त्या दिवशी रात्री राजमहालात जाऊन राजकुमाराच्या कक्षापर्यंत पोचली. गाढ झोपलेल्या राजकुमाराच्या गळ्याला तिने विळखा घातला. राजकुमार जागा झाला आणि घाबरून आरडा-ओरडा करू लागला.

राजवाड्यातील सर्व नोकर-चाकर राजकुमारा भोवती जमा झाले. सर्पिणीला कसं मारावं हे काही कुणाच्या लक्षात येईना. राजकुमाराच्या गळ्याला विळखा घातलेल्या सर्पिणीवर प्रहार केला तर राजकुमाराला ही जखम होईल. तेंव्हा सर्पिणी म्हणाली-"प्रथम राजाला बोलवून आणा. अगोदर न्याय-निवाडा झाला पाहिजे. जर मला कोणी मारायचा प्रयत्न केला तर मी युवराजाला डसेन."

थोड्याच वेळात राजा तेथे आला, तेव्हा सर्पिणी राजाला आपल्या नवऱ्याच्या मृत्यूबाबत सांगून म्हणाली-"माझ्या नवऱ्याने कोणाला ही इजा केली नव्हती. तो चुकून दरबारात आला, म्हणून राजकुमाराने त्याचा वध केला नि मला विधवा बनवलं. या राज्यातील न्याय-सूत्रानुसार मी आता राजकुमाराचा वध करून त्याच्या बायकोला विधवा बनवू शकते की नाही?"

सर्पिणीच्या तोंडचे हे शब्द ऐकून राजाला फार दुःख झाले. न्याय-शास्त्रा प्रमाणे सापाला विनाकारण मारून सर्पिणीला विधवा बनवल्याच्या अपराधाबद्दल राजकुमाराला शिक्षा करणे क्रमप्राप्त होते. पण तो त्याचा एकुलता एक मुलगा होता. आता या संकटाला कसं तोंड द्यावं? राजा विचार करू लागला.

निरुपायास्तव राजाने दोन न्यायाधीशांना बोलवले. त्या दोघांनी सर्पिणीचं म्हणणं नीट ऐकून घेतलं. एक न्यायाधीश म्हणाला-"राजन्, आपल्या राज्यातील कायद्यानुसार 'डोळ्याला डोळा नि दाताला दात' या न्यायसूत्राची अंमल-बजावणी केलीच पाहिजे. राजकुमाराने सापाला मृत्यु-दंड देऊन सर्पिणीला विधवा बनवलं. तेव्हा तोच साप आता राजकुमाराच्या बायकोला विधवा बनवू शकतो!"

हे ऐकून त्याचे खंडण करीत सर्पिणी म्हणाली-"नाही, कोणते ही न्यायशास्त्र हा निर्णय मान्य करणार नाही. मला फसवण्यासाठी न्यायाधीष हा व्यर्थ युक्तिवाद करीत आहे. माझा मेलेला नवरा राजकुमाराच्या बायकोला कसा विधवा बनवू शकेल?"

सर्पिणीच्या या प्रश्नावर न्यायाधीष काही बोलू शकेना, तो गप्प बसला. तेव्हा दुसरा न्यायाधीष म्हणाला-"सर्पिणी म्हणत आहे, ती गोष्ट बरोबरच आहे. तरी पण मला आपली एक शंका आहे!"

मग न्यायाधीषाने सर्पिणीला विचारले-"बेटा, तुला किती मुलं आहेत?"

डोळ्यात अश्रू आणून सर्पिणी म्हणाली-"मला पाच मुलगे आहेत."

तेव्हा न्यायाधीष म्हणाला-"ओह, तर



मग राजकुमाराने तुला 'पाच मुलांची विधवा' बनवली आहे. आता न्याय-शास्त्रानुसार तू हीं राजकुमाराच्या बायकोला 'पाच मुलांची विधवा' बनवू शकतेस. दूसरे काही न्याय-सूत्रात बसणार नाही. अपराधाची शिक्षा, या लोकात न मिळाली तर अन्य लोकात अवश्य मिळेल. न्याय तरी असं सांगतो."

शंकित सुरात सर्पिणी म्हणाली- "होय, बरोबर आहे!"

आता न्यायाधीष म्हणाला-"तर मग तुला थोडी प्रतीक्षा केली पाहिजे. कारण आज राजकुमाराच्या बायकोला दोनच मुलगे आहेत. ती जेव्हा पाच मुलांची आई होईल तेव्हा तू तिचा सूड घेऊ शकतेस. तोपर्यंत तुला थांबावे लागेल."

हा निर्णय राज्यांतील न्याय-सूत्रानुसार असल्यामुळे तो मानल्याशिवाय गत्यंतर नव्हते. सर्पिणी राजाला म्हणाली- "राजकुमाराची बायको जेव्हा पाच मुलांची आई होईल, तेव्हा मला कळवावे."

न्यायप्रेमी राजाने सर्पिणीला तसे वचन दिले.

यानंतर अनेक वर्षे राजकुमाराच्या बायकोला मूलच झाले नाही. सर्पिणी वाट पहात राहिली. राजकुमार सपरिवार जेव्हा उद्यानात विहार करायला येई, तेव्हा विधवा सर्पिणी त्याला बाहेर येऊन लक्षपूर्वक पहात असे. तिची फार निराशा होई.

दिवसांमागून दिवस जात राहिले आणि राजकुमारा बरोबर दोन बालक दिसू लागले. सूडाची आग विधवा सर्पिणीच्या मनात धगधगत राहिली. आणि शेवटी ही आग विझण्यापूर्वीच एक दिवशी सर्पिणी मरून गेली.







## पानांतील हिरवा रंग

दुर्वा (हरळी) आणि पाने हिरवीगार दिसतात या हिरवेपणाचे श्रेय त्यांच्यात असणाऱ्या 'क्लोरोप्लास्टस' नावाच्या द्रव्याकडे जाते. या क्लोरोप्लास्टसमधे आणखी चार पदार्थ असतात. क्लोरोफिल हे 'हिरवट निळ्या' रंगाचे, क्लोरोफिल बी हे 'हिरवट पिवळ्या' रंगाचे, फ्लांटोफिल हे 'पिवळ्या' रंगाचे व केरोटिन हे 'गुलाबी' रंगाचे असते. हरळी व अन्य पाने ऋतुमानाप्रमाणे फिक्या हिरव्यापासून अगदी गर्द हिरव्यापर्यन्त रंग बदलण्याचे कारण ही ही द्रव्येच.

## रंग बदलणारे सरडे



शत्रूपासून आपले रक्षण करण्यासाठी काही प्राणिमात्रांना निसर्गानेच काही विशेष शक्ति दिलेल्या आहेत. निसर्गातील वातावरण व आसपासच्या गरजांच्या अनुरूप प्राणिमात्र आतले रंग बदलू शकतात-ही शक्ति ही निसर्गाचीच देणगी होय. या प्राणी मात्रांपैकीच सरडा हा अेक प्राणी आहे. याच्या कातड्याम 'क्रोमे टोफोर्स' नावाचे रंग बदलण्याची शक्ति असणारे विशेष कण असतात. हे कण सामान्यत: एकाच रंगाचे व नक्षत्राच्या आकारचे असतात. सरड्यांमधे हे कण निरनिराळ्या रंगांचे असतात. एका रंगाचा कण जेंव्हा दुसऱ्या रंगकणात मिसळतो, तेंव्हा एक तिसराच रंग तयार होतो. निळा व पिवळा एकत्र होअून हिरवा रंग बनतो. लाल व पिवळा एकत्र होअून नारिंगी, आणि लाल व निळा एकत्र येअून भुरकट, जांभळट रंग बनतो.



## शेंदरी रंगाचे बगळे

कावळ्याप्रमाणे साऱ्या शरिराचा एकच रंग असणारे पक्षी फार कमी असतात. अशा पक्ष्यांत त्रिनिदादमधे रहाणारे शेंदरी वर्णाचे बगळे हे वैशिष्ट्यपूर्ण मानले जातात. हे खास जातीचे बगळे फारच शोभिवन्त असतात. सहा कोटी वर्षांपूर्वीचे त्यांचे अवशेषही नुकतेच आढळले आहेत. प्राचीन मिस्र देशाचे लोक असे समजत, की परमेश्वराने मानव जातीचा इतिहास लिहिण्यासाठी यांची नियुक्ति केली आहे, अन् यामुळे ते या पक्ष्याचा खूपच आदर करत असत. जन्माच्या वेळी हे पक्षी भुऱ्या रंगाचे असून, नंतर ते खाकी दिसू लागतात. ह्यानंतर त्यांचा रंग कमी कमी होत पांढरा दिसू लागतो व नंतर गुलाबी रंगात त्यांचे वर्णान्तर होते. शेवटी त्यांची वाढ जेव्हा पूर्ण होते. तेंव्हा त्यांना शेन्दरी रंग प्राप्त झालेला असतो.



विशेष समाचार

# श्री कांची कामकोटि पीठाधिपति

श्री कांची कामकोटि पीठाधिपति श्री चंद्रशेखर सरस्वती महास्वामी यांचा जन्मशताब्दि उत्सव मे १९९३ मध्ये सुरु झाला. हा उत्सव वर्ष भर साजरा करण्याचा निश्चय भक्त- मंडळींनी केला आहे. श्री चंद्रशेखर सरस्वती यांच्या इतका दीर्घ काल पीठाधिपति-पद भूषविल्याचे ऐकिवात नाही.

आजचे हे परमाचार्य ८६ वर्षांपूर्वी आदिशंकराचार्यांचे वारस म्हणून व कांची येथील मठाचे ६८ वे शंकराचार्य म्हणून नियुक्त झाले. यांची ही नियुक्ति मोठ्या विचित्र परिस्थितीत झाली. ६६ वे आचार्य श्री चंद्रशेखर सरस्वती यांनी सन १९०६ मध्ये बारा वर्षाचा बालक स्वामीनाथन याला पाहिले, त्याच्या डोळ्यातील दिव्य शक्ति पाहून स्वामीजी आकर्षित झाले. या मुलात जगत्‌गुरू होण्याची लक्षणे त्यांना दिसली. आपल्या बरोबर राहणाऱ्या अन्य पंडितांना स्वामीजी म्हणाले-"माझ्या पश्चात् हाच बालक कांची मठाचा पीठाधिपति होणार!"

दुसऱ्याच वर्षी ६६ वे आचार्य कांची जवळील 'कलवै' नावाच्या गावी दिवंगत झाले. त्या वेळी स्वामीनाथन दिंडिवनम नावाच्या एका छोट्या शहरात एका ख्रिश्चन मिशनरी शाळेत शिकत होता. स्वामीनाथनच्या मोठ्या आईचा मुलगा प्रथम पासूनच पीठाधिपतीसह रहात असे, म्हणून ६६ व्या आचार्यांच्या मृत्यूनंतर त्याची ६७ वा आचार्य म्हणून नियुक्ति झाली. स्वामीनाथनच्या मोठ्या आईने आपल्या एकुलत्या एक मुलाला मठाला समर्पित करण्याचा निर्णय घेतला. या विधवा आईला भेटण्यासाठी आणि तिला सांत्वना देण्यासाठी स्वामीनाथन सुद्धा आईसह कांचीला आला.

आई नि मुलगा जेव्हा कांचीला पोचले तेव्हा कांची पीठाचा एक संन्यासी स्वामीनाथनला 'कलवै' येथे घेऊन गेला. आजच्या पीठाधिपतीची प्रकृति फार बिघडली आहे हे रस्त्यातच त्याला समजले. अशा स्थितीत स्वामीनाथनने ६८ वे शंकराचार्य बनावे असा संन्याशाने त्याला आग्रह केला. याचाच अर्थ असा की त्याने पदवी धारण करून सर्व जबाबदाऱ्या स्वीकाराव्यात. सर्व कौटुंबिक बंधने झुगारून मुक्त व्हावे.

परमाचार्यांना जेव्हा या प्रसंगाची आठवण करून देण्यात आली, तेव्हा ते म्हणाले-"मी कधी कल्पना करू शकलो नव्हतो, अशा त्या घटनेचं मला मोठं आश्चर्य वाटतं! बैलगाडीत बसून राम-स्मरण करीत मी माझा बाकीचा प्रवास पूर्ण केला."

ही जबाबदारी स्वीकारण्याची अनुमति वडिलांनी स्वामीनाथनला तारेने दिली. १३ फेब्रुवारी १९०७ रोजी स्वामीनाथन कांची कामकोटि पीठाचे ६८ वे शंकराचार्य म्हणून नियुक्त झाले आणि त्यांनी ६६ व्या आचार्यांचे नाव धारण केले. चंद्रशेखर सरस्वती तरुण आहेत. भावी काळात त्यांना खूप मोठ-मोठी कर्तव्ये पार पाडायची आहेत. हे सर्व काही करण्यासाठी विद्या व निष्ठा यांची अत्यंत आवश्यकता आहे. म्हणून ते एकान्तात विद्याध्ययन करीत, तपस्या करून आपल्याला अधिक योग्य बनविण्याचा प्रयत्न करीत. लोक-कल्याणाच्या तीव्र आकांक्षेने ते निरंतर रात्रंदिवस आध्यात्मिक साधनेत मग्न रहात.

सन १९०९ पासून एक्वीस वर्षे त्यांनी श्री आदिशंकरांप्रमाणे संपूर्ण भारताची दिग्विजय यात्रा केली. किती ही अंतर असलं तरी ते पायीच चालत. निरुपाय झाला तर कधी ते पालखीत बसत.

परमाचार्य महापंडित आहेत. त्यांनी ग्रीक, लॅटिन व फ्रेंच भाषांचे अध्ययन केले. ग्रीक राजमाता म्हणाल्या-"त्यांचे स्वरूप निर्मल आध्यात्मिक आहे." राजकुमारी म्हणाली-"त्यांचं दर्शन म्हणजे पूर्णत्वाचं दर्शन आहे!" अशा रीतीने त्यांनी आपली आध्यात्मिक अनुभूति व्यक्त केली. त्यांचे वर्णन करताना एक अमेरिकन राजदूत म्हणाला-'ते संन्याशांचे राजे आहेत.'

सन १९२७ मध्ये महात्मा गांधी व परमाचार्यांची भेट झाली. ते एकमेकांशी बोलत असताना राजाजींनी येऊन गांधींना आठवण करून दिली-"भोजनाची वेळ झालीय." गांधीजी म्हणाले-"आचार्यांशी संभाषण हेच आजचं माझं संध्याकाळचं भोजन!"

जो साधारणपणे ८४ वर्षे जगतो, त्याने एक हजार पूर्णिमा पाहिलेल्या असतात. म्हणून यावेळी 'सहस्त्र-चंद्र' उत्सव साजरा केला जातो. पण कांची परमाचार्य तर शंभर वर्षे जगले आहेत. म्हणून त्यांच्या भक्तांनी 'शताब्दी-महोत्सव' थाटात साजरा करण्याचा निश्चय केला आहे.

काही वर्षांपूर्वी परमाचार्यांनी एक लेख लिहिला-"मला जीवनाने काय शिकवले?" या लेखात ते म्हणतात- "दुसऱ्याकरिता जगण्यासाठीच परमेश्वराने काही माणसांना जन्म दिलेला असतो. हेच मला जीवनाने शिकवले आहे."

### परमाचार्यांचे उपदेश

निरनिराळ्या धर्मांचे सिद्धांत व आचार-व्यवहार यांत फरक असणे स्वाभाविक आहे. पण हा काही कोणाचा दोष नाही. सर्व धर्मांचे आचार-व्यवहार एकाच प्रकारचे असण्याची आवश्यकता नाही. पण सर्व धर्मात मैत्री असणे आवश्यक आहे. एकता ही गोष्ट सर्वाधिक महत्त्वाची होय.

आजकाल जगात शिस्त राहिलेली नाही, कुठलं ही काम व्यवस्थितपणे चाललेलं दिसत नाही. ध्येयहीन अवस्थेत सगळी कामं चालू आहेत. अशा स्थितीत जगातील चढाव-उतार पाहून जगणं फार कठिण काम होऊन बसलंय. म्हणून आपण शिस्त पालन करणे आवश्यक आहे. स्वतःला शिस्तीत राहण्याची सवय लावणे, सर्वत्र शिस्त-पालन करणे हा सर्वात उत्तम सद्गुण सिद्ध होणार आहे. आपल्यामुळे दुसऱ्या कोणाला त्रास होणार नाही अशी दक्षता घेतली पाहिजे. आपली कर्तव्ये आपण जबाबदारीने पार पाडली तर शिस्तबद्ध जीवन जगता येईल. शिस्तीमुळे चांगलं काम करायला आपल्याला प्रोत्साहन मिळेल, आपलं मन निर्मल नि संतुष्ट होईल.





# सासू नि सून

श्रीपुर नावच्या गावी एक शेतकरी रहात असे. त्याचं नाव भूषण. त्याची बायको कामाक्षी मोठी कजाग बाई होती. तोंडाला येईल ते बडबडत असे.

भूषण आणि कामाक्षी दंपतीला तीन मुली नि एकच एक मुलगा होता. दोन मोठ्या मुली नि मुलगा आई जे म्हणेल त्याला मान तुकवीत. आई विरुद्ध काही बोलण्याचे धाडस ते करीत नसत. म्हणून या तिघांच्या बाजूने कामाक्षी निश्चिन्त असे. तिसरी मुलगी चंदना आपल्या वडिलांसारखी होती. ती कोणाशी फार बोलत नसे.

दुसऱ्यांशी कसे वागावे, मोठ्यां बद्दल आदर कसा दाखवावा, लहानांशी कसे प्रेमाने वागावे, आपल्या बरोबरीच्यांशी कशी मित्रता राखावी, वगैरे विषयांवर आई-वडील तिला आपापल्या परीने समजावीत.

चंदना उपवर झाली तेव्हा कामाक्षीने नवऱ्याची परवानगी न घेताच केशव नावाच्या एका तरुणाशी तिचे लग्न लावून देण्याचा निश्चय केला.

एक दा चंदनाची एक मैत्रीण विमला तिला भेटायला कामाक्षीच्या घरीं आली. एक वर्षापूर्वी विमलाचे लग्न झाले होते. दोघी मैत्रिणी गप्पा-गोष्टी करीत बसल्या होत्या. एवढ्यात मधेच कामाक्षीने येऊन विमलाला विचारले—"विमला, कसं काय हल्ली चाललंय तुझं?"

विमलाची सासू बारीक-सारीक गोष्टीत नाराज होत असे. सुनेनं केलेलं कुठलं ही काम तिला आवडत नसे. विमला यामुळे फार कष्टी होई.

रेवती रणनवरे

एकदा तिने आपल्या नवऱ्याकडे सासूबद्दल तक्रार केली. तिला कसा त्रास होतो हे सविस्तार तिने नवऱ्याला सांगितलं. सगळं ऐकून नवरा फक्त एवढंच म्हणाला-"आई म्हणेल तसं करीत जा!"

हे. ऐकून कामाक्षी विमलाला म्हणाली-"सुनेने सासूशी जरा कठोरपणेच वागले पाहिजे."

मैत्रिणीशी आणखी काही गप्पा-गोष्टी करून विमला आपल्या घरी निघून गेली. तेव्हा कामाक्षीने चंदनाला उपदेश केला—"तुझी मैत्रीण काय म्हणत होती, नीट ऐकलंस ना? उद्या लग्न करून सासरी गेलीस, तर सासूच्या प्रत्येक गोष्टीला मान तुकवू नकोस. तिच्या प्रत्येक म्हणण्याला हो म्हणत गेलीस तर तू संपलीच. सासूला आपल्या कह्यात ठेवलंस, तर तुझी धडगत!" आईचा सगळा उपदेश चंदनाला चांगला पटला.

केशवशी चंदनाचं लग्न थाटामाटात पार पडलं. चंदनाची सासू पार्वती मोठ्या शांत स्वभावाची होती. सर्वांशी ती प्रेमाने वागे. पण कुणी काही चूक केली तर मात्र ती तिला सहन होत नसे.

चंदना ज्या दिवशी सासरी आली. त्या दिवशी पार्वती स्वयंपाक-घरात काम करीत होती. तिथूनच सुनेला बोलावून तिने सांगितलं "अंधार पडू लागलाय, दिवा लाव."

तरी पण चंदनाने दिवा लावला नाही. थोड्या वेळाने सासू स्वयंपाक-घरातून बाहेर आली. तिनेच दिवा लावला नि सुनेला विचारलं-"सुनबाई, मी दिवा लावायला सांगितलं. तू दिवा नाही लावलास. ऐकू का नाही आलं तुला?"

यावर चंदनानं उत्तर दिलं-"माहेरी आई मला काही काम नाही करू देत!"

पार्वतीने समजावलं—"अग ते माहेर आहे. तिथं तुला लहान मुलगी समजलं जातं. माहेरी काही काम न केलं तरी चालतं. हे सासर आहे, इथं तुला घर संभाळायचंय. काम केलंच पाहिजे."

हे सगळं ऐकून चंदनाला वाटलं—"सासू पहिल्या पासूनच सगळी कामं माझ्याकडून करून घ्यायचा घाट घालते आहे."

इथूनच सासू-सुनेचं प्रच्छन्न युद्ध सुरू झालं. सासूने काही ही सांगितलं तर चंदना नेमके त्याच्या विरुद्ध करी. होय म्हणजे नाही, नि नाही म्हणजे होय! सुनेच्या अशा वागण्यावर सासू नाराज होई.

केशवच्या लक्षात आलं की आई नि सुनेचं काही पटत नाहीये दोघी एकमेकींवर असंतुष्ट आहेत. त्याला हे ही समजलं की चूक आपल्या बायकोची आहे. चंदनाला तो काही बोलला की ती रागावत असे. अशा रीतीने नवरा-बायकोची भांडणं सुरू झाली.

अशातच विमला एकदा आपल्या मैत्रिणीला भेटायला आली. सासरी चंदनाचं कसं काय चाललंय हे तिला पहायचं होतं.

चंदनाने काही न लपवता साऱ्या गोष्टी







विमलाला सांगितल्या. ती म्हणाली- ''माझ्या सासूमुळे हल्ली आम्हा नवरा-बायकोत सुद्धा भांडणं व्हायला लागली आहेत!''

विमलाला आपल्या मैत्रिणीच्या या वागण्याचं मोठं आश्चर्य वाटलं. आपलं आश्चर्य प्रकट करीत ती म्हणाली—''चंदना, तू मोठी अडाणी नि भोळी-भाबडी आहेस. तू जे काही सांगत आहेस, त्याचा सारांश मला तरी एवढाच दिसतोय की तुझी सासू फार चांगली बाई आहे. अशी सासू तुला मोठ्या भाग्याने मिळालेली आहे. तूच तिच्याशी कठोरपणे वागत आहेस!''

अमळ विचार करीत चंदना म्हणाली-''तुझं म्हणणं बरोबर आहे! तुला आठवतंय माझ्या लग्नापूर्वी तू एकदा माझ्याकडे आली होतीस. तेव्हा तू म्हणत होतीस–'सासू जे म्हणेल ते मी करते. तरी पण सासूचं शेपूट आपलं नेहमी वाकडंच! नित्या माझ्या कामावर टीका करीत असते' तुझं सगळं बोलणं ऐकून आईने मला सल्ला दिला होता. सासूची प्रत्येक गोष्ट ऐकून मान तुकवू नकोस, तिला आपल्या ताब्यात ठेव. आईच्या उपदेशानुसार मी सर्व काही करीत आहे.

यावर आणखी आश्चर्य प्रकट करीत विमला म्हणाली—''माझ्या नि तुझ्या सासूत कुठेच समानता दिसत नाही. तू आता सासरी आली आहेस. माहेरच्या गोष्टी विसरून जा. तुझ्या आईने तुला जो बदसल्ला दिला, तो विसरून जा. जाणून-बुजून आपल्या कुटुंबाला आगीत ढकलू नकोस. इतकी सुरेख सासू नि नवरा मिळाल्याबद्दल आपल्याला धन्य मान. आईचा उपदेश लक्षात ठेवून व्यर्थ आपलं जीवन दुःखमय बनवू नकोस.'' नंतर तिने चंदनाला सासरी कसं वागावं नि आपल्या घराला स्वर्ग कसं बनवावं हे ही समजाऊन सांगितलं.

चंदनाने विमलाचे म्हणणे नीट ध्यानपूर्वक ऐकून घेतले नि म्हणाली— ''ठीक आहे, काही दिवस तुझ्या सल्ल्यानुसार करून पाहते. काय परिणाम होतोय पाहू या.'' आणि विमला आपल्या घरी निघून गेली.

दुसऱ्या दिवशी चंदना भल्या पहाटे उठली, स्नान करून तिने स्वयंपाक-घरात प्रवेश केला. सकाळी उठून कधी स्नान न करणारी सून आज आंघोळ करून स्वयंपाक घरात आलेली पाहून पार्वती खूष झाली.

तिसऱ्या दिवशी सकाळी आंगण स्वच्छ करून पार्वती सडा घालायला लागली तेव्हा चंदना सासूपाशी येऊन म्हणाली—''सासूबाई, तुम्ही राहूं द्या. मी सडा घालून रांगोळी काढते.'' चंदनाने सडा घातला नि छान रांगोळी काढली.

सुनेत एवढा बदल झालेला पाहून खूष होऊन सासू ज्याच्या त्याच्याकडे सुनेचे गुणगान करू लागली—''पाहिलंत, माझ्या सुनेने किती छान रांगोळी काढली आहे!''

सासूच्या या वागणुकीमुळे चंदनाच्या मनात सासूबद्दलचा आदरभाव दुणावला. तिच्या दृष्टीने सासू एक आदर्श सासू नि उत्तम स्त्री बनली.

काही दिवसांनी चंदना गर्भवती झाली. सासूच्या आनंदाला पारावार राहिला नाही. सुनेला ती पूर्ण विश्रांति देऊ लागली. स्वतः स्वयंपाक करून सुनेपुढे वाढलेलं ताट येऊं लागलं. चंदना एक दिवस हसत हसत म्हणाली—''सासूबाई, माझ्याच्याने भोजन घेणं जमलं नाही, तर उद्या तुम्ही स्वहस्ते माझ्या तोंडात ही घास घालाल असं वाटतंय!''

मंदस्मित करीत पार्वती म्हणाली— ''होय चंदना, तुझ्यासारखी सून मिळाली तर तिच्या तोंडात घास देण्यात काही कमीपणा का आहे?''



# हिंसक प्रवृत्ति

विभूतिपुरिचा राजा विकटसेन स्वतः हिंसात्मक स्वभावाचा होता. युद्ध करणं, बंदी म्हणून पकडलेल्या लोकांना मारून टाकणं, देवाला बळीच्या नावावर असंख्य मूक जिवांची हत्या करणं त्याला स्वभावतः फार आवडे.

मंत्री धर्मकीर्तीचा हितोपदेश राजा एका कानाने ऐकून दुसऱ्या कानाने सोडून देई. 'यथा राजा तथा प्रजा' या न्यायानुसार राज्यात हिंसेची प्रवृत्ति वाढत चालली होती.

अशात सत्यानंद नावाचा एक साधु मंत्र्याच्या निमंत्रणावरून राजाला भेटायला आला. त्याने राजाला पुराण, उपनिषदे, श्रुति आणि स्मृति ग्रंथातील अनेक कथा ऐकवल्या आणि अहिंसा ही कशी श्रेष्ठ प्रवृत्ति आहे हे समजावलं. हिंसेचा का त्याग करावा हे सत्यानंदाने मोठ्या रोचक पद्धतीने राजाला सांगितले.

राजा विकटसेन हात जोडून साधूला म्हणाला-"स्वामी, आपण माझे गुरु. मी आपल्याला काय गुरु-दक्षिणा द्यावी ते सांगा."

मंदस्मित करीत साधु म्हणाला-"राजा, तुझ्या राज्यात हिंसेचे तांडव चालू आहे. तू आणि तुझी प्रजा यांनी अहिंसा-व्रताचे पालन करावे. हीच माझी गुरु-दक्षिणा!"

"जरूर!" म्हणून विकटसेनने आपल्या सेनापतीला बोलवलं नि आज्ञा दिली-"सेनापति, आजपासून आपल्या राज्यात सर्वांनी अहिंसा-व्रताचं पालन करायचंय! माझ्या आज्ञेची तावडतोब अंमलबजावणी व्हावी. दवंडी पिटवून सर्व नागरिकांना सावध करा, जर कोणी अहिंसेचे पालन केले नाही तर मागचा-पुढचा विचार न करता त्याला ठार मारून टाका. हीच माझी आज्ञा आहे."

मंत्री धर्मकीर्ति आणि साधु सत्यानंद यांनी राजाची ही आज्ञा ऐकली आणि डोक्याला हात टेकले.





# अद्भुत फूल

## ३

(राजगुरु गौरीनाथने राजा प्रतापवर्मा आणि राजकुमारी प्रियंवदाला शताब्दि फुलाच्या शापाबद्दलची सविस्तर हकिकत सांगितली. सेनापती गम्भीरवर्माने येऊन राजाला बातमी दिली की, माणिक्यपुरीच्या दक्षिण प्रान्तातील समुद्रतटावरील गाव आणि तेथील घरे अचानकपणे धराशायी झाली आहेत. अन् भयभीत झालेली प्रजा वाट फुटेल तिकडे धावत सुटली आहे—यानंतर)

समुद्रतटीची घरे अचानकपणे का कोसळली याबद्दल कोणीच काही बोलू शकेना. त्या दिवशीची रात्र तर अगदी शान्त होती. कुठे पाऊस पडला नव्हता कि कुठे समुद्रात वादळही झाले नव्हते! सकाळी उठून पहातात, तर घरे आपली जमीनदोस्त झालेली! प्रत्येक जण आपापल्या परीने विचार करत होता की असे का झाले? पण कोणीच कोठल्या निर्णयावर मात्र येत नव्हते! बास, प्रत्येकाला आपल्याच जगण्याची काळजी पडली होती. कशाही प्रकारे जीव वाचवून तेथून पळून जाणे एवढेच त्यांच्या हातात उरले होते. त्यांची अशी धारणा होती की अजून थोडा वेळ जरी इथे थांबलो, तर आपल्या जिवावर बेतेल! भयभीत



जनता अशा तऱ्हेने लक्ष्यहीन होऊन वेडी-वाकडी पळत सुटली होती!

पळून गेलेली काही भयभीत माणसे राजधानीत पोचली. नगरद्वारावर तैनात असलेल्या सैनिकांनी ही वार्ता सेनापतीला सांगितली. सेनापतीच्या आज्ञेवरून सैनिक त्या लोकांना खास बनवलेल्या शिबिरात घेऊन गेले. काही शरणार्थींनी मन्दिराच्या प्रांगणात आश्रय घेतला, तर काहींनी कालच्या रात्री वसंतोत्सव साजरा झालेल्या मैदानात. शरणार्थींनी अशा प्रकारे आपली रात्र घालवली.

राजकुमारी प्रियंवदा आपल्या सख्यांसह या व्यवस्था कार्यात सामिल झाली. राजवाड्याचा कोणता भाग स्त्रिया व मुलांच्या उपयोगी पडेल याची तिने पहाणी केली. काही निर्णय घेऊन तिने अशी ठिकाणे रिकामी करवली अन् शरणार्थींनी बिनधास्त तेथे मुक्काम केला. हे काम होता होता अर्धी रात्र निघून गेली.

सकाळ झाल्याबरोबर राजा प्रतापवर्मा सेनापती गंभीरसिंह सह शरणार्थींची विचारपूस करायला निघाला. राजाला पहाताच प्रजेने मोठ्या दीनपणे सांगितले, "घर-दार, जनावरं, संपत्ती वगैरे सर्व काही सोडून आम्ही इथे येऊन पोचलोत महाराज! आम्हाला परत तिथं जायलाही भिती वाटतेय. अन् परत गेलो तरी आमची खात्री आहे की सगळ्याचा नाशच झालेला असणार! कोणत्या क्षणी, कुणावर कसं संकट कोसळेल सांगवत नाही."

"तुम्हा लोकांच्या संरक्षणाचा भार माझ्यावर आहे. तुमचे प्राण किंवा संपत्तीचं कोणतंच नुकसान होणार नाही. तुम्ही सर्वांनी निश्चिन्त असा." असे म्हणत राजाने प्रेमाने त्यांचे सांत्वन केले, आणि सेनापतीकडे पाहिले.

"कालच काही लोकांना दक्षिण प्रान्ताकडे पाठवलंय महाराज!"

"छान, फारच छान!" राजा संतोषाने म्हणाला.

"एक शुभसमाचार आहे महाराज! ज्या स्त्रिया अन् मुलं शरणार्थी बनून आलीयत, त्यांच्या रहाण्याची व्यवस्था स्वतः राजकुमारीने राजवाड्याच्या पश्चिम भागात केलेली आहे. राजकुमारीच्या दासींनी मला सांगितलं की या व्यवस्थेत त्यांनी काल मध्यरात्रीपर्यन्त अविश्रान्त काम केलंय."

"हाँ, गरीबांसाठी झटायची प्रवृत्ति प्रियंवदेत लहानपणापासूनच आहे. ठीक आहे, तिथं ही जाऊन कशी व्यवस्था आहे ते पाहू या." राजा म्हणाला.

"जशी आज्ञा," म्हणत सेनापती राजाच्या मागे मागे चालू लागला.

राजा व सेनापती राजप्रासादाच्या पश्चिम भागात पोचले, तेंव्हा त्यांना दिसले की, तेथे स्त्रिया, पुरुष रांगेने बसले होते. त्यांच्यासमोर पत्रावळी मांडलेल्या होत्या. थोड्याच वेळात राजकन्येच्या दासी भोजन पदार्थांची भांडी आणून पदार्थ वाढू लागल्या. सर्वांना जेवताना पाहून राजाला संतोष वाटला. तो म्हणाला, "प्रियंवदा, तुझा उदार स्वभाव प्रशंसनीय आहे. पीडितांची सेवा करण्यानेच मानवजन्म सार्थ होतो. हे सत्य जाणून तू जी सेवा करते आहेस याबद्दल तुझी तारीफ करावी तेवढी थोडीच! तुझ्याबद्दल मला मोठा अभिमान वाटतोय. हे गरीब लोक सदा तुझं गुणगान करत रहातील. जोपर्यन्त ते इथे आहेत,





तोपर्यन्त त्यांच्या सुखसोयींचा सारा भार मी तुझ्यावर सोपवत आहे.''

होकारात्मक डोके हलवत राजकुमारी हसत बोलली. ''बाबा, तुम्ही इथल्या व्यवस्थेबद्दल निश्चिन्त रहा. त्यांना काही कमी पडणार नाही, याची जबाबदारी माझी! तुम्ही आता अन्यत्र असणाऱ्या शरणार्थींचाच फक्त विचार करा.'' ती हे सारे मोठ्या विनयानेच बोलली.

राजा व सेनापती तेथून निघून जेंव्हा राजप्रासादाजवळ पोचत होते, तेंव्हाच चार सैनिक त्यांच्या जवळ येऊन पोचले. त्यांना पाहून असे दिसत होते की, ते कशामुळे तरी खूपच घाबरलेले आहेत.

त्यांना पाहून सेनापतीने विचारले, ''अरे, काय झालं? घाबरे का झाला आहात इतके?''

''प्रभु, काल दक्षिणी भागात गेलेले आपले सैनिक नाहीसे झालेत! त्यांचा काही पत्ताच लागत नाहीये!'' सैनिक बोलले.

सेनापतीने एकदम रागावून विचारले, ''झालं काय त्यांचं?''

''ते कुठं आहेत, हे सांगायला कुणी शिल्लक असेल तर ना! आज सकाळी आपले सैनिक तिथे पोचले, तेंव्हा त्यांना आढळलं की तिथे कोणीच नाही! सर्वत्र केवळ भयाण शान्तता! अन् याशिवाय आणखीही काही गावं बरबाद झालेली आहेत!'' घाबरलेल्या सैनिकांनी आणखी बातमी दिली.

सेनापतीने विचारले, ''आज सकाळी गेलेले सैनिक तरी परतलेत की नाही?''

''तीन सैनिक येऊन पूर्ण विवरण देऊन गेलेत. त्यांच्या बरोबर आपला दलाधिपती वीरसिंहही गेलेला आहे.'' सैनिक उत्तरले.

सेनापतीने आज्ञा दिली की, वीरसिंहने परत आल्याबरोबर त्याला भेटावे.

''जशी आज्ञा.'' असे म्हणून सैनिक तेथून निघून गेले.



''इथे असणाऱ्या लोकांना आणखी घरं कोसळल्याची बातमी कळली तर ते फारच घाबरून जातील अन् हाहाःकार माजेल; म्हणून ही बातमी आपल्यापुरतीच ठेवावी. समुद्र तटावर गेलेला आपला दलपती परत आल्यावर कदाचित आपल्याला अधिक सैन्य तिकडे पाठवावे लागेल. म्हणून सैन्य अगदी तयार ठेवा. जरूर पडल्यावर लगेच कूच करायला सोपं पडेल.'' राजा म्हणाला.

''असंच करू या महाराज! दलपती आल्याबरोबर मी आपणाला येऊन भेटेन.'' असे म्हणून सेनापती तेथून निघून गेला.

सैनिकांबरोबर समुद्रतटावर गेलेला दलपती त्या दिवशी संध्याकाळी घाबराघुबरा परत आला अन् सेनापतीला भेटला.

''काय झालं? तुझा चेहरा इतका पाढंरा का पडलाय? तिथे खरं काय घडलं ते पाहूनच असा परत आलायस का?'' सेनापतीने विचारले.

''सगळंच काही भारी विचित्र आहे प्रभु! आपले काल संध्याकाळी गेलेले सैनिक समुद्रतटावर पोचले होते यात संशयच नाही. कारण त्यांच्या पाऊलखुणा अगदी स्वच्छ दिसताहेत! पण ते तिथे पोचल्यानन्तर काय घडलं हेच कळत नाहीय! कारण ते सांगायला, नावालाही एक माणूस इथे हजर नाहीय.''





दलपतीने सांगितले.

सेनापतीने विचारले, "मग आता काय करावंसं वाटतंय तुला?" समुद्रतटावर आपले जे लोक आहेत, त्यांना एकाच जागी एकत्र ठेवण्यापेक्षा त्यांना तीन संघात विभाजित केलंय, पहिला संघ समुद्रतटावर राहील, दुसरा त्यांच्यापासून जरा दूर अन् तिसरा त्याहीपेक्षा आणखी जरा दूर राहील. तीनही संघात आपसात वार्ता पोचवल्या जातील अन् त्यांनी अगदी सावध रहावं अशी सूचना त्यांना देअूनच आलोय मी. आपण परवानगी दिलीत तर सकाळीच एकदा मी जाअून येईन तिथे!" दलपती अुद्गारला.

सेनापती आनन्दाने म्हणाला, "शाबास, असंच कर." नंतर तो राजभवनात गेला अन् त्याने राजाला संपूर्ण अहवाल ऐकवला. तेथून तो शरणार्थींच्या शिबिरात गेला. तेथे असलेल्या कोणालाही खाणेपिणे व विश्रान्ती याबाबत काहीच त्रास झाला नव्हता. त्याने जेंव्हा पाहिले की केवळ सैनिकच नव्हेत, तर सामान्य नागरिकही तन, मन, धनाने त्यांची सेवा करत आहेत, तेंव्हा त्याला फार बरे वाटले.

दुसऱ्या दिवशी सकाळीच दलपती वीरसिंह सेनापतीच्या घरी आला. त्याला पहाताच सेनापतीने अुत्सुकतेने विचारले. "हं बोल, कशी आहे तिथली परिस्थिती?"

"प्रभु, फारच भयंकर आहे तिथली परिस्थिती! मी जेंव्हा निघून येत होतो, तेंव्हा सैनिकांनी येअून सांगितले. त्याचं असं म्हणणं आहे की ते भूत पुन्हा आलं आहे." दलपतीने सांगितले.

मोठया आश्चर्याने सेनापती अुद्गारला, "भूत?"

"होय, बरोबर मध्यरात्री समुद्राच्या पाण्यातून पर्वतकाय भूत बाहेर येताना सैनिकांनी स्वत:च्या डोळ्यांनी पाहयलंय. ते जमिनीवरून चालतंय की आकाशातून अुडतंय हे कुणाला कळलंच नाही. पण

हाँ, ते जेंव्हा इकडे तिकडे पहातं, डोकं हलवत हळूहळू चालू लागतं तेंव्हा त्याच्या पायाखालची घरं, घरातले जीव, झाडं वगैरे सर्व तुडवलं जातं अन् जमिनीत आत दाबलं जातं. त्यांचं काही चिन्ह ही मागे अुरत नाही. अगदी बिलकुल आवाज न करता, डोकं तेवढं हलवत ते अुत्तर दिशेकडे निघून गेलंय. समुद्रतटावरचे आपले सैनिक त्याच्या पायांखाली तुडवले गेले आहेत. त्यांच्यापासून काही अंतरावर असणाऱ्या सैनिकांनी भुताची मागची बाजू तेवढी पाहूयलीय; त्याचं तोंड नाही दिसलं त्यांना. ते भयभीत होअून पळतच सुटले. मग तोंड बघायची कसली शुद्ध!" दलपति घाबरत बोलला.

"हे काय प्रकारचं भूत असेल?" ते तर अुत्तरेकडे निघून गेलं." सेनापती मनातल्या मनात बडबडत होता.

"होय, सेनापती! आपल्या सैनिकांनी त्याच्याशी सामना केला असता तर तेही त्याच्या पायांखाली चिरडून जमिनीत गाडले गेले असते. घाबरून परत पळून आल्यामुळेच त्यांच्याकडून आपल्याला ही समग्र वार्ता कळू शकली." वीरसिंह म्हणाला.

थोडा वेळ विचार करून नंतर सेनापती म्हणाला, "तू म्हणतोस की ते अुत्तरेकडे गेलंय. पण ते समुद्रातून आलंय म्हणून सकाळ होण्यापूर्वीच पुन्हा समुद्रात मिसळून गेलं असेल. आपले काही सैनिक अुत्तरेकडे पाठवा; तिथेही नक्कीच काही अुत्पात घडला असेल! दक्षिण समुद्रतटावर पहिल्याप्रमाणेच आपले सैनिक अुभे ठेवा. काल रात्री प्रमाणेच त्यांचे तीन गट करून पहारा चालू ठेवा. त्या विचित्र भुताबद्दल अधिक काही कळलं तर मला कळवा. मी तुम्ही सांगितलेल्या गोष्टी महाराजांना सांगून येतो. प्रजेला या धोक्यातून वाचवणं हे आपलं कर्तव्य आहे."

पुढे चालू



# खरा मित्र

दृढनिश्चयी राजा विक्रमादित्य पुन्हा झाडाजवळ आला आणि वर चढून त्याने प्रेत उतरवले. ते प्रेत खांद्यावर टाकून तो नेहमीप्रमाणे स्मशानाची वाट चालू लागला. तेंव्हा प्रेतातील वेताळ बोलू लागला-"राजा, या अर्ध-रात्रीच्या वेळी तू खरं म्हणजे आपल्या अंतःपुरात सुखाने झोपायला हवे. पण असं न करता तू मोठ्या निष्ठेने धडपडत आहेस. तुझे हे सर्व प्रयत्न बहुधा निष्फळ होतात हे तुला माहीतच आहे. मला वाटतं तू आपला हा हट्ट सोडून द्यावास. पण तू तर आपला हट्ट धरूनच बसला आहेस! याला तुझा विवेक म्हणावं की मूर्खपणा हे मला समजत नाही. पुष्कळ माणसं अशी असतात, ज्यांना आपल्या सद्यःस्थितीबाबत संतोष नसतो. अधिक प्रगति करण्याचे सामर्थ्य त्यांच्यात असते, पण या आपल्या शक्तीची जाणीव मात्र

वेताळाच्या गोष्टी



त्यांना नसते. यामुळेच ही माणसे आपल्या वर्तमान परिस्थितीशी झगडण्याचा प्रयत्न करीत नाहीत व निराश अवस्थेत आपला बहुमूल्य वेळ फुकट दवडतात. काही माणसे परिस्थितीशी झगडण्याचे धाडस तर करतात, पण त्यांच्या हे लक्षात येत नाही कीं आपले ध्येय प्राप्त करण्यासाठी खरोखरीच कोणता मित्र आपल्याला साहय करील. यामुळे ते चुकीच्या मार्गावर वाटचाल करतात. तू ही एक तसाच माणूस असावास अशी शंका मला येत आहे. मी तुला रामनाथ नावाच्या एका माणसाची गोष्ट सांगतो. ती ऐकून तू थोडा सावध होशील आणि तुला काही मार्गदर्शन ही मिळेल." आणि वेताळ आपली गोष्ट सांगू लागला.

रामनाथ एक छोटा व्यापारी होता. त्याच्या बायकोची शहरात जाऊन तेथे व्यापार करण्याची फार इच्छा होती. रामनाथला अनेक विद्या येत होत्या. तो छान गायचा, सुंदर चित्र काढायचा. या त्याचा कलांचा व्यापाराशी काही संबंध नसला, तरी त्याची हौस दांडगी. तो लोकांशी गोड बोले, त्यामुळे सर्व जण त्याच्यावर संतुष्ट असत. गावातील सर्व लोकांशी त्याचा चांगला परिचय होता. त्यामुळे खरेदीसाठी त्याच्या दुकानावर जे लोक येत, त्यांच्यापैकी काही रोख सौदा करीत काही उधार! उधारीचे पैसे वसूल करण्यासाठी तो कुणाला त्रास देत नसे. यामुळे घर-खर्चासाठी आवश्यक पैसे त्याला मिळत, पण व्यापारात त्याची विशेष प्रगति होत नसे. तो जसा होता तसाच राहिला. त्याला फार अधिक फायदा कधी झाला नाही.

शहरात कोणाशी त्याचा विशेष परिचय नव्हता. तेथे काही काम केले, तर त्याला चांगले पैसे मिळवता येतील असा बायकोने सल्ला. त्याने शहरात जाण्याचा निश्चय केला. गावातला जमीन-जुमला विकून टाकला आणि बैलगाडीत बसून शहराकडे जायला



निघाला.

थोडं दूर गेल्यावर गाडीचा आस तुटला. गाडीच्या चालण्यातील दोष लक्षात येताच गाडीवानाने गाडी थांबवली नि नवरा बायकोला खाली उतरायला सांगितलं.

आता शहरात कसे जावे याचा दोघे जण विचार करू लागले. इतक्यात समोरून एक बैलगाडी येताना दिसली. गाडीवानाने त्या गाडीला थांबवलं नि आतील लोकांकडे मदतीची याचना केली.

लांब-लांब मिशांवाला एक माणूस खाली उतरला.

रामनाथकडे पाहताच त्याला वाटलं की आपण याला कुठं तरी पाहिलं आहे खास! जेव्हां दोघांना एकमेकांची ओळख पटली तेव्हा दोघांनी एकमेकांना मिठी मारली.

सत्यानंदने गाडी दुरुस्त करण्यासाठी रामनाथला मदत केली आणि म्हणाला-"एका महत्त्वाच्या कामासाठी मी दुसऱ्या गावी निघालो आहे. माझा पत्ता आणि घराच्या खाणाखुणा तुम्हाला सांगतो. मी परत येईपर्यंत तुम्ही दोघांनी माझ्याकडेच राहिलं पाहिजे."

दोन दिवस प्रवास केल्यानंतर त्यांची गाडी शहराच्या सरहद्दीवर पोचली व एका अरुंद बोळातून जाऊ लागली. समोरा समोरून येणाऱ्या दोन गाड्या या



बोळात एकमेकींना ओलांडू शकत नव्हत्या. एक गाडी बोळात मधेच थांबलेली होती. गाडीत बसलेला माणूस खाली उभ्या असलेल्या माणसाशी बोलत होता. रामनाथने आपल्या गाडीवानाला त्याच्याकडे पाठवलं आणि सुचवलं की ही गाडी पुढे गेली तर आपली गाडी त्या रस्त्याने पुढे जाऊ शकेल.

तो गाडीवान म्हणाला-"ही धनशेखरजींची गाडी आहे. ही गाडी किती ही वेळ इथे उभी राहू शकते."

गाडीवान निराश होऊन परत आला आणि रामनाथला सर्व सांगितले. हा धनशेखर कोण आहे हे पाहण्यासाठी



रामनाथ गाडीजवळ गेला. त्याच्या लक्षात आलं की हा दुसरा-तिसरा कोणी नसून त्याचा बालपणचा मित्र धनशेखरच आहे. दोघांनी एकमेकांना ओळखलं आणि मोठ्या आनंदाने एकमेकांना आलिंगन दिले.

धनशेखर त्यावेळी एका दूरच्या गावी काही महत्त्वाच्या कामासाठी एका माणसाला भेटायला निघाला होता. आपल्या बालपणाच्या मित्राला भेटून त्याला इतका आनंद झाला की त्याने आपले बाहेर गावी जाणें रद्द केले. आतापर्यंत खाली उभ्या असलेल्या ज्या माणसाशी तो बोलत होता त्याला उद्देशून म्हणाला-''नरसिंह, आपला प्रवास स्थगित केल्याची बातमी मी बलभद्रला देऊन येतो. तू यांना बरोबर घेऊन आपलं घर दाखव.

काही वेळानंतर रामनाथ सीतेला म्हणाला-''सत्यानंदने किती प्रेमाने आपल्याला त्याच्या घरी जायला सांगितलंय. मला वाटतं अगोदर आपण त्याच्याच घरी जाऊ या.''

यावर सीता म्हणाली-''आपण धनशेखरकडेच गेलं पाहिजे.''

रामनाथ यावर काही बोलू शकला नाही. धनशेखरचं घर दाखवीत नरसिंह म्हणाला-''त्यांनी मला आपल्याला घर दाखवायला सांगितलं, घरात घेऊन जायला नाही सांगितलं. त्यांनी जे सांगितलं त्याहून अधिक काही केलेलं त्यांना आवडणार नाही.''

नरसिंहाच्या या वागणुकीचे रामनाथला मोठे आश्चर्य वाटले. इंद्राच्या महालासारख्या त्या मोठ्या हवेलीत नवरा बायकोने प्रवेश केला. दारावरील पहारेकऱ्याने सर्व जाणून घेतले व त्यांना तेथेच थांबायला सांगून तो आत गेला. थोड्या वेळाने धनशेखरची बायको कामाक्षी बाहेर येऊन म्हणाली-''तुम्ही कोण हे मला माहीत नाही. माझे पतिदेव या शहरातले एक प्रतिष्ठित गृहस्थ



आहेत. त्याचं नाव कुणाला माहीत नाही? म्हणून त्यांचा मित्र म्हणून पुष्कळ लोक येत-जात असतात. इथे येणारी काही माणसं संधि साधून चोऱ्या ही करतात. म्हणून ते येईपर्यंत आपण इथेच थांबाल का? जर खरोखरीच तुम्ही त्यांचे मित्र असाल तर आपल्या चुकीबद्दल मी आपली क्षमा मागेन. माझ्या बोलण्याबद्दल कृपया वाईट वाटून घेऊ नका.

रामनाथला आपला अपमान झाल्यासारखं वाटलं. पण अपमान गिळून तो म्हणाला-''देवीजी, आपल्या पतिराजांनी इकडेच येण्याबाबत फार आग्रह केला. म्हणून आम्ही इथे आलो. त्यांनी आग्रह केला नसता तर आपले बालमित्र सत्यानंद यांच्याकडे आम्ही केव्हाच गेलो असतो.

रामनाथच्या या बोलण्याचं कामाक्षीला मोठं आश्चर्य वाटलं. ती म्हणाली-''सत्यानंदचे जे मित्र आहेत, ते आमचे मित्र होऊच शकत नाहीत. त्यांच्या घरावर उडणारा कावळा आमच्या घरावर उडू शकत नाहीं हे कदाचित् आपणास माहीत नसावं. मला वाटतं आपण नक्कीच काही तरी खोटं बोलत आहात!''

रामनाथ एक क्षण भर तिथे थांबला नाही. आपल्या बायकोसह तो बाहेर आला. तो बायकोला म्हणाला की या



अपमानाला तू जबाबदार आहेस. यावर चिडून सीता म्हणाली-''होय, तुमचे मित्र तुमच्या दृष्टीने सगळे चांगले, आणि मी तेवढी वाईट काय? एका श्रीमंताच्या घरची ही अशी स्थिति, आता त्या गरीबाकडे काय होणार आहे कोणाला ठाऊक? आता आपण कुणाच्या घरी जायला नको. एकाद्या खाणावळवालीच्या घरी-जाऊ नि तिथेच राहू.''

रामनाथला बायकोचं म्हणणं पटलं. ते दोघे एका म्हाताऱ्या खाणावळवालीकडे गेले. म्हातारीने अगोदर त्यांच्याकडून सर्व माहिती काढून घेतली आणि म्हणाली-''तर तुम्ही सत्यानंदच्या गावचे



काय? तुम्हाला इथं राहण्याची परवानगी मी देऊ शकणार नाही."

रागाने लाल होत रंगनाथने विचारले-"तर मग सत्यानंदच्या गावातील लोकांना तुझ्यासारख्या म्हातारीकडे राहता येणार नाही काय?"

म्हातारीने स्पष्टीकरण दिले-"कृपा करून गैरसमज नका करून घेऊं. सत्यानंद तर फार चांगले गृहस्थ आहेत. मी जेव्हा अडचणीत होते, तेव्हा त्यांनीच मला मदत केली. नाहीतर माझे काय झाले असते कोण जाणे? ते तर नेहमी असं म्हणतात की त्यांच्या गावच्या लोकांनी त्यांच्याकडेच राहिलं पाहिजे, माझ्यासारख्या खाणावळवालीकडे नाही. तुम्हीं जर माझ्या घरी राहिलात तर ते मला कधी ही क्षमा करणार नाहीत." तिने एका माणसाला बोलवलं आणि सत्यानंदाच्या घरी निरोप पाठविला.

थोड्याच वेळात सत्यानंदाची बायको तेथे आली आणि म्हणाली-"भाई रामनाथ, आज इथं कुठं? हे आपल्याबाबत खूप सांगत असतात. आपली शेती-वाडीवरील गाणी त्यांच्या खूप स्मरणात आहेत. लहानपणी तुम्ही काढलेली चित्रं अजून यांच्या संग्रहात आहेत. बरेच दिवस तुम्हाला भेटायची इच्छा यांच्या मनात ठाण मांडून आहे. तुमच्या उजव्या गालावर जो डाग आहे, तो यांनी तुम्हाला मारल्याचा प्रसाद आहे असं हे सांगतात! खरं आहे ना? ते सारं आठवलं की यांना फार वाईट वाटतं. आपण दोघे आता इथंच रहा."

रामनाथ आणि सीता यांना आता सत्यानंदच्या घरी राहण्याशिवाय गत्यंतर नव्हते. थोड्या वेळात धनशेखरचा निरोप घेऊन नरसिंह आला-"तुम्हाला धनशेखरजींनी बोलवलं आहे." एकटा रामनाथच तिकडे गेला.

जे काही घडलं त्याबद्दल धनशेखरला पश्चात्ताप झाला. तो म्हणाला-"रामनाथ, मी आणि सत्यानंद यांच्यात



शत्रुत्व आहे. म्हणून मी स्वतः त्याच्या घरी आलो नाही. बलभद्रच्या घरून निघायला अमळ उशीरच झाला. तुझ्यासाठी माझे काम अर्धवट सोडूनच मी परत आलो. घरी आल्यावर जे घडलं ते सर्व समजलं. मला फार वाईट वाटलं. काही दिवसांनी तुला पटेल की जे झाले, त्यात माझी काही चूक नाही. शहरातील परिस्थितीच काही विचित्र असते. काही असो, माझ्या बायकोला क्षमा कर. आता तू आपल्या पत्नीसह माझ्याकडेच रहा. पैसे मिळवण्याची कला मी तुला शिकवेन, माझ्या प्रमाणेच तू ही श्रीमंत होशील."

रामनाथ म्हणाला-"मित्रा, माझ्यावरील तुझ्या प्रेमाबद्दल मी अंतःकरणपूर्वक आभार मानतो. पण आता राहिलो तर सत्यानंदकडेच राहीन, गैरसमज नको करून घेऊस."

धनशेखरने परोपरीने विनंती केली. जर सत्यानंदकडे राहिलास तर माझ्याशी शत्रुत्व पत्करावे लागेल अशी धमकी पण दिली. पण या धमकावण्यामुळे रामनाथ जरा ही बदलला नाही. तो सत्यानंदकडे परत आला.

एवढी गोष्ट सांगून वेताळ राजा विक्रमादित्याला म्हणाला-"राजन्, एक गोष्ट तर सत्य आहे की धनशेखरने जाणून-बुजून रामनाथचा अपमान



केलेला नाही. इतका श्रीमंत असून ही धनशेखरने रामनाथची क्षमा मागितली यावरून त्याची उदात्तताच दिसत नाही का? धनशेखरच्या इच्छेनुसार रामनाथ त्याच्या घरी राहिला असता तर त्याच्या मदतीने तो लखपति बनला असता! ज्या ध्येयासाठी तो शहरात आला होता, त्याची पूर्तता झाली असती. कोण आपला खरा मित्र आणि कोण नाही हे लक्षात न आल्यामुळे चालत आलेली संधि त्याने हातची घालवली. हा त्याचा मूर्खपणाच नाही का? माझ्या या शंकेचं समाधान जाणत असून ही तू केलं नाहीस तर तुझे मस्तक धडावर राहणार नाही हे तुला

माहीतच आहे."

राजा विक्रमादित्य म्हणाला- "रामनाथ असा काही विचार करून खेड्यातून-शहरात आला होता की शहरात त्याच्या कलांना अधिक वाव मिळेल, त्याच्या योग्यतेचे उचित मूल्यमापन होईल. त्याचे दोन मित्र या शहरातील प्रतिष्ठित नागरिक आहेत हे त्याला माहीतच नव्हते. याचा अर्थ असा की आपली स्वतःची शक्ति नि योग्यता यांच्यावर भिस्त ठेवूनच तो शहरात आला होता. रस्त्यात दोन्ही मित्र भेटले ही एक अघटित गोष्ट होय! आता एक गोष्ट उरली की धनशेखर नि सत्यानंद यांच्यापैकी खरा मित्र कोण? एक तर खरं की धनशेखर रामनाथला आपला मित्र समजतो, पण प्रत्यक्ष भेट झाल्यावरच त्याला ही मैत्री आठवते. आपल्या या बाल-मित्राबाबत तो आपल्या बायकोशी कधीच काही बोलला नाही. पण सत्यानंदाची गोष्ट नशी नाही. त्याने आपल्या बायकोला रामनाथ बाबत खूपच सांगितले होते. इतकेच नव्हे तर म्हाताऱ्या खाणावळवालीला सुद्धा आपल्या गांवच्या अनेक गोष्टी त्याने सांगितल्या होत्या. यावरून आपल्या खेड्याबद्दल त्याला किती आपुलकी आहे हे स्पष्ट होते. अशा उत्तम माणसाशी धनशेखरने वैर आरंभिले. हे सर्व जाणून रामनाथने धनशेखरला विश्वसनीय मानले नसेल तर त्यात काय आश्चर्य? दोघांपैकी कोण अधिक चांगला मित्र हे रामनाथने समजून घेतले. चंद्रशेखरची प्रार्थना डावलून सत्यानंदच्याच घरी राहण्याचा जो निर्णय रामनाथने घेतला त्यात मूर्खपणा मुळीच नाही."

अशा रीतीने राजाचा मौनभंग झाल्यावर वेताळ प्रेत सोडून उडून गेला नि झाडाच्या फांदीवर जाऊन बसला.

—वसुंधरेच्या एका कथेवर आधारित



# चांदोबा पुरवणी-५६

आपल्या देशातील पशु-पक्षी

## तरस

हाडं खाणारं जनावर



मांजर म्यांव म्यांव करतं, कुत्रं भुंकतं, मग मांजर नि कुत्र यांच्या संमिश्र स्वरूपाचे हे जनावर काय बरे करीत असेल? ते हंसतं! हे विचित्र जनावर जेव्हा आवाज करतं, तेव्हा खदखदा हंसतं. अशा रीतीने हंसत जेव्हा ते हाडांच्या ढिगाऱ्याच्या चौफेर हिंडतं, तेव्हा ते नाचतंय असं वाटतं.

या जनावराचे पाय कुत्र्यासारखे नि शरीर मांजरासारखं असतं. पण याच्यात मांजराची कोमलता व सौंदर्य नसतं, नि नसते कुत्र्याची चपलता आणि तात. उभे कान असलेल्या तरसाचं डोकं मोठं असतं. मागचे पाय जाड व ठेंगणे असल्यामुळे शरीराच्या मागील भाग थोडा खाली झुकलेला असतो. तरस १५० सें.मी. लांब व १०० सें.मी. उंच असते. खाकी आणि फिक्कट जांभळ्या रंगाच्या याच्या शरीरावर काळे पट्टे असतात. याच्या पायांवर ही काळ्या रेषा असतात.

आपल्या भोजनासाठी तरस कधी शिकार करीत नाही. दुसऱ्या जनावरांनी शिकार करून जे अवशेष उरलेले असतात, ते खाऊन हे आपले पोट भरते. स्वभावाने हे फार भित्रट असते. पण कधी नवजात शिशूंना तरसाने पळविल्याच्या बातम्या कानी येतात.



# आधुनिक भारतीय वाङ्मय

आसाम मधील जंगलांतील टेकड्यांखाली भूगर्भात पेट्रोलियमचा साठा आहे. म्हणून या डोंगरांवर 'दिग्बोई' हे शहर वसले आहे. भारताच्या निरनिराळ्या प्रदेशांतील मजूर इथे येतात. ते निरनिराळ्या धर्मांचे असले तरी एकत्र गुण्या-गोविंदाने राहतात.

चांद अभीर असाच एक मजूर तेथे आलेला असतो. एकदा त्याची बायको आजारी पडते. योग्य औषधोपचार व

## वीरेन्द्रकुमार भट्टाचार्य यांची कादंबरी 'प्रतिपाद'

आहार न मिळाल्यामुळे बिचारी मरण पावते. आईच्या प्रेमाला आंचवलेली मुलगी 'पन्नू' दिसायला मोठी सुरेख असते.

याच शहरात दिनशेखर एक अधिकारी असतो. तो हिंदू असला तरी जहानारा नावाच्या एका मुस्लिम तरुणीशी लग्न करण्याची त्याची इच्छा असते. म्हणून तो मुस्लिम धर्माचा स्वीकार करतो नि नवे नाव घेतो गियासुद्दीन. मुसलमान होऊन त्याने जहानाराशी लग्न तर केले, पण दुर्भाग्याने थोड्याच दिवसात ती आजारी पडली. न्यायासाठी झगडणाऱ्या मोठ्या मनाच्या आपल्या नवऱ्याला सोडून जाताना तिला फार दुःख होते. ती आजारी पडल्यापासून चांद अभीरची मुलगी पन्नू तिच्या बरोबरच राहते, तिची सेवा-सुश्रुषा करते. तिने पन्नूला विनंती केली की तिच्या मरणोत्तर तिने आपल्या नवऱ्याशी लग्न करावे.

चांद अभीर अट घालतो की गियासुद्दीन पुन्हा हिन्दू धर्मात येत असेल तरच पन्नूशी त्याचे लग्न होईल. याच वेळी चॅटर्जी नावाचा एक तरुण पन्नू वर प्रेम करू लागतो. पण लाजून तो आपले प्रेम प्रकट करू शकत नाही. त्याने हे रहस्य आपल्या पुरतेच मर्यादित ठेवले.

दरम्यानच्या काळात शहरातील परिस्थिति खूपच बदलली. वैयक्तिक सुख-दुख विसरून लोक नव्या परिवर्तनाकडे अधिक आकर्षित झाले. मजुरांचं एकत्रित येऊन लढणं ब्रिटिश ऑइल कंपनीच्या मालकांना रुचेना. आधुनिक यंत्रांचा उपयोग करून त्यांनी अनेक मजुरांना कामावरून काढून टाकलं.

मजुरात अशांति माजली, दंगे-धोपे होऊं लागले, मजुरांची एकजूट पाहून मालक घाबरले. त्यांनी विचार केला की या लढाईत जय मिळविण्याचा एकच उपाय म्हणजे मजुरात भेद-भाव निर्माण करणे. हिंदू व मुसलमान यांना



एकमेकां विरुद्ध भडकवण्यात आले. एका माणसाला पैशांची लालूच दाखवून हिंदूंच्या मंदिरात गोमांस ठेवण्यात आले. पण हे करीत असताना तो माणूस पकडला गेला. आणि सर्व कट उघडकीस आला.

दुसऱ्या महायुद्धाच्या प्रारंभीच्या काळातील ही गोष्ट आहे. त्या वेळी ब्रिटिश लोक जाणून-बुजून भारतीयांपासून दूर रहात. इंग्रज व भारतीय यांचे आपापसांतील संबंध दुरावत चालले होते. मजुरांनी संप पुकारल्यावर कंपनीच्या मालकांनी दूरच्या प्रदेशातून मजूर आणवले. स्थानिक मजुरांनी त्यांना यायला प्रतिबंध केला, तेव्हा इंग्रज अधिकाऱ्याने मजुरांवर बेसुमार गोळीबार केला. पन्नूचा बाप चांद अभीर, चॅटर्जी, नुकताच विवाहित झालेला बसवा आणि मंदिरात गोमांस ठेवायला गेलेला बोधन हे सर्व गोळीबारात मृत्यु-मुखी पडतात. बोधनला आपल्या करणीचा पश्चात्ताप होऊन अलीकडे तो मजुरांच्या खांद्याला खांदा देऊन लढत असे.

अिंग्रज लोकात ही काही सहृदय माणसे होती, जी न्यायाचा पक्ष घेऊन अन्याया विरुद्ध लढत. अशा लोकात एक होती श्रीमती प्लेमियास. पीडित जनतेला ती सर्व प्रकारे मदत करीत असे.

कादंबरीच्या शेवटी लेखक सुचवतो-''या लढ्याचा अंत नाही. भविष्याच्या पोटात याहून मोठी वादळे आहेत!''

ज्ञानपीठ पुरस्कार मिळवणारे आसामचे प्रसिद्ध कादंबरीकार श्री. वीरेन्द्रकुमार भट्टाचार्य यांच्या सुप्रसिद्ध कादंबरी 'प्रतिपाद'ची ही कथा आहे. दिग्बोईच्या दहा हजार मजुरांच्या संगठित संपाच्या पृष्ठभूमीवर १९३९ च्या सुमारास ही कादंबरी लिहिली गेली. घटना व पात्रे यांचे चित्रण स्वाभाविक व मर्मस्पर्शी आहे. 'नॅशनल बुक-ट्रस्ट ऑफ इंडिया' ने ही कादंबरी अनेक भाषात भाषांतरित करून प्रसिद्ध केली.

# तुम्हाला माहीत आहे?

१. म्हैसूरच्या टिपू सुलतानच्या राजधानीचं नाव काय?
२. कोणत्या देशाच्या राष्ट्रध्वजावर गरूड पक्षी व सर्प अंकित असतात?
३. इंग्लंड मधे तंबाखूचा प्रवेश कोणी करविला?
४. ३ सप्टेंबर रोजी कोणती प्रमुख घटना घडली?
५. कोणत्या ग्रंथासाठी रवीन्द्रनाथ टागोरांना नोबेल पारितोषित मिळाले?
६. 'डिनामाइट' चा शोध कोणी लावला?
७. होळकरांनी कोठून राज्यकारभार चालवला?
८. 'नीलगिरी'ची झाडे कोणत्या देशात सर्वात अधिक आहेत?
९. 'सीलोन'चे नाव 'श्रीलंका' केव्हा झाले?
१०. कुणाला 'साबरमतीचा संत' संबोधले जाते?
११. पर्शिया राज्याची स्थापना कोणी केली?
१२. सती-सहगमन आणि बाल-विवाह यांच्या विरुद्ध लढणारा भारतीय समाज-सुधारक कोण?
१३. सर्वप्रथम अंतरिक्षात गेलेल्या व्यक्तीचे नाव काय?
१४. सूर्यमंडलातील सर्वात मोठा ग्रह कोणता?
१५. अमृतसरचे सुवर्णमंदिर कोणत्या शीख धर्म-गुरूचे निवास-स्थान होते?
१६. कोणते जनावर एक फूट लांब जीभ असली तरी आपल्या कंठातून आवाज काढू शकत नाही?
१७. नोबेल शांति-पुरस्कार मिळविणारात सर्वात कमी वयाचा विजेता कोण?
१८. आर्य-समाजाची स्थापना कोणी केली?
१९. कोलार येथील सोन्याच्या खाणी कोणत्या प्रदेशात आहेत?
२०. लोकसभा बरखास्त करण्याचा अधिकार स्पीकरला नसेल, तर कोणाला आहे?

## अुत्तर

१. श्रीरंगपट्टण.
२. मेक्सिको.
३. सर वॉल्टर रॅले (१५५२-१६१५).
४. इंग्लंडने जर्मनी विरुद्ध युद्ध जाहिर केले.
५. गीतांजलि.
६. आल्फ्रेड नोबेल (१८६७).
७. आजच्या मध्य-प्रदेशातील इंदुर.
८. ऑस्ट्रेलिया.
९. मे १९७२.
१०. महात्मा गांधी
११. सैरसचा सम्राट (ई.पूर्व ५००-४००).
१२. राजा राममोहन राय.
१३. रशियन अंतरिक्ष प्रवासी यूरी गागारिन.
१४. गुरु ग्रह.
१५. गुरु रामदास.
१६. जिराफ.
१७. मार्टिन लूथर किंग ज्यूनिअर. १९६४ मधे वयाच्या पस्तीसाव्या वर्षी
१८. स्वामी दयानंद सरस्वती.
१९. कर्नाटक.
२०. राष्ट्रपतीला हा अधिकार आहे.



# बैराग्याचा सल्ला

चंद्रनाथला साधु-संतांचा सहवास फार आवडे. साधु-संतांचे आशिर्वाद नि कृपेशिवाय जीवनात सुख-शांति लाभत नाही असा त्याचा विश्वास होता. धर्म व न्यायाच्या मार्गावर चालण्यासाठी साधु-संतांचे मार्गदर्शन अत्यंत आवश्यक आहे. एक दिवशी तो एका बैराग्याला आपल्या घरी घेऊन आला, मनोभावे त्याची पूजा केली. त्याची श्रद्धा व भक्ति पाहून बैरागी खूपच प्रभावित झाला. तो चंद्रनाथला म्हणाला-"मी तुझ्यावर खुष आहे, माझ्याकडून काही पाहिजे असेल तर अवश्य माग."

नम्रपणे चंद्रनाथने निवेदन केलं-"स्वामीजी, मी जीवनात अत्यंत संतुष्ट आहे. मला कसली ही अपेक्षा नाही. आपल्या सारख्या महापुरुषांच्या आशीर्वादाने माझ्यापाशी धन, संपत्ति व सुख सर्व काही आहे. मला कशाची ही कमतरता नाही. पण माझी पत्नी चन्द्रमुखी मात्र नित्य असंतुष्ट असते. तिच्या असंतोषाचे कारण माझ्या काही लक्षात येत नाही. तिचा असंतोष कसा दूर होईल हे आपण सांगाल तर मोठी कृपा होईल!"

बैराग्याने चंद्रमुखीला बोलवायला सांगितलं. त्याने चंद्रमुखीला अनेक प्रश्न विचारले व त्यांची उत्तरे मिळवली. ती म्हणाली-"नवऱ्याचं माझ्यावर प्रेम आहे. माझ्या सर्व इच्छा पूर्ण होत आहेत. घरातील कामे करण्यासाठी नोकर-चाकर आहेत. वेळ मिळाला की मी पुस्तके वाचते. मला संगीताची ही आवड आहे."

मग बैराग्याने विचारले-"असं सगळं असेल तर तू असंतुष्ट कां?"

चंद्रमुखी म्हणाली-"सगळं काही

राजेश्री पोहेकर



जवळ असून ही मी असंतुष्ट का हेच तर माझ्या ही लक्षात येत नाही. आमच्या बंगल्याजवळ एक छोटे कौलारू घर आहे. वीरभद्र नावाचा एक माणूस तिथे राहतो. तसा ओढगस्तीतच त्यांचा संसार चालतो. नवरा-बायको दोघे ही मेहनत करतात. तरी पण संसाराची दोन टोके मिळाविणे त्यांना कठिण जाते. असं असलं तरी वीरभद्राची बायको कांता नेहमी प्रसन्न असते. उल्हसितपणे आपले काम करते, जसं काही कशाची ही कमतरता नाही. मला वाटतं पूर्व-जन्मींच्या पुण्याईचं हे सगळं फळ असावं."

क्षण भर बैराग्याने विचार केला नि मग म्हणाला-"जो माणूस केवळ स्वतःसाठी जगतो, त्याला आत्मिक संतोष मिळत नाही. फळाची आशा न धरता कांता मेहनत करते, म्हणून ती सदा संतुष्ट व आनंदित राहते. फळाची आशा न करता काही केलंस तर तुला ही संतोष मिळेल. शक्य असेल तेव्हा दुसऱ्यांना मदत करीत जा. यामुळे तुझा असंतोष नष्ट होईल. तुझे मन आनंदी व उल्हसित होईल. तुझे शरीर व मन अधिक सुदृढ होऊ लागेल."

चन्द्रमुखीला बैराग्याचा सल्ला तितका आवडला नाही. तरी पण एकदा तिला वाटे बैरागी आपल्या हिताचंच काही सांगत आहे. कारण ती नेहमी दुसऱ्यांकडून मदत घ्यायची, पण स्वतः मात्र कुणाला मदत करीत नसे.

याच वेळी लक्ष्मी तेथे आली. ती गरीब होती. या गावात येऊन दोन-तीन घरी काम करून ती आपले पोट भरी. परंतु आजपर्यंत वीरभद्राच्या घरासारखे चांगले काम तिला अन्यत्र मिळाले नव्हते. एकदा तिने चन्द्रमुखीला कामाबद्दल विचारले असता 'काही दिवसांनी पाहू' असं म्हणून तिला टाळलं होतं. म्हणूनच आज लक्ष्मी चन्द्रमुखीला भेटायला आली होती.

चंद्रमुखीकडे लक्ष्मीला पुरवता येईल इतकं काम खरोखरीच नव्हतं. पण तिला







स्वस्थ बसूं देणं ही तिला मान्य नव्हतं.

सांगितलेली सगळी कामं झाल्यावर लक्ष्मीने जरा आराम केला तर तो तिला सहन होईना. आता चन्द्रमुखी लक्ष्मीकडून निरर्थक कामं करून घेऊ लागली. ती केली काय नि न केली काय! उदाहरणार्थ ती सांगे-"आपल्या गल्लीतील शेवटच्या घरी राहणाऱ्या नारायणची बायको तिच्या नातेवाईकाकडे गेली होती. परत आली की नाही पाहून ये. मागच्या दारी कावळा जोरात काव-काव करतो आहे, त्याला पळवून लाव. रस्त्यावर उगाच गडबड-गोंगाट का बरं चालू आहे? कोण आपापसात भांडत आहे बघ बरं?" असली निरर्थक कामं ती लक्ष्मीला सांगे. लक्ष्मीला काही तरी कामाला लावलं की तिला संतोष होई. लक्ष्मीने सतत काम केले पाहिजे असा तिचा आग्रह.

लक्ष्मी कोणत्या ही कामाला नकार देत नसे. सर्व कामे ती आनंदाने करी. पण कांताकडे काम करताना तिला जसा संतोष असे, तसा चंद्रमुखीची कामं करताना नसे. चन्द्रमुखीकडे ती नोकर असे, कांताकडे त्या घरातील कोणी तरी एक असायची. कांताबद्दल चुकून ती तोंडावाटे अपशब्द काढीत नसे, नि कोणी तिच्या विरुद्ध बोललेले तिला सहन होत नसे. हे सर्व पाहिले की चन्द्रमुखीचा जळफळाट होई.

काही दिवसांनी बैरागी परत आला तेव्हा सर्व हकिगत त्याला समजली. लक्ष्मीची प्रवृत्ति लक्षात घेऊन तो स्वतः कांताच्या घरी गेला. तेथील सर्व परिस्थिति त्याने जाणून घेतली. तेथून परतल्यावर चंद्रमुखीच्या घरची परिस्थिति ही त्याने बारकाईने पाहिली. दोन्ही घरातील वातावरणाचं त्याने तौलनिक अध्ययन केले.

बैराग्याची गंभीर मुद्रा पाहून चंद्रमुखीने विचारले-"स्वामीजी कांता नि मी यांच्यात काय फरक जाणवला

आपणास?"

बैरागी म्हणाला-"कांताकडे खूप काम असतं. पण कांता आवश्यक तेवढं कामच लक्ष्मीकडून करून घेते. अनावश्यक कामं ती तिला करायला लावीत नाही. पाणी पिण्याची भांडी कांता स्वतःच साफ करते, ते काम लक्ष्मीकडून करून घेत नाही. अमुक काम स्वतःच, अमुक काम नोकराचं असा भेदभाव ती करीत नाही. ती लक्ष्मीला आपल्या घरातील एक माणूस समजते. दरमहा वेतन मिळते, म्हणून दुसरे लोक भले ही तिला नोकर समजोत, पण कांता तिला नोकरासारखी वागणूक कधी देत नाही. म्हणून लक्ष्मीला तिथे किती ही काम करावं लागलं तरी ते ती खुशीने करते."

बैराग्याच्या बोलण्याने चन्द्रमुखी जरा नाराज होऊन म्हणाली-"मग मी काय लक्ष्मीशी नीट वागत नाही का?"

समजावण्याच्या सुरात बैरागी म्हणाला-"अजून ही तुझ्या लक्षात आलेलं दिसत नाही. कांताकडे जी कामं आहेत ती ती करते. पण घरात नोकर आहे, म्हणून तू लक्ष्मीकडून काम करून घेतेस. दोन्हीत काही फरक नाही वाटत तुला?"

आता आपली चूक चंद्रमुखीच्या लक्षात आली. ती काही बोलणार एवढ्यात बैरागी म्हणाला-"तुझ्या असंतोषाचं कारण तुझ्या मनातील ईर्ष्या आहे. कांता तुझ्याहून अधिक संतुष्ट आहे, हे तुला सहन होत नाही. हा हेवा सोडून दे आणि कांताला आपली सखी समज. आपला मोठेपणा दाखवण्यासाठी नको, पण सत्प्रवृतीने दुसऱ्यांना मदत करीत जा. यातून तुला असीम संतोष मिळेल. यामुळे तुझे मन शुद्ध होईल."

चन्द्रमुखीने बैराग्याच्या सल्ल्यातील रहस्य जाणले, आणि त्याप्रमाणे तिने आपल्या वागण्यात बदल घडवून आणला. आता ती नित्य संतुष्ट राहू लागली.



## चांदोबाच्या बातम्या



### भारतीय विद्यार्थ्याला अमेरिकेत उत्तेजन

वॉशिंग्टन जवळील फेरफॅक्स कौंटी मध्ये ११ वर्षांचा बालक अखिल रस्तोगी सहाव्या इयत्तेत शिकत आहे. या मुलाची आई दीपा एका बैंकेत नोकरी करते. तिच्या उजव्या हाताची एक नस बिघडलेली आहे. ती दुधाचे भांडे हातात घेऊन कपात ओतायला लागली की दूध सांडते. आईची ही अवस्था पाहून अखिलला फार वाईट वाटते. अखिलने खूप विचार करून प्लास्टिकची एक स्कूवाली नळी बनवली. तिच्या साह्याने दूध खाली न सांडता बरोबर कपात भरता येते. आपल्या मुलाने लावलेल्या या शोधामुळे आईला खूप आनंद झाला. काही कौटुंबिक मित्रांनी या उपकरणाचे पेटंट घेण्याचा सल्ला दिला. अमेरिकेतील एका व्यापारी संस्थेने हे पेटंट मंजूर केले. अशा रीतीने अत्यंत अल्प वयात अमेरिकेत अखिलला एक पेटंट मिळाले.

### इंग्रजीत शब्द-वर्ग

'शब्द-वर्ग' या खेळाला इंग्रजीत 'स्क्रेबल' म्हणतात. इंग्रजी शिकणारे विद्यार्थी हा खेळ मोठ्या आवडीने खेळतात. यामुळे विद्यार्थ्यांची 'शब्द-संपदा' वाढते. आल्फ्रेड बट्टा नावाच्या एका शिल्पकाराने या खेळाला सुंदर रूप प्राप्त करून दिले. वयाच्या ९३ व्या वर्षी गेल्या एप्रिल मध्ये तो दिवंगत झाला. १९३० मधे त्याने हा खेळ नावारूपाला आणला. काही व्यापाऱ्यांना हा खेळ विकण्याचा त्याने प्रयत्न केला, पण कोणी ही तो खरेदी करीना. वीस वर्षांनी एका छोट्या व्यापारी संस्थेने हा खेळ प्रकाशित केला. मुलांना जेव्हा हा खेळ खूप आवडला तेव्हा पूर्वी नकार दिलेल्या संस्थेने तो खरेदी केला व खूप मोठ्या प्रमाणावर त्याचे प्रकाशन केले. त्याच मौलिक सूत्राचा उपयोग करून आता 'मॅग्नेटिक सेट' तयार करण्यात आले आहेत. त्यामुळे प्रवासात ही हा खेळ खेळता येतो. नंतर जगातील अनेक भाषात हा खेळ प्रकाशित झाला. कोट्यवधि संख्येने याची विक्री झाली.





# विदूषक बुह-लूल

खलीफा हारून अलरशीदच्या दरबारात बुह-लूल नावाचा एक विदूषक होता. तो नुसता विदूषकच नव्हे तर मोठा ज्ञानी होता.

एकदा खलीफाने आपल्या विदूषकाला विचारले–"बुह-लूल, आपल्या बगदाद नगरीत किती मूर्ख आहेत हे तू सांगू शकशील?"

बुह-लूलने ताबडतोब उत्तर दिले-"हो, मला माहीत आहे बगदाद मध्ये किती मूर्ख आहेत?"

"ठीक आहे, जर तुला माहीत असेल तर त्यांची एक यादी कर. यादीत एक ही चूक असता कामा नये. समजले ना?" खलीफा म्हणाला.

खलीफाच्या या बोलण्यावर विदूषक गडगडून हसला. आणि म्हणाला-"बगदाद मधील ज्ञानी लोकांची यादी करणं हे याहून सोपं काम आहे. मूर्खांची नाही, मी ज्ञानी लोकांची सूची तयार करतो. त्या सूचीत जे नसतील ते सर्व मूर्ख समजा."

बुह-लूलला लग्नाचा अतिशय तिटकारा असे. हे पाहून खलीफाला फार वाईट वाटे. आपल्या गुलाम दासींपैकी एक सुरेख मुलगी पाहून खलीफाने जबरदस्तीने त्याचे लग्न लावून दिले. लग्नाच्या पहिल्या रात्री जेव्हा नवी नवरी विदूषकाजवळ येऊन बसली, तेव्हा तो ताडकन् उठला आणि 'अरे बाप रे, वाचवा, वाचवा' असे जोरजोराने ओरडूं लागला आणि धावत राजमहालाकडे आला.

खलीफाने त्याला बोलवलं आणि अमळ रागावून म्हणाला–"मूर्खा, एका सुंदर पोरीशी तुझं लग्न लावून दिलं, अन् तू तिला सोडून आरडा-ओरडा करून धावत इकडे आलास! हा काय शहाणपणा आहे होय?"

यावर विदूषक म्हणाला-"सरकार, माफ करा मला. माझी बायको सुंदर आहे यात मुळिच संशय नाही. पण ती जशी माझ्याजवळ येऊन बसली, तसे तिच्या हृदयातील बोल मला ऐकू येऊ लागले–"मला छान छान साड्या आणून द्या-मूल्यवान दागिने मला पाहिजेत." ते सगळं ऐकून मला फारच भीति वाटली. म्हणून मी धावत-पळत आपणाकडे आलो.

खलीफाला हे ऐकवून त्याच्याकडून पैसे मागण्याचा विचार विदूषकाच्या मनात मुळिच नव्हता. कारण एकदा खलीफाने सोन्याच्या एक हजार अशर्फ्या भेट म्हणून विदूषकाला दिल्या होत्या, त्या त्याने साफ नाकारल्या. दुसऱ्यांदा एकदा खलीफाने काही नजराणा दिला, तो ही त्याने स्वीकारला नव्हता.

खलीफाने त्याला विचारलं–"मी खुशीने तुला काही भेट म्हणून देतो आहे, तू ती स्वीकारीत का नाहीस?"

या प्रश्नाचे उत्तर म्हणून विदूषकाने आपल्या पायाचा तळवा खलीफाला दाखवला.

हे त्याचे दुस्साहस पाहून खलीफाचे सेवक त्याला मारायला धावले. खलीफाने त्यांना थांबवीत विचारले–"का?

(अरेबियातील एक गोष्ट)



माझ्याशी अशी गैर वागणूक का करीत आहेस?"

विदूषकाने सफाई दिली—"सरकार, मी काय म्हणतो तिकडे लक्ष द्या. आपणांपुढे हात पसरून आपल्या भेटींचा जर मी स्वीकार केला असता, तर आपल्याला पायाचा तळवा दाखविण्याचा अधिकार मला राहिला नसता! होय की नाही?"

एकदा खलीफा लढाईत विजयी होऊन परत येत होता. खलीफ बरोबर विदूषक बुह-लूल पण होता. एका पडावावर मध्य रात्री खलीफाला तहान लागली-"पाणी, पाणी" उसे ओरडणाऱ्या खलीफाला विदूषकाने पाणी आणून दिले.

विदूषक म्हणाला—"हे पाणी पिण्यापूर्वी आपण कृपा करून माझ्या एका प्रश्नाचं उत्तर द्यावं. यावेळी आपणास हे पाणी न मिळतं, तर या पाण्यासाठी काय मूल्यवान भेट आपण दिली असती?"

पाण्याचा पेला तोंडाला लावीत खलीफा उद्गारला—"माझं अर्धं राज्य देऊन टाकलं असतं!"

"सरकार, माझी आणखी एक शंका आहे. आपण जे पाणी प्यायलं त्यामुळे आपणास लघुशंकेला जायलाच लागणार. समजा, आपल्या पोटात गेलं हे पाणी आतच राहून गेलं, लघुशंकेद्वारा ते बाहेर न येऊं शकले तर ते बाहेर आणण्यासाठी आपण काय द्याल?" विदूषकाने पृच्छा केली.

खलीफाने उत्तर दिले—"जरूर पडली तर अर्धं राज्य देईन."

बुह-लूल म्हणाला—"म्हणजे याचा अर्थ असा की पाणी आणि मुत्र याची किंमत सारखीच! जर या दोन गोष्टी इतक्या बहुमूल्य असल्या, तर या राज्यासाठी लढाई करायची काय आवश्यकता आहे?"

खलीफाने लाजेने आपली मान खाली घातली.






राम सीतेशी इतक्या कठोरपणे बोलत होता की ऐकणाऱ्या सर्वांची हृदयं भय-कंपित झाली. सीतेने आपल्या आयुष्यात कधी असे कटु बोल ऐकले नव्हते. मान खाली घालून ती उभी होती. अपमानाच्या भाराखाली ती दबून गेली होती. इतक्या लोकांसमोर तिचा जो अपमान होत होता, त्यामुळे तिच्या डोळ्यात अश्रू तरळले.

आपले अश्रू पुसत शांत स्वरात ती म्हणाली-"आर्यपुत्र! आपण असे का बोलत आहात? आपणास वस्तुस्थिति माहीत नसल्याचे दिसते. तुमचा समज झालेला आहे, त्याप्रमाणे मी शीलभ्रष्ट झालेली नाही हे निश्चित जाणा.

नंतर ती लक्ष्मणाकडे वळून म्हणाली-"भावोजी, माझं दुःख दूर करण्याचा एकच उपाय मला दिसतो आहे, नि तो म्हणजे चिता! आता अग्निप्रवेशाशिवाय काही अन्य उपाय मला दिसत नाही."

सीतेच्या या बोलण्याने लक्ष्मणाचे मन हेलावले. दीनपणे त्याने रामाकडे पाहिले. सीतेची जर अग्नि-प्रवेश करण्याची इच्छा असेल तर आपली हरकत नसल्याचा भाव रामाच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत होता. म्हणून सीतेच्या इच्छेची पूर्ति करणे आपला धर्म समजून लक्ष्मणाने



चिता रचण्याची व्यवस्था केली.

थोड्या वेळात चिता जळू लागली. नतमस्तक होऊन सीतेने रामाला प्रदक्षिणा घातली आणि ती चितेजवळ आली. हात जोडून प्रार्थना करीत ती म्हणाली-"हृदयात रामाशिवाय अन्य कोणाला स्थान नाही हे खरे असेल, तर अग्निदेवच आता माझे संरक्षण करील." आणि सीतेने चितेला प्रदक्षिणा घातली. तिने धगधगत्या अग्नीत प्रवेश केला.

तेथे उपस्थित असलेल्या सर्वांच्या हृदयात कालवा-कालव झाली. राम ही अश्रू ढाळीत सर्व पहात राहिला.

पाहता पाहता चिता शांत होऊ लागली. अग्निदेव मनुष्य रूपात प्रकट होऊन सीतेला चितेबाहेर घेऊन आले.

अलंकारांनी सुसज्जित, लाल साडी नेसलेली सीता पूर्ववत् उभी होती, केशकलाप जशाचा तसा होता. तिला अग्नीने कसला ही अपाय केलेला नव्हता.

अग्निदेव रामाला म्हणाले-"हे राम, आता या धर्मपत्नि सीतेचा स्वीकार कर. हिने कोणते ही पाप केलेले नाही. तुझ्याशिवाय कोणत्या ही अन्य पुरुषाचा विचार सुद्धा हिच्या मनात आलेला नाही. रावणाने हिला आपल्या अंतःपुरात ठेवले. रावणाबाबत हिने कधी ही विचारच केला नाही. आता या पवित्र सीतेचा स्वीकार कर आणि सुखाने जीवन जग."

अग्निदेवाच्या या वाणीने रामाला परम संतोष झाला. अशा पतिव्रता स्त्रीचा आपण अपमान केल्याबद्दल त्याला पश्चात्ताप झाला. त्याच्या डोळ्यातून अश्रू-धारा वाहू लागल्या. तो अग्निदेवाला म्हणाला-"सीतेने काही पाप केलेले नाही हे मी चांगले जाणतो. पण इतका दीर्घ काळ रावणाच्या महालात राहिलेल्या सीतेची परीक्षा न करताच जर मी तिचा स्वीकार केला असता तर लोकापवादास पात्र ठरलो असतो. दशरथाचा पुत्र राम अधर्मी आहे, कर्तव्य-च्युत आहे असे लांछन लोकांनी लावले असते. अशा कलंकापासून दूर राहण्यासाठी आणि सीतेचं पातिव्रत्य सिद्ध करण्यासाठी मी तिचा अग्निप्रवेश पहात राहिलो. आता तिन्ही लोकात सर्वांना समजले की सीता पतिव्रता आहे, निष्कलंक आहे, धर्मपरायण आहे. तिचे माझ्यावर किती प्रेम आहे हे मी चांगले जाणतो. म्हणून मी आपल्या आज्ञेचे पालन अवश्य करीन."

त्यावेळी दिव्य विमानाने राजा दशरथ स्वर्गातून तेथे अवतीर्ण झाले. राम, लक्ष्मण नि सीता यांनी नम्रपणे त्यांना नमस्कार केला. दशरथाने आपल्या प्रिय पुत्र रामाला आलिंगन दिले आणि म्हणाले-"हे राम, तुझ्या वियोगामुळे स्वर्गातील सारे सुख, देवी-देवतांकडून होणारा सन्मान यांचा आनंद मी लुटू शकत नाही. शत्रूचा वध करून आपले वनवासाचे व्रत तू पूर्ण केलेस. तुझ्यासारखा कर्तव्य-परायण पुत्र मिळाल्याबद्दल कुणाला अभिमान वाटणार नाही? आज मला अत्यानंद होत आहे. कैकेयीने जेव्हा तुला वनवासासाठी पाठविण्याचा हट्ट केला, तेव्हा मला किती अपार दुःख झालं हे तुला ठाऊक नाही. त्याची आठवण झाली की आज ही माझे मन कंपित होते. तुझ्या हातून रावणाचा वध करविण्यासाठीच देवतांनी तुझ्या राज्याभिषेकात विघ्ने आणली हे आता माझ्या लक्षात येतंय. वनवास संपवून तू





परत जाशील तेव्हा कौसल्येला फार आनंद होईल. परत गेल्यावर आपला राज्याभिषेक संपन्न कर. सुखाने राज्य-कारभार करीत आपल्या भावांना सुखी कर."

रामाने दशरथासमोर हात जोडले आणि म्हणाला-"मला वनवास दिल्याच्या अपराधाबद्दल मी कैकेयी व भरत यांचा त्याग करावा असे आपण सांगितले. आता आपण त्यांना क्षमा करावी."

दशरथाने रामाची विनंती मान्य केली. लक्ष्मणाला आलिंगन दिले. रामाची विविध प्रकारे सेवा करण्याबद्दल प्रशंसोद्गार काढले. ते सीतेला म्हणाले-"तुझा त्याग केल्याबद्दल रामावर रागवू नकोस." सर्वांना नमस्कार करून दशरथ स्वर्गाकडे निघाले.

यानंतर इन्द्र रामासमोर आले नि म्हणाले-"या वेळीं तू माझ्याकडून एकादा वर माग." रामाने वर मागितला-"माझ्यासाठी ज्या-ज्या वानरांनी प्राणत्याग केला, त्या सर्वांना पुनः जीवन-दान मिळावे." इंद्राने ही प्रार्थना मान्य केली. दुसऱ्याच क्षणी रणांगणवर जे वानर मरून पडले होते, ज्यांचे अवयव इकडे-तिकडे विखरून पडलेले होते, ते सर्व जिवंत होऊन उठले. असं वाटलं, जणू यांना काही झालंच नाही. आताच झोपेतून जागे झाले आहेत. वानरांना जिवंत झालेलं पाहून तेथे उपस्थित असलेल्या लोकांना मोठं आश्चर्य वाटलं.

रात्र संपत आली होती. विभीषणाने रामाच्या स्नानादि कार्यक्रमाची व्यवस्था केली. शुद्ध गरम पाणी, सुगंधी द्रव्ये, वस्त्रे व स्त्रियांना त्याने आपल्या बरोबर घेतले.

राम विभीषणाला म्हणाला-"सुग्रीव आदि वानरांना स्नानासाठी बोलव. मला लवकरच अयोध्येला जायचे आहे. चौदा वर्षे संपल्यावर लगेचच जर मी दृष्टीस पडलो नाही, तर भरताने अग्निप्रवेश करण्याची प्रतिज्ञा केलेली आहे. म्हणून आता माझ्या दृष्टीने स्नानादि कार्यक्रम महत्त्वाचे नाहीत."

विभीषण म्हणाला-"राम, एक दिवसात मी आपणास अयोध्येला घेऊन जाईन. आपण काळजी करू नये. रावणाने कुबेराचे पुष्पक विमान बळजबरीने इथे आणले आहे. आपणा तिघांचा मी यथोचित सत्कार करू इच्छितो, आपण त्याचा स्वीकार करावा एवढीच माझी प्रार्थना आहे."

"विभीषणा, युद्धात तू मला जे सहकार्य दिलंस, तोच माझा सर्वात मोठा सत्कार! मला भेटण्यासाठी चित्रकूटावर येत असलेल्या भरताला पहायला मी फार आतुर झालो आहे. माता कौसल्या, सुमित्रा, कैकेयी, गुरुदेव वसिष्ठ व प्रेमळ नगरवासियांचे दर्शन करण्याची आता माझी उत्कट इच्छा आहे. सर्वांना मला शक्य तितक्या लवकर भेटायचे आहे. तू ताबडतोब पुष्पक विमान मागवून घे. आता इथे एक क्षण ही घालविणे योग्य होणार नाही. मला लवकरच इथून जाण्याची अनुमति दे." रामाने आपली योजना सांगितली.

विभीषणाने ताबडतोब पुष्पक विमान आणले. फुलांनीं सुशोभित केलेले ते विमान रामाला दाखवीत विभीषणाने



प्रश्न केला-"आता आणखी काय आज्ञा आहे, रामा?"

"वानरांनी मला जी मदत केली, तिचे शब्दांनी वर्णन करता येणार नाही. त्यांना वस्त्रे व अलंकार देऊन त्यांचा सत्कार कर. जी लंकानगरी कधी देवतांच्या अधीन झाली नाही, ती या वानरांनी माझ्या ताब्यात आणून देण्याचे महत्कार्य केले. त्यांच्या अविश्रान्त श्रमाचे फळ त्यांना मिळालेच पाहिजे. तू आपली कृतज्ञता त्यांना दाखवलीस तर ते सर्व धन्य होतील." राम विभीषणाला म्हणाला.

विभीषणाने वानरांची सेवा-सुश्रुषा केली, त्यांचा सत्कार करून रामाची



इच्छा पूर्ण केली. यानंतर राम सीते सह पुष्पक विमानावर आरुढ झाले. मागे लक्ष्मण होताच. वानर, सुग्रीव, विभीषण या सर्वांना राम म्हणाला-"तुम्हा सर्वांच्या सहकार्याने मला कार्य-सिद्धि प्राप्त झाली. आता तुम्हाला जिथे जायचे असेल, तिथे जायला मी परवानगी देतो. सुग्रीवा, एक बंधु आणि मित्र बनून तू मला सर्वतोपरि साह्य केलेस. आता आपल्या सेनेसह तू किष्किंधेला जाऊन सुखाने रहा. विभीषणा, मी तुला लंकेचं राज्य दिलं आहे, एकाद्या आदर्श राजाप्रमाणे राज्य-कारभार कर. असं केलंस तर देव ही तुझ्या वाटे जाणार नाहीत. आपण सर्वांनी अनुमति दिलीत तर मी आता अयोध्येला जातो."

सुग्रीव नि अन्य वानर, तसेच विभीषण वगैरे रामाला म्हणाले-"आमची पण अयोध्येला येण्याची इच्छा आहे. आम्हाला ही आपल्या बरोबर घेऊन चला ना. आम्ही नगरवासियांना कोणत्या ही प्रकारे त्रास देणार नाही. आपला राज्याभिषेक पाहून, माता कौसल्येला प्रणाम करून मग आम्ही परत येऊं."

"तुम्हा सर्वांची माझ्या बरोबर यायची इच्छा असेल तर ती आनंदाचीच गोष्ट आहे. सुग्रीव, आपल्या वानरबांधवांसह पुष्पक विमानात ये. विभीषणा, तू ही आपल्या मंत्र्यांसह चल माझ्या बरोबर." रामाने अनुमति दिली.

वानरांसह सुग्रीव व मंत्र्यांसह विभीषण विमानावर चढताच पुष्पक विमानाने आकाशात उड्डाण केले. विमान वायु-वेगाने आकाशात उडू लागले. रामाने सीतेला त्रिकूट पर्वतावरील लंका-नगरी दाखवली, रक्ताने माखलेली युद्ध-भूमि दाखवली. जिथे रावणाचा वध केला ती जागा पण दाखवली. कुंभकर्णाला जिथे मारलं ते स्थान, समुद्र आणि सेतु दाखविला. विभीषण सर्वप्रथम जेथे रामाकडे आला तो प्रदेश दाखवला. किष्किंधा-नगर आणि वालीचा जेथे वध

केला ते स्थान दाखवले.

तेव्हा सीता रामाला म्हणाली- ''अयोध्येत प्रवेश करण्यापूर्वी सुग्रीवाची पत्नी तारा व तेथील अन्य स्त्रिया आणि वानर-प्रमुखांच्या बायकांना ही आपण आपल्या बरोबर घेऊ या.

रामाने किष्किंधेजवळ पुष्पक विमान थांबवलं आणि तो सुग्रीवाला म्हणाला-''तुमच्या बायका-मंडळींना ही अयोध्येला घेऊन चलावं अशी सीतेची इच्छा आहे. तुम्ही आपल्या घरी जाऊन तशी खबर द्या.''

सुग्रीवाने ताराजवळ येऊन सांगितलं- ''तुला आणि अन्य वानर-स्त्रियांना राज्याभिषेक पाहण्यासाठी अयोध्येला घेऊन जाण्याची राम व सीता यांची इच्छा आहे. तेव्हा तुम्ही ताबडतोब निघायची तयारी करा.''

ताराने आपले सर्व दागिने घालून शृंगार केला व अन्य वानरांच्या बायकांना सुचवले-''चला, आपण अयोध्या नगरीच्या दर्शनासाठी जाऊ या.''

अन्य वानर-स्त्रियांनी ही आपापले अलंकार परिधान केले. सीतेला पाहण्यासाठी त्या सर्व उतावीळ झाल्या होत्या. तारा बरोबर त्या ही विमानात चढल्या. आता विमान पुन्हा आकाशात उडाले. तेव्हा रामाने सीतेला ऋष्यमूक पर्वत दाखवला. प्रथम तो सुग्रीवाला जेथे भेटला ती जागा पण दाखवली. सीता हरवल्यावर जेथे बसून आपण विलाप केला ते स्थान ही रामाने सीतेला दाखवले. कबंधाचा जेथे वध केला तो प्रदेश दाखवला. यांशिवाय अन्य प्रमुख प्रदेश ही दाखवले.

अत्रि महर्षींचा आश्रम, गुहाचे निवास-स्थान, शृंगवेरपुर, चित्रकूट, भरद्वाज मुनींचा आश्रम आदि प्रदेशांवरून उडत विमान अयोध्या नगरीकडे येऊ लागले.





# एक हजार एकशे सोळा!

अनुराधा लहान असतानाच तिची आई वारली. वडिलांनी दुसरं लग्न केलं. सोळाव्या वर्षापर्यंत अनुराधा आपल्या आजीकडेच वाढली. सावत्र आई दुर्गा मोठी भांडखोर चांडाळीण होती.

एके दिवशी नवरा जेवायला बसला तेव्हा दुर्गा म्हणाली- ''आता आपल्या लाडक्या लेकीला घरी घेऊन या. चार-पाच वर्ष इथं ठेवून मग लग्न करून टाकू.''

दुर्गाचा नवरा होता बाईलवेडा. बायको करील ती पूर्व! काही वाद-विवाद न करता तो अनुराधाला आपल्या घरी घेऊन आला.

दुर्गाचा एक भाऊ शहरात रहात होता. त्याचा एक दोस्त होता राजू. काही हुंडा द्यायला न लागता राजू अनुराधाशी लग्न करील असं दुर्गाने नवऱ्याला समजावून सांगितलं.

लग्नापूर्वी राजूने सांगितले की त्याला शहरात चांगली नोकरी आहे. लग्न करून शहरात आल्यावर एक आठवड्या भरातच अनुराधाला कळून चुकलं आपल्या नवऱ्याच्या नोकरी बाबत!

अनुराधाने परोपरीने आपल्या नवऱ्याला सांगून पाहिलं-''चोऱ्या करून मिळणाऱ्या पैशांनी कधी सुख-शांति मिळणार नाही.''

बायकोच्या या उपदेशाची टिंगल करीत राजू म्हणायचा-''जीवनाची कला न जाणणारे काबाड-कष्ट उपसतात. तुझ्या सांगण्याप्रमाणे मेहनत करायला मी काही मूर्ख नाही!''

अनुराधा शहरात आल्याला सहा

रामदास आठवले



महिने झाले. एकदा आजीकडून निरोप आला की नातीला शेवटचं एकदा भेटण्याची तिची इच्छा आहे. एक भाड्याची गाडी ठरवून ती लगेच आजीकडे गेली. आजीची तब्येत फारच खालावलेली तिने पाहिली.

अनुराधाकडून तिचा नवरा कसा आहे हे जेव्हा आजीला समजलं, तेव्हा तिला खूप वाईट वाटलं. दुःखी कष्टी म्हातारी म्हणाली-''बेटा, आता काय करता येणार? जे झालं, ते झालं!'' असं म्हणत म्हातारीने उशीखालून एक पिशवी काढली नि म्हणाली- ''भेटीदाखल एक हजार एकशे सोळा रुपये दान शुभ असतं असं म्हणतात. इतकी रक्कम या पिशवीत आहे. आपल्या नवऱ्याला सांग या रकमेचा उपयोग करून काही व्यापार कर.'' असं सांगत म्हातारीने पिशवी अनुराधेच्या हाती दिली नि राम म्हटला.

अनुराधा पैशांची पिशवी नवऱ्याच्या हाती देत म्हणाली-''आपल्याला आशीर्वाद देऊन आजीने हे एक हजार एकशे सोळा रुपये तुम्हाला दिले आहेत. या पैशातून आपण काही व्यापार करावा.''

राजू खदखदा हसून म्हणाला-''ही रक्कम घेऊन संध्याकाळी हा जातो, नि रात्री पर्यंत दहा हजार मिळवून आणतो.''

त्याच दिवशी संध्याकाळी पैशांची पिशवी आपल्या खिशात घालून राजू दाराबाहेर पडला. एवढ्यात एक घोडा-गाडी येऊन दाराशी थांबली.

आतल्या माणसाने तोंड बाहेर काढून राजूला विचारले-''देवीच्या देवळाकडे जायचा रस्ता कोणता?''

राजूने माहिती दिली-''त्यासाठी आपल्याला बरंच दूर जावं लागेल. चला, मीच घेऊन जातो तुम्हाला.''

राजू गाडीत बसला. देवळापाशी आल्यावर तो माणूस गाडीतून खाली उतरला. राजूचे आभार मानून लगबगीने आत निघून गेला.

राजू जेव्हा आरामात गाडीतून उतरत होता, तेव्हा गाडीत त्याला एक पत्र दिसलं. नीलकंठ नावाच्या माणसाने आपली बायको भानुमतीला लिहिलेलं ते पत्र होतं.

पत्रात लिहिलं होतं-''मी कामासाठी शहरात जातो आहे. पंचवीस हजार रुपयांचा जो हार खरेदी केला, तो तुला पसंत नाही. तो मोडून दुसरा हार बनविण्याची तुझी इच्छा आहे. आता तू देवीच्या मंदिरात असणार हे मला माहीत आहे. म्हणून एका माणसाबरोबर हे पत्र पाठवीत आहे. त्याच्या हस्ते हार पाठवून दे. शहरात जाऊन दुसरा हार बनवून आणीन.''

हे पत्र वाचून राजूला अत्यानंद झाला. त्याला वाटलं आता आपलं भाग्य उजळलं! जरा ही विलंब न करता तो देवीच्या देवळात गेला.

पंचवीस वर्षे वयाची एक बाई एका बाजूला बसली होती. राजूने विचारले-''आपलंच नाव भानुमति का?''

तिने होकारार्थी मान हलवली. राजूने पत्र तिच्या हाती दिले. पत्र वाचून ती म्हणाली-''मी आताच तो हार पार्वतीला दिला. आपल्या मुलीच्या लग्नासाठी पंधराशे रुपये तिने माझ्यापाशी मागितले. पण माझ्याजवळ एवढी रक्कम नव्हती. तिने विनंती केली की मी जर आपला हार तिला दिला तर तो गहाण





ठेवून ती पैसे मिळवील."

आलेली सुवर्ण-संधि पाहता पाहता हातची गेली याबद्दल राजूला फार वाईट वाटलं. पण दुसऱ्याच क्षणी त्यांच्या मनात एक नवी आशा पालवली.

तो भानुमतीला म्हणाला-"मालक पुन्हा शहरात केव्हा जातील कोण जाणे? हे काम आताच पूर्ण झालेलं बरं. माझ्यापाशी एक हजार एकशे सोळा रुपये आहेत. तुम्ही ज्या पार्वतीबद्दल म्हणत आहात तिला ही रक्कम देऊन आपला हार घेऊन या. मी नीलकंठजींकडून माझे पैसे मागून घेईन."

राजूने दिलेली पिशवी भानुमतीने घेतली नि म्हणाली-"पार्वतीचं घर इथंच देवळामागे आहे. ही रक्कम तिला पुरेशी आहे की नाही-आता विचारून येते." तीन-चार मिनिटातच भानुमति हार परत घेऊन आली. राजूला म्हणाली-"मालकांना सांग की हार अगदी शोभासारखा झाला पाहिजे. असं होऊ नये की पुन्हा काही चूक व्हावी, अन् पुन्हा हार नव्याने करायला लागावा."

राजू आपल्या बुद्धिमत्तेवर बेहद्द खुश होता. तो परमानंदच्या दुकानी गेला. आपला चोरीचा माल विकण्यासाठी बहुधा तो इथंच येत असे. राजूकडे पहात म्हणाला-"वा राजू, नकली सोन्याचा हार देऊन मला धोका देऊ पहातोस?" असं म्हणून त्याने हार जमिनीवर टाकून दिला.

राजूला वाटलं जशी आपल्या डोक्यावर वीज कोसळली. त्याने कित्येक हुशार लोकांना आपली कला दाखवली होती. अनेकांना त्याने पालथे पाडले होते. पण आज दुसऱ्या कोणी त्याला धडा शिकवला होता. या पराभवाने त्याचा थरकाप झाला. त्याच्यापुढे प्रश्न होता आता बायकोला कसं तोंड दाखवावं?

निराश राजू संध्याकाळपर्यंत गल्ली-बोळातून हिंडत राहिला. संध्याकाळी घरी आला. घरात सगळीकडे अंधार होता, नि अनुराधा घरात नव्हती.





घरात प्रवेश करून त्याने दिवा लावला, तेव्हा टेबलावर अनुराधाने लिहिलेले पत्र सापडले.

पत्रात लिहिलं होतं-"माझी मैत्रीण भानुमति आणि तिचे पति नीलकंठ यांना माझ्याकडून आपणाबाबत सर्व गोष्टी समजल्या. आपला स्वभाव, आपल्या सवयी आणि आपला धंदा जाणून आपल्याला एक धडा शिकवण्याचा त्यांनी निश्चय केला. आणि धडा असा जो जन्मभर आपल्या स्मरणात राहील. हे सर्व नाटक त्यांनी रचलं. चोर व धोकेबाज माणसाची बायको म्हणवून घेण्यापेक्षा मरण बरं! मृत्यु-समयी माझ्या आजीने जे एक हजार एकशे सोळा रुपये दिले, त्यामुळे माझी हिंमत वाढली. या रकमेतून दोन गायी खरेदी करून दुधाचा व्यवसाय केला तर सन्मानपूर्वक जीवन जगेन. म्हणून मी आपल्या घरी जाण्याचा निर्णय घेतला आहे. अजून ही उशीर झालेला नाही. आपण आपल्या वृत्तीत बदल करा, चोरीचा धंदा सोडून द्या. आपल्या बुद्धीचा सदुपयोग करा. 'मी सन्मार्गावर जाऊ शकेन, परिश्रम करू शकेन' असा आत्मविश्वास असला तर उद्या सूर्यास्तापर्यंत गावाकडे या."

पत्र वाचून राजूच्या डोळ्यांवरील झापड नाहीशी झाली. ज्या बुद्धिमत्तेच्या जोरावर तो गर्व करीत होता, ते सर्व खोटं होतं. अनुराधेसारखी बायको मिळाल्यावर ही त्याने आपणात काही सुधार न करता तिच्यावर अन्यायच केला. म्हातारीने दिलेली रक्कम प्रामाणिकपणे केलेल्या मेहनतीची कमाई होती; तिने राजूला योग्य मार्गावर आणले. दुसऱ्या दिवशी सूर्योदया पूर्वीच राजू नम्रपणे अनुराधाच्या दरवाजावर जाऊन उभा राहिला. आपल्या नवऱ्याचे स्वागत करताना अनुराधाला ही खूप आनंद वाटला.





# ईर्ष्या

एका गावात बलभद्र नावाचा एक गरीब शेतकरी रहात असे. त्याला बरीच मुलं-बाळं होती. बलभद्र रोज जंगलात जाई नि लाकडं तोडून आणी. ती विकून जे थोडे-फार पैसे मिळत, त्यातून मुलांना कंजी पाजी आणि नवरा-बायको पण पीत. बलभद्र खूप काम करी, कष्ट उपसे, तरी पण परिवारातील सर्वांचं पोट भरणं त्याला कठिण होई.

एक दिवशी भल्या पहाटे बलभद्रने कुऱ्हाड खांद्यावर टाकली नि जंगलात जायला निघाला. रस्त्यात भुर-भुर पाऊस सुरू झाला. जंगलात पोचेपर्यंत मुसळधार पाऊस सुरू झाला. इतक्यात त्याला जंगलात एक ओसाड धर्मशाला दिसली. तो धावत-पळत तेथे गेला नि आडोशाला उभा राहिला. पाऊस थांबायची तो आता वाट पाहू लागला.

पण पाऊस थांबायचे नाव घेई ना! त्याने विचार केला-"वाळकी लाकडं पावसात सर्व भिजून गेली असणार. ओली लाकडं कोण खरीदणार? आज मुलांच्या नशिबात कंजी सुद्धा नाही." निराशेने बलभद्र धर्मशाळेत इकडे-तिकडे पाहू लागला. एका बाजूला त्याला एक लाकडी मूर्ति दिसली. ती पाहून त्याला थोडी आशा निर्माण झाली. जवळ जाऊन पाहिलं तर ती एक देवीची मूर्ति होती.

बलभद्र विचार करू लागला-"मूर्ति देवीची असो वा देवाची लाकडाचीच तर आहे ना! हीच मूर्ति फोडून घेऊन गेलो, तर चार पैसे मिळतील. बायको नि मुलांना गरम-गरम कंजी तरी पाजता येईल."

बलभद्राने कुऱ्हाड उचलली आणि मूर्तीचे तुकडे करणार, एवढ्यात मूर्तीतून शब्द बाहेर पडले-"थांब, थांब अे दुष्टा, माझं डोकं फोडणार? मला तू काय समजला आहेस?"

बलभद्राने ताबडतोब कुऱ्हाड खाली टाकली नि मूर्तीला प्रणाम करून म्हणाला-"माते, मला क्षमा कर. मी लाकडं तोडायला आलो नि पाऊस सुरू झाला. बस, आज आता माझ्या मुलांना भुकेलंच रहायला लागणार."

मूर्ति म्हणाली—"अरे, तुझं दारिद्र मी समजते. मी तुझ्यावर रागावले नाही. तुला सुखी बनविण्याचा उपाय माझ्याजवळ आहे. तू घरी जाताना एक नवं भांडं घेऊन जा. माझं स्मरण करून ते चुलीवर ठेव. चुलीवर भांडं ठेवताच, तुझ्या कुटुंबाला पाहिजे तेवढं शिजलेलं अन्न तुला मिळेल. जा आता आपल्या घरी!"

बलभद्राने कुऱ्हाड फेकून दिली. मूर्तीला साष्टांग नमस्कार केला. पावसाची पर्वा न करता तो घराकडे निघाला.

रिक्त हस्ते आलेल्या बलभद्रकडे पाहून आश्चर्य प्रकट करीत बायको म्हणाली—"आज लाकडं नाही आणलीत? आणि कुऱ्हाड कुठे आहे?"

जंगलात जे घडलं ते सारं बायकोला सांगून बलभद्र म्हणाला-"आता लाकडं नि कुऱ्हाड यांची काही जरूर नाही. देवीची कृपा-दृष्टि आपल्यावर आहे.



(२५ वर्षांपूर्वी चांदोबात प्रकाशित झालेली गोष्ट)



बलभद्राची बायको एक नवं भांडं घेऊन आली. त्याच्यावर झाकण ठेवलं. भांडं चुलीवर ठेवलं नि उतरवलं. झाकण उघडून पाहिलं तर ते खाद्य-पदार्थांनी भरलेलं होतं. भरपूर जेवल्यानंतर त्यांना छान झोप लागली.

आता बलभद्रच्या परिवाराला खाण्या-पिण्याची चिंता राहिली नाही. रोज त्यांना स्वादिष्ट भोजन मिळू लागले. ते स्वत: पोटभरं खातच, आपल्या आसपासच्या लोकांना ही बोलवू लागले.

बलभद्रच्या घराजवळच दुसरं एक घर होतं. त्या घराच्या मालकिणीचं नाव मंदोदरी. तिने पाहिले की जो बलभद्रचा परिवार केवल कंजी पिऊन रहायचा, आज हे लोक स्वादिष्ट भोजन करीत आहेत. तिच्या मनात विचार आला–"असं स्वादिष्ट भोजन तर आम्हा पैसेवाल्यांना ही मिळत नाही. ही कर्म-दरिद्री माणसं रोज पक्वान्नं कशी बनवूं शकतात? एकाएकी हे लोक इतके संपन्न कसे झाले? काय बरं घडलं असावं?"

बलभद्रच्या लहान मुलाला बोलवून मंदोदरीने विचारले–"अरे छोटू, तुझा बाप जंगलात जाऊन लाकडे तर आणीत नाही. मग पक्वान्ने तुझी आई कशी बरं बनवू शकते?"

बलभद्रच्या छोट्या मुलाने मंदोदरीला सगळं रहस्य सांगून टाकलं. तो म्हणाला–"जंगलातल्या देवीने आमच्यावर कृपा केली आहे. आम्हाला जे पाहिजे ते सर्व ती या भांड्यातून आम्हाला देते. आमची आई अन्न शिजवीत नाही, नि बाबा बाजारातून काही आणीत नाहीत." छोटूने जंगलात जे घडलं ते सर्व मंदोदरीला सांगून टाकले.

हे सर्व ऐकून मंदोदरीच्या मनात तीव्र ईर्ष्या जागृत झाली. तिने आपल्या डोक्याला एक पट्टी बांधली आणि कोपऱ्यात कण्हत बसली. घरातलं काही काम केलं नाही, की स्वयंपाक केला नाही. मुलं जवळ आली नि खायला मागू लागली. शिव्या देऊन तिने मुलांना हाकलून लावले.

दुपारच्या वेळी नवरा घरी आला. त्याने पाहिलं आज बायकोने चूलच पेटवली नाही. मंदोदरीला विचारलं–"का ग, आज झालंय तरी काय तुला? तब्येत बरी नाही का?"

ईर्ष्येच्या आगीत होरपळलेली मंदोदरी म्हणाली- "चूल सुद्धा न पेटवता मेवे-मिठाया लोकांना मिळताहेत! आणि मीच एक अशी, मेहनत-काबाडकष्ट करून काही फायदा नाही."

मंदोदरीकडून सगळं काही ऐकून झाल्यावर नवऱ्याने विचारले–"बरं, मी आता काय करूं?"

"मला काय विचारताय? कुऱ्हाड घेऊन जंगलात जा. देवीवर कुऱ्हाड उगारून चांगली धमकावणी द्या तिला. तिच्याकडून भांड्याचं वरदान मिळवा. तुम्ही हे काम केलं नाहीत, तर मी नाही स्वयंपाक करीत बसणार! समजलं?"

"असं रागाच्या भरात देवीचं का डोकं फोडायचं?" नवऱ्याने विचारले.

"तुम्हाला तर थोडी सुद्धा अक्कल नाही. प्रार्थना करून जी देवी वरदान देत नाही, तिला शिक्षा करून आपण वरदान मिळवलं पाहिजे." मंदोदरीने नवऱ्याला समजावलं.



बायकोचं म्हणणं ऐकलं नाही तर आपलं जीवन खडतर होणार हे नवऱ्याच्या लक्षात आलं. त्याने कुऱ्हाड खांद्यावर टाकली नि जंगलाच्या वाटेने चालू लागला. जरा शोधल्यावर त्याला ती धर्मशाळा नि तेथील लाकडाची देवीची मूर्ति सापडली. मूर्ति दिसताच नवऱ्याने आपली कुऱ्हाड देवीवर उगारली.

दुसऱ्याच क्षणी धरणी-कंप झाला. वीज चमकली आणि त्याबरोबरच मंदोदरीच्या नवऱ्याची दृष्टि नाहीशी झाली. तो आंधळा झाला. त्याला काही दिसेनासं झालं. कुणी तरी आपल्याला लाथ मारलीय असा त्याला भास झाला.

तो खाली पडला. त्या स्थितीत त्याला एक भयंकर स्वर ऐकू आला.

"दुष्टा, माझं डोकं फोडायला निघालास? मला कोण समजलास तू?"

मंदोदरीचा नवरा खूप घाबरला. त्याच्या शरीराचे सर्व अवयव ढिले पडले. तो रागाने लाल झाला. दीन होऊन देवीला म्हणाला-"क्षमा कर माते. मी असा घोर अपराध केला आहे, की काही ही शिक्षा केलीस तरी ती कमीच होईल. पण मला हे समजत नाही—बलभद्र तुझ्याशी असाच वागला, तेव्हा तू त्याच्यावर कृपा केलीस. मग माझ्यावरच तुझा असा राग का बरे?"

"बलभद्र जन्म-दरिद्री आहे. तू काही गरीब नाहीस. तुला कशासाठी क्षमा करू सांग बरं?" देवीने विचारले.

"तो गरीब असला, तर मी अडाणी आहे. माते, मला क्षमा कर." असे म्हणत त्याने देवीला साष्टांग नमस्कार केला नि गयावया करून रडू लागला.

देवी म्हणाली—"एका अटी वर मी तुला क्षमा करीन. बलभद्रच्या भांड्यात सर्व पक्वान्नं येतील असं वरदान तर मी त्याला दिलं, पण तुपाची व्यवस्था करायला मी विसरले. बिचारे तुपावाचूनच सर्व पक्वान्नं खातात! तू रोज त्यांच्या घरी जायचं नि एक शेर तूप त्यांना द्यायचं. आहे कबूल?"

"जशी तुझी इच्छा. तुझ्या आज्ञेप्रमाणे मी करीन. पण माझ्या अपराधाबद्दल क्षमा करणार नं?" मंदोदरीच्या नवऱ्याने देवीला विचारले. आता त्याचं सगळं दुःख संपलं. घरी येऊन त्याने बायकोला सर्व वृत्तांत कथन केला, आणि म्हणाला—"कुणी तरी किती बरोबर सांगितलंय—'स्त्री बुद्धि प्रलयांतका!' आता रोज बलभद्रकडे एक शेर तूप पाठवीत जा."

ती बिचारी काय करणार? नवऱ्याने सांगितल्याप्रमाणे रोज बलभद्रकडे एक शेर तूप पाठवू लागली.



# बहुरूपा वसुंधरा



## सोन्याची झाडे

"एक हजार रुपये द्या आणि एक सागवानाचा वृक्ष लावा. वीस वर्षे त्याची देखरेख करून त्याचा पूर्ण विकास करण्याची जबाबदारी आमची. वीस वर्षांनी आपणास शंभर पट म्हणजे एक लाख रुपये मिळतील." असल्या जाहिराती अलीकडे आपण खूपच वाचतो. याचा अर्थ असा की सागवान लाकडाची किंमत सोन्यासारखी आहे. एवढंच नव्हे थायलंडचे दोन संशोधक सागवानाला सोनंच समजतात. 'न्यूट्रान एक्टिवेशन' नामक तंत्राचा उपयोग करून जेव्हा सागवान वृक्ष त्यांनी करवतीने कापले तेव्हा त्याच्या भुश्श्यात त्यांना सोन्याचे कण सापडले. अशा प्रकारच्या वृक्षांना त्यांनी नाव दिलं-'साक नांग'. थाय भाषेत सागवानाला म्हणतात 'साक', 'नांग' म्हणजे सोनं. दक्षिण भारतात काही लोक सोन्याला 'तंगम्' म्हणतात.



## झाडांवरील वलये

हल्ली निरनिराळ्या प्रकारच्या संस्था स्थापन होत आहेत. पण आपण अशा एखाद्या संस्थेबद्दल ऐकलं आहे का, जिचे सभासद केवळ वृक्षच होऊ शकतात? उत्तर प्रदेशात 'इलाइट मदर ट्रीज' नावाच्या एका संस्थेची स्थापना केली आहे. लिंब, बाभूळ, जांभूळ, देवदार, शीशम, चिंच यांच्या विविध जातींचे ३५०० वृक्ष या संस्थेचे सभासद आहेत. जे वृक्ष या संस्थेचे सभासद आहेत, त्यांना उत्कृष्ट बी निर्माण करता यावे. सभासदत्व पाहिजे असेल तर मुळात तो वृक्ष सुदृढ असला पाहिजे, त्याचा बुंधा सरळ असला पाहिजे, फांद्या डेरेदार असल्या पाहिजेत, पाने घनदाट असली पाहिजेत. अशा वृक्षांना 'मदर ट्रीज' म्हणतात. सभासद झालेल्या प्रत्येक झाडाच्या बुंध्यावर एक पिवळे वलय अंकित केले जाते. नंतर त्यांच्या बीजांचे अंकुर उत्पन्न करण्यात येतात. त्यांना 'इलाइट मदर्स' संबोधले जाते. अशा वृक्षांच्या भोवती दोन वलये अंकित केली जातात. नंतर यांची बीजे अन्यत्र पाठविण्यात येतात. हे बियाणे शक्तिशाली आहे, यातून फुटणारे अंकुर सुदृढ आहेत असे दिसून आल्यावर या वृक्षांभोवती तिसरे पिवळे वलय आंकित करण्यात येते.



## उंच वृक्ष

कॅलिफोर्नियातील हंबोल्ट स्टेट पार्क येथे असलेला लाल चंदन वृक्ष ११३ मीटर उंचीचा आहे. जगातील सर्व वृक्षात हाच सर्वात उंच आहे असे म्हणतात. याचं नाव ठेवलंय 'हयारी कोल'. १४९९ मधे सापडलेल्या या वृक्षाच्या बुंध्यावरील वलये पाहता असे वाटते की हा तीन हजार वर्षांचा असावा. ऑस्ट्रेलियातील व्हिक्टोरियामधील निलगिरीचा वृक्ष सर्वात उंच मानला जात असे. पण असे म्हणतात की तेथेच एक दुसरा निलगिरीचा वृक्ष आहे, त्याची उंची आहे १४३ मीटर!



# तर्कट ईश्वरी

मदनपुर गावात राहणारा मोतीराम मोठा शौकीन माणूस आहे. खूप गोड गोड बोलतो. सर्वांना मदत करतो. पण लग्न झाल्यावर त्याला हे सर्व सोडून द्यावं लागलं. बायको ईश्वरी सर्वांशी मिळून-मिसळून वागत नसे. सर्वांच्या बद्दल ती साशंक असे. प्रत्येक गोष्टीतून उलटा अर्थ काढायची तिला सवय असे. याशिवाय ती फार कंजूस ही होती. यामुळे मोतीरामला नाइलाजाने आपल्या स्वभावाला मुरड घालावी लागली. अर्थात् यामुळे तो निराश झाला नाही. पण आपल्या बायकोत योग्य तो बदल व्हावा यासाठी झटू लागला.

सीताराम आपल्या काही कामासाठी त्या गावी आला होता. तो मोतीरामकडे आला नि म्हणाला—"कसं काय चाललंय मोती? खरं म्हणजे माझं काम आहे शेजारच्या गावात. केवळ तुला भेटण्यासाठी इथं आलो. तुझ्या इथे एक आठवडाभर राहून आपल्या लहानपणच्या आठवणी ताज्या कराव्यात अशी इच्छा आहे. आपले ते दिवस मी कसे बरे विसरू शकेन?"

सीताराम नि मोतीराम बाळपणचे मित्र होते. मोतीरामचे विनोदी बोलणे ऐकून सीतारामला मोठी गंमत वाटे. लहानपणी सीतारामने मोतीरामला खूप मदत केली. सीताराम स्वतः मोठा श्रीमंत होता. कालांतराने तो शहरात आला आणि मोठ्या प्रमाणावर व्यापार करू लागला. आता तो करोडपति आहे.

सीतारामचं मोतीरामकडे येणं ईश्वरीला आवडलं नाही. ती नवऱ्याला

पुष्पहास जोशी



म्हणाली—"तो जर एवढा श्रीमंत असेल तर त्याने एकाद्या चांगल्या ठिकाणी रहायला हवं होतं. मैत्रीचं सोडून द्या, तो कंजूस आहे, म्हणून आपल्याकडे येऊन राहयलाय! एक-दोन दिवस राहिला असता तर गोष्ट वेगळी. हा तर चांगला आठवडा भर ठिय्या देऊन राहणार आहे. कोणा तरी सोम्या-गोम्याला इतके दिवस खाऊ घालायला मला नाही जमणार!"

जर याला स्वादिष्ट पक्कान्नं खाऊ घातली तर याचा येथील मुक्काम वाढेल अशी तिला भीति होती. म्हणून रोज रोज भाज्या बनवणं ही तिनं सोडून दिलं. ती तिन्ही वेळा सीतारामच्या पानात फक्त लोणचंच वाढी. असं केलं म्हणजे सीताराम लवकर जाईल असा तिला विश्वास होता. पण सीतारामला याची काही पर्वा नव्हती. ती जे काही वाढी ते तो आनंदाने खाई. असं सुकं जेवण आपल्याला का दिलं जात आहे याबाबत त्याने कधी विचारच केला नाही. दिवसभर तो आपल्या कामात गुंतलेला असे. रात्री दोन्ही मित्र उशीरा पर्यंत गप्पात रंगत. सीतारामला मोतीरामशी गप्पागोष्टी करणं फार आवडे. गप्पा मारताना मोठ्याने मधून मधून आरडा-ओरडा करणे ईश्वरीला मुळिच आवडत नसे. ती मनातल्या मनात रागावे, जळफळे.

सीताराम जेव्हा जायला निघाला तेव्हा ईश्वरीला म्हणाला-"मी आपल्या मित्राला भेटायला आलो होतो. माझ्या इथे राहण्यामुळे तुला खूप त्रास झाला, तुझी गैरसोय झाली. तू मला भोजन दिलंस, ते मी जन्मभर विसरणार नाही. माझ्या मित्राची मैत्री आणि त्याच्याशी झालेल्या गप्पा यापेक्षा तुझं आतिथ्य निश्चित सरस! येताना आपल्या मित्रासाठी एक भेट आणली होती, ती स्वीकार करण्याचा अधिकार तुझाच अधिक." असं म्हणत एक सुंदर हिऱ्याची अंगठी त्याने ईश्वरीला दिली.



त्या अंगठीला एक कळ होती. ती फिरवून अंगठी कोणत्या ही बोटाच्या मापाची बनविता येई. अशी मूल्यवान अंगठी पाहून ईश्वरीला फार आश्चर्य वाटलं. तिच्या तोंडातून काही शब्द बाहेर पडेना.

जाताना सीतारामने पति-पत्नींना आपल्याकडे येण्याचे निमंत्रण दिले. काही दिवसांनी ईश्वरी आजारी पडली. उपचारासाठी सीतारामच्या गावी जायचं होतं. मोतीरामला वाटलं बरी संधि आहे. तो म्हणाला-"आपण सीतारामच्या घरी जाऊ. त्याने आपल्याला अगत्यपूर्वक बोलवले आहे." ईश्वरीने ते नाकारले.

दु:खी अंत:करणाने मोतीराम म्हणाला-"त्याने आपल्याला मोठ्या प्रेमाने बोलवले आहे, हे तू विसरलीस वाटतं?"

"त्यांना आपलं स्वागत का करायचंय माहीत आहे? आपल्याला जी हिऱ्याची अंगठी दिलीय, त्याची किंमत वसूल करायची आहे त्यांना! आपल्याला त्यांच्याकडे बोलवून त्या संधीची ते वाट पहात आहेत. ते श्रीमंत असल्यामुळे आपल्याला हिऱ्याची आंगठी देऊ शकले. आपल्याला कुठे तसं काही द्यायला ऐपत आहे? आपण जर त्यांच्याकडे राहिलो तर आपल्याला ही चांगली भारी किंमतीची



भेट द्यावी लागेल. म्हणून त्यांच्याकडे रहायला न जाता आपण आपले दुसरीकडे कुठे तरी राहू." ईश्वरीने आपले तर्कट मांडले.

मोतीरामला बायकोचं बोलणं आवडलं नाही. पण बिचारा काय करणार? गप्प बसला. ते दोघे नंतर शहरात गेले, एका छोट्या खोलीत चार दिवस राहिले, वैद्य उमानंद कडून औषधोपचार करविला. दरम्यानच्या काळात शहरातील पाहण्यालायक स्थळे पाहून घेतली.

मदनपुरला परत आल्यावर मोतीराम बायकोला म्हणाला—"पाहिलंस? शहरात आपला २०० रु. खर्च झाला.



मित्र सीतारामकडे राहिलो असतो, तर याच पैशातून एकादी भेट-वस्तु खरेदी करता आली नसती? तुझ्या मूर्खपणामुळे मला आपल्या मित्रापासून दूर रहावं लागलं. मी तर म्हणेन सीतारामडे न जाऊन आपण त्याचा अपमान केलाय! सीताराम उमानंदचा मित्र आहे असं ही मी ऐकलंय. आपण सीतारामला उमानंदकडे घेऊन गेलो असतो तर बरं झालं असतं. तुझी चिकित्सा पण त्याने अधिक प्रेमाने केली असती. आपण शहरात गेल्याची वार्ता उमानंदकडून सीताराम पर्यंत पोचली असेल असं मला वाटते. हे कळल्यावर त्याला किती दुःख झालं असेल!"

यावर ईश्वरी म्हणाली—"पाहुणे घरी न आले तर आनंदच होतो, कारण त्यांच्या येण्यामुळे गैरसोय होते नि खर्च वाढतो. आपण सीतारामकडे गेलो असतो तर ते पुन्हा आपल्याकडे आले असते. एकदा एक हिऱ्याची अंगठी त्यांनी आपल्याला दिली, दुसऱ्यांदा त्याहून कमी किंमतीची वस्तु देऊन चाललं नसतं. म्हणून मला वाटतं आपण गेलो नाहीत याचा सीतारामला ही आनंदच वाटेल."

मोतीराम व्यथित अंतःकरणाने म्हणाला—"मी लहानपणापासून सीतारामला ओळखतो. तो जिथं कुठं जातो, तिथं आपल्यां प्रेमाच्या माणसांना भेटी देत असतो. ही त्याची सवय आहे. तुला समजाऊन सांगणं माझ्या ताकती बाहेर आहे."

काही दिवसानंतर सीताराम शेजारच्या गावात आल्याचं मोतीरामला समजलं. तो तेथील अतिथि-गृहात उतरला होता. हे समजल्यावर मोतीरामला फार दुःख झालं नि तो त्याला भेटायला निघाला. पण ईश्वरीने त्याला जाऊ दिलं नाही. म्हणाली—"पाहिलंत न, मी म्हणाले तसंच झालं. तुमच्या मित्राचं पितळ उघडं पडलं. आता तुम्ही काही बोलू नका." पण चार दिवसांनी सीताराम जेव्हा त्यांना भेटायला आला, तेव्हा ईश्वरी आश्चर्यचकित झाली.

आपल्या मित्राला दोष देत सीताराम म्हणाला—"मला फार वाईट वाटलं की तुम्ही दोघे शहरात येऊन माझ्या घरी आला नाहीत." नंतर ईश्वरीकडे पहात तो म्हणाला—"हा तर गाढव मूर्ख आहे. कमीत कमी तू त्याला समजाऊ शकली असतीस. काही असो, जे घडलं ते बरं घडलं नाही. म्हणून यावेळी मी तुमच्याकडे रहायला आलो नाही."

"सामान्य परिस्थितीत आम्ही तुमच्याकडे अवश्य आलो असतो. पण माझी तब्येत बरी नव्हती, म्हणून तुमच्याकडे यायला संकोच वाटला!" आपले समर्थन करीत ईश्वरी म्हणाली.

"या कैफियतीत काही अर्थ नाही. आता एकदा तुम्ही दोघांनी शहरात आलेच पाहिजे, नि माझ्या घरी निदान दहा दिवस तरी राहिलं पाहिजे. तरच मी तुम्हाला क्षमा करू शकेन." सीतारामने आपला विचार सांगितला.

मोतीराम आणि ईश्वरी म्हणाले—"येऊं, एकदा जरूर येऊं!"

तेव्हा सीताराम हसत म्हणाला—"तुम्हाला काय वाटलं मी तुमच्याशी भांडायला आलो? मुळीच नाही. मी इकडे आलोच होतो. म्हटलं आपल्या मित्राला एक छोटी भेट देऊन जावं." आणि सीतारामने एक हिऱ्याची अंगठी दिली नि निघून गेला.

आता मात्र ईश्वरीचा चेहरा पाहण्यासारखा झाला. सीतारामला काही भेट द्यावी लागेल म्हणून ती त्याच्या घरी गेली नव्हती. पण आता सीताराम त्यांच्या घरी राहिला नव्हता, तरी भेट देऊन गेला. सीताराम भेटी देई-आपलं प्रेम, मैत्री नि बंधुत्वभाव दाखवण्यासाठी! व्यापारासाठी नव्हे. हे सत्य ईश्वरीच्या लक्षात यायला बराच उशीर झाला, पण सीताराम किती चांगला माणूस आहे हे आता तिच्या लक्षात आलं. काही दिवसांनंतर ती स्वतःच नवऱ्याला बरोबर घेऊन सीतारामकडे जायला निघाली. बरोबर काही छान छान भेट-वस्तु ही तिने घेतल्या.













# अधिकार पत्र

हेलापूरीच्या जंगलात शिकाऱ्यांची संख्या फार वाढली. त्यामुळे जनावरांची संख्या दिवसें-दिवस कमी होऊं लागली. राजा विद्याधरच्या जेव्हा हे लक्षात आलं तेव्हा त्याने आदेश दिला कि अधिकार-पत्राशिवाय जंगलात कुणाला ही शिकार करता येणार नाही. जर कोणी आज्ञा-भंग करील, तर त्याला कठोर शिक्षा दिली जाईल.

एक दिवशी जंगलात दोन शिकारी शिकार करीत होते. अनपेक्षितपणे दोन जंगल-अधिकारी तेथे पोचले आणि दोन्ही शिकाऱ्यांना त्यांनी विचारले—"राजाची मोहर लावलेलं तुमचं अधिकार-पत्र कुठे आहे?" हे ऐकताच एक शिकारी पळून जाऊं लागला. अधिकाऱ्यांनी दुसऱ्या शिकाऱ्याला तिथेच सोडलं, नि पळून जाणाऱ्या शिकाऱ्यामागे ते धाऊं लागले.

जंगलात दूर अंतरावर गेल्यावर शिकारी अधिकाऱ्यांच्या तावडीत सापडला. दमून गेल्यामुळे जोरात श्वासोच्छ्वास करीत आपल्या आतल्या खिशात ठेवलेलं अधिकार-पत्र काढून त्याने अधिकाऱ्यांना दाखवले.

राजाची मोहर लागलेलं ते अधिकार-पत्र अधिकाऱ्यांनी नीट तपासून पाहिलं नि त्याला म्हणाले—"तू उगाचच आम्हाला इतकं पळवलंस! अधिकार-पत्र तुझ्याजवळ होतं तर तुला पळून जाण्याची काय जरूरी होती?"

एक दीर्घ श्वास सोडून शिकारी म्हणाला—"माझ्याजवळ अधिकार-पत्र होतं, पण माझ्या मित्राजवळ नव्हतं ना!"





# अद्‌भुत फूल -४

(माणिक्यपुरी राज्याच्या दक्षिणेकडील भागातल्या समुद्रकिनाऱ्यावरील काही गावे अचानक जमीनदोस्त होऊन तिथले लोक भयग्रस्त झाले. त्यातील काही प्राणरक्षणासाठी राजधानीकडे आले. स्वतः राजा, राजकुमारी आणि सेनापती या लोकांच्या आश्रयाची व्यवस्था करण्यात रात्रंदिवस मग्न झाले. समुद्रतटाकडे चौकशी करायला सेनापती, त्या घटनेचे पूर्ण वर्णन करताना म्हणाला की, या सर्व विनाशाच्या मुळाशी एक भयंकर दिसणारा राक्षसी प्राणी आहे अन् तो अर्ध्या रात्री समुद्रातूनच बाहेर पडला होता.)

सेनापती गंभीरसिंह सरळ राजवाड्यात पोचला. दलाधिपति वीरसिंहने सांगितलेली सर्व माहिती त्याने राजाला निवेदन केली. ते ऐकून राजा प्रतापवर्मा म्हणाला, "काय म्हणालात? राक्षसी प्राणी? अशा प्राण्यांचं वर्णन तर ऐतिहासिक गोष्टीतून सुद्धा ऐकायला मिळालेलं नाही कधी! अन् आश्चर्य म्हणजे असली, विश्वास सुद्धा न बसावा अशी गोष्ट आजच्या काळात ऐकू येतेय्! स्वतःच्या डोळ्यांनी तो पप्राणी पाहिलेला कोणीही माणूस इथे आपल्यापर्यन्त पोचलेला नाही. फक्त सैनिकांनी सांगितलेली गोष्ट दलाधिपतीने तुमच्या कानी घातली. त्यात किती तथ्य याचा आपण गंभीरपणे विचार करायला हवा!"



"होय प्रभु, दलाधिपती वीरसिंहाने जमीनदोस्त झालेली गावंच फक्त पाहिली आहेत, प्रत्यक्ष तो राक्षसी प्राणी नाही पाहिलेला! पण एवढी गोष्ट मात्र खरीच की गावं नष्ट होण्याचं कारण निसर्गाचा कोप नव्हे, दुसरंच काही तरी असलं पाहिजे. सैनिकांकडून राक्षसी प्राणी पाहिल्याबद्दल जे कळलंय, ते निराधार मानणंही बरोबर नव्हे! फक्त 'काहीतरी बकवास' म्हणून ती गोष्ट कानावेगळी करणंही बरोबर होणार नाही. आपण परवानगी दिलीत, तर मी स्वत: तिथे जाऊन, खरोखर काय घडलंय ते पाहून येईन. आपल्या देशातील जनतेवर जे महासंकट कोसळले आहे ते तर आपण प्रत्यक्ष पहात आहोत. म्हणून सैनिकांनी जे काही सांगितलं त्याची शहानिशा करणं अत्यंत आवश्यक आहे. आणि हे काम कोणी तरी जबाबदार माणसाने केले पाहिजे. म्हणून महाराज, मी स्वत:च या कामगिरीवर निघतो. हा राक्षसी प्राणी प्रत्यक्ष पाहिला पाहिजे, म्हणजे त्याच्या जाचातून सुटकेचा विचार आपण करू शकू. शिवाय आपल्या राज्यावर त्याचा अलीकडेच का एवढा कोप झाला आहे ते ही आपण जाणून घेतले पाहिजे. मूलभूत कारण आपल्याला समजले म्हणजे मग आपण योग्य ती उपाय योजना करू शकू. म्हणून महाराज मी म्हणतो या जबाबदारीच्या कामावर मी स्वत:च जातो. दुसऱ्या कोणावर हे काम सोपविणे योग्य होणार नाही." सेनापती गंभीरसिंह विनयपूर्वक बोलला.

थोडा विचार करून राजा म्हणाला, "ठीक आहे, तुम्ही जा. मी लगेच राजगुरूंना बोलावून घेऊन पुढे काय करायचं, ते ठरवीन."

"जशी आज्ञा," म्हणून राजप्रासादाच्या पश्चिमेकडे, जिथे शरणार्थी बायका-पुरूषांची व्यवस्था केली होती, तिकडे सेनापती निघून गेला. त्याला पाहिल्याबरोबर सैनिक प्रणाम करून त्याला म्हणाले, "सर्व काही सुरळीतपणे चालू आहे महाराज! इथे कसलीच अडचण नाही. शरणार्थींची चौकशी करायला राजकुमारी ही आज आल्या आहेत."

गंभीरसिंह आतल्या खांबांच्या ओळीमधून विशाल अशा मंडपात गेला. इतक्यात अगदी सामान्य वस्त्रं परिधान केलेली राजकुमारी आपल्या दासींसह जवळच्याच एका खोलीतून बाहेर आली. सेनापतीला पाहिल्या बरोबर ती म्हणाली, "इथल्या लोकांना खाण्यापिण्याची काहीही कमतरता नाही. लहान मुलांच्या तब्येतीची ही मी चांगली काळजी घेतलेली आहे. त्यांची प्रकृति बिघडू नये याबद्दल जागरूक असायला, मी राजवैद्यांनाही सुचवलं आहे?"

"राजकुमारी, तुमच्या या वागणुकीने मलाही फार संतोष वाटतोय! विशेषत: लहान मुलांची तुम्ही जी काळजी घेताय ती खासच प्रशंसनीय आहे. या गोष्टीची आगाऊ काळजी घ्यावी हे उचितच आहे." सेनापतीने राजकुमारीचे कौतुक करत म्हटले.

राजकुमारी पुढे म्हणाली, "इथे ज्या बायका आहेत, त्या तशा सुखात आहेत पण बऱ्याच दूर रहात असलेल्या आपल्या नवऱ्यांची मात्र त्यांना चिन्ता लागून राहिली आहे. त्यामुळे एकदाच का होईना, पण फार दूर असणाऱ्या नवऱ्यांनी





इथे येऊन आपल्या बायकामुलांना भेटून जावं."

"असंच करू या राजकुमारी! उद्या संध्याकाळपर्यन्त त्यातल्या काहीजणांना इथे पाठवायची व्यवस्था करीन मी." असे बोलत सेनापती दुसऱ्या शिबिराकडे वळला.

इतक्यात दलपती वीरसिंह समोरून येऊन नमस्कार करत म्हणाला, "आज आणखीही काही सैनिक जखमी होऊन परतले आहेत. आपले वैद्य त्यांचा इलाज करत आहेत, पण भ्यायलेले ते सारेजण राक्षसी प्राण्याबद्दलच पुन्हापुन्हा बोलत आहेत."

"त्यांचं खरं ठरलं, तर खरोखरच आपला देश भयानक संकटात सापडलेला आहे. त्या प्राण्याला तोंड देण्यासाठी आपल्याला कदाचित इतरांचीही मदत घ्यावी लागेल. काहीही असलं तरी आता मात्र मला स्वतःलाच तिथं जाऊन त्या राक्षसी प्राण्याची माहिती मिळवायला हवी. मी आता दक्षिणप्रान्ताकडेच निघतोय, तुम्हीही माझ्याबरोबर यायला हवं. संध्याकाळपर्यन्त पूर्ण तयारी ठेवा." सेनापतीने त्याला आज्ञा दिली.

तेव्हां दलपतीने विचारले, "आपल्याबरोबर सैन्यंही घ्यायचं?"

"नको, तुमच्याबरोबर तीन सैनिक घेणं पुरेसं होईल. पण आज रात्री पहाऱ्यावर जाणाऱ्या सैनिकांना मात्र नेहमीप्रमाणेच जाऊ द्या. आपण स्वतन्त्रपणे निरनिराळे जाऊ. आपल्या या बेताची तिसऱ्या कुणालाही खबर लागू देऊ नका." सेनापतीने सूचना दिली.

त्या दिवशी दुपारी सेनापती, दलपती आणि तीन सैनिक माणिक्यपुरी राज्याच्या दक्षिण सरहद्दीकडे चालू लागले. संध्याकाळपर्यन्त ते समुद्रकिनारी पोचले. तिथे पोचल्यावर त्यांना दिसून आले की तिथली केवळ सारी गावेच नव्हे, तर झाडे झुडपेही नाहीशी झाली आहेत! त्या ओसाड जागी संरक्षणासाठी याशिवाय आणखी काहीच नव्हते.

चौथा प्रहर सुरू होताच उत्तरेकडे काळ्या डोंगरासारखे काहीतरी हलत आहे, असे सेनापतीला दिसून आले. तो आकार हळूहळू आपल्याकडेच येत असल्याचे त्याने दलपतीला दाखवले. आकार हळूहळू हलत-डुलत पुढे सरकत होता. इकडून तिकडे हलणारे त्याचे मस्तक झाडांवरून दिसत होते. तो जेव्हा आणखी पुढे आला, तेंव्हा त्याचे भयकारी रूप स्पष्ट दिसू लागले. त्याचे पाय ताडाच्या झाडासारखे अन् हात अजगरासारखे दिसत होते. त्या राक्षसपशूच्या भयंकर रूपामुळे सेनापतीचे हृदयही कापू लागले.

सेनापती आणि दलपती यांनी त्याच्या वाटेत काही अडथळा न आणता आपण बाजूला सरकून त्याला पुढे जाऊ दिले. सौभाग्याने सैनिकही त्याच्या पायाखाली तुडवले जाण्याच्या भयाने दूर पळाले.

पूर्वेला सूर्यकिरणे दिसू लागता लागता तो राक्षसी प्राणी समुद्र गर्भात अदृश्य झाला.

चालत जाणारा तो पर्वताकार राक्षस पाहून सेनापतीच्या मनात आले की, या प्राण्याला कोणताही मानवप्राणी तोंड देऊ शकणार नाही! प्रत्यक्षच पाहिल्यावर आता हे ही सिद्ध झाले की, हा विचित्र प्राणी मध्यरात्रीच समुद्रातून निघून



उत्तरेकडे जातो अन् सूर्योदयाबरोबर पुन्हा पाण्यात अदृश्य होतो. त्याच्याशी लढणे अशक्य असल्याने त्याने आपल्या तीन्ही सैनिकांना राजधानीकडे परत पाठवलं. पहाऱ्यासाठी तेथे अगोदर आलेल्या सैनिकांचा काही पत्ताच नव्हता. सेनापतीने ओळखले की, ते सारेच्या सारे राक्षसाच्या पायाखाली दबून गेले असले पाहिजेत.

त्यावेळी हाच विचार करत असलेला दलपती सेनापतीला एकदम म्हणाला, "प्रभु, त्या राक्षसाशी सामना देऊन आपल्या आणखी सैनिकांचे प्राण गमावणं शहाणपणाचं होणार नाही. त्यापेक्षा तो



राक्षस शहरात घुसून काही नुकसान होण्यापूर्वीच शहर वाचवण्याचा काही अुपाय योजून सावधगिरी बाळगणं जास्त योग्य होईल."

"होय, तुमचं म्हणणं अगदी योग्यच आहे. आता कोणत्या अुपायाने राक्षसाला शहरप्रवेशापासून रोखता येईल हाच विचार करायला हवा. त्यासाठी काही योजना बनवायला हवी. जमलं तर त्याच्या नाशाचाच अुपाय शोधला पाहिजे. आता आपण राजधानीत जाअून महाराजांना आपलं म्हणणं सांगू या. आज रात्री इथे सैनिकांना पहाऱ्यावर पाठवायची आवश्यकता नाही. अुद्या सकाळी पुन्हा तुम्ही इथे येअून त्या राक्षसाच्या पावलांचे ठसे कुठे आढळले तर पाहून ठेवा." असे बोलत सेनापती आपल्या घोड्यावर आरूढ झाला. दलपतीनेही त्याचे अनुकरण केले, अन् दोघेही राजधानीला गेले.

सेनापती राजवाड्यात पोचला, तेंव्हा महाराज प्रतापवर्मा राजगुरू गौरीनाथशी काही विचारविनिमय करत होते. सेनापती दिसल्याबरोबर राजाने, तो राक्षसप्राणी स्वतः पाहिला की नाही, याबद्दल त्याच्याकडे विचारणा केली. राजाच्या स्वरात आतुरता पुरेपूर भरलेली होती.

"होय महाराज, सैनिकांच्या सांगण्यात जराही अतिशयोक्ति नव्हती. तो प्राणी नक्कीच राक्षस असला पाहिजे." असे म्हणून सेनापतीने दक्षिण समुद्रतटावर पाहिलेल्या दृश्याचे सविस्तर वर्णन केले. "तो राक्षसी प्राणी अर्ध्या रात्री समुद्रातून बाहेर पडून सरळ अुत्तरेकडे जातो आणि सकाळ होता होता पुन्हा समुद्रात विलीन होतो. आपल्यापैकी कोणातही त्याला मारण्याची.शक्ती असणे शक्य नाही."

हे बोलणे ऐकून राजा गंभीरतेने विचार करू लागला. इतक्यात राजगुरु म्हणाले, "महाराज, चन्द्रकेतुला कुलश्रेष्ठ पुजाऱ्याकडून शाप मिळाला. माझा अंदाज आहे की, तो चन्द्रकेतूच या रूपात प्रकट झालेला आहे. क्वचितच आढळणारी 'शताब्दि फुलं' आपल्या राज्यातल्या अुत्तरेकडेच असल्याने, राक्षसरूपातला चन्द्रकेतु तिकडे आकर्षित झालेला असावा. अशा स्थितीत ती 'शताब्दि फुलंच' आपलं रक्षण करू शकतील."



"पण ती विचित्र फुलं आपले रक्षण कसं काय करू शकतील? आपण तर म्हणाला होतात की, ती फुलं आपल्यावर गंडांतर आणतील? मग हे कसं शक्य होईल गुरुदेव?" राजाने आश्चर्य प्रकट केले.

"कुलश्रेष्ठ पुजाऱ्याकडून शापित झालेला चन्द्रकेतु आता या भूमीवर राहू शकणार नाही. त्याला ती विचित्र फुलंच माणिक्य पुरीकडे आकर्षित करत आहेत. आपण जर ती फुलं त्या राक्षसाच्या- म्हणजेच चन्द्रकेतुच्या- निवासस्थानी समुद्रात नेअून टाकली, तर त्या नरराक्षसाच्या आपल्याकडे येण्याच्या भयातून आपली मुक्तता होईल की नाही? आता फक्त हे साहसी कृत्य आपणापैकी कोण करू शकेल, हेच पाहयचं आहे." राजगुरूने आपले म्हणणे स्पष्ट केले.

गुरुदेवांच्या या बोलण्याने राजाला श्रृंगमाय पर्वतावरील त्या अुत्तुंग जातीच्या लोकांची आठवण झाली. वसंतोत्सवात येअून विविध स्पर्धांत विजय मिळवणारा युवक उत्तुंग व त्याचे दोस्त यांची राजाला अकस्मात् आठवण झाली अन् त्यांनी आपल्याला मोठ्या आदराने आपणाकडे येण्याचे आमंत्रणही दिल्याचे स्मरले. निरनिराळे खेळ खेळताना तो युवक किती तरतरीत व तेजस्वी दिसत होता! खेळताना तो चपळाईने इतक्या वेगवान हालचाली करी, की तिथे एकच अुत्तुंग नसून एकाच वेळी अनेक अुत्तुंग अुपस्थित असल्याचा भास अुत्पन्न होत होता! इतका शूर असूनही तो विनयशीलही किती होता. वसंतोत्सवातला 'विजयी

वीर' म्हणून जाहीर झाल्यानन्तर त्याने किती विनयाने तो शताब्दि फुलांचा गुच्छ राजकन्येला अर्पण केला होता. आपले शिपाई व दलाधिपती त्या फुलांची रोपे आणण्यासाठी श्रृंग्माय पर्वत प्रान्तात गेले असता या अत्तुंग जमातीच्या लोकांनी त्यांचे किती प्रेमाने स्वागत केले होते! शंभर वर्षांनी एकदा फुले लागल्यानन्तर नवीन रोपे येण्यास आणखी दोन वर्षे वाट पहावी लागली. तेव्हां ती रोपे देण्यास आपण असमर्थ असल्याने त्यांना किती वाईट वाटले होते. तरीही राजकन्या नाराज होऊ नये म्हणून पुन्हा खूप कष्ट करून आणखी काही फुले मिळवून रोपांऐवजी ती फुलेच त्यांनी पुन्हा शिपायांहाती पाठवली होती. राजकुमारीला भेटीदाखल ती फुलं देणारा युवक हा अत्तुंगच असल्याने हे काम त्याच्यावरच सोपवावे असे राजाच्या मनात आले. संकट टाळण्याचा हाच एक अुपाय आहे, असे त्याला वाटले. लगेच आपले मस्तक हलवून सेनापतीकडे वळत राजा त्याला म्हणाला, "मी आपल्या राज्यरक्षणासाठी अुद्याच श्रृंग्माय पर्वताकडे जाणार आहे. माझ्याबरोबर दलपती वीरसिंह आला, तर पुरेसे होईल." नंतर राजगुरूंना अुद्देशून राजा म्हणाला, "गुरुवर, माझी ही यात्रा सफल व्हावी असा आशिर्वाद द्या मला." अन् आशिर्वादासाठी राजाने आपले मस्तक झुकवले.

"राजा! हा निर्णय अगदी योग्य असाच आहे. राज्यरक्षणासाठी सदा सन्नद्ध असणाऱ्या अन् त्यासाठी प्राणही द्यायची तयारी असणाऱ्या अत्तुंगजातीच्या लोकां कडून तुझा हा अुद्देश पूर्ण होईल. लैरंबीमातेचे आशिर्वाद नेहमी तुला लाभोत व ती तुझ्या प्रजेचं रक्षण करो!" असे म्हणून राजगुरूने राजाला आशिर्वाद दिला.

क्रमशः





# अजेयचा जय

दृढनिश्चयी विक्रमादित्य पुन्हा झाडापाशी आला, त्याने झाडावरून प्रेत उतरवले व वेताळ बोलू लागला –"राजा, एका वेदांती नि तपस्वी अजेय नावाच्या राजकुमाराची गोष्ट मी तुला सांगतो. हा राज्याच्या प्रलोभनात गुरफटून आपला नाश करून घेतो. गोष्ट ऐकताना तुझा थोडा श्रम-परिहार ही होईल."

अरूणगिरीचे महाराज विक्रमसेन यांना दोन मुलगे होते-अजेय नि विजय. अजेय लहानपणापासूनच वेदान्ताकडे झुकलेला होता. पण विजय त्याच्या अगदी विरुद्ध स्वभावाचा होता. राजा बनण्याची जबरदस्त आकांक्षा त्याच्या मनात होती.

सोळा वर्षांचा असतानाच अजेय सर्व विद्या-पारंगत झाला. त्याला युवराज म्हणून घोषित करण्याची वडिलांची

**वेताळाच्या गोष्टी**



इच्छा होती. पण विजय म्हणाला—"पिताजी, अजेय वयाने मोठा असला तरी राज्य-कारभार करण्याची ताकत त्याच्यात नाही. तो तर आहे एक वेदांती दार्शनिक!"

त्यावेळी तेथे हजर असलेला अजेय म्हणाला—"राजा जनक वेदांती होता. पण त्याने राज्य-कारभार उत्तम रीतीने केला. विजय, तू ही थोडा वेदांत शिकलास तर बरे होईल."

"कुठल्या ही विषयाचं अर्धवट ज्ञान योग्य नव्हे. मी असं मुळिच करणार नाही. वेदांती असून ही तुझ्या मनात राजा होण्याची इच्छा असेल तर तू कसला रे वेदांती?" कठोरपणे विजय अजेयला म्हणाला.

यावर हसून अजेय म्हणाला—"मला आपल्या वेदांती असल्याचा कधीच गर्व नव्हता नि नाही. पिताजीच मला युवराज बनवू इच्छितात. तू का त्यांच्या इच्छेच्या आड येतो आहेस?"

राजा विक्रमसेनने विजयच्या पाठीवर हात ठेवीत म्हटले—"विजय, बोलण्यात तू अजेयला जिंकू शकणार नाहीस. तुम्ही दोघांनी राम-लक्ष्मणाप्रमाणे एकमेकांवर प्रेम करावं अशी माझी अंतःकरणपूर्वक इच्छा आहे. तुझी राजा बनण्याची इच्छा योग्य नाही. कारण मोठ्या मुलाने राजा होणं न्यायसंगत आहे. असंच आता पर्यंत सर्वत्र घडत आलेलं आहे."

"पिताजी, माझा सामर्थ्यावर विश्वास आहे. संप्रदाय काही ही असो." विजयने आपला विचार सांगितला.

यावर अजेय म्हणाला—"विजय, जर सामर्थ्यावर खरोखर तुझा विश्वास असेल, तर आपल्याला देशातील सर्व युवकांसाठी एक स्पर्धा योजली पाहिजे."

अजेयच्या या प्रस्तावावर काय बोलावं हे विजयला सुचेना. त्याचा चेहरा पडला. भावाची पाठ थोपटीत अजेय म्हणाला—"म्हणूनच मी तुला म्हणतो-थोडा वेदान्त शीक. त्यामुळे तर्क-ज्ञान वाढते."



विजय चिडून म्हणाला—"राजाला बाहु-बलाची आवश्यकता असते. तर्क करायला मंत्री-गण असतातच. परीक्षेच्या आधारे मोठ्यांनी निर्णय घ्यावा की राजा बनायला कोण अधिक योग्य आहे?"

विजयचा प्रस्ताव अजेयने मान्य केला. परंतु अजून ही विजय सर्व युद्ध-विद्यात परिपूर्ण नव्हता. म्हणून अजेयनेच सुचवलं की ही स्पर्धा दोन वर्षांनंतर घेतली जावी.

या दोन वर्षांत विजयने खूप मेहनत केली. सर्व प्रकारच्या युद्ध-विद्यात तो तरबेज झाला. गुरूंनी त्याची खूप तारीफ केली. एक दिवशी अजेय बरोबर त्याची स्पर्धा झाली, पण त्यात त्याचा पराजय झाला.

इतकं सगळं घडल्यावर आता अजेयला विजय म्हणाला—"युद्ध-विद्यात तू असा पारंगत आहेस, तेव्हा तुला राज्याची आकांक्षा नाही यावर मी कसा विश्वास ठेवावा?"

सामर्थ्य, निस्वार्थता आणि वेदांती विचार यांचे सुरेख मिश्रण ज्याच्यात असेल तोच आदर्श राजा बनू शकेल. राजा होण्याची महत्त्वाकांक्षा तर मला नाही, पण मी राजा झालो तर पिताजींना आनंद होईल. प्रजा पण सुखी होईल. म्हणून माझी राजा बनण्याची इच्छा आहे.



शेवटी अजेयलाच राजा बनवण्याचा निर्णय विक्रमसेनने केला. विजयने पुन्हा विरोध केला. आता वडिलांनी त्या विरोधाची पर्वा केली नाही. तेव्हा विजय आपल्या आईकडे जाऊन म्हणाला—"मातोश्री, मला राजा होण्याची फार इच्छा आहे. जर माझी ही इच्छा पूर्ण झाली नाही, तर मी एकाद्या वेळी बंड करीन."

महाराणीने समजाऊन सांगण्याचा प्रयत्न केला—"तू राजद्रोह केलास तर तुला नक्कीच मृत्युदंड भोगावा लागेल. दोन भावात जो मोठा असतो, तोच राजा बनण्याचा अधिकारी असतो."

पण विजय म्हणाला—"ते शक्य नाही.



सैन्यातील बरेच लोक माझ्या बाजूला आहेत. सेनापतींचा विचार काही समजत नाही. मी राजा व्हावं अशी माझ्या अनेक मित्रांची इच्छा आहे. मी जर बंड करून उठलो तर निःसंशय मीच राजा होईन.''

मुलाचं हे बोलणं ऐकून आई घाबरली आणि सर्व गोष्टी राजाच्या कानांवर घातल्या. आपला धाकटा मुलगा राजा होण्यासाठी बंडाळी करू इच्छितो हे जेव्हा राजा विक्रमसेनला समजलं, तेव्हा तो रागाने लाल झाला. त्याने दोन्ही मुलांना बोलवलं आणि विजयला धमकावलं—''तू जर राजद्रोह केलास, तर तुला कठोर शिक्षा दिली जाईल हे लक्षात ठेव.''

अजेयने राजाला प्रार्थना केली की—''पिताजी, आपण काळजी करू नका. विजय जे काही करीत आहे, त्या सर्वांवर माझं लक्ष आहे. विजय ज्यांना ज्यांना भेटतो, त्यांना मी ही भेटतो. विजयला विरोध करण्याची त्यांना भीति वाटते, म्हणून केवळ ते त्याला मदतीचं आश्वासन देतात. पण मी राजा बनावं अशीच त्या सर्वांची इच्छा आहे. आपण विजयला क्षमा करावी.''

''पण राजा होण्याची याला महत्त्वाकांक्षा आहे. जर वेळीच याला शिक्षा न दिली, तर एक दिवशी हा बंड करून उठेल!'' विक्रमसेन म्हणाला.

अजेयने आपला विचार सांगितला—''मला खरोखर राजा होण्याची इच्छा नाही. पिताजी, आपण विजयला राजा बनवा आणि एक वर्ष भर राज्यकारभार चालवण्याची संधि त्याला द्या. जर प्रजेने त्याचे शासन मान्य केले, तर त्यालाच राजा म्हणून कायम करा.''

अनिच्छेने का होईना विक्रमसेनने अजेयचा प्रस्ताव मान्य केला. विजयने एक वर्षभर राज्य-संचालन व्यवस्थितपणे केले, आणि यशस्वी राजा म्हणून तो प्रसिद्ध झाला.

अशात अजेयने एकदा एक बैठक आयोजित करून आपला विचार सर्वांपुढे



मांडला—''विजय राज्य-शासन चांगलं करू शकतो हे आता सिद्ध झालं. आता त्यालाच राजा बनवून माझी जंगलात जाण्याची इच्छा आहे.''

सर्व उपस्थित लोकांनी एकमताने जाहिर केले की अजेयनेच राज्य-शासन केले पाहिजे. लोकांचा निर्णय ऐकून विजयचा चेहरा पडला. त्याने लोकांना विचारलं—''माझ्या सामर्थ्यावर आपला विश्वास नाही का?''

उपस्थित लोक म्हणाले-''विजयच्या मागे अजेय असेल तरच ते सामर्थ्य उपयुक्त ठरेल. अजेय नसेल तर विजय समर्थ शासक होऊच शकणार नाही. अजेयहून अधिक समर्थ माणूस धुंडून ही सापडणार नाही.''

तेव्हा अजेय सर्वांना उद्देशून म्हणाला -''मीच तर या राज्याचा खरा राजा आहे. विजय माझा प्रतिनिधि बनून राहील. मी जंगलात जाऊन तपश्चर्या करीन आणि अतींद्रिय शक्ति प्राप्त करून आपल्या देशाचं रक्षण करीन. विजयच्या राज्य-कारभारात काही चूक झाली नि त्यामुळे कोणावर अन्याय झाला तर त्याने न्यायासाठी माझ्याकडे यायला हरकत नाही. हाच माझा अंतिम निर्णय आहे!''

विजय राजा झाला. पण एवढ्याने त्याला संतोष झाला नाही. विजय



अजेयचा प्रतिनिधि आहे असेच सर्व लोक समजत. अजय स्वतः महाशक्तिशाली आहे. जर तपोबलाची ही त्याला साथ मिळाली तर आपल्याला नक्कीच धोका आहे. विजयच्या मनात ही शंका घर करून राहिली. त्याने प्रथम तुरुंगातल्या काही अट्टल कैद्यांना मुक्त केले आणि जंगलात जाऊन अजेयला मारून टाकण्याची त्यांना आज्ञा दिली. अजेयचे तपोबल व त्याची धार्मिक प्रवचने यांनी प्रभावित होऊन ते त्याचे शिष्य बनून गेले. आता आपल्या थोरल्या भावाचा तपोभंग करण्यासाठी विजयने अप्सरांहून सुंदर अशा युवती अजेयकडे पाठविल्या.



अजेयने आपल्या शिष्यांशी त्यांचे विवाह करविले नि धाकट्या भावाला निरोप पाठविला की अजून ही काही शिष्य अविवाहित आहेत, त्यांच्यासाठी आणखी काही कन्या पाठवाव्यात.

आपण अजेयवर जय मिळवू शकत नाही हे विजयच्या लक्षात आले. त्याला माहीतच होतं की प्रजा अजेयच्या तुलनेत त्याला तुच्छ समजते. म्हणून त्याने राज्यात दवंडी पिटवली की 'मी विजयचा प्रतिनिधि नाही, मीच या राज्याचा खरा राजा आहे!'

काही मंत्री, राजप्रतिनिधी व राजसेवकांनी या घोषणेचा विरोध केला. त्या सर्वांना विजयने राज्यातून बाहेर घालविले. ते सर्व जण जंगलात अजेय कडे आले. अजय त्यांना म्हणाला– "विजयच्या राज्य-कारभारात मी ढवळाढवळ करू इच्छित नाही. त्याच्या शिस्तीत जर आपणास त्रास होत असेल तर आपण इथे माझ्यापाशी रहा. इथे तुम्हाला कशाची कमतरता पडणार नाही.

हळू हळू विजयच्या राज्यात अत्याचार वाढू लागले. त्यामुळे राज्य सोडून जंगलात जाणारांची संख्या वाढू लागली. अजेयने त्या सर्वांना आश्रय दिला. इतक्या अधिक संख्येने येणाऱ्या लोकांच्या सर्व गरजा भागविणं काही सोपं काम नव्हतं. अजेयने आपल्या तपोबलाच्या साहयाने एका अमोघ वट-वृक्षाची निर्मिती केली. हा वृक्ष ज्याला जे पाहिजे ते देऊ लागला.

एके दिवशी विजय काही सैनिकांसह जंगलात अजेय जवळ आला, आणि म्हणाला– "इथे तू सर्व अपराध्यांना आधार देत आहेस. तुझ्यावर मी राजद्रोहाचा आरोप करतो. बोल, यावर तुझं काय म्हणणं आहे?"

विजयच्या या प्रश्नावर अजेयला खूपच राग आला. आणि तो म्हणाला "वा! मीच तर या देशाचा खरा राजा. तुझ्या या आरोपाचं मी खंडण करण्याची मुळिच आवश्यकता नाही. ताबडतोब तू राज्य सोडून चालता हो." आपल्या सैनिकांच्या साहयाने विजयने अजेयच्या आश्रितांना कैद करण्याचा प्रयत्न केला. अजेय जरा ही डगमगला नाही. त्याने वटवृक्षाकडे पाहून एक चुटकी वाजवली. त्यासरशी वृक्षाच्या फांद्या आणि पारंब्या यातून असंख्य सैनिक निर्माण झाले. त्यांनी विजयला आणि त्याच्या सर्व सैनिकांना कैद केलं.

तेव्हा अजेयला फार आनंद झाला आणि त्याने आज्ञा दिली–"हा विजय देशद्रोही आहे. याला देशाच्या सरहद्दीबाहेर हाकलून द्या."

या घटनेनंतर अजेय जंगल सोडून राजधानीत आला आणि आपला राज्याभिषेक करवून तो अरुणगिरीचा राजा झाला.

वेताळाने विक्रमादित्याला ही गोष्ट ऐकवली आणि म्हणाला-"राजा, अजेय सारखा वेदांती, संयमी, शांतगुणी माणूस इतका बदलतो, याचे कारण त्याच्या मनातील राजपदाचा लोभच नाही का? त्याने अनेकदा विजयला क्षमा केली. धाकट्या भावाने त्याच्यावर राजद्रोहाचा आरोप करताच त्याने त्याला बंदी बनवलं. इतकं सर्व काही केल्यावर विजयला राज्याबाहेर घालवणं आणि स्वतः राजा बनून सिंहासनावर बसणं



राजपदाचा मोहच नाही का? त्याने असे करणे गैर नव्हे का? या स्वार्थीपणामुळे त्याचे सर्व सद्‌गुण मातीमोल होत नाहीत? हा अजेयचा परजयच नाही का? या माझ्या शंकेचं समाधान जाणून-बुजून तू केलं नाहीस, तर तुझं डोकं धडावर राहणार नाही हे मी सांगण्याची आवश्यकता नाही."

राजा विक्रमादित्य म्हणाला—"स्वार्थ, लोभ व क्रोध या तामसिक गुणां पलीकडे पोंचलेल्या ज्ञानी सत्पुरुषाची तुलना सामान्य माणसा बरोबर करणं इष्ट नव्हे. त्याचं खंडण अथवा त्याची प्रशंसा ही योग्य नव्हे. ज्ञानी व विवेकी माणसाला कधी कधी लोक-कल्याणासाठी फार कठोर वागावे लागते. परिस्थितीकडे पाहून जर असे न केले तर त्या माणसाला ज्ञानी वा विवेकी म्हणता येणार नाही. आरंभी विजयची राजा होण्याची इच्छा वैयक्तिक होती, पण तो जेव्हा राजा झाला जेव्हा आपला भाऊ आपल्या मार्गातील धोंड आहे असं त्याला वाटू लागलं, म्हणून त्याने आपल्या प्रजेवर अत्याचार करायला सुरुवात केली. अजेयने बरेच दिवस वाट पाहिली की आपल्या भावाच्या प्रवृत्तीत बदल होईल, पण तसे जेव्हा घडले नाही तेव्हा त्याला नाइलाजाने विजयला राज्याबाहेर काढावे लागले. राजद्रोह हा राज-परिवार व राजाश्रित लोकांपुरता मर्यादित असतो, पण विजय आपल्या प्रजेचाच शत्रु बनला आणि त्याने देशद्रोह सुरू केला. राजापेक्षा राज्य हे अधिक पवित्र असते. म्हणूनच आपल्या भावाला केवळ राजद्रोही नाही तर देशद्रोही ठरवून आपण स्वतः राजा बनला."

अशा रीतीने राजाचा मौन-भंग झाल्यावर वेताळ शवासह अदृश्य झाला आणि झाडावर जाऊन बसला.

कल्पित

वसुंधरेच्या एका कथेवर आधारित



# चान्दोबा पुरवणी-५७

भारतातील पशुपक्षी

## ससाणा

आन्तरराष्ट्रीय खेळांच्या अुत्सवांच्या सुरुवातीला विश्वशांतीची कामना मनात बाळगून कबुतरे अुडवली जातात. ही प्रथा खूप दिवसांपासून प्रचलित आहे. पूर्वीच्या काळी दूरदूरच्या प्रान्तात लेखी बातम्या पोचविण्यासाठी कबुतरांचा अुपयोग केला जात असे. पोपटांना भाषा शिकवण्याची ही पद्धत अस्तित्वात आहे. त्याचप्रमाणे इतर पक्ष्यांची शिकार करण्यासाठी ससाण्यांना प्रशिक्षण दिले जाते. ससाणा आकाशात खूप अुंचावरून अुडतो आणि खाण्यायोग्य एकादा पक्षी आढळताच एकदम झडप घालून, त्याला पकडून खाअून टाकतो. मजबूत शरीराचा अन् टोकदार पंखांचा हा पक्षी ताशी २८० कि. मी. वेगाने अुडू शकतो, असे मानले जाते.



अुत्तर भारतात 'पहीत' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या या ससाण्यांचा अुपयोग राज-परिवारातील माणसे करत असत, आणि त्यांच्या करवी पक्ष्यांच्या शिकारीचा खेळ खेळत असत. अुडणाऱ्या पक्ष्याला झटकन् पकडून तो एकाद्या झाडावर जाअून बसतो. नन्तर प्रथम त्या पक्ष्याचे पंख काढून टाकून मोठ्या आवडीने त्याला खाअू लागतो.

जगात ससाण्यांच्या जवळजवळ ७० जाती आहेत, असे मानले जाते. त्यांच्या नाकाच्या बाजूचा, वरचा जबडा दृढ अन् धारदार असतो. पहीत जातीच्या ससाण्यांची डोकी काळ्या रंगाची व रेषा असणारी अशी असतात. त्यांचे पंख रुंद असतात. खालची पोटाकडची बाजू फिक्या गुलाबी किंवा लाल रंगाची असते. काही ससाण्यांच्या पोटाच्या खालच्या बाजूवर काळ्या रेषा असतात.

माणसांचा संपर्क नसेल अशा पर्वत शिखरांवर हे ससाणे आपली घरटी बनवतात. दरवर्षी निराळ्या जागी घरटे बनवून त्यात ते अंडी घालतात. नर ससाण्यापेक्षा मादी ससाणा आकाराने मोठी असून, ती एका वेळी फिक्या लाल रंगाची तीन चार अंडी घालते.



# आधुनिक भारतातील साहित्य :

भारत-पाकिस्तानच्या फाळणीपूर्वीचे दिवस. पुरो ही तरुणी पंजाब प्रान्तातील एका खेड्यात रहात असे. जवळच्याच गावच्या रामचन्द्र नावाच्या एका युवकाशी तिचे लग्न ठरले. आपल्या वैवाहिक जीवनाबद्दलची स्वप्ने रंगवत असतानाच एके दिवशी रशीद नावाच्या एका मुसलमान तरुणाने तिचे अपहरण केले!

पुरोचे आजोबा सावकारी करत असत. त्यांनी रशीदच्या आजोबांच्या कुटुंबाची खूपच छळणूक करून त्यांना पार धुळीला मिळवले होते. या गोष्टीचा सूड घेण्यासाठीच रशीदने पुरोला पळवून नेले होते.

रशीदच्या घरातच डांबून ठेवलेल्या पुरोने काही दिवसांनी रात्री तेथून पळ काढला व ती आपल्या घरी गेली.

## अमृता प्रीतमची गोष्ट 'पिंजरी'



परंतु आपल्या घरातच तिचा फार अपमान केला गेला! कारण ती स्वतः एक हिन्दू स्त्री असून, तिला पळवून नेणारा होता एक मुसलमान! तिला आपल्या घरात ठेवले, तर समाज आपल्या कुटुंबावर बहिष्कार टाकेल, आपली मान-मर्यादा धुळीला मिळेल—अशा विचारने घरातल्या वडीलधाऱ्यांनी पुरोला घरात ठेवून घ्यायला सरळ सरळ नकार दिला! तिचा विचारीचा अन्य मार्गच खुंटल्यामुळे ती घर सोडून निघून गेली. परन्तु रशीदने तिला आपल्या घरी आश्रय दिला व तिच्याशी विवाह केला. ते दोघेही दुसऱ्या गावी निघून गेले.

इकडे पुरोच्या बहिणीचे रामचन्द्रशी लग्न झाले. रामचन्द्रची बहीण लाजो हिने पुरोच्या भावाशी लग्न केले.

पुरोचे मात्र आपल्या माहेरच्यांशी काहीच संबंध राहिले नाहीत. तिची सारी नातीच तुटली. पुरोचे नाव आता 'हमीदा' असे झाले होते. रशीदचे तिच्यावर अपार प्रेम होते अन् तो मोठ्या प्रेमाने तिचा सांभाळ करत होता. पुढे त्यांना एक मुलगाही झाला. अशीच बरीच वर्षे उलटून गेली.

भारत-पाकिस्तानची फाळणी झाली अन् देशात सर्वत्र भांडण-तंटे सुरू झाले. विविध प्रान्तातले हिन्दू-मुसलमान एकमेकांच्या कत्तली करू लागले. पुरो जिथे रहात होती, तो भाग पाकिस्तानात अन्तर्भूत झाला. तेथील हिन्दूंना धाक दाखवून तेथून हाकलण्यात येऊ लागले. त्यातील काहीजण घाबरून एका मोठ्या घरात लपून बसले. गुंडांनी त्या घराला आग लावून दिली; परन्तु ऐन वेळी पोलिसांनी येऊन त्यांना वाचवले. तरीही मदत मिळेपर्यन्त तीन माणसे जळून मेलीच. जे जगले-वाचले, त्यांना भारतात पाठवून देण्यात आले. पण जी तीन माणसे मेली, त्यांच्या हाडांचे सापळे तिथेच पडून राहिले. जे हिन्दू पोलीस-संरक्षणात गाव सोडून निघाले, त्यांनी रात्र पुरोच्या गावातच काढली. ज्याच्याशी आपला विवाह होणार होता, तो रामचन्द्र पुरोला त्या लोकांच्यात दिसला. तिच्या भावाची बायको लाजो, हिचा काही पत्ता लागत नसल्याची वार्ता तिला त्याच्याकडून समजली.

सकाळीच सारे हिन्दू भारताकडे निघाले, इकडे पुरो लाजोचा शोध घेत होती. तिला लाजो एका विधवेच्या घरी आढळली. त्या म्हातारीचा मुलगा या सुंदर मुलीशी जबरदस्तीने निकाह करायच्या विचारात होता.



पुरोने रशीदच्या मदतीने लाजोला वाचवले व तिला आपल्या भावाच्या हवाली केले. हा तिचा सख्खा भाऊच होता.

पुरोच्या भावाने तिला असा सल्ला दिला की, 'तिला भारतात पळून जायला ही चांगली संधी आहे, अन् तीही शेवटचीच. तेव्हा ही संधी हातची सोडू नये,' पण पारो काही आपल्या पतीला सोडून जायला राजी नव्हती. रशीदने सूड घेण्यासाठी तिचे अपहरण केले होते हे खरेच; पण आता त्याचे तिच्यावर फारच प्रेम होते व तो तिची खूप काळजी घेत होता.

लूटमार व गुंडगिरीला बळी पडून हाडांचे निर्जीव सापळे बनणाऱ्या स्त्रियांच्या विषादपूर्ण परिस्थितीचे प्रतिबिम्ब म्हणजे 'पिंजारी' (अस्थिपंजर). हीच या कादम्बरीची मुख्य कथावस्तु आहे.

पंजाबची प्रमुख लेखिका अमृता प्रीतम यांनी ही कादम्बरी लिहिली आहे. समाजाच्या चालीरीति व घडामोडींचे अगदी हुबेहूब वर्णन लेखिकेने या कादंबरीत केले आहे; अन् म्हणूनच अगदी समर्पक असे 'पिंजारी' हे नाव त्यांनी दिले आहे. अमृता प्रीतम यांना साहित्य अकाडेमीचा 'ज्ञानपीठ पुरस्कार' ही मिळालेला आहे.

# तुम्हाला माहीत आहे काय?

१. दुखवटा व्यक्त करण्यासाठी ख्रिश्चन लोक काळे कपडे घालतात. चीनचे रहिवासी यासाठी कोणता रंग वापरतात?
२. मुंबईचे 'गेट वे ऑफ इंडिया' कोणत्या राजाच्या सन्मानार्थ उभारण्यात आले?
३. व्हिक्टोरिया राणीचे इंग्लंडवर अनेक वर्षे शासन चालू होते. तिने किती वर्षे राज्य केले, हे माहीत आहे?
४. 'कबुकी' ही नृत्य-नाटक-शैली कोणत्या देशाची आहे?
५. अमेरिकेच्या संयुक्त राष्ट्रांपैकी एका राष्ट्राने सर्वात अगोदर स्वातन्त्र्याची घोषणा केली. परन्तु त्या राष्ट्राने अमेरिकेच्या संविधानाला संमति मात्र सर्वात शेवटून दिली. ते राष्ट्र कोणते?
६. इंग्रजांनी १७८८ मधे ऑस्ट्रेलियातील एका नगराला 'कैद्यांची वसाहत' म्हणून घोषित केले. ते नगर कोणते?
७. आफ्रिकेतील कोणता देश जवळजवळ दोन हजार वर्षांपूर्वी पासून स्वतन्त्र आहे?
८. २,४०० वर्षांपूर्वी कोणत्या ग्रीक तत्ववेत्त्याला मृत्युदंड देण्यात आला?
९. आपल्या देशात सर्वात अगोदर प्रकाशित झालेल्या 'बंगाल गॅजेट' नावाच्या साप्ताहिक पत्रिकेचा प्रकाशक कोण?
१०. चीनवर शासन करणारा पहिला शासक कोण?
११. जगातील अतिशीतल प्रदेशाचे नाव काय?
१२. सर ऐझेक पिटमन हा कशासाठी प्रसिद्ध होता?
१३. 'ताजमहाल'च्या आकाराची कल्पना करणारा पर्शियाचा स्थापत्यशास्त्रज्ञ कोण?
१४. सर्वात प्रथम स्त्रियांना मताधिकार देणारा देश कोणता?
१५. सर्वात उंचावर वसलेल्या राजधानीच्या शहराचे नाव काय?
१६. अंतरिक्षात भ्रमण करणाऱ्या पहिल्या महिलेचे नाव काय?
१७. मीटर गेज व ब्रॉडगेज यांच्यातील फरक किती?
१८. आपल्या देशातील प्रसिद्ध सूर्यमंदिराचे नाव काय?
१९. कर्नाटक-संगीतातील 'त्रिमूर्ति' कोणाकोणाला म्हणतात?
२०. ब्रह्मपुत्र नदी कुठे व कोणत्या समुद्राला मिळते?

## उत्तर

१. पांढरा.
२. इंग्लंडचा राजा पंचम जॉर्ज.
३. ६३ वर्षे.
४. जपान.
५. रोड ऐलंड.
६. सिडनी.
७. इथियोपिया.
८. सॉक्रेटीस.
९. जेम्स ऑगस्टन हिकी.
१०. चेंगिझखानचा नातू कुब्लाखान.
११. अंटार्टिकाचे वोस्टाक स्टेशन (८७ सेल्सियस).
१२. शॉर्टहॅण्ड लिपि अस्तित्वात आणली.
१३. वस्तार ईसा.
१४. न्यूझीलंड. १८९३ मधे.
१५. बोलिव्हियाची राजधानी लापोज.
१६. वोरिना तेरिष्कोवा.
१७. मीटर गेज १ मीटर, ब्रॉडगेज १.६७५ मीटर.
१८. ओरिसातील कोणार्क.
१९. त्यागराज, श्यामशास्त्री, मुत्तुस्वामी दीक्षित.
२०. नौखाली जवळ बंगालच्या उपसागरात.



# श्रेष्ठ वैद्य

राजा विक्रमसेन शिकारीसाठी जंगलात गेला नि रस्ता चुकला. रस्ता शोधत असताना त्याला काट्यां-कुट्यांतून जावे लागले व तो घायाळ झाला. अशा असहाय्य स्थितीत त्याला एक साप चावला. त्यामुळे राजा बेशुद्ध झाला.

तो जेव्हा शुद्धीवर आला जेव्हा त्याने पाहिलं कि आपण एका आश्रमात पुष्प-शैयेवर आहोत. राजाच्या जवळच एक मुनि बसला होता. तो राजाला म्हणाला—"बरं झालं, माझ्या शिष्यांनी वेळेवरच तुला बेशुद्ध झालेला पाहिला नि ते तुला इथं घेऊन आले. मला जेवढे उपचार करता आले तेवढे मी केले. आता कसं वाटतंय तुला?"

राजाची तब्येत उत्तम झाली होती. त्याने मुनीला दक्षिणा दिली. मुनी म्हणाला-"मी काही वैद्य नाही. तुझी ही दक्षिणा मी स्वीकारणे योग्य नव्हे. राजधानीत सौभाग्य-नगरीत प्रचंड नावाचा एक प्रसिद्ध वैद्य राहतो. जाऊन त्याचा राजसम्मान कर."

राजाने राजधानीत येऊन राजवैद्य प्रदीपला प्रचंड बद्दल विचारलं.

प्रदीपने येऊन राजाचा प्रश्न जाणून घेतला आणि सांगितलं "महाराज, मी राजवैद्य आहे. माझ्याहून श्रेष्ठ कोणी वैद्य आपल्या राज्यात असेल हे संभवत नाही. राजसम्मान तर माझाच झाला पाहिजे. पण केवळ संकोचाने मी आपणास तसे काही सुचवीत नाही, इतकंच!"

राजा विक्रमसेनने विचारले—"म्हणजे

अमृतेश्वरी पुरोहित



सौभाग्यनगरी प्रचंड नावाचा एक श्रेष्ठ वैद्य आहे हे तुम्हाला माहीत नाही असं दिसतंय."

प्रचंडचं नाव ऐकताच प्रदीपचा चेहरा उतरला. त्याच्या चेहऱ्यावरील तेज नष्ट झालं, त्याचा उत्साह नाहीसा झाला. अनिच्छेने तो म्हणाला—"महाराज, मी प्रचंडचं नाव तर ऐकलंय. त्याच्याकडून जे उपचार करून घेतात ते श्रीमंताचे गरीब होतात असं ही ऐकलंय. त्याची चिकित्सा फार खर्चिक असते नि सामान्य माणसाला ती पर्वडत नाही."

प्रदीपच्या या बोलण्याचं विक्रमसेनला मोठं आश्चर्य वाटलं आणि त्याने प्रश्न केला—"हे तुम्ही कुणाच्या तोंडून ऐकलं बरं?"

प्रदीपने सांगितले—"काही दिवसांपूर्वी सौभाग्यनगरचा कुमारगुप्त नावाचा एक श्रीमंत माणूस इथं आला होता. तो माझा मित्र आहे. त्याने मला प्रचंडची ही कथा ऐकवली. लोभाला ही काही सीमा असते महाराज! अतिलोभ अमानवीय होय."

राजाने प्रदीपला रवाना केले आणि असंतोषाने मंत्र्याला म्हणाला-"प्रचंडच्या श्रेष्ठते बद्दल मी बरंच काही ऐकलंय. ते मला ज्याने सांगितलं, तो ही कोणी सामान्य माणूस नाही. तो एक महान् मुनि आहे. आपलाच व्यवसाय करणाऱ्या कुणाबद्दल प्रदीपच्या मनात ईर्ष्या असणे शक्य आहे. पण माझ्यापुढे, आपल्या राजापुढे असं धादांत खोटं बोलण्याचं साहस त्याने का करावं हे माझ्या लक्षात येत नाही."

मंत्री म्हणाला—"आपल्या संदेहाचं निराकरण कुमारगुप्तला भेटल्यावरच होऊ शकेल. पण आपण राजा म्हणून त्याच्याकडे गेलात तर तो निर्भयपणे सत्य बोलणार नाही. म्हणून आपण वेष पालटून त्या नगरीत जाऊ आणि वस्तु-स्थिति जाणून घेण्याचा प्रयत्न करू. महामुनि तर खोटं बोलणारच नाहीत. मला वाटतं आपल्या राजवैद्य प्रदीपनेच ही खोटी कथा रचलेली असावी."

राजा आणि मंत्री वेष पालटून सौभानगरीत पोचले. प्रचंड कोणी सुप्रसिद्ध माणूस आहे असं त्यांना वाटलं नाही. ते कुमारगुप्तला भेटले तेव्हा त्याने प्रदीपचीच री ओढली.

मंत्री कुमारगुप्तला म्हणाला—"हे पहा, जंगलातील महामुनि सुद्धा सांगतात की प्रचंड सारखा उत्तम वैद्य कोणी नाही. आपण गैरसमज करून घेणार नसाल तर असं म्हणू-की त्यांचे नि आपले काही व्यक्तिगत वैर असावे, म्हणून तो आपणांशी असा वागला असावा!"

यावर हसून कुमारगुप्त म्हणाला—"होय, त्याचं-माझं पटत नाही ही गोष्ट तर खरीच! पण मी त्याच्याबद्दल जे काही बोललो, तो केवळ माझाच विचार आहे असं नाही. प्रचंडचा एक परांकुश नावाचा मित्र आहे. त्याचं ही असंच म्हणणं आहे. वाटलं तर आपण त्याला भेटा नि वस्तु-स्थिति जाणून घ्या."

राजा आणि मंत्री परांकुशला भेटले, तेव्हा त्यांना समजलं की कुमारगुप्त जे सांगतो ते बरोबर आहे. तेव्हा राजा मंत्र्याला म्हणाला—"प्रचंड श्रेष्ठ वैद्य असेल ही, पण राजसम्मान व्हावा अशी त्याची योग्यता दिसत नाही. कारण त्याच्यात माणुसकीचा अभाव



दिसतो. खरंच ही मोठी दुर्भाग्याची गोष्ट आहे." असं बोलताना राजाला फार वाईट वाटलं.

राजाच्या या बोलण्याचं परांकुशला मोठं आश्चर्य वाटलं. तो राजाला म्हणाला—"प्रचंड वैद्य म्हणून जितका श्रेष्ठ आहे तितकाच तो मानवतावादी आहे, हे लोकांनी लक्षात घ्यावं असं मला वाटतं. तेच मी जरा निराळ्या प्रकारे सांगितलं, म्हणून आपला गैरसमज झालेला दिसतोय! लोभ त्याला मुळिच नाही. मानवाची सेवा म्हणजे परमेश्वराची सेवा असं तो मानतो. म्हणूनच तो गरीब व भिकाऱ्यांची सेवा करतो. श्रीमंताला त्याच्याकडून उपचार करून घ्यायचा असेल जर त्याला भिकाऱ्याचा वेष धारण करावा लागतो. आता माझ्या म्हणण्यातील रहस्य आपल्या ध्यानी येईल."

आता राजा विक्रमसेनचा संशय दूर झाला. कुणाबद्दल ही पूर्ण माहिती न मिळविता अर्ध-सत्यावर विश्वास ठेवणं बरोबर नाही हे त्याच्या लक्षात आले. विशेषतः कवींच्या गोष्टींचा अर्थ लावताना नीट समजून घेतलं पाहिजे, कारण त्या गोष्टी द्वयर्थी असतात. जोपर्यंत संपूर्ण गंभीरतेने आपण विचार करीत नाही, तोपर्यंत त्यांचा गूढार्थ आपल्या लक्षात येत नाही.

या घटनेनंतर विक्रमसेनने प्रचंडचा मोठ्या प्रमाणावर सन्मान केला. एवढ्यानेच त्याला संतोष झाला नाही. आपल्या राज्यात आणखी कोण असे महापुरुष आहेत, त्यांचा शोध करायला त्याने प्रारंभ केला. राजवैद्य प्रदीप मध्ये पण आता बदल घडून आला. संधि मिळाली की गरीबांची सेवा तो मोफत करू लागला. साधारण जनतेपर्यंत पोंचण्याचा हाच एक उत्तम मार्ग आहे हे त्याला समजून चुकलं.





# आळशाची लढाई

कोशल राज्यात वीरदास नावाचा एक तरूण रहात असे. तो एक नंबरचा आळशी होता. त्याचे आई-वडील तो लहान असतानाच वारले होते. आजीने मोठ्या प्रेमाने त्याचं पालन-पोषण केले, म्हणून तो आणखीनच आळशी बनला.

तो कोशल राज्यात जन्मला आणि मोठा झाला. कोशलच्याच शेजारी वैदेहीचं राज्य होतं. बरीच वर्षे या दोन राज्यात शत्रुत्व चालत आलं होतं. कोशल वर विजय मिळविण्यासाठी वैदेही राज्याचा राजा सिंहसेन याने मोठ्या प्रमाणावर सैन्याची जमवाजमव केली आणि एके दिवशी युद्धाची घोषणा केली.

कोशलचा राजा चंद्रकांत याला आपल्या हेरांकडून समजले की वैदेही राज्याची सेना त्याच्या सेनेच्या तिप्पट आहे, तेव्हा त्याने आपल्या राज्यात दवंडी पिटवली की देशातील सर्व तरुणांनी तत्काल सैन्यात भर्ती व्हावे.

दवंडी ऐकून देशातील अनेक युवक आपल्या देशाच्या संरक्षणासाठी सेना-दलात भर्ती झाले. राजाने आपल्या गुप्तचरांना आदेश दिला की अजून ही कोणी तरूण सैन्यात भर्ती झाले नसतील, तर त्यांना जबरदस्तीने सेनेत सामिल करावे.

सैनिकांची नजर चुकवून भटकणाऱ्या वीरदासला राजाच्या हेरांनी हेरले. ते त्याला म्हणाले—"कां? अजून तू सैन्यात भर्ती का झाला नाहीस?"

आश्चर्य प्रकट करीत वीरदास

स्वाती देशपांडे



म्हणाला—"युद्ध आणि देशभक्तीच्या गोष्टी तर मी आयुष्यात पहिल्या प्रथम ऐकत आहे. आजीने बनवलेलं अन्न खाणं आणि आरामात झोपणं यांशिवाय मला काही माहीतच नाही!"

हा एक नंबरचा आळशी आहे हे हेरांना त्याच्या बोलण्यावरून समजलं. त्यांनी त्याचे हात बांधले आणि युद्धाचं शिक्षण घेणाऱ्या तरुणांच्या गटात त्याला पाठवून दिले.

आता आपल्या सैन्यासह सिंहसेन कोशल राज्याच्या सीमेपर्यंत येऊन पोचला. राजा चन्द्रकान्त ही आपल्या सेनेसह शत्रूशी सामना करायला निघाला. सर्व सैनिक तलवार, ढाल नि चिलखत घेऊन राजा बरोबर निघाले. हे सर्व वाहून नेण्याइतकी ताकत वीरदासात नव्हती, म्हणून तो फक्त तलवार घेऊन निघाला. रणांगणावर भूक लागली तर उपयोगी पडतील म्हणून एका काशाच्या भांड्यात त्याने चार भाकऱ्या घेतल्या नि ते भांडं आपल्या कपड्याखाली पोटावर बांधलं. मातीच्या एका भांड्यात पाणी भरून घेतलं व ते आपल्या खांद्याला लटकवलं.

त्याला एक वृद्ध सैनिक तिथे दिसला. तो व्याकुळ होऊन कण्हत होता. त्याने वीरदासला इशारा करून सुचवले की त्याला फार तहान लागली आहे नि त्याला प्यायला पाणी पाहिजे. वीरदासने त्याला पाणी प्यायला दिले.

पाणी प्यायल्यानंतर "माझी नात मोठी सुंदर नि बुद्धिमान मुलगी आहे. मी ज्याला पसंत करीन, त्याच्याशीच लग्न करण्याचा तिचा हट्ट आहे. ही अंगठी घे. तिला सांग की मीच तुला तिच्याकडे पाठवलंय. जर प्राण वाचून रणांगणावरून बाहेर पडलास तर तूच तिचा नवरा होशील." असे म्हणत त्याने वीरदासाला अंगठी दिली अन् त्याने प्राण सोडला.





वीरदासला वाटले की आपण ही काही मृत्यूच्या तडाख्यातून सुटणार नाही. एवढ्यात वाचण्याचा त्याला एक उपाय सुचला. तो त्या म्हाताऱ्या सैनिकाजवळ जाऊन झोपला. त्याच्या शरीरावरील रक्त त्याने आपल्या कपड्यांना माखले आणि मेल्यासारखा पडून राहिला. काही क्षणात त्याला गाढ झोप लागली.

पण एक संकट त्याच्यापुढे येऊन ठाकलं. काही घोडे घायाळ झाले आणि सैरा-वैरा इकडे-तिकडे धावू लागले. एका घोड्याचा पाय जोराने वीरदासच्या खांद्याला लागला आणि तो व्याकुळ झाला.

याच वेळी शत्रु-पक्षाचा राजा चंद्रकांत घोड्यावर बसून वेगाने जात होता. त्याने कोठले ही हत्यार वा कवच जवळ नसणाऱ्या वीरदासला पाहिलं. त्याला वाटलं हत्याराशिवाय इथे असलेला हा युवक अवश्य मोठा पराक्रमी असला पाहिजे. तो म्हणाला—"वाह, तुझ्या सारख्या पराक्रमी माणसाला माझ्या हस्तेच मरण आलं पाहिजे." असं म्हणत राजाने आपली तलवार वीरदासच्या पोटात खुपसली.

कपड्यांच्या आत लपवलेल्या काशाच्या भांड्यावर ती तलवार लागली. त्यातून मोठा आवाज निघाला. त्या आवाजाने राजाचा घोडा घाबरला. राजाचा तोल जाऊन तो धडामदिशी खाली पडला.

आपला तोल सावरीत राजा दूर अंतरावर पडलेली आपली तलवार आणण्याचा प्रयत्न करू लागला. एवढ्यात वीरदासने त्या मेलेल्या वृद्ध सैनिकाचं प्रेत राजाच्या अंगावर फेकलं.

सैनिकाच्या मुठीत बंद असलेली तलवार नेमकी राजाच्या छातीत घुसली. 'वैदेही राज्य की जय' अशी घोषणा करीत राजा जमिनीवर पडला आणि

त्याने प्राण सोडले. आपल्या राजाच्या आकस्मिक मृत्यूमुळे सैनिक घाबरले नि सैरा-वैरा पळून जाऊ लागले.

वीरदासच्या हस्ते शत्रु-राजा मारला गेल्याचे जेव्हा राजा चन्द्रकांतला समजले तेव्हा तो स्वतः त्याला भेटायला आला आणि म्हणाला—"वाहवा, तू तर महावीर आहेस!" राजा सन्मानपूर्वक त्याला आपल्या महालात घेऊन आला. आता राजाने त्याला विचारलं—"बोल, तुला काय देऊ?"

वीरदास राजाला म्हणाला—"महाराज, मी आता खूप दमलोय! मला पोटभर जेवण द्या आणि झोपायला छान जागा द्या."

राजा चंद्रकांतने एक मोठा वाडा वीरदासला दिला आणि त्याच्या दिमतीला काही सैनिक दिले.

वीरदास एक आठवडा भर त्या वाड्यात आराम करीत राहिला. नंतर तो आपल्या गावी गेला आणि आजीला पालखीत बसवून वाड्यात घेऊन आला. जन्मापासून आळशी असलेल्या आपल्या नातवाचं वैभव पाहून आजीला फार आनंद झाला.

काही दिवसांनी वीरदासने आपल्या आजीला त्या वृद्ध सैनिकाची कथा सांगितली. आजी त्या मुलीच्या गावी गेली आणि अंगठी दाखवून मुलीला वाड्यात घेऊन आली. राजाच्या उपस्थितीत वीरदास व त्या म्हाताऱ्या सैनिकाची नात यांचा विवाह मोठ्या थाटामाटात पार पडला.

वीरदासने नीट विचार केल्यानंतर त्याच्या हे लक्षात आले की आळस हा आपला मोठा शत्रु आहे, आळसापायी मनुष्य-जन्म व्यर्थ होऊन जातो. आता तो परिश्रमपूर्वक युद्ध-विद्या शिकू लागला. शेवटी राजाने त्याला आपले सेनापति-पद बहाल केले.





# वीर हनुमान

चैत्र शुद्ध पंचमीच्या दिवशी राम अयोध्या सोडून वनवासाला निघाला होता. चैत्र शुद्ध चतुर्थीला वनवासाची चौदा वर्षे पूर्ण झाली. त्याच्या दुसऱ्या दिवशी तो भरद्वाजांच्या आश्रमात पोचला. भरद्वाज मुनींना प्रणाम करून तो म्हणाला—"स्वामीजी, अयोध्या नगरी सुरक्षित नि सुव्यवस्थित आहे ना? भरत राज्य-पालन यथायोग्य रीतीने करीतच असेल! आमच्या सर्व मातोश्री सुखात आहेत ना?"

भरद्वाज मुनि म्हणाले—"भरताने केस व जटा वाढवल्या आहेत. तुझ्या पादुका समोर ठेवून तो राज्य-कारभार करीत आहे. तो तुझी वाट पहा आहे. बाकी सर्व काही ठीक आहे."

हनुमानाला पुढे पाठविण्याची रामाची इच्छा होती, म्हणून तो हनुमानाला म्हणाला—"तू शृंगवेरपुरला जा. तेथील भीलराज गुहाला सांग की मी शत्रूचा पराभव करून सुखरूप परत आलो आहे. ही वार्ता ऐकून गुहाला फार आनंद होईल. तो तुला अयोध्येचा मार्ग दाखवील आणि भरताचा समाचार देईल. नंतर तू भरताला जाऊन भेट आणि त्याला माझी खुशाली कळव. त्याला सांग की मी वनवास संपवून सीता व लक्ष्मण यांच्यासह अयोध्येला येत आहे. सीतेच्या



अपहरणापासून रावण-संहारापर्यंतची सर्व हकिकत त्याला विस्ताराने ऐकव. हे सर्व सांगत असताना भरताच्या मनात काय विचार येत असतील, त्याच्या चेहऱ्यावर कोणते भाव प्रकट होत आहेत हे तू नीट जाणून घे. आपले पिता व प्रपिता यांच्या राज्याचे शासन तो आज करीत आहे. या राज्यावरील आपला अधिकार सोडण्यात त्याला दुःख तर होत नाही ना? बरीच वर्षे ज्या राज्याचा सांभाळ तो करीत आहे, त्याचा राजा बनून राहण्याची त्याची इच्छा असणे शक्य आहे! अशा परिस्थितीत त्यानेच राजा बनून रहावं हे मला इष्ट वाटते. आपलं हे काम करून शक्य तितक्या लवकर परत ये."

रामाने हनुमानाला जाण्याची आज्ञा देताच त्याने मनुष्य-रूप धारण केले व तो आकाशात उडाला नि अयोध्येकडे निघाला. प्रथम तो शृंगवेरपुरला पोचला आणि गुहाला भेटून त्याने निवेदन केलं—"राम खुशाल असल्याची वार्ता मी घेऊन आलो आहे. सीता व लक्ष्मण यांच्या सह तो आज भरद्वाज मुनींच्या आश्रमात आहे. उद्या सकाळी तो तेथून निघेल." आता हनुमान आकाश-मार्गाने नंदीग्रामकडे जायला निघाला.

नंदीग्रामच्या सभोवताली सुंदर उंच उंच वृक्ष होते. अयोध्या इथून दोन तासांच्या अंतरावर होती. इथे भरताने आपला आश्रम बनविला होता आणि हरिणाजिन परिधान करून तो रहात होता. चौदा वर्षांचा वनवास संपवून अजून ज्येष्ठ बंधु राम का परत आला नाही अशा चिंतेत तो होता. स्नान न केल्यामुळे त्याचं सर्व शरीर धुळीने माखलेलं होतं. केसांच्या जटा झाल्या होत्या. तो केवळ कंद-मूळ व फळेच खात असे. अशा स्थितीत मंत्री, पुरोहित व सेनापति यांच्या मदतीने तो राज्यशासन करीत होता. त्याच्या बरोबर राहणाऱ्या सर्वांनी भगवी वस्त्रे धारण केली होती.

भरताला पाहून हनुमानाने नमस्कार





केला आणि सांगितलं—"रामाचं कुशल-क्षेम कळवण्यासाठी मी इथं आलो आहे. मी जी बातमी आणली आहे, ती ऐकून तुझी सर्व काळजी दूर होईल. तुला लवकरच रामाचे दर्शन घडेल. रामाने रावणाचा वध केला, त्याने पळवून नेलेल्या सीतेला परत आणले आणि आपल्या सर्व इच्छा पूर्ण करून आपल्या महापराक्रमी मित्रांसह तो येत आहे. त्याच्या बरोबर सीता नि लक्ष्मण ही येत आहेत."

ही वार्ता ऐकून भरताच्या आनंदाला पारावार राहिला नाही. तो जणू आनंदातिरेकाने बेहोश झाला. शुद्धीवर आल्यावर तो हनुमानाला म्हणाला—"तू मला फार सुरेख बातमी दिली आहेस. तू मनुष्य आहेस की देवता हेच मला कळत नाही. तुला बक्षिस म्हणून एक लाख गायी, शंभर ग्राम, सर्व वस्त्राभूषणे व चौदा कन्या मी देत आहे. यांचा स्वीकार कर."

रामाच्या पादुका घेऊन भरत चित्रकूटहून अयोध्येला आल्यानंतर जे जे घडलं ते सर्व हनुमानाने भरताच्या आग्रहावरून त्याला विस्ताराने कथन केलं.

सर्व वृत्तांत जाणून घेतल्यावर भरताने मोठ्या आनंदाने शत्रुघ्नाला आज्ञा केली—"जा. अयोध्येतील सर्व लोकांना सांग की त्यांनी स्नान करून सुगंधित द्रव्ये व फुलांसह वाजत-गाजत मंदिरात जाऊन देवी-देवतांची पूजा करावी. रामाच्या दर्शनासाठी चारण व भाट यांनी आपल्या संगीत-वाद्यांसह बहु-संख्येने उपस्थित रहावे."

हजारो सैनिकांना बोलवून शत्रुघ्नाने आज्ञा दिली—"तुम्ही ताबडतोब जाऊन नंदीग्रामपासून अयोध्येपर्यंतचा मार्ग स्वच्छ करावा. कोठे ही खड्डे राहू देऊ नयेत. काही सैनिकांनी रस्त्यावर थंड पाणी शिंपडावं, फुलांचा सडा टाकावा. सूर्योदयापूर्वी अयोध्येतील सर्व रस्ते व घरे









सुशोभित झाली पाहिजेत. विशाल राजमार्गावर फुलांची तोरणे बांधा, चंदनाचा छिडकावा करा, रंगी-बेरंगी रांगोळ्या काढा."

राण्या, मंत्रीगण, सैनिक व त्यांच्या बायका, ब्राम्हण, क्षत्रिय, गणनायक सर्व जण रामाला पाहण्यासाठी बाहेर पडले. काही हत्तींवर बसले, तर काही रथांतून निघाले. सैनिक आपल्या आयुधांसह निघाले. जयंत, विजय, सिद्धार्थ, अर्थसाधक, अशोक, मंत्रपाल, सुमंत आदि मंत्रीगण ही निघाले. दशरथाच्या राण्या रथात बसून नंदीग्रामी पोचल्या.

रामाच्या पादुका आपल्या मस्तकावर धारण करून भरत रामाच्या स्वागताला निघाला. त्याच्या बरोबर ब्राम्हण, व्यापारी, अयोध्येतील प्रतिष्ठित नागरिक आपल्या हाती पुष्पमाला घेऊन निघाले. भरता बरोबर राज-चिन्ह, छत्र-चामर, सुवर्ण-दंड वगैरे होते.

बराच वेळ वाट पाहून ही जेव्हा राम दिसेना तेव्हा भरत हनुमानाला म्हणाला —"शेवटी तुझी बुद्धि माकडाचीच ना! रामाच्या येण्याची खोटी बातमी तू मला कशासाठी दिलीस? राम तर इथं कुठं दिसतच नाहीये."

हनुमानाने भरताला निवेदन केले —"भरद्वाज मुनींनी वानर-सेनेला मेजवानी दिली. त्यांच्या उद्यानातील रंगीबेरंगी फुले पाहून वानर आनंदातिरेकाने नाचू-बागडू लागले! त्यांचा कोलाहल तुला ऐकू येत नाहीये? ते सर्व जण गोमती नदी पार करीत असावेत असं मला वाटतं. ते बघ पुष्पक विमान, किती दुरून दिसत आहे ते! कुबेराचं ते विमान आता रामाचं झालं. त्या विमानात रामाबरोबर सीता, लक्ष्मण, वानरराज सुग्रीव आणि राक्षसांचा राजा विभीषण हे पण बसले आहेत."

लवकरच लोकांचे हर्ष-ध्वनि ऐकू येऊ लागले.—"तो पहा, राम येतो आहे!" रामाला पाहण्यासाठी सर्व जण उठून उभे राहिले. सर्वांची उत्सुकता पराकाष्ठेला पोचली होती.

एवढ्यात राम आलाच. समोर उभ्या असलेल्या रामाला नमस्कार करीत भरत म्हणाला—"ठरलेल्या अवधीत परत येऊन आपण दिलेले वचन पाळले, याबद्दल मी आपले आभार मानतो."

रामाने भरताला आपल्या विमानात घेतलं नि त्याला आलिंगन दिलं. भरताने लक्ष्मणाला कुशल-क्षेम विचारलं आणि सीतेला नमस्कार केला. सर्व वानर-वीरांना त्याने आलिंगन दिले. नंतर तो सुग्रीवाला म्हणाला—"आम्हा चार भावांना तू पाचवा भाऊ मिळालास." नंतर विभीषणाकडे वळून तो म्हणाला—"जो उपकार करतो तोच खरा मित्र! तुमची मदत आम्ही कधी ही







विसरणार नाही."

शत्रुघ्नाने राम व लक्ष्मण यांना प्रणाम केला आणि सीतेच्या पद-कमलांना श्रद्धापूर्वक नमस्कार केला. रामाने कौशल्येच्या पायांवर डोकं ठेवलं, आणि नंतर सुमित्रा, कैकेयी व वसिष्ठ यांना नमस्कार केला. सर्व नागरिकांनी मोठ्या उत्साहाने रामाचे स्वागत केले.

भरताने रामाच्या पादुका स्वहस्ते त्याच्या पायात घातल्या आणि म्हणाला –"आजपर्यंत ज्या तुमच्या राज्याचं पालन केलं ते आता तुम्हाला सोपवतो. तुम्हाला पुन्हा अयोध्येत आलेलं पाहून माझा जन्म सार्थक झाला. माझी इच्छा पूर्ण झाली."

राम विमानानेच नंदीग्राम येथे पोचला. त्याच्या बरोबर जेवढे लोक होते, सर्वांना घेऊन राम विमानातून खाली उतरला आणि नंतर विमानाला कुबेराकडे रवाना केलं.

रामाच्या राज्याभिषेकाचा मुहूर्त निश्चित झाला. राम, लक्ष्मण व भरत यांनी आपले केस कापून घेतले. भरत, लक्ष्मण, सुग्रीव, बिभीषण आणि राम यांनी मंगलमय स्नान केले. रामाने आपला देह चंदन-चर्चित केला व गळ्यात फुलांच्या माळा घातल्या. पिवळ्या रंगाची वस्त्रे परिधान करून तो सिंहासनावर बसला. शत्रुघ्नाने राम, लक्ष्मण व भरत यांना पुष्पहार व अन्य अलंकारांनी अलंकृत केले. दशरथाच्या राण्यांनी सीतेला अलंकारांनी शृंगारले.

सुमंत्र नावाचा सारथी जेव्हा रथ घेऊन आला तेव्हा राम त्यात बसला. सुग्रीव व हनुमान यांनी स्नान केले व उत्तम वस्त्रे व आभूषणे घालून ते ही अयोध्येकडे निघाले.

दशरथाचे मंत्री अगोदरच अयोध्येत पोचले. गुरु वशिष्ठ यांच्याशी आवश्यक सल्लामसलत करून त्यांनी राज्याभिषेकाची तयारी केली. सुग्रीवाची मित्रता, हनुमानाची अमोघ शक्ति,

वानरांनी युद्धात दाखवलेला पराक्रम आणि विभीषणाचं आपल्या बाजूला येणं यांबाबत रामाने नागरिकांना जेव्हा सविस्तर सर्व सांगितलं, तेव्हा त्यांच्या आश्चर्याला सीमा राहिली नाही. राम दशरथाच्या महालात पोचला. राजवाड्याचा काही भाग पाहुण्यांच्या निवासासाठी सुरक्षित ठेवण्यात आला.

सुग्रीवाने चार सोन्याचे कलश उत्तम वानरांच्या हाती देऊन त्यांना आज्ञा दिली—"उद्या सकाळ पर्यंत चार समुद्रांचं पाणी तुम्ही या कलशात घेऊन या."

जांबवान, हनुमान, वेगदीर्श व ऋषभ कलश घेऊन निघाले आणि पाचशे नद्यांचे पाणी घेऊन आले. चार समुद्रांचे पाणी ही येऊन पोचले.

नंतर शास्त्रीय विधिनुसार रामाचा राज्याभिषेक झाला. राम व सीता यांना रत्नजडित सिंहासनावर बसविण्यात आले. नंतर ऋत्विक, ब्राह्मण-कन्या, नागरिक व योद्धे यांनी एकामागून एक रामाचा अभिषेक केला.

शत्रुघ्नाने रामाच्या डोक्यावर श्वेत छत्र धरले. सुग्रीव चौरी ढाळू लागला. विभीषण ही एक दुसरी चौरी ढाळत राहिला.

आपल्या राज्याभिषेकाच्या या मंगल प्रसंगी रामाने ब्राह्मणांना सवत्स धेनु, सोने आणि वस्त्रे दान म्हणून दिली. रामाने सीतेच्या हातातील एक मोत्यांची माळ देऊन म्हटलं—"वानरांपैकी तुला जो अधिकाधिक आवडला असेल त्याला ही माळ दे." सीतेने ताबडतोब ती माळ हनुमानाला दिली. यानंतर रामाने वानर-वीरांना विविध प्रकारच्या भेटी दिल्या.

विभीषण लंकेला परत गेला. रामाने भरताला युवराज बनविले आणि स्वतः राज्य-संचालन करू लागला.





# जशास तसे!

चीन मध्ये एका खेड्यात एक जमीनदार रहात असे. त्याच्याकडे कोणी नोकर टिकत नसे. तो नोकराकडून खूप काम करून घेई, आणि पैसे देण्याची वेळ आली की त्याच्यावर खोटा आरोप करी—"सांगितलेलं काम तू नीट केलं नाहीस!" चार शिव्या देऊन तो नोकराला हाकलून देई.

जमीनदाराची ही सवय सर्वांना ठाऊक होती. म्हणून गावातील कोणी ही माणूस त्याच्या घरी काम करायला तयार होत नसे.

एकदा दूरच्या गावातील एक मुलगा जमीनदाराकडे येऊन काम मागू लागला. आणि त्याला काम मिळालं.

जमीनदाराने अगोदरच त्याला सांगितलं—"हे बघ, तुला आताच सांगून ठेवतोय. मी तुला जे काम करायला सांगेन ते तू नीट केलं नाहीस तर तुला मजुरी तर मिळायची नाहीच, मी तुला ताबडतोब कामावरून काढून टाकीन."

"आपण योग्यच सांगत आहात. सोपवलेलं काम ठीक केलं नाही तर ती चूकच नाही का?" नवा नोकर म्हणाला.

त्याने कामाला सुरुवात केली. सकाळी कोंबडा आरवला की तो कामाला लागे. अंधार पडेपर्यंत त्याचे काम चालू राही. कामात त्याने कधी ही आळस केला नाही.

एक दिवशी जमीनदाराने नोकराला बोलवलं आणि सांगितलं—"हे बघ, डोंगरावर बांबूची छान बेटं आहेत. वरच्या बाजूला हिरवीगार कोवळी पानं आहेत. उद्या आपल्या बैलाला तिथं घेऊन जा. तू पानं तोडून मात्र त्याला चारू

अमृता डिके

नकोस. समजलं?"

नोकर म्हणाला—"जशी आज्ञा मालक! तुम्ही सांगताय तसंच करीन."

दुसऱ्या दिवशी बैलाला घेऊन तो डोंगरावर गेला. बैलाला बांबूच्या एका बेटाला बांधलं. मग एक काठी हातात घेऊन बैलाला मारीत मारीत ओरडू लागला—"चल, वर चढ."

बिचाऱ्या बैलाला मार सहन होईना. तो बेटाच्या चारी बाजूंना धाऊ लागला.

रस्त्याने जाणारे-येणारे दोन घटका गंमत पहात आणि बैलाची कीव करून चालू लागत. लवकरच जमीनदाराच्या कानी ही वार्ता पडली. तो पळतच आला नि नोकराला म्हणाला—"अरे, कठोरपणे बैलाला असं का मारतो आहेस?"

"आपण गप्प बसा. हा फार घमेंडखोर झालाय. वर चढून पानं खायला सांगतोय मी केव्हाचा, हा वर चढतच नाहीये. चांगला मार खाल्ला म्हणजे स्वारी वळणीवर येईल!" नोकर म्हणाला.

जमीनदाराने दरडावून सांगितलं—"बस, पुरे झालं आता. बैलाला हिरवी पानं चारायची आता जरूर नाही. चल घरी."

जमीनदार नौकरावर चांगलाच नाराज झाला होता. काही तरी बहाण्याने त्याला काढून टाकायचा त्याने निश्चय केला. तो योग्य संधीची वाट पाहू लागला.

एक दिवशी तो नोकराला म्हणाला—"हे बघ, आपल्या घरावर मोठ्ठं कौलारू छप्पर आहे. पण काय त्याचा उपयोग? तू उद्या सकाळी एक काम कर. छप्परावर चढ नि काही भाजीपाला लाव."

"त्यात काय मोठंसं? तसंच करीन मालक!" नोकराने तावडतोब उत्तर दिलं.

दुसऱ्या दिवशी सकाळी त्याने एक कुदळ घेतली नि छपरावर चढला. कौलारू छपरावर कुदळीचे घाव घालायला सुरुवात केली. घरात झोपलेल्या जमीनदाराच्या अंगावर काही कौलांचे तुकडे पडले. घाबरून त्याने बाहेर येऊन पाहिलं, तेव्हा सगळा प्रकार लक्षात आला. त्याने विचारलं—"अरे, अशी कौलं का फोडतो आहेस? विचार काय आहे तुझा?"

"आपण गप्प बसा मालक, आपल्याला काही माहीत नाही. भाजीपाला लावण्याची ही सर्व पूर्वतयारी आहे. समजलं?" नोकर उत्तरला.

"बाप रे, पुरे झाला भाजीपाला! तू खाली उतर. काही नको भाजीपाला लावायला." जमीनदार म्हणाला.

या नालायकापुढे काय करावे हे जमीनदाराला समजेना.

उन्हाळ्याचे दिवस होते. पाण्याच्या दुष्काळामुळे जमीनदाराची शेतं सुकून चालली होती. त्याने नोकराला बोलवून सांगितलं—"हे बघ, उन्हाळ्यामुळे शेतं





वाळून चालली आहेत. उद्या सकाळी लवकर उठून तू आपली शेतं काळजीपूर्वक घरी घेऊन ये."

जमीनदाराला वाटलं हा वार काही फुकट जाणार नाही. आता आपला नोकर नक्कीच नोकरी सोडून जाईल.

नोकर म्हणाला—"त्यात काय मोठंसं मालक? तुम्ही म्हणताय तसंच करीन अगदी!"

दुसऱ्या दिवशी सकाळी जमीनदार जागा झाला. त्याने घराबाहेर बराच गडबड-गोंगाट चाललेला ऐकला. तो बाहेर आला.

नोकर एक मोठी कुदळ हातात घेऊन घरासमोरील भिंत पाडीत होता. घराचा मुख्य दरवाजा त्याने केव्हाच बाहेर फेकून दिला होता. आता भिंत हळू-हळू पडत होती.

"अरे मूर्खा, हे तू काय चालवलं आहेस? तुझी अक्कल तर ठिकाणावर आहे ना?" रागाने लाल होत जमीनदाराने विचारले.

भिंत पाडण्याच्या कामात खंड न येऊ देता नोकर म्हणाला—"तुम्ही गप्प बसा. तुम्हाला काय माहीत आहे?"

"भिंत पाडायचं काम थांबवशील की नाही?" जमीनदाराने खेकसत विचारले.

नोकर म्हणाला—"शेतं घरी आणायला कोणी सांगितली मला?"

"मग त्यासाठी काय भिंती पाडायला सांगितल्या मी तुला मूर्खा?" जमीनदाराने विचारले.

भोळ्या भावाने नोकराने प्रश्न केला—"निदान ही समोरची भिंत पाडल्याशिवाय शेतं घरात कशी आणता येतील मालक?"

आता जमीनदारचे डोळे उघडले. या नोकरापुढे आपलं काही चालायचं नाही हे त्याच्या लक्षात आलं. जमीनदाराने त्याला एक खाशी रक्कम देऊन रवाना केलं!



## चान्दोबाच्या बातम्या

### अेव्हरेस्ट शिखरावर स्त्रिया

अेव्हरेस्ट शिखरावर चढणारी पाहिली महिला कोण? ती आहे जपानमधील जूंको टाबी. पण या शिखरावर चढणारी पहिली भारतीय स्त्री कोण हे माहीत आहे? तिचे नाव आहे बचेन्द्र पाल. या शिखरावर दोन वेळा चढून जाणारी स्त्री ही आपल्याच देशातली आहे. तिचे नाव आहे संतोष यादव. जगातली कोणतीही महिला अजूनपर्यन्त तेथे दोनदा पोचली नव्हती. १० मे १९९३ रोजी तिने हे यश मिळवले. १९९२ मधे ती या अगोदर एकदा गेली होती. दुसऱ्या वेळी जेंव्हा ती एवरेस्टवर चढायला गेली, तेव्हा तिच्याबरोबर कुंग भुरिया व डिक्की डोल्मा नावाच्या आणखी दोन महिलाही होत्या. महिलांनी ज्यात भाग घेतला,



असे हे पहिलेच पर्वतारोहण होय. एका आठवड्यातच बचेन्द्र पालच्या नेतृत्वाखाली दीपू शर्मा, राधादेवी, सुमन कुटियाल आणि वनिता मार्टोलिया नावाच्या चार महिलांनी एव्हरेस्टवर चढून एक नवा अुच्चांक प्रस्थापित केला. त्याच दिवशी, म्हणजे १६ मे रोजी स्पॅनिश पर्वतारोहण संघातील नेपाळची शेरपा अंगरीशा नवव्यांदा एव्हरेस्टवर पोचली. १९८३ मधे पहिल्यांदा एव्हरेस्ट चढलेल्या अंगरीशाने १९८४, ८५, ८७, ८८, ९० व ९२ मधे पुन्हापुन्हा हा पराक्रम केला होता. तिचा हा अुच्चांक मोडणे सोपे नव्हे!

### आकाशात खाद्यपदार्थांची जाहिरात

आकाशात मोठमोठे फुगे नेहमीच सोडले जातात. त्यांवर असणाऱ्या व्यापारी जाहिराती ही अलिकडील सर्वसाधारण गोष्ट झाली आहे. या फुग्यांमुळे जनतेचे लक्ष सहजपणे आकर्षित करून घेता येते. पण लवकरच एक मैल लांबीचा एक 'बिलबोर्ड' आकाशात अुडवण्याचा प्रयत्न एक अमेरिकन व्यापारी कंपनी करणार आहे. याला विरोध करणाऱ्यांचे असे म्हणणे आहे की, हा एक गंभीर व भयानक प्रकार आहे. तरीही खाद्यपदार्थांच्या जाहिरातीचा हा विचित्र प्रकार लवकरच अस्तित्वात येणार आहे.

### 'हरताळ' करणारे घड्याळ

लंडन शहराच्या 'वेस्ट मिनिस्टर' भागात असणाऱ्या 'बिगबेन' घड्याळाचा आवाज जगभर प्रसिद्ध आहे. दर पंधरा मिनिटांनी, तीस मिनिटांनी आणि पाऊण तासाने एकेकदा मधुर आवाज करणाऱ्या घंटा यात बसवलेल्या आहेत. नुकत्याच पंधरा मिनिटांनी आवाज करणाऱ्या घंटा आठ आठवडे बंद पडल्या होत्या. परन्तु यंत्र विशारदांनी आतील 'गियर चक्र' बदलले आणि ते काम पुनश्च सुरू झाले. परन्तु १९ मेच्या संध्याकाळी ६.३० ते ९.२५ पर्यन्त घंटांचा आवाज ऐकू आला नाही, आणि इंजिनियर लोक गंभीरपणे या 'हरताळा'च्या कारणांचा विचार करू लागले! अन् इतक्यात त्या घंटांचा मधुर आवाज यथावत् घुमू लागला!





# ब्रह्मदेवाची गाठ

प्राचीन काळी काशी नगरीत राजपाल नावाचा एक तरुण रहात असे. लहानपणीच त्याचे आई-वडील वारले. काही प्रतिष्ठित नागरिकांच्या मदतीने त्याने आपले शिक्षण पूर्ण केले आणि राजदरबारात एक चांगलीशी नोकरी मिळवली.

नोकरी मिळाल्यावर आता त्याला लग्न करावंसं वाटू लागलं.

कुणी तरी मदत केल्याशिवाय आपलं लग्न होणार नाही हे तो समजून चुकला, म्हणून त्याने आपल्या मनातील गोष्ट आपल्या एका मित्राला सांगितली.

त्या मित्राने सल्ला दिला—"एका न्यायाधीशाची एक उपवर मुलगी आहे. सर्व दृष्टींनी ती तुला योग्य आहे. मी आजच रात्री न्यायाधीशांशी तुझ्याबाबत बोलणी करीन. उद्या सूर्योदयाच्या वेळी आपण मनकर्णिका घाटावर भेटू. जे ठरेल ते मी तुला तिथे सांगेन."

रात्रभर राजपालला झोप आली नाही. चौथ्या प्रहरी त्याने बाहेर डोकावून पाहिलं तेव्हा त्याला वाटलं सकाळ झालीय. तो लगबगीने मनकर्णिका घाटावर पोचला. बराच वेळ त्याने आपल्या मित्राची वाट पाहिली. त्याला दूर पायरीवर एक माणूस दिसला.

पायरीवर बसलेला माणूस म्हातारा होता. चांदण्यात तो काही ताडपत्रे ध्यानपूर्वक पहात होता. म्हाताऱ्याच्या मागील बाजूने राजपालने पाहिले. तेव्हा त्याला ती लिपि काही विचित्रच वाटली.

वृद्ध त्याला म्हणाला—"तुला ही लिपि कशी वाचता येईल? ही तर ब्रह्मलिपि आहे!"

मीनल नामजोशी

"आपण हे काय लिहीत आहात?" राजपालने वृद्धाला विचारले.

डोकं वर न उचलता वृद्धाने सांगितले—"सूर्योदयापूर्वी जन्माला येणाऱ्यांच्या जन्म-कुंडल्या आहेत या!".

राजपालला मोठं आश्चर्य वाटलं. हा माणूस प्रत्यक्ष ब्रह्मदेव तर नसेल अशी त्याला शंका आली.

थोड्या वेळात वृद्धाने आपले लिहिण्याचें काम संपविले आणि सर्व ताडपत्रे बांधून बाजूला ठेवली. नंतर त्याने आपल्या जवळच्या पिशवीतून काही तांबडे नि काही पांढरे दोरे काढले नि गाठी बांधायला सुरुवात केली.

"दादाजी, हे दोरे कसले? आणि या गाठी आपण कशासाठी मारीत आहात?" राजपालने वृद्धाला विचारले.

डोकं वर न करता आपलं काम चालू ठेवीत वृद्धाने सांगितले—"या ब्रह्मगाठी आहेत! ज्या पुरुषांच्या भाग्यात ज्या स्त्रिया आहेत, त्यांच्या या गाठी मी मारीत आहे."

"तर मग माझी गाठ कुणाशी बांधली आहे हे आपणास माहीत असेलच. थोड्याच वेळात माझ्या लग्नाची वार्ता घेऊन येणाऱ्या आपल्या मित्राची मी वाट पहात आहे." राजपालने उत्साहपूर्वक माहिती दिली.



वृद्ध राजपालकडे पाहून म्हणाला—"तुझं लग्न फार लवकर होणार नाहीये. तुझ्या होणाऱ्या बायकोचं वय आज तीन वर्षांचं आहे. ती जोपर्यंत १७ वर्षांची होणार नाही, तोपर्यंत तुझं लग्न होणार नाही."

राजपाल म्हणाला—"म्हणजे आणखी चौदा वर्षे माझं लग्न होणार नाही! हे कसं शक्य आहे?"

"तिकडे बघ, एका डोळ्याने आंधळी ती बाई येत आहे न? तिच्या कडेवर जी मुलगी आहे, ती तुझी बायको होणार आहे." वृद्धाने भविष्य सांगितले.

राजपाल झटपट पायऱ्या चढून वर आला आणि त्या म्हाताऱ्या बाईजवळ



पोचला. एका डोळ्याने आंधळ्या त्या म्हातारीचे कपडे मळलेले होते. तिने मुलीला पायरीवर बसवले, आणि स्वतः गंगास्नान करण्यासाठी पायऱ्या झरझर उतरू लागली. राजपालला वाटलं ही तीन वर्षांची मुलगी त्या म्हातारीची मुलगी असावी.

ही आपली होणारी बायको आहे असा विचार मनात येताच त्याला तिच्याबद्दल घृणा वाटू लागली. त्याने इकडे तिकडे पाहिले, तो वृद्ध माणूस निघून गेला होता. त्या म्हाताऱ्याच्या बोलण्यावर विश्वास ठेवावा की नाही हा त्याला प्रश्न पडला. त्याला वाटलं या मुलीला मारून टाकलं पाहिजे. अन्यथा त्याच्या जीवनात अशांतीच अशांति माजेल.

आपल्या मित्रासाठी अधिक थांबणं त्याला आता इष्ट वाटलं नाही. मित्र ज्या कामगिरीवर गेला होता, त्यात त्याला यश मिळालं असतं तर तो एव्हाना परत आला असता. कदाचित् त्याला आपल्या कामात यश मिळालं नसावं.

असा विचार करून राजपाल घरी परत आला. वाटेत त्याला राजदरबारात काम करणारा एक ओळखीचा नोकर भेटला. राजपाल त्याला म्हणाला—"एक पिशाचिनी एका मुलीच्या स्वरूपात जगते आहे. तू जाऊन जर चाकूने तिला भोसकून मारून टाकलंस तर मी तुला दहा अशर्फ्या बक्षिस म्हणून देईन. बोल, माझं काम करशील की नाही?"

"पिशाचिनीला जिवंत राहू देणं बरं नव्हे! तिला मारून टाकलं पाहिजे. कुठे आहे दाखवा मला. आता जाऊन तिला ठार करून येतो." नोकर म्हणाला.

राजपाल त्या नोकराला घेऊन परत घाटावर आला. म्हातारी आंघोळ करून मुलीला कडेवर घेऊन निघाली होती. तिच्याकडे बोट दाखवीत राजपाल म्हणाला-"बघ, त्या म्हातारीच्या कडेवर जी मुलगी आहे, तीच पिशाचीण आहे. माझं काम करून मला येऊन भेट."



आणि तो परत निघाला. आपल्या डोळ्यांनी शिशु-हत्या त्याच्याने पाहवणार नव्हती.

नोकर म्हातारीच्या जवळ आला. तो तिच्या मागे-मागे चालू लागला. हळू-हळू त्याने चाकू उघडला आणि मुलीला तो भोसकणार, एवढ्यात मुलीने आपल्या मोठ्या डोळ्यांनी त्याच्याकडे पाहिले. तिचे डोळे पाहून नोकराला वाटलं—ही तर एक सामान्य मुलगी आहे. तिची हत्या करण्याचा विचार त्याने सोडून दिला. तरी पण हातातील चाकूने डोळ्याच्या वरच्या बाजूला एक वार केला नि पळून गेला.

नंतर तो राजपालला भेटला. पिशाचिनीची हत्या केल्याची खोटीच बातमी त्याने राजपालला दिली.

शिशु-हत्येचा अपराध केल्याबद्दल राजपालला पश्चात्ताप झाला, पण या मुलीशी लग्न करण्याच्या संकटापासून मुक्त झाल्याचा त्याला आनंद ही वाटत होता. त्याने आपल्या लग्नासाठी खूप प्रयत्न केले, पण त्याचे लग्न काही जमले नाही. अनेक वर्षे लोटली. नोकरीत त्याने खूप प्रगति केली. तरी पण लग्न न झाल्याचे दुःख त्याच्या मनात घर करून राहिले.

चौदा वर्षे होऊन गेली. नवा आलेला न्यायाधीश आता त्याचा अधिकारी होता.



राजपालची योग्यता, प्रामाणिकपणा नि कामाची हातोटी पाहून तो त्याच्यावर खुश झाला. अजून पर्यंत याचं लग्न का झालं नाही याचं त्याला आश्चर्य वाटे.

राजपालने व्यथित अंतःकरणाने न्यायाधीशाला सांगितले—"लग्नाचा प्रयत्न तर मी सतत करीत आलो. पण त्यात यश आतापर्यंत कधीच मिळाले नाही."

तेव्हा न्यायाधीशाने विचारले—"माझी एक लग्नाला आलेली मुलगी आहे. मोठी सुंदर नि शिकलेली आहे. गृहकृत्यदक्ष आहे. तू तिच्याशी लग्न करशील?"

राजपालने मोठ्या आनंदाने हा प्रस्ताव मान्य केला. न्यायाधीशाने राजपालशी आपल्या मुलीचं लग्न लावून दिलं. दागिन्यांनी नटलेली ही युवती फार सुंदर दिसे. राजपालच्या जीवनात जणू स्वर्ग अवतरला. त्याच्या असं लक्षात आलं की आपली बायको केशरचना करताना अशी काळजी घेते की कपाळाच्या डाव्या बाजूकडील भाग झाकला जावा. तिथे ती एक दागिना ही घालायची. बाकीचे दागिने तिने कपाटात ठेवले तरी हा दागिना मात्र सतत कपाळावर ठेवी.

एकदा राजपालने या दागिन्याबद्दल तिला विचारलं तेव्हा ती म्हणाली– "मी जेव्हा तीन वर्षांची होते, तेव्हा मला चाकूने मारून टाकायचा एका दुष्टाचा विचार होता. पण शेवटी डोक्यावर एक जखम करून तो पळून गेला. ती जखमेची खूण वाईट दिसते, म्हणून मी हा दागिना कधी काढून ठेवीत नाही."

राजपालने आश्चर्याने विचारले– "तर मग त्या दिवशी ती एका डोळ्याने आंधळी म्हातारी तुला घेऊन नदीच्या किनारी आली होती ती तुझी आई नव्हे?"

राजपालच्या या प्रश्नाचे बायकोला मोठे आश्चर्य वाटले. तिने विचारले– "ती म्हातारी तुम्हाला काय माहीत? तिने माझे पालन-पोषण केले. मी न्यायाधीशाची सख्खी मुलगी नाही, मी त्यांच्या भावाची मुलगी आहे. तुमच्या प्रमाणेच माझे आई-वडील मी लहान असतानाच वारले. एका डोळ्याने आंधळ्या त्या वृद्धेने मला सांभाळले. माझ्या काकांनी मला दत्तक घेतले आहे."

राजपालने काही ही न लपवता झालेलं सगळं बायकोला सांगितलं. ते ऐकून बायको थोडी सुद्धा रागावली नाही. ती म्हणाली– "त्या दिवशी मनकर्णिका घाटावर जो वृद्ध आपल्याला भेटला होता, तो अवश्य ब्रह्मदेवच असला पाहिजे."



## बहुरूपा वसुन्धरा

### नारळाची झाडे

नारळाच्या झाडाला "कल्पवृक्ष" आणि 'हिरवे सोने' म्हटले जाते. कारण या झाडाच्या प्रत्येक भागाचा काही ना काही उपयोग केला जातो.

नारळाचे पाणी हे विटॅमिन्स व खनिज पदार्थांनी युक्त असे बलवर्धक पेय आहे. त्याच्या कोवळ्या खोबऱ्याबद्दलही हेच म्हणता येईल. वाळवलेल्या खोबऱ्याचे तेल काढले जाते. स्वयंपाकासाठी उपयोगात येणाऱ्या प्रमुख तेलां मध्ये हे ही एक तेल आहे. हे केसांसाठीही गुणकारी असते. साबण, शृंगाराच्या वस्तु व औषधांमध्येही या तेलाचा उपयोग केला जातो. तेल काढल्यावर राहिलेली पेंड जनावरांचे खाद्य म्हणून उपयोगात आणली जाते. नारळाच्या करवंटीपासून रंगी-बेरंगी बाहुल्या व अन्य शोभेच्या



वस्तु बनवल्या जातात. नारळाच्या शेंडीपासून मजबूत अशा दोऱ्या, चटया वगैरे बनवल्या जातात. नारळाच्या झावळ्या झोपड्यांचे छत म्हणून व पानांच्या मधल्या काड्या झाडू (खराटे) साठी वापरतात. झाडाचे खोड खांबासारखे वापरता येते.

नारळाचे झाड जवळजवळ २५ मीटरपर्यन्त उंच वाढते. नारळाचे रोप लावल्यापासून तीन-चार वर्षांत फळे येवू लागतात. चांगल्या जातीच्या झाडापासून दरवर्षी ३०० पर्यन्त नारळ मिळू शकतात. साधारण दोन महिन्यातून एकदा नारळ तोडले जातात.

### पाण्यात राहणारे, गर्भ धारण करणारे, घोड्याच्या आकाराचे नर-प्राणी (मासे)

समुद्राचे पाणी जेथे उथळ असते, तेथे हे पाण्यातले घोडे (मासे) रहातात. हे छोटे प्राणी फार विचित्र प्रकारचे जीव होत. अन्य माशांप्रमाणे ते आडवे पोहत नाहीत, तर उभे पोहतात. यांचे तोंड दिसायला घोड्यासारखे दिसते. आपल्या दोन डोळ्यांनी ते चारी



दिशांना पाहू शकतात. यातील नर-प्राण्याखाली पिशवीसारखा एक भाग असतो. मादी नराच्या जवळ जाऊन एका वेळी जवळ जवळ दोनशे अंडी त्याच्या पिशवीत सोडते. त्यानंतर पाच आठवडे हे नरच या अंड्यांचे रक्षण करतात. अंडी फुटून पिल्ले बाहेर यायच्या वेळी या पिशवीचे तोंड आपोआप उघडते आणि पिल्ले बाहेर येतात.

# दोन महिला प्रधान मंत्री




नुकतीच दोन देशांनी आपल्या देशाच्या प्रधान-मंत्री पदावर महिलांची निवड केली. २४ जून रोजी टर्की मध्ये श्रीमती टान्सु सिल्लर या प्रधान मंत्री बनल्या. यानंतर १२ दिवसांनी किम कांबेल कॅनडाच्या १९ व्या प्रधान मंत्री म्हणून निवडून आल्या. त्या कॅनडाच्या प्रथम महिला प्रधान मंत्री होत.

एप्रिल महिन्यात टर्कीचे अध्यक्ष हर्बर्ट ओजाल यांचा अकस्मात् मृत्यु झाला आणि प्रधान मंत्री सुलेमान डेमेरिल अध्यक्ष झाले. त्यामुळे 'ट्रू पाथ पार्टी' या सत्तारूढ पक्षाला नव्या प्रधान मंत्र्याची निवड करावी लागली. त्यावेळी ४७ वर्षे वयाच्या श्रीमती सिल्लर मंत्री-मंडळात अर्थ-मंत्री होत्या. प्रधान मंत्री पदासाठी त्यांनी निवडणूक लढवली. ६५ वर्षांचे 'इंटीरियर' मंत्री इस्मत सेस्टिन त्यांचे प्रतिद्वंद्वी होते. त्यांना ३२० मते मिळाली, तर सिल्लरला ५७४ मते मिळाली. सेस्टिन यांना ४० वर्षांचा राजनैतिक अनुभव होता, सिल्लरला केवळ तीनच वर्षांचा. अशा अनुभवी व्यक्तीला निवडणुकीत हरवणे हे सिल्लरला मोठे भूषणावह होते.

श्री. सिल्लर बास्फरस विद्यापीठातून अर्थशास्त्राच्या पदवीधर झाल्या. यानंतर अमेरिकेतील येल विद्यापीठात त्यांनी आपले उच्च शिक्षण पूर्ण केले. नंतर १९७८ पासून टर्कीतील निरनिराळ्या विद्यापीठांतून त्यांनी सहायक प्राध्यापक म्हणून काम केले. सन १९८३ मध्ये त्या प्राध्यापक झाल्या. १९९० मध्ये त्या 'ट्रू पाथ पार्टीत' सम्मिलित झाल्या. १९९१ मध्ये डेमिरिल मंत्री-मंडळात त्या अर्थ-मंत्री बनल्या. ही जबाबदारी स्वीकारल्यावर केवळ २० महिन्यात त्यांनी टर्कीच्या व्यापार-क्षेत्रात अनेक मूलभूत सुधारणा घडवून आणल्या. 'स्टॉक-एक्स्चेंज' च्या कार्य-पद्धतीत योग्य बदल करण्याचा त्यांनी यथाशक्ति प्रयत्न केला. देशातील तरुण-तरुणी व स्त्रिया यांच्यासाठी लाभदायी कार्य करण्याची त्यांना फार आवड होती, आणि या दिशेने त्यांनी भरीव कार्य केले.

टर्कीच्या संसदेत शासनारूढ पक्षात पुरुषांची संख्याच अधिक आहे. पन्नासहून अधिक वयाचे सदस्यच बहुसंख्येने यात आहेत. अशा सदस्यांनी आपल्याहून कमी वयाच्या एकाद्या महिलेस प्रधान मंत्री म्हणून निवडावे ही एक विशेष गोष्ट आहे. वृद्धांच्या हातातील सत्ता आता तरुणांच्या हाती आली. राजनीतिज्ञांच्या दृष्टिने टर्कीमधील हा बदल राजकारणातील एक अभूतपूर्व घटना होय. आता श्रीमती सिल्लर यांनी देशाच्या विकासासाठी काही मूलभूत बदल घडवून आणण्याचा प्रयत्न

किम कांबेल पण ४६ वर्षे वयाच्या आहेत. म्हणून कॅनडाला सुद्धा एक तरुण महिला प्रधान-मंत्री मिळाली आहे असे म्हटले पाहिजे. प्रथम कांबेल वॅकूव्हर मध्ये वकिली करीत होत्या. यानंतर त्या सत्तारूढ 'प्रोग्रेसिव्ह कॉन्झर्वेटिव्ह पार्टी' मध्ये प्रविष्ट झाल्या. एकाहून एक वरच्या अधिकारावर चढत आता त्या प्रधान मंत्री बनल्या आहेत.




प्रधान मंत्री ब्रियान मलरोनी यांनी आपल्या मंत्रीमंडळात कांबेल यांना न्याय-मंत्री व नंतर संरक्षण-मंत्री बनविले.

देशातील व्यापार-उद्योग मंदावला. देश बराच कर्ज-बाजारी झाला. व्यापारी संस्था बंद होऊ लागल्या. त्यामुळे लोकांना रोजगारी मिळणे अतिशय कठीण होऊन बसले. देशाची आर्थिक स्थिति मोठी दयनीय झाली. दरम्यान देशाच्या परिस्थितीबाबत सार्वमत आजमावले गेले. सरकारने जनते पुढे घटना बदलण्याचा प्रस्ताव मांडला, आणि त्याला मंजुरी मिळाली नाही. या परिस्थितीत मलरोनी यांनी आपल्या प्रधान-मंत्री पदाचा राजीनामा दिला. म्हणून सत्तारूढ पक्षाला नवीन प्रधान-मंत्री निवडावा लागला.

१३ जून रोजी जी निवडणूक झाली त्यात किम कांबेल यांना शेकडा ५३ मते मिळाली, तर त्यांचे प्रमुख प्रतिद्वंद्वी पर्यावरण खात्याचे मंत्री जीन चारेस्ट यांना शेकडा ४७ मते मिळाली. दुसऱ्या मतमोजणीत एक आणखी उमेदवार जिम एडवर्ड्स् यांनी कांबेलशी सहकार्य केले, त्यामुळे त्यांना सहज जय मिळाला.

कॅनडात ब्रिटिश संसदीय पद्धतीचे अनुकरण केले जाते. येत्या नोव्हेंबर महिन्यात सार्वत्रिक

राजकारणांतील तज्ज्ञांचे म्हणणे आहे की कॅनडाची जनता तरुणांच्या हाती सत्ता द्यायला फार उत्सुक झाली आहे. म्हणूनच कांबेलला आपल्या प्रयत्नात यश मिळालं. श्रीमती कांबेल व क्लिंटन जवळ जवळ समवयस्क आहेत. त्या गिटार वाजवतात, बुद्धिबळे खेळतात, रशियन साहित्याची त्यांना फार आवड आहे. येत्या नोव्हेंबर मध्ये जी निवडणूक होईल तीत कांबेल यांचे आसन स्थिर होईल यात शंका नाही.

**महिला प्रधान मंत्री**

श्रीमती गोल्डा मेयर-इजराइल • श्रीमती इंदिरा गांधी-भारत • श्रीमती सिरिमावो बंडारनायके-श्रीलंका • श्रीमती मार्गरेट थॅचर-इंग्लंड • श्रीमती बेनजीर भुट्टो-पाकिस्तान • श्रीमती बेगम खलीदा जिया-बंगला देश



# आजीची भविष्य-वाणी

कृष्णवेणीला आपल्या मुलीचे लग्न ही एक डोके-दुखी होती. तिचं नाव अप्सरा ठेवावं असं सासूने सुचवलं होतं, कारण ती दिसायला फार सुंदर होती. अप्सरा जेमतेम एक वर्षाची असेल. अशात एका भयानक रोगाने तिचे वडील वारले.

बिचारी दुर्भागी अप्सरा वयाने वाढली, पण बुद्धीने नाही. आता ती लग्नाला आली, तरी पण गल्लीतल्या लहान मुलांशी खेळत असे.

एक दिवशी गल्लीत खेळत असताना अप्सराला तहान लागली. समोरच्या घराचा दरवाजा खटखटावून तिने पाणी मागितले, तेव्हा घरातली बाई तिला धमकावत म्हणाली—"आपल्या घरी जाऊन पाणी पीता येत नाही तुला? तू पण कशी मुलगी आहेस? इतकी मोठी झालीस नि गल्लीत खेळत राहतेस! तुझ्याशी कोण लग्न करील?"

अप्सराला या बोलण्याचा फार राग आला. पाणी न पिताच तिने लोटा फेंकून दिला आणि रडत आपल्या घरी आली. आजीने घडलेलं सगळं ऐकून घेतलं नि म्हणाली—"रडू नकोस बेटा. तुझं लग्न होणार नाही? तू आपल्या नावाप्रमाणेच रूपवती आहेस. ऐक, तुझं लग्न किनई, एखाद्या राजकुमाराशी होईल. आणि तुला शोधून काढीत तो येईल." आजी मोठ्या प्रेमाने म्हणाली.

त्या दिवसापासून अप्सराने लहान मुलांबरोबर खेळणं सोडून दिलं. एक दिवशी रात्री कृष्णवेणी पाणी पिण्यासाठी उठली, तेव्हा तिने पाहिलं की अप्सरा अंधारात खिडकीत बसून कोणाची तरी वाट पहात आहे. मुलीची ही स्थिति पाहून



तिला मोठं आश्चर्य वाटलं. नंतर तिने मुलीला विचारलं–"अग, इथं कशासाठी बसली आहेस? झोप नाही का येत तुला?"

अप्सरा म्हणाली–"मी जर झोपले, तर मला शोधत येणाऱ्या राजकुमाराला आपलं घर कसं सापडेल? मग तो परत जाईल. म्हणून मी त्याची इथं वाट पहात बसले आहे."

कृष्णवेणी सासूच्या बाजेजवळ गेली नि म्हणाली–"पहा, तुमच्या सांगण्याचा परिणाम!"

सासूच्या शरीराला स्पर्श करताच तिला तिचं शरीर थंड वाटलं. ती मेलेली होती.

सासूच्या मृत्यूनंतर दोन महिन्यांनी कृष्णवेणी अप्सराच्या लग्नाचा विचार करू लागली. एका मध्यस्थाच्या मदतीने शेजारच्या गावातील एक स्थळ सांगून आलं. मुलगा तिरळा होता. मुलाच्या आईवडिलांच्या दृष्टीने कसं का होईना मुलाचं लग्न होणं आवश्यक होतं. म्हणून ते मुलगी पहायला आले.

अप्सराने मुलाला विचारलं-"बोल, तू कुठल्या देशाचा राजकुमार आहेस?"

मुलगा या प्रश्नाचं काही उत्तर देणार, एवढ्यात मुलाच्या आईने माहिती दिली–"माझा मुलगा शेतात काम करतो."

"चिखलात काम करणाराशी माझा विवाह? माझ्यासाठी तर एक राजकुमार येणार आहे!" असे सांगत अप्सरा आत निघून गेली.

"वेडी! खरंच वेडी!" म्हणत लोक निराश होऊन परत गेले.

अशा रीतीने मुलीच्या लग्नाचा प्रश्न हे कृष्णवेणीला एक न सुटणारं कोडं होऊन बसलं.

चार दिवसांनंतर मध्य-रात्री कृष्णवेणीने पाहिलं की अप्सरा राजकुमाराची प्रतीक्षा करीत खिडकीपाशी बसून डुकल्या घेत आहे. परसातील चिंचेच्या झाडाखाली बसून





कृष्णवेणी रागाने सासूला शिव्या देत बोलू लागली–"तुम्ही स्वर्गात आहात की नरकात हे मला ठाऊक नाही. पण माझ्या मुलीला मात्र तुम्ही नरकात लोटून गेलात!"

त्याच वेळी गाव भर भटकून जंगलात जाण्यासाठी निघालेले एक पिशाच्च आपला थकवा दूर करण्यासाठी चिंचेच्या झाडावर आराम करीत होते. कृष्णावेणीच्या शिव्या ऐकून पिशाच्चाने कृष्णवेणीच्या पुढ्यात उडी मारली.

पिशाच्चाला पाहताच प्रथम कृष्णवेणी घाबरली. पण मग जरा सावरून म्हणाली-"काय करू दादा? माझं दुःख कुणाला सांगू?" आणि तिने पिशाच्चाला आपली रामकहाणी ऐकवली.

सगळं काही ऐकून पिशाच्चाने काही वेळ विचार केला नि मग दुःखाने ते म्हणाले–"आक्का, जग खूप विचित्र होत चाललंय. नाही तर अप्सरे सारख्या भाचीशी मीच नसतं का लग्न केलं? तू काळजी करू नकोस. उद्या मध्यरात्री येऊन मी अप्सरेच्या डोक्यातील राजकुमाराचं भूत उतरवून टाकतो!"

दुसऱ्या दिवशी अर्ध्या रात्री पिशाच्च पांढऱ्या घोड्यावर बसून राजकुमाराच्या वेषात आलं. खिडकीत बसलेल्या अप्सरेचा आनंद गगनात मावेना. टाळ्या वाजवीत ती म्हणाली–"आजीने सांगितलेली गोष्ट कधी खोटी का होईल? राजकुमार, हेच माझे घर. आत यावे!"

यावर पिशाच्च म्हणाले–"महालात राहणारा मी तुझ्या या झोपडीत कसा येऊ? तूच बाहेर ये. थोडा वेळ आपण या चांदण्यात हिंडू."

काही न बोलता अप्सरा पिशाच्च्याच्या पांढऱ्या घोड्यावर बसली. पिशाच्च्याने तिला जंगलात खूप दूर वर नेले. थोड्या वेळाने अप्सरा म्हणाली–"राजकुमार, मला तर या जंगलात भीतीच वाटते. काही बोल ना."

ते म्हणालं–"एक छोटीशी गोष्ट



आहे. कालच आपल्या भावाला मारण्यासाठी मी विषप्रयोग करवला!"

अप्सराने विचारले—"का बरं?"

मोठ्याने खदखदा हसच्च पिशाच्च म्हणाले—"माझा भाऊ जिवंत राहिला तर मग मी सिंहासनावर कसा बसेन?"

"ठीक आहे, पण असं करणं पाप नाही का?" अप्सराने विचारलं.

"पाप-पुण्याची आम्हा राजकुमारांना काय पर्वा? दोन-तीन दिवसात आपल्या म्हाताऱ्या बापाला ही मी स्वर्गात पाठवून देणार आहे. एक महिना भरात राजा बनून आपल्या शक्तिशाली सेनेसह शेजारच्या राज्यावर आक्रमण करून ते मी जिंकणार आणि त्या राज्याच्या राजकुमारीशी लग्न करणार!"

अप्सराला हेच सांगण्याचा त्याचा उद्देश होता की राज्यसिंहासनावर बसण्याची ज्यांची इच्छा असते, ते कुठलं ही पाप करायला भीत नाहीत. अप्सराच्या मनात राजकुमारांविषयी घृणा व तिरस्कार उत्पन्न व्हावा अशी त्याची इच्छा होती.

पण अप्सरा पिशाच्चाचं बोलणं फक्त ऐकत होती. तिने त्याला काही उत्तर दिले नाही.

थोड्या वेळाने पिशाच्चाने अचानकपणे अप्सराला घोड्यावरून खाली उतरवलं आणि म्हणालं—"मला सेनापतीशी काही महत्त्वाच्या विषयावर चर्चा करायची आहे. तुझ्याशी गप्पा मारण्यात मी ते विसरूनच गेलो. आता मी चाललो."

अप्सरा घाबरून म्हणाली—"अर्ध्या रात्री एकाद्या मुलीला एकटी इथे सोडून चाललास? एकाद्या वाघाने वा सिंहाने मला खाऊन टाकलं तर?"

"खाल्लं तर खाल्लं! ते ही एक पुण्य-कर्मच आहे. मी आहे एक राजकुमार! माझी इच्छा असेल तर अनेक सुंदरी माझ्या दारासमोर ओळ लावून उभ्या राहतील. तुझीच काय एवढी



पत्रास?" असं म्हणून ते निघून गेलं.

अप्सरा तिथे ओक्सा-बोक्षी रडत बसली. इतक्यात एक तरूण घोडेस्वार तिथे आला नि म्हणाला-"या मध्य रात्रीच्या वेळी घनदाट जंगलात तू कोण एकटी रडत बसली आहेस?"

अप्सरा म्हणाली—"मी अप्सरा आहे!"

तिचं उत्तर ऐकून तो युवक घोड्यावरून खाली उतरला आणि आनंदाने म्हणाला-"वा! मी मोठा भाग्यवान् आहे. दीड वर्षं मी जिचा शोध करतो आहे ती आज शेवटी या जंगलात सापडली. घोड्यावर बस, माझ्या बरोबर महालात चल. लवकरच आपले लग्न होईल."

संशयाने त्याच्याकडे पहात अप्सरा म्हणाली—"आजीची भविष्यवाणी खरी ठरणार काय? तू खरचंच राजकुमार आहेस काय?"

घोडेस्वार घाई करीत म्हणाला—"मी नुसता राजकुमार नाही, महाराजांचा पुत्र आहे. आता व्यर्थ वेळ घालवू नकोस. पटकन् घोड्यावर बस."

अप्सरा मोठ्या आनंदाने घोड्यावर बसली. दुसऱ्या दिवशी सकाळी कृष्णवेणी आतुरतेने अप्सराची वाट पहात होती, एवढ्यात राजसेवक पालखी घेऊन आले



आणि तिला राजमहालात घेऊन गेले. राणीने स्वतः येऊन कृष्णवेणीचे स्वागत केले नि म्हणाली—"या विहीणबाई, मी लग्नाच्या तयारीत गुंतले होते, म्हणून स्वत: आपल्याला आणायला येऊ शकले नाही. क्षमा करा हं." असे म्हणत राणीने कृष्णवेणीचे हात आपल्या हाती घेतले.

हे जे काही घडत होते ते कृष्णवेणीला स्वप्नवत् वाटत होते. तिच्या मनाची अवस्था जाणून राणी म्हणाली—"विहीणबाई, हे सगळं आपल्याला विचित्र वाटत असेल. म्हणून खरं ते सगळं तुम्हाला सांगून टाकते." आणि ती म्हणाली.

"माझा मोठा मुलगा विजय थोडा वेडसर आहे. दुसरा मुलगा जय चांगला बुद्धिमान आहे. एकदा दोघे भाऊ शहरात गेले. लोकांनी विजयचा चेहरा-मोहरा पाहून थट्टा केली—'तुझं लग्न एकाद्या राजकुमारीशी होणार नाही. अंतःपुरातल्या एकाद्या दासीशीच तुझं लग्न होईल.' "

हे ऐकून विजयच्या डोळ्यात अश्रू भरून आले. माझी सासू प्रेमाने त्याला म्हणाली—"तू काळजी करू नकोस. ते सगळे राजकुमार सामान्य राजकुमारींशीच लग्न करतील, पण तुझं लग्न होईल एका अप्सरेशी!"

त्या दिवसापासून माझा मुलगा अप्सरेच्या शोधात आहे. कुठल्याही राजकुमारीची तस्बीर त्याला दाखवली की तो तिरस्कार करीत म्हणतो—"ही अप्सरा तर होऊंच शकणार नाही. अलीकडे त्याचा हा हट्ट वाढत चालला की मी स्वतःच अप्सरा शोधून काढीन. रात्रंदिवस घोड्यावर बसून राज्यात सर्वत्र हिंडत असतो. तुमची मुलगी त्याच्या नजरेस पडली हे त्याचे भाग्यच होय! एका क्षणात दोघांनी एकमेकांना पसंत केलं. आता लवकरच त्यांचं लग्न करून टाकू."

राणीचं बोलणं ऐकून कृष्णवेणीला फारच आनंद झाला. ती म्हणाली-"राणीजी, आपल्याच्याने मुकाट्याने बसवत नाही, म्हणून आपण आपले प्रयत्न करीत बसतो. पण तुम्हीच सांगा ब्रह्मदेवाने जे लिहिले, ते कोणाला टाळता येईल बरे? या ठिकाणी ब्रह्मलिखिता बरोबरच आजीच्या भविष्य-वाणीचा चमत्कार ही दिसून येतो."

"बरोब्बर! तुम्ही अगदी ठीक बोलत आहात. ब्रह्मलिखित आणि आजीबाईंची वाणी यांमुळेच हे सर्व शक्य झाले." हसत हसत राणी उद्गारली.





# अद्भूत फूल-५

(राजगुरूने राजाला सांगितले की, राज्याच्या उत्तरेला असलेल्या त्या 'शताब्दि' फुलांनीच राक्षसाला जमिनीकडे आकृष्ट केलेले आहे. ते ऐकून राजाने निश्चय केला की आपण स्वतःच शृंग्माय पर्वतावर जाऊन तेथील उत्तुंग युवकांची मदत मिळवायची - यानंतर.)

सैनिकांनी राजा प्रतापवर्माच्या आगमनाची वार्ता उत्तुंग जातीचा प्रधान शंभु याला निवेदन केली. त्याने ताबडतोब दवंडी पिटवून ती वार्ता तेथील घरोघरी पोचवली. थोड्याच वेळात वस्तीतील सारे लोक विशाल अशा मैदानात जमा झाले. त्यांना संबोधून प्रधान म्हणाला. "प्रजाजन हो! आपले महाराज प्रतापवर्मा थोड्याच वेळात येथे पोचत आहेत."

प्रधानाचे बोलणे ऐकताच सर्वजण फारच आनन्दित होऊन ते ताबडतोब आपापल्या घरी जाऊन सणासुदीसाठी असलेले रंगीबेरंगी कपडे घालून परत आले व मोठ्या उत्सुकतेने आपल्या राजाची वाट पाहू लागले.



राजपरिवार अुत्तुंग नागरिकांच्या जवळ पोचताच अंगरक्षक घोड्यांवरून अुतरून राजा व राजकुमारीच्या घोड्यांजवळ गेले. पहाडी जातीचा प्रधान शंभु हात जोडून राजाच्या स्वागतासाठी पुढे झाला. राजा प्रतापवर्माही हसत-हसत घोड्यावरून अुतरला. राजकुमारीकडे आणि वीरसिंहाकडे निर्देश करत "ही माझी कन्या प्रियंवदा अन् हे आमचे दलनायक वीरसिंह." असे म्हणून त्यांचा परिचय शंभूला करून दिला.

शंभु नंतर राजाला जवळच्या झाडाच्या छायेत घेअून गेला. तेथे बांबूंनी बनवलेले एक आसन ठेवलेले होते आणि जवळच दुसरे एक लहान आसनही होते. राजकुमारीला त्या आसनावर बसायला सांगून शंभूने स्वतःच प्रतापवर्माचा हात धरून त्या बांबूच्या आसनावर बसवले. नंतर तो विनयाने म्हणाला, "महाराज, आपल्या आगमनाने आमची शरीरे आनन्दाने पुलकित होत आहेत. आपल्या व राजकुमारींच्या दर्शनाचा हा सोहळा आमच्या हृदयांवर कायमचा कोरल्यासारखा राहील." इतक्यात काही तरुणी हातात काही खाद्यपदार्थांच्या थाळ्या घेअून तेथे आल्या व त्यांनी त्या राजपरिवारासमोर ठेवल्या. जेव्हां ते सर्वजण प्रेमाने व आवडीने ते पदार्थ खात होते, तेंव्हा डफांचा मधुर असा ध्वनि सुरू झाला. काही युवती बांबूच्या लहान लहान काठ्या घेअून नाचू लागले.

नृत्य समाप्त झाले आणि राजा अुठून त्यांना अुद्देशून बोलू लागला. "काही दिवसां पूर्वी इथल्या काही तरूणांनी येअून राजधानीत झालेल्या स्पर्धांमधे भाग घेअून बक्षिसंही मिळवली होती. तुम्हा सर्वांना त्यांच्या या विजयाबद्दल खूप आनंद झालेलाही होता. आत्ता मी दुसऱ्याच एका अत्यन्त जरूरीच्या कामासाठी इथे आलेलो आहे. केवळ याच प्रान्तावर नव्हे, तर संपूर्ण माणिक्यपुरी राज्यावर असं संकट येअून ठेपलं आहे,



की त्याची कोणी कल्पना केली नसेल, अन् करूही शकणार नाही. इथल्या पहाडांवर विकसित झालेल्या 'शताब्दि' फुलांच्या सुगन्धाने आकर्षित होऊन दक्षिण बाजूच्या समुद्रातून एक राक्षसी प्राणी मध्यरात्री बाहेर पडतो. बाहेर आल्यावर तो अुत्तरेकडे जाअू लागतो. पुन्हा सूर्योदय होता होता दिशाहीनासारखा परत येअून समुद्राच्या पाण्यात अदृश्य होतो. त्याच्या बाहेर येण्यामुळे समुद्रकिनाऱ्यावरील झाडंझुडपं, माणसं, घरं, प्राणी इत्यादि सर्वकाही त्याच्या पायाखाली चिरडून जातं अन् सर्वांचाच नाश होतो. त्या भयानक राक्षसी प्राण्याने अजून या पहाडी प्रान्तात पाअूल ठेवलेलं नाही! त्या प्राण्याला तोंड देअून त्याच्याशी लढणं, हे कोणत्याही मानवाला केवळ अशक्य आहे. म्हणूनच, राजगुरूंच्या अुपदेशावरून, त्याने या प्रान्तात प्रवेश करू नये म्हणून मी एक योजना आखली आहे. मला असं कळलंय की तो राक्षस प्राणी 'शताब्दि' फुलांच्या सुगंधाने आकर्षित होऊन उत्तरेकडे येत राहिलाय. तेव्हा आपल्या जवळ आता एकच उपाय आहे; अन् तो म्हणजे तो प्राणी रहात असलेल्या नेमक्या जागेवर फुलं नेअून टाकणं! याशिवाय दुसरा कोणताच अुपाय आम्हाला सुचत नाहीय! हे काम करण्यासाठी मला तुम्हा लोकांची मदत हवीय."

राजाचे बोलणे समाप्त झाल्यावर काही क्षण तसेच स्तब्धतेत निघून गेले; पण कोणीच तोंड अुघडेना. ती शांतता मोडत प्रधान शंभु म्हणाला, "महाराज, राज्याच्या रक्षणासाठी आपले प्राणही गमवायला तयार असणारांपैकी लोक आहोत आम्ही, भाग्यच समजतो ते आम्ही! त्या राक्षसी प्राण्यापासून आपल्या राज्याचं रक्षण करणं हे आमचं कर्तव्यच आहे. आज समुद्रकिनाऱ्याच्या प्रान्तांवर असणारं संकट अुद्या आमच्यावरही येअून ठेपायची शक्यता आहे, हे सांगून आपण आमच्यावर अुपकारच केले आहात, आम्ही त्याबद्दल कृतज्ञ आहोत आपले! आपलं कर्तव्य बजावण्यात आम्ही मुळीच कसूर करणार नाही."

आपल्या प्रधानाच्या बोलण्याला पाठिंबा, म्हणून सर्वांनी टाळ्या वाजवल्या. इतक्यात त्या गर्दीतून एक युवक पुढे आला व त्याने राजाला प्रणाम केला.

राजकुमारीने त्याला पाहिल्याबरोबर हलकेच राजाला म्हणाली, "मला ती अद्भुत फुलं आणून देणारा तरूण हाच!" तो तरूण म्हणाला "होय राजकुमारी! त्या फुलांमुळे असं संकट येईल हे मला कळलं होतं; अन् ती फुलं आपणाला देणारा मीच!" अन् राजाकडे वळून तो बोलला. "तो राक्षसप्राणी रहात असलेल्या जागेकडे मी लगेच ती 'शताब्दि' फुलं घेअून निघतो. महाराज, मला आज्ञा द्या."

"अुत्तुंग! तुझ्या या बोलण्यामुळे मला फार संतोष वाटतोय. पण प्रथम तू आपल्या प्रमुखाची परवानगी घे." राजा अुत्तरला.

अुत्तुंग अपेक्षेने आपल्या प्रधानाकडे पाहू लागला.

"शाबास अुत्तुंग! तुझ्या या साहसाबद्दल मी तुझं अभिनन्दन करतो! पण त्या प्राण्यावर तू काबू कसा मिळवणार ते सांग अगोदर!" शंभूने विचारले.



"महाराज म्हणाले, त्याप्रमाणे काही 'शताब्दि' फुलं तोडून मी एका नावेत भरीन. अन् त्या राक्षसाच्या मागे मागे जाअून, त्याचा निवास असलेल्या जागी मी ती ठेवून येईन. तसं झालं म्हणजे त्या प्राण्याचा माणिक्यपुरीत जाण्याचा प्रश्नच मिटेल!" अुत्तुंग मोठ्या विश्वासाने अुत्तरला.

"तू बरोबर विचार केला आहेस. तिथे जाअून यायला काही दिवस नक्कीच



लागतील. तोपर्यन्त तुझ्या कुटुंबीयांचं रक्षण करण्याची जबाबदारी माझ्यावर असेल." राजा मोठ्या आनन्दाने म्हणाला.

पण प्रधान शंभु मधेच म्हणाला. "अुत्तुंगचं कुटुंब काही विशेष मोठं नव्हे. त्याचे आईबाप तर त्याच्या लहानपणीच वारले. आता त्याला एक धाकटी बहीणच तेवढी आहे."

इतक्यात लोकांच्या समूहातून पंधरा वर्षांची एक मुलगी हातात पुष्पमाला घेअून पुढे आली.

अुत्तुंग राजाला म्हणाला, "हीच माझी छोटी बहीण रजनी."

राजनीने येअून ती माळ राजकुमारीच्या गळ्यात घातली. लोकांनी टाळ्या वाजवून आपला आनन्द व्यक्त केला. राजकुमारीने स्मितपूर्वक रजनीचा हात आपल्या हातात घेअून तिचा गालगुच्चा घेत अुत्तुंगला अुद्देशून म्हटले, "तू परत येईपर्यन्त तुझी ही बहीण रजनी राजप्रासादात माझ्याबरोबर राहील." अन् तिने रजनीला विचारले, "काय ग, रहाशील ना?"

लाजेने मान खाली घालत रजनीने आपली संमती दर्शवली.

राजा शंभूला म्हणाला, "प्रियंवदेला शताब्दि फुलं फार आवडतात. राजोद्यानात ती वाढवावीत अशी तिची तीव्र इच्छा होती; पण आता ती आपली इच्छा तिला दाबावी लागत आहे, कारण ती फुलं शापग्रस्त असल्याचं राजगुरूंनी तिला सांगितलं आहे. तेव्हा कमीत कमी ती झाडं प्रत्यक्ष पहाण्यासाठी ती माझ्याबरोबर इथवर आलेली आहे. दुरून का होईना, पण ती फुलं तिला पहाता येतील काय?";

शंभु चटकन अुत्तरला, "हो! हे अवघड काम थोडंच आहे?"

"आपली परवानगी असेल तर मी स्वतः राजकुमारींबरोबर जाअून त्यांना ती फुलं दाखवीन. घोड्यांवरून गेलो, तर



लवकर परतही येता येईल." अुत्तुंग म्हणाला.

राजा आपल्या कन्येला म्हणाला, "हे ठीक होईल. आत्ताच निघा न् लवकर परत या, आपल्या बरोबर अंगरक्षकही घे." अन् शंभूकडे वळून तो म्हणाला, "चला, तोवर आपण तुमची ही वस्तीही पाहून घेअू."

पुढे राजकुमारी व तिच्यामागे अुत्तुंग असे आपापल्या घोड्यांवरून निघाले. त्यांच्या मागेमागे अेक अंगरक्षक ही होता. ते तिघेही 'शताब्दि' फुलं असणाऱ्या पहाडाकडे जात राहिले. बरेच दूर गेल्यावर ते एका अरुंद रस्त्याला लागले. तेंव्हा अुत्तुंग म्हणाला, "इथून आपल्याला घोडा खूपच सावधपणे चालवावा लागेल हं! अगदी हळू हळू चला. वाटेतल्या झाडांच्या फांद्याही बऱ्याच खाली झाकलेल्या आहेत."

आणखी थोडे पुढे गेल्यावर तो म्हणाला, "पहा पहा! समोर त्या आकाशाला भिडणाऱ्या अुंच झाडांच्या टोकावर चमचमणारी फुलं दिसत आहेत. हीच ती 'शताब्दि' फुलं!"

ते अद्भुत दृश्य राजकुमारी मुग्ध होअून पहातच राहिली! पहाडावर बांबूच्या झाडांसारख्या दिसणाऱ्या झाडांवर चमकणारी ती लाल फुले पाहून



राजकुमारी म्हणाली, "आपण अजून जरा पुढे जाअू या?"

"नको राजकुमारी! घोडे आणखी पुढे जाअू शकणार नाहीत. अन् पायी चालणं फारच कठीण आहे" अुत्तुंग अुत्तरला.

राजकुमारी एकाद्या मूर्ती प्रमाणे स्तब्ध अवस्थेत फुलांकडे पहात राहिली. ती शांतता भंग करत अुत्तुंगने विचारले, "आता परत फिरू या राजकुमारी?"

"इतकी सुन्दर फुलं अशी शापग्रस्त असणं म्हणजे केवढा दैवदुर्विलास! पण मला मात्र वाटतंय की, काहीतरी चमत्कार घडून ती शापमुक्त होतील!" असे म्हणून ती एकटक फुलांकडे पहातच

राहिली; अन् मग तिने घोडा अुलट फिरवला.

ते जेव्हां वस्तीवर पोचले, तेंव्हा राजा परत निघण्याच्याच तयारीत होता. त्याला पाहून प्रियंवदा म्हणाली, "बाबा, फारच अद्‌भुत दृश्य पहायला मिळालं मला! पण ती फुलं मिळवणं म्हणजे फारच कठीण काम आहे."

"अशी कठीण कामं करण्यातच मजा येते राजकुमारी." शंभु म्हणाला.

अुत्तुंगला जवळ बोलावून राजा त्याला म्हणाला, "माझी मनापासून खात्री आहे की, आपल्या कामात तू सफल होशील. तुझ्या येण्याची केवळ मीच नव्हे, तर राज्यातली सारीच प्रजा मोठ्या अुत्सुकतेने वाट पहात असेल. देशकल्याण अन् शान्ति यांकरता तू काम करायला निघाला आहेस, ही फारच प्रशंसनीय गोष्ट आहे." नंतर तो शंभूला म्हणाला, "इकडे अुत्तुंग निघाला की तुम्ही लगेच त्याच्या बहिणीला-रजनीला-घेअून राजवाड्यात या." अन् आपल्या आसनावरून अुठून राजा पुढे झाला.

रजनीच्या खांद्यावर आपला हात ठेवून अन् तिच्या हाताचे प्रेमाने चुंबन घेअून राजकुमारी घोड्यावर स्वार झाली. राजा, दलनायक आणि अंगरक्षकही आपापल्या घोड्यांवर चढले. शंभूने त्यांना प्रणाम करून निरोप दिला. राजा आपल्या परिवारासह पुढे चालू लागला.

तो लवाजमा निघून गेल्यावर अुत्तुंगच्या खांद्यावर प्रेमाने थोपटत शंभु त्याला म्हणाला. "बाळ अुत्तुंग, तुझ्या धाडसाची प्रशंसा करू तेवढी थोडीच आहे! तुझ्यामुळे आपला अुत्तुंग वंशच धन्य झालाय. तू जे कार्य हाती घेतलंयस, ते धोक्याचं तर खरंच! पण जगन्मातेचा आशिर्वाद सदाच तुझ्या पाठीशी असेल, अन् आपल्या कार्यात सफल होअूनच परतशील तू!" त्याच्या या शब्दातून वात्सल्य व आनन्द ओसंडत होते.

**क्रमशः**



# अवतारी पुरुष

दृढनिश्चयी विक्रमराजा प्रेत खांद्यावर घेअून स्मशानाकडे चालू लागला. वेताळ म्हणाला, "तू ध्येयहीन असून वाट चुकल्यासारखा वागत आहेस. तुला कीर्ती हवीय? की संपत्ती? की अधिकार? तुला मार्गदर्शन करण्यासाठी मी तुला दिव्यनाथची गोष्ट सांगतो; ती तू ऐक."

जगतसेन राजाला दरबारी कलाकारांबद्दल चीड होती. त्यांच्यामुळे देशाचा काहीही फायदा होत नसल्याने, चित्रकार, कवि, पंडित इत्यादि सर्व कलाकारांना निरनिराळे बोलावून घेअून काही अशक्य अशा गोष्टी करायला सांगितल्या. त्या करणे अशक्य झाल्याने राजाने सर्वांनाच दरबारातून घालवून दिले.

जगत्सेनच्या राज्यात हा प्रकार चालू असतानाच पंडित दिव्यनाथ आपल्या प्रतिभेच्या जोरावर अनंत कीर्ति, प्रतिष्ठा

## वेताळाच्या गोष्टी



व अपार धन कमवण्याच्या इच्छेने राजा महासेनच्या दरबारात गेला. त्याच्या दरबारी पांडित्याचे ज्ञान अपूर्व होते.

दिव्यनाथ राजाला म्हणाला, "महाराज, तुमच्या दरबारात माझी फार आवश्यकता आहे. अर्धवट ज्ञान असणाऱ्या तुमच्या पंडितांना ज्ञानी बनवणं अत्यंत जरुरीचं आहे; अन् ते करून दाखवणं केवळ मलाच शक्य आहे!"

यावर हसून राजाने विचारले, "असं? ठीक आहे, मी कबूल करतो की माझ्या दरबारी पंडितांचं ज्ञान अपुरं आहे. पण तू महान् पंडित आहेस, याचा पुरावा काय?"

"आपल्या पंडितांपैकी एकाचा मी शिष्य म्हणून स्वीकार करतो, आणि एका महिन्याच्या आतच त्याच्यात जे परिवर्तन घडेल, त्याची परीक्षा आपण स्वतःच करा. अन् मग मी प्रतिभाशाली आहे किंवा नाही, ते ठरवा." दिव्यनाथ धिटाईने बोलला.

पण राजा महासेन म्हणाला, "शेजारच्या देशाचा राजा जगत्सेन याला कलाकारांबद्दल फार चीड आहे. त्यानं नुकतंच आपल्या साऱ्या कलाकारांना दरबारातून घालवून दिलंय. तू जर स्वतःची प्रतिभा तिथे शाबित करू शकलास; तर माझ्या दरबारातला एकच काय, सगळेच पंडित तुझं शिष्यत्व पत्करतील."

राजाचे हे आव्हान ऐकून दिव्यनाथ सरळ जगत्सेनकडे आला. त्याच्यावर नाराज होत तो दिव्यनाथला म्हणाला, "माझा कवि, पंडित अन् कलाकारांवर मुळीच विश्वास नाही. त्यांच्या बाबतीत माझा अनुभव चांगला नाही. तेंव्हा तू आणखी एकाद्या राजाकडे जाऊन आपलं पांडित्य दाखवावंस हे बरं!"

राजाच्या या बोलण्यावरही आपली हार न मानता दिव्यानथ जिद्दीने म्हणाला, "प्रभु, मी केवळ कवि अन् पंडित नव्हे. मला सर्वच कला अवगत आहेत. अनेक राजे मला आश्रय द्यायला तयार आहेत. पण कालिदासाला जसं केवळ भोजराजाचंच आकर्षण होतं, तसा मीही फक्त आपणाकडेच आकर्षित झालोय."

दिव्यनाथच्या या वक्तव्याने प्रभावित होऊन जगत्सेनने विचारले, "माझ्यात असं काय विशेष आहे?"

"प्रभु, अवतारपुरुष आहात आपण! यामुळेच तर दरबारातले सगळे कलाकार विफल झाले." राजाची प्रशंसा करत दिव्यनाथ उत्तरला.

ते ऐकून राजा जगत्सेनने विचारले. "माझी श्रेष्ठता अन् त्या कलाकारांची विफलता यांच्यात काय संबंध?"

"महाराज, आपल्या शासनाखाली एकूण वातावरणच ऋतुमानाप्रमाणे ठीकठाक आहे. देशात अकालमृत्यु अन् अकाली पाऊस मुळीच नाहीये. एकादा महान् गायक आपल्या गायनप्रभावाने पाऊस पाडू शकेल हे सहजशक्य आहे. पण तो आपल्या शक्तीचा अवमान करून नैसर्गिक परिवर्तन घडवू शकणार नाही. आपण किती शक्तिमान आहात हे आता आपल्या ध्यानात आलं असेल. आता तरी आपण आपलं श्रेष्ठत्व कबूल कराल की नाही?" दिव्यनाथ बोलला.

प्रशंसा-प्रवाहात राजा वहात राहिला.



त्याने विचारले. "गायकांचं सोड! पण इतर कलाकारां बद्दल तुझं काय मत आहे?"

"महाराज, प्राचीनकाळी परशुराम हा एक अवतारी पुरुष होता. या रामावतारानंतर त्याचं तेज फिकं वाटू लागलं. हे तर सर्वांनाच विदित आहे की, एकाद्या नव्या अवतारानन्तर, जुन्या अवताराचं महत्व कमी होतं. सध्या भगवन्ताने आपला अवतार घेतलेला आहे. याच मुळे आपल्या कलाकारांचे प्रयत्न विफल झाले." दिव्यनाथ म्हणाला.

"पण मी भगवन्त आहे, याला पुरावा



काय? मला तर एकादाही चमत्कार वगैरे करून दाखवता येत नाही!

"का? रामानं तरी कधी कुठला चमत्कार दाखवला नाही! गौतम बुद्धानं तरी कधी, कुठला चमत्कार केला! त्यांनी केलेल्या महान् कार्याच्या आधारेच आपण त्यांना 'भगवान' मानतो. कंस, जरासंध, शिशुपाल, दुर्योधन यांनी काय त्या मायावी कृष्णाला कधी भगवान मानलं? मी लहानपणा पासूनच देवभक्त आहे, म्हणूनच आपणात असलेला भगवान ओळखू शकलो. महान भक्त असणारे चित्रकार व शिल्पकार यांनी आपल्या कलेच्या आधोर थोडासा का होईना, पण परमेश्वराच्या अस्तित्वाचा थुरावा दाखवला. मी तितकाही नाही दाखवू शकणार."

"मी भगवान असल्याचं माझ्या दरबारी कलाकारांनी कधी सिद्ध केलं?" राजाने मोठ्या अुत्सुकतेने विचारले.

"आपण त्यांना जेंव्हा परमेश्वराला मूर्तरूप देण्याची आज्ञा दिली, तेंव्हा त्यांनी आपलं रूपच डोळ्यांपुढे आणलं. त्यांनी चित्रं काढली, शिल्पही घडवली. हां, पण एक गोष्ट खरी, की समोर दिसणाऱ्या सूर्याचं चित्र काढता येतं, शिल्प बनवता येतं, पण आपणात जे तेज आहे, त्याला मूर्त रूप देणं अशक्य आहे. आपण बनवलेल्या चित्रात व मूर्तीत त्यांना ते तेज कुठं सापडू शकलं नाही. त्यामुळेच स्वतःच्या कामाबद्दल असंतुष्ट होअून त्यांनी त्या पौराणिक पुरुषांचा आधार घेतला; अनं त्यांनाच मूर्त रूप दिलं. आता आपण अशी कल्पना करा की, त्यांना जर शंभर वर्षांनंतर भगवंताचं रूप साकारायला सांगितलं, तर ते काय करतील ठाअूक आहे? दुसरं काय करणार ते? ते राजा जगतुसेनचंच चित्र साकारून संतुष्ट होतील." दिव्यनाथ अुत्तरला.

हे सारे ऐकून जगतुसेनचा आनन्द गगनात्त मावेनासा झाला. दिव्यनाथच्या हुषारीबद्दल त्याने प्रशंसोद्‌गार काढले.



परन्तु जवळच बसेल्या मन्त्र्याला मात्र दिव्यनाथचे बोलणे बिलकुल आवडले नाही. त्याने ताबडतोब काही अभिनेत्यांना बोलावले. राजाने त्यांना एक गोष्ट सांगितली अन् आज्ञा दिली की "तोंडातून एक शब्दही न बोलता ती गोष्ट अभिनयाद्वारे प्रकट करा." दुसऱ्या दिवशी अभिनेत्यांनी .तसे करून दाखवल्याबरोबर जगतुसेन फारच आनन्दित झाला. तो मोठ्या अुत्साहाने त्यांना म्हणाला, "दिव्यनाथचं कथा अद्‌भुत खरंच! तुम्हा कलाकारांचा अभिनयही अुत्तम आहे."

"पण या लोकांचा अभिनय मला तरी काही समजला नाही. निदान दिव्यनाथला तरी समजला असेल की नाही, याचीही मला शंकाच आहे. महाराज, आपणच त्याला विचारा ना!" मन्त्री व्यंगात्मक आवाजात बोलला.

तेंव्हा दिव्यवनाथ हसून म्हणाला, "अवतारपुरुषाच्या लीला मोठ-मोठे वेदान्तीच काय, पण प्रत्यक्ष ब्रह्मदेवालाही समजू शकत नाहीत. जोपर्यन्त अवतारपुरुष महाराज स्वतः आपल्याला सांगणार नाहीत, तोपर्यन्त आपल्यासारख्या तुच्छ माणसांना कसं बरं समजणार?"

आनन्दाने खदाखदा हसत जगतुसेन



म्हणाला, "दिव्यनाथ, आजवर जो अवतारपुरुष माझ्या रूपात सुप्तावस्थेत होता, त्याला तू जागवलंस. माझ्या पुत्राला, युवराजाला, तू सकल कलात तज्ज्ञ बनवलंस तर मी आजन्म तुझा ऋणी होईन."

"युवराजांना विद्यादान करण्याची संधी आपण मला देअू करत आहात, त्याबद्दल धन्यवाद! त्यांना सर्व विद्यात प्रवीण बनवण्यासाठी मला फक्त एकच दिवस पुरेसा आहे." दिव्यनाथ मोठ्या आत्मविश्वासाने म्हणाला.

'केवळ एकच दिवस पुरेसा आहे,' या दिव्यनाथच्या म्हणण्याचे राजाला फार



आश्चर्य वाटले."

युवराजाला एकान्तात घेऊन जाऊन दिव्यनाथ त्याला म्हणाला, "तुझे वडील भगवान असून सृष्टिकर्ता आहेत. तूही त्यांच्यासारखा बनू इच्छित असशील, तर त्याला दोन मार्ग आहेत. तू आठवड्यातून दोन अुपास करायला हवेस. झाडाला अुलटं टांगून घेऊन तपस्या करायला हवी. दहा वर्षं तपस्या करत तुला अध्ययन करावे लागेल-पण हा मार्ग फार कठीण आहे. आता दुसरा मार्गही नीट ऐक. तू आपली जीभ बाहेर काढलीस, तर मी त्यावर सारी मुळाक्षरं लिहितो. तेंव्हा तू या दोनातून एक मार्ग निवड; तुला आवडेल तो."

खूप अुत्साहाने जीभ बाहेर काढत युवराज म्हणाला. "मला तर हा दुसरा मार्गच अुत्तम वाटतोय.

युवराजाच्या या बोलण्यावर दिव्यनाथ फारच खूश झाला, आणि म्हणाला, "जरासा थांब, त्यासाठी काही नियम आहेत. मी तुझ्या जिभेवर जेंव्हा मुळाक्षरं लिहीन, तेंव्हा तुला आपला राग सोडून द्यायला हवा; अन् शान्त रहायला हवं. कूळ किंवा जात वगैरेंचा विचार न करता, तुझ्याहून जे वयाने मोठे आहेत त्यांचा तू मान ठेवायला हवास; जे लहान आहेत, त्यांच्याशी प्रेमाने वागायला हवंस. तुला सगळं कळतं, असं गृहित धरलं, तरीही इतरांचा सल्ला घेतल्यावाचून तू काहीही करायचं नाहीस. नेहमी हसतमुख रहायचंस. मी आत्ता हे जे नियम तुला सांगितलेत त्या सगळ्यांचं तू नीट पालन केलं नाहीस, तर मी लिहिलेल्या प्रत्येक अक्षराचं भूत बनून तुला तऱ्हेतऱ्हेने सतावेल."

युवराजाने सर्व नियम पाळण्याचे कबूल केले. युवराजाच्या जिभेवर अक्षरे लिहिल्यानन्तर दिव्यनाथ राजा जगतुसेनकडे जाऊन म्हणाला, "राजा, युवराजांना अगदी बारक्यातली बारकी गोष्टही तत्क्षण समजते. मी आपणाकडे जितका वेळ मागितला होता, त्याहीपेक्षा कमी वेळात त्यांनी सर्व कला शिकून घेतल्या आहेत."

राजा जगतुसेनला फार संतोष वाटला. ते पाहून काय म्हणावे अन् काय नाही, हेच मन्त्र्याला कळेनासे झाले! तरीही धाडस करून तो म्हणाला, "युवराज सकलविद्या पारंगत झाल्याचे जाणून मला फार आनन्द झाला महाराज! कठोपनिषदात मला काही अडचणी आल्या आहेत, युवराजाना विचारून मी त्या दूर करून घेऊ इच्छितो."

हे ऐकताच घाबरून दिव्यनाथ म्हणाला, "महाराज धर्मराजाने लहानशा अभिमन्यूला चक्रव्यूह भेदण्यासाठी पाठवले, अन् परिणाम काय झाला? अनुभवशून्य व्यक्तींना तितकासा विद्याबोध झालेला नसतो. आपले युवराज अजून दहा वर्षे तरी अभिमन्यूसारखेच असतील. कोणतीही विद्या ते सहजतेनं शिकू शकतात, पण कुणाच्या अशा अडचणी सोडवू जातील तर त्यांचे प्राण संकटात सापडू शकतात."

चिन्ताग्रस्त होऊन जगतुसेन म्हणाला, "पण माझा हा पुत्र सर्व विद्यात पारंगत झालाय याला पुरावा काय?

"ही पारंगतता त्यांच्या वागण्यातून लक्षात येऊ शकेल. त्यांच्या वर्तनात



आजपासून होत जाणारा फरक आपण पहात रहा." स्वतःला संभाळत दिव्यनाथ म्हणाला.

एकाच आठवड्यात युवराजात खूप फरक पडला. आपल्या पुत्राच्या वागणुकीवर खूश होऊन राजा जगतुसेनने दिव्यनाथला आपल्या दरबारातच रहाण्याची विनन्ती केली. पण तो म्हणाला, "आता माझ्या जीवनाचं एकच ध्येय आहे. मी आजपासून देशोदेशी फिरत राहून आपली कीर्तीपताका सर्वत्र फडकवत ठेवीन."

दिव्यनाथाच्या या निस्वार्थीपणावर व राजभक्तीवर संतुष्ट होऊन त्याला अनेक

अमूल्य वस्तु भेट देऊन राजाने त्याचा सत्कार केला. तेथून निघून दिव्यनाथ महासेनच्या दरबारात पोचला.

इतकी गोष्ट सांगून वेताळाने विक्रमादित्यला म्हटले "राजा, दिव्यनाथने प्रसिद्धी, कीर्ती आणि धनार्जन हे आपल्या जीवनाचे ध्येय मानले. तेवढयासाठीच तो महासेनच्या दरबारात गेला होता. परन्तु महासेनने त्याच्या पांडित्याबद्दल शंका घेऊन त्याला जगत्सेनकडे पाठवले. दिव्यनाथने तेथे आपल्या हुशारीने यश व अनेकानेक बक्षिसेही मिळवली. तरीही पुन्हा तो जगत्सेनला सोडून गेला. ही गोष्ट विचित्र नव्हे का? यावरून दिव्यनाथची बुद्धि अस्थिर आहे, असेच कळून येते की नाही? तो ध्येयहीनच नव्हे का? माझ्या या प्रश्नांची अुत्तरं तुला माहीत असूनही सांगल्याचं टाळलंस, तर तुझ्या मस्तकाचे फुटून तुकडे तुकडे होतील."

विक्रमार्क चटकन उत्तरला, "होय, ही गोष्ट अगदी खरीच की, दिव्यनाथला राजदरबारांतून आपल्या पांडित्याचं प्रदर्शन करायचं होतं आणि त्याद्वारे कीर्ती आणि धनही कमवायचं होतं. त्याला ही गोष्ट कळून चुकली होती की जगतसेनला कवडीइतकी ही अक्कल नव्हती. यामुळेच त्याला दरबारात शास्त्र व पांडित्याचं प्रदर्शन करावं लागलं. त्याने जगतुसेनला 'तू अवतारी पुरुष आहेस' असं म्हटलं, तेंव्हा त्याचा त्यावर अगदी सहज विश्वास बसला. दिव्यनाथ धनाबरोबरच कीर्तीही हवी होती. अन् ती तर केवळ पांडित्यप्रदर्शनानेच मिळणार होती. जगतुसेनची विनंती धुडकावून, त्याच्या महासेनच्या दरबारात येण्याचं हेच प्रमुख कारण!" अशा प्रकारे विक्रमराजाचे मौन भंग करण्यात वेताळ सफल झाला. व तो लगेच विक्रमार्कला झुकांडी देऊन तेथून गायब झाला आणि पूर्वीच याच झाडावर चढून लटकू ळागला.

कल्पित





# चांदोबा पुरवणी-५८



आपल्या देशातील पशुपक्षी :

## 'रीसस' माकडे



मनुष्याचे रक्त दोन भागात विभाजित केले जाते-आर्.एच्. पॉझिटिव्ह व आर्.एच् निगेटिव्ह. आर.एच. ही अक्षरे रीसेस नावाच्या एका जातीच्या माकडाची सूचक आहेत. म्हणजेच याचा अर्थ असा की, या जातीच्या माकडांचा मनुष्याच्या रक्ताशी खूपच जवळचा संबंध आहे.

या माकडात मुख्यतः 'लोगर्स व मेकाक्स' हे दोन प्रकार आहेत. त्यातील 'रीसस मेकाक' ही सर्व जगात प्रसिद्ध आहेत. कारण यांचे रक्त जवळजवळ माणसाच्या रक्तासारखेच असते. या माकडांचा साधारणतः वैद्यकीय शोधांसाठी अुपयोग केला जातो. यामुळे ही माकडे मोठ्या संख्येने आपल्या देशातुन नियमितपणे निर्यात केली जात असत. पण यामुळे यांची एकूण संख्या खूपच रोडावली आणि ही जातच समूळ नष्ट होण्याच्या मार्गाला लागली. भारत सरकारने हा प्रकार लक्षात घेऊन ती परिस्थिति समूळ नाहिशी करण्याच्या विचाराने या निर्यातीवर बंदी घालून त्यांच्या संरक्षणाची व्यवस्था केली आहे.

ही 'रीसस' माकडे जास्त करून अुत्तरप्रदेश व मध्यप्रदेशात आढळतात. वर्षातले सहा महिने यांना कडक थंडीला तोंड द्यावे लागत असल्याने त्यांच्या शरीरावर लांबलांब व दाट असे केस असतात. केसांची लांबी जवळजवळ ६० सें.मी. असते.

गावातून, शहरातून मुख्यतः देवळे, तळाव व स्टेशनांच्या आसपास ही माकडे टोळ्या करून फिरताना दिसतात.











# आधुनिक भारतातील चित्रकार

## राजा रवि वर्मा

आजचा केरळ प्रान्त सन १९४७ पर्यन्त तिरुवान्कूर व कोचिन या दोन रियासतींच्या शासनाखाली होता.

आधुनिक भारतीय चित्रकारांमधे राजा रविवर्मांचे एक वैशिष्ट्यपूर्ण स्थान आहे. ते स्वत: तिरुवान्कूर राजवंशातील होते. तिरुवान्कूरची राजधानी तिरुअनंतपुरपासून चाळीस मैलांवरील एका गावी १९४७ मधे त्यांचा जन्म झाला. अगदी लहान वयात-जेव्हां नीट पावलेही टाकता येत नसत-बाल रविवर्मा भिंतींवर पशुपक्षी व झाडांची चित्रे काढी. घरातल्या वडीलधाऱ्यांनी मनाई करून सुद्धा, त्यांनी पर्वा न करता त्यांचं हे रेखाटन चालूच असे. त्यांचे मामा राजवर्मा यांच्या लक्षात आले, की आपल्या या भाच्याला चित्रकलेत खूपच गोडी आहे, अन् तो या कलेत चांगलाच हुशारही आहे. ते स्वत: एक चित्रकार असल्याने बाल रविवर्माच्या कलेवर ते फार खुश असत. त्यांनी रविवर्माला खूपच प्रोत्साहन दिले.



पुढे रविवर्मा तिरुअनन्तपुरमला गेले. तो तैलचित्रांचा जमाना होता. राजभवनात काम करता करता रविवर्माने अलगिरीनायुडु नावाच्या चित्रकाराकडून तैलचित्रे काढायची कला शिकून घेतली. सुप्रसिद्ध डच चित्रकार थिओडोर जॉन्सन यांच्या चित्रकलेचा रविवर्माच्या कलेवर खूपच प्रभाव दिसून येतो. खुद्द त्यांच्याजवळ चित्रकला शिकण्याची संधी न मिळूनही त्यांच्या चित्र काढण्याच्या पद्धतीने रविवर्मा खूपच प्रभावित झाले.

रविवर्मांनी रामायण, महाभारत यांसारख्या पौराणिक व ऐतिहासिक ग्रन्थांचे चांगले अध्ययन व मनन केले. त्यातील पात्रे व दृश्ये त्यांनी पाश्चात्य शैलीत रंगवली व सर्वांचे लक्ष आकृष्ट करून घेतले.

१८८२ मधे मद्रासच्या गव्हर्नरने एक चित्रकला-प्रदर्शन आयोजित केले होते. त्यात रविवर्माला सुवर्णपदक मिळाले. त्या चित्राचे व्हिएन्नामधे प्रदर्शन झाले व रविवर्मा जगद्विख्यात झाले. ८७ वर्षांचे होऊन त्यांचा मृत्यु ओढवेपर्यन्त साऱ्या जगात त्यांची खूपच कीर्ती पसरली होती.

विश्वकवि रवीन्द्रनाथ टागोर रविवर्माच्या चित्रांबाबत म्हणतात-"आपल्या जीवनातले कितीतरी प्रभातकाल मी रविवर्माची चित्रे पहात आनन्दात घालवले. त्यांच्या चित्रांनी माझं मन मोहून गेलं. त्यांच्यावर माझं अपार प्रेम आहे. या चित्रांनी आपल्या पौराणिक पात्रांना सजीव रूप दिलं आहे. त्या पात्रांचे हावभाव व अन्य दृश्ये त्यांनी फारच अद्भुत अशी रंगवलेली आहेत. या चित्रांची माझ्या हृदयपटलावरील छाप कधीच पुसून जाणार नाही.



# तुम्हाला माहीत आहे काय?

१. राजा दशरथाच्या कन्येचे नाव काय? तिचा विवाह कोणाशी झाला?
२. 'टेबल टेनिस' हा खेळ कोणी सुरू केला? केंव्हा?
३. 'भोपाल' व 'भोजपाल' यांचा संबंध काय, हे माहीत आहे?
४. जगाच्या एकूण भूमीचा किती भाग जलमय आहे?
५. 'तमिळ वेद' अशी कीर्ती मिळालेला ग्रन्थ कोणता? ग्रंथकर्त्याचे नाव काय?
६. रोम शहराप्रमाणेच सात पहाडांवर वसलेले दक्षिण भारतातील शहर कोणते?
७. वज्र हे आम्लात विरघळत नाही. मग ते कसे विरघळते?
८. पहाडी जातीचे नाव मिळालेला एक प्रान्त आपल्या देशात आहे. तो प्रान्त कोणता?
९. विक्रमादित्याच्या दरबारात 'नवरत्न' म्हणवले गेलेले नऊ बुद्धिशाली पुरुष कोण?
१०. एका चिनी सम्राटाच्या दरबारात युरोपच्या एका अधिकाऱ्याला स्थान मिळाले होते. तो अधिकारी व तो सम्राट कोण?
११. कोणत्या प्रान्ताचे नाव 'करुनाडु' असे होते?
१२. विमानाच्या आकाराला रूप देणारा पहिला माणूस कोण?
१३. 'नायनमार' 'आल्वार' या दोघात फरक कोणता?
१४. इंग्रजांनी कलकत्त्यात जो किल्ला बनवला, त्याचे नाव काय?
१५. पाण्याने भरलेल्या लोट्यात लोखंडाचा तुकडा सोडला, तर पाण्याची पातळी वाढेल काय?

## उत्तर

१. राजकुमारी शान्ता, ऋष्यशृंग मुनीशी.
२. इंग्लंडचा जेम्स गिब, १८८८ साली.
३. भोपाळ ही मध्यप्रदेशाची राजधानी. तेथे असलेल्या 'भोजपाल' नावाच्या तलावावरून शहराला हे नाव मिळाले.
४. जवळजवळ ६० टक्के.
५. 'तिरुक्कुरळ', तिरुवल्लुवर.
६. तिरुअनन्तपुरम् (त्रिवेन्द्रम्). अनन्त नावाच्या आदिशेषाच्या पर्वतावर निर्मित शहर.
७. तीव्र उष्णतेने.
८. मिझोरम. 'मिझो' म्हणजे पहाडी माणूस.
९. कालिदास, वेताळभट्ट, घटकर्पर, वराहमिहीर, क्षपणक, अमरसिंह, वररुचि, शंकु, धन्वन्तरी.
१०. इटलीचा मार्कोपोलो, राजा कुब्लाखान.
११. कर्नाटक.
१२. सुप्रसिद्ध चित्रकार लिओनार्दो द व्हिन्सी.
१३. नायनमार हा शिवभक्त होता व आल्वार वैष्णव.
१४. विल्यम किल्ला. १६९६ व १७१५ च्या अवधीत.
१५. वाढत नाही.



# विद्वान् आणि बुद्धिमान

प्राचीन काळी प्रतिहार नगरीत तीन मित्र रहात असत. त्यांची नावं होती-सूर्यमित्र, चंद्रशेखर नि चंदनमिश्र. लहानपणापासून ते एकमेकांचे मित्र होते. तिघांनी ही एकाच गुरूच्या देखरेखीखाली विद्याभ्यास केला होता. म्हणून त्यांची मित्रता दिवसें-दिवस गाढ होत गेली.

अशा रीतीने दिवस जात राहिले आणि तिन्ही मित्र आता वयात आले. त्यांचं शिक्षण ही पूर्ण झालं. उच्च शिक्षण प्राप्त करण्यासाठी कोठे जावे असा विचार फक्त चंद्रशेखरनेच केला. बाकीच्यांनी असा काही विचार कधी केलाच नाही. चन्द्रशेखर आपल्या आई-वडिलांचा एकुलता एक मुलगा होता, त्यांनी मुलाला बाहेर कोठे पाठविणे मान्य केले नाही.

एक दिवशी संध्याकाळी हे तिघे ही आमराईत हिंडायला गेले. तिथे चंद्रशेखर त्यांना म्हणाला—"भविष्यात काय करावं याबाबत माझी एक योजना आहे. मला वाटतं जो योग्य संधि शोधून काढतो तोच खरा भाग्यवान! नोकरी केली तर आपण कूप-मंडूक बनून जातो. जगातील अन्य घडामोडींशी आपला संबंधच रहात नाही. म्हणून आपण काही असा उद्योग शोधला पाहिजे, ज्यामुळे आपल्या व्यक्तित्वाचा विकास होईल."

सूर्यमित्र नि चंदनमिश्र म्हणाले—"मित्रा, जरा नीट समजावून सांग ना"

"सांगतो हं, आपल्या प्रतिहार नगरांत आणि आसपासच्या प्रदेशात नारळ व सुपारी यांची झाडं विपुल प्रमाणात आहे. आपल्याला जी सुगंधित द्रव्ये लागतात ती मात्र इथे मिळत नाहीत. गंडसा आणि मालव बेटातून ही द्रव्ये आपल्याकडे



येतात आणि भारी किंमतीला विकली जातात. आपली सुपारी नि नारळ यांना या बेटात चांगली मागणी आहे. म्हणून मला असं वाटत की आपण पुरेसं भांडवल गुंतवून सुपारी व नारळ खरेदी करावेत नि गंडसा आणि मालव बेटात जाऊन तेथे व्यापार करावा." चंद्रसशेखरने आपली योजना समजावून सांगितली.

"पण आपल्याला व्यापार करायला जमेल?" दोन्ही मित्रांनी प्रश्न केला.

"का नाही? थोडंसं भांडवल गुंतवून आपण व्यापार सुरू करू. सुरुवातीला काही अडचणी येतील, पण हळू हळू आपल्याला यश मिळेल." चंद्रशेखरने समजावून सांगितले.

बराच वेळ तिघांनी आपापसात चर्चा केली. शेवटी सूर्यमित्र व चंदनमिश्र यांनी मोठ्या उत्साहाने चंद्रशेखरची योजना मान्य केली. चंद्रशेखरने आपल्या आई-वडिलांना समजावून संगितलं— "आपल्या या व्यापारात माझे दोन मित्र ही बरोबर असतील, तेव्हा तुम्हाला काळजी करायचं काहीच कारण मला तरी दिसत नाही."

तिघे मित्र आपापला माल घेऊन प्रथम गंडसा बेटावर गेले. तिथे परदेशी व्यापाऱ्यांसाठी एक खास धर्मशाळा होती. तिघे ही तेथे उतरले.

चंद्रशेखर आपल्या मित्रांना म्हणाला—"उद्यां सकाळीच आपण तिघे या बेटावरील निरनिराळ्या ठिकाणी जाऊ आणि आपल्या व्यापाराचा प्रारंभ करू."

दोघे मित्र 'हो' तर म्हणाले, पण मनातल्या मनात त्यांना भीति वाटत होती. दुसऱ्या दिवशी सकाळी तिघे निरनिराळ्या ठिकाणी गेले आणि संध्याकाळी धर्मशाळेत परत आले. चंद्रशेखरने बाकीच्या दोघांना निराश पाहून विचारले—"का रे बाबांनो? असे मान खाली घालून का बसला आहात?"

ते चन्द्रशेखरला म्हणाले— "पहिल्याच दिवसापासून व्यापारात-





नुकसानीला सुरुवात झाली. आमचं बोलणं ऐकून काही व्यापाऱ्यांनी विचारले—"नव्याने व्यापार सुरू केलाय वाटतं? ते आमच्याकडे पाहून हसले सुद्धा!"

नंतर दोघांनी चन्द्रशेखरला त्याच्या व्यापाराबद्दल विचारले. चंद्रशेखरला सांगायला थोडा संकोच वाटत होता. त्याला वाटलं आपलं वृत्त ऐकून या दोघांना वाईट वाटेल. तरी पण खरं बोललेलंच बरं असं त्याला वाटलं.

त्या दिवशी दुपार पर्यंत चन्द्रशेखरचा अर्धा माल विकला गेला होता. आपल्या अंदाजाहून अधिक फायदा त्याला मिळाला. एवढंच नव्हे तर सिंहल, काश्मीर सारख्या दूर देशांहून आलेल्या व्यापाऱ्यांशी ही त्याची ओळख झाली. काही लोकांनी त्याला दुसऱ्या दिवशी भोजनाचं निमंत्रण दिलं.

हे सगळं ऐकून दोन्ही मित्रांचे चेहरे पाहण्यासारखे झाले. नंतर तीनचार दिवसात चंद्रशेखरचा सर्व माल विकला गेला. तोपर्यंत सूर्यमित्र व चन्दनमिश्र यांचा अर्धा माल ही विकला गेला नाही. तो माल विकून देण्याची जबाबदारी चंद्रशेखरने उचलली आणि तो सर्व माल चांगल्या फायद्यात विकून ही टाकला.

चंद्रशेखरच्या सल्ल्याने तिन्ही मित्रांनी



मिळून बेटावर मिळणारी सुगंधी द्रव्ये खरेदी केली. याशिवाय विदेशी व्यापाऱ्यांकडून काही अद्भुत वस्तु व घर सजावटीची सामग्री पण खरेदी केली.

अशा रीतीने व्यापाराचे काम पूर्ण झाल्यावर तिन्ही मित्र प्रतिहार नगरीत परत येण्याची तयारी करू लागले.

मायदेशी परत येण्यापूर्वी तिघे ही गंडसा बेटावरील चेन्नकेशवच्या मंदिरात गेले. या बेटावरील लोक मोठ्या भक्ति-भावनेने येथे पूजा करतात. हे देऊळ एका डोंगरावर आहे आणि डोंगराच्या मागच्या बाजूस पायथ्याशी गंडकी नदी वाहते. डोंगराच्या शेवटी



एक टुमदार बगीचा आहे. परमेश्वराच्या पूजेसाठी रोज येथून फुले येतात. ती सुंदर बाग पाहण्यासाठी दोन मित्र चंद्रशेखरला तेथे घेऊन गेले. जेव्हा चन्द्रशेखर डोंगरावरून खालील वनश्री पहात होता, तेव्हा दोन मित्रांनी मिळून त्याला गंडकीत ढकलून दिले आणि मुकाट्याने परत आले.

धर्मशाळेत येऊन दोघांनी चंद्रशेखरचे पैसे व माल अर्धा अर्धा वाटून घेतला. थोड्या दिवसांनी ते प्रतिहार नगरीत परत आले.

चंद्रशेखरचे आई-वडील मोठ्या आतुरतेने चंद्रशेखरची वाट पहात होते. सूर्यमित्र व चंदनमिश्र दोघे ही त्यांच्याकडे गेले आणी एक खोटीच गोष्ट रचून सांगितली. ते म्हणाले—"चंद्रशेखरला व्यापार करणं जमलं नाही, त्यामुळे त्याचे बरेच नुकसान झाले. त्याला फार दुःख झाले आणि त्याने आत्महत्या केली. गंडसा बेटाच्या कायद्यानुसार त्याचा माल तेथील सरकारने आपल्या ताब्यात घेतला." रडत रडत त्यांनी हे सर्व चंद्रशेखरच्या आई वडिलांना सांगितलं. आता आपला मुलगा जिवंत नाही हे आई-वडिलांनी जाणलं.

पण वस्तु-स्थिति काही निराळीच होती. चंद्रशेखरला जेव्हा डोंगरावरून ढकलून देण्यात आलं, तेव्हा तो गंडकी नदीत पडला नाही. एका वडाच्या झाडाच्या फांद्यात अडकून पडला. तो बेशुद्ध झाला आणि सूर्यास्ताच्या वेळी शुद्धीवर आला. शुद्धीवर येताच त्याने आरडा-ओरडा केला—'वाचवा, वाचवा मला!'

त्यावेळी भगवान चेन्नकेशवच्या मंदिराचे प्रमुख व्यवस्थापक मंदारक यांची मुलगी स्वर्णगौरी आपल्या सेविकांसह बागेत हिंडत होती. चंद्रशेखरचं ओरडणं ऐकून स्वर्णगौरीने खाली पाहिलं-एक माणूस वडाच्या फांद्यात अडकून पडला होता. तिने



तावडतोब काही माणसांना बोलवले आणि दोराच्या साहयाने त्याची सुटका केली.

चन्द्रशेखरला जेव्हा बागेत आणलं गेलं तेव्हा तो पुन्हा बेशुद्ध झाला. स्वर्णगौरी आपल्या नोकरांच्या मदतीने त्याला आपल्या घरी घेऊन गेली. त्याची सेवा-सुश्रूषा केली.

चन्द्रशेखरला पाहून मंदारक मुलीला म्हणाला—"बेटा, हा तर प्रतिहार नगरीतील एक व्यापारी आहे. याचं नाव चन्द्रशेखर. याच्याकडून मी काही माल खरेदी पण केला आहे. याची हुषारी नि बुद्धिमत्ता पाहून मी फार खुश झालो नि याला काही भेटी पण दिल्या." चन्द्रशेखरला पाहून त्याला फार आश्चर्य वाटलं.

थोड्या वेळाने चंद्रशेखर शुद्धीवर आला. गंडसा बेटावरील प्रमुख व्यापारी मंदारकला आपल्या जवळ पाहून त्याला मोठं आश्चर्य वाटलं.

मंदारक मोठ्या प्रेमाने चन्द्रशेखरशी बोलला. विचारलं—"ही अशी घटना कशी घडली?" सर्व काही सांगायला प्रथम तर चन्द्रशेखरला अंमळ संकोच वाटला, पण नंतर त्याने एक-एक करीत सगळं सांगून टाकलं.

सर्व ऐकून रागीट मंदारक



म्हणाला—"मित्र-द्रोहाला ही काही सीमा असते. तुझे ते मित्र अजून ही शहरात असण्याची शक्यता आहे. आता सैनिक पाठवून त्यांना पकडून आणतो."

पण चन्द्रशेखर शांतपणे म्हणाला—"त्यांना पकडून आणणं सोपं काम आहे, पण मला वाटते ते योग्य होणार नाही. शिवाय ज्या लोकांनी मला मारण्याची योजना आखली, ते एव्हाना येथून गेले ही असतील. माझे पैसे नि माल घेऊन ते केव्हाच पळून ही गेले असतील."

मंदारकने हे सर्व मान्य केले. पण त्याला शंका होती म्हणून त्याने



विचारले—"इतकं सर्व झालं तरी तू त्या मित्रांशी मैत्री ठेवू इच्छितोस?"

चंद्रशेखर हसून म्हणाला—"तसं नाही. त्यांनी जे काही केलं त्याबद्दल माझा त्यांच्यावर राग तर आहेच. पण त्यांना पकडून त्यांच्यावर आरोप करणे रस्त्यांतील भिकाऱ्याशी भांडण करण्यासारखे आहे. ते मला मुळिच पसंत नाही. मी विद्वान नाही, बुद्धिमान आहे. म्हणून विद्वानासारखे त्यांना क्षमा करून सोडून देऊ शकत नाही. बुद्धिमान माणसा प्रमाणे त्यांचा सूड घेईन. जर आपणास शक्य असेल तर मला काही रक्कम कर्जाऊ द्या. मी पुन्हा व्यापार करीन आणि आपली रक्कम सव्याज परत करीन.

चंद्रशेखर प्रामाणिक आणि सत्य-प्रेमी होता. मंदारकला त्याचा प्रस्ताव योग्यच वाटला. तो काही बोलणार एवढ्यात सर्व काही ऐकणारी स्वर्णगौरी पुढे येऊन म्हणाली—"पिताजी, थोडं मी काय म्हणते ते पण ऐका." आणि ती वडिलांना शेजारच्या खोलीत घेऊन गेली.

थोड्या वेळाने मंदारक एकटाच बाहेर आला आणि म्हणाला—"कोणत्या ही परिस्थितीत मी तुला कर्ज़ द्यावे हे माझ्या मुलीला पसंत नाही."

चंद्रशेखरवर याचा काही ही परिणाम झाला नाही. तो काही बोलला नाही. मंदारकच पुन्हा हसत बोलू लागला—"तू माझा जावई बनावंस अशी तिची इच्छा आहे. आपली सर्व संपत्ति तुझ्या सुपूर्द करावी असं ती म्हणते. मला मुलगा नाही, तेव्हा तूच माझा जावई झालास तर मला फार आनंद वाटेल."

चंद्रशेखरने आपल्या मनातील विचार सांगितला—"आपला काही निर्णय सांगण्यापूर्वी एक गोष्ट आपण लक्षात घ्यावी. माझे आई-वडील, भाऊ सर्व जण प्रतिहारनगरीत आहेत. शिवाय त्यांच्याहून आपला मातृदेश मला अधिक प्रिय आहे. म्हणून आपल्या घरी राहून आपला व्यापार चालू ठेवणे मला जमणार नाही."

चंद्रशेखरचे हे बोलणे मंदारकला खूपच आवडले. तो म्हणाला-"तुझा हा स्वाभिमानच माझ्या मुलीला पसंत आहे हे विसरू नकोस. जावईबुवा, तुमची जशी इच्छा तसंच करा. तुम्ही म्हणालात तर आम्ही ही तुमच्या 'स्वदेशी' चलू, नाही म्हणू नका."

काही दिवसात चंद्रशेखर आणि स्वर्णगौरी यांचा विवाह थाटामाटात साजर झाला.

एका शुभ दिवशी चंद्रशेखर पत्नी व सासरे यांच्या सह प्रतिहार नगरात पोचला.

चंद्रशेखरच्या परत येण्याचं सर्व परिचितांना मोठं आश्चर्य वाटलं. ते त्याला प्रश्नांवर प्रश्न विचारू लागले.

चंद्रशेखरने सर्वांच्या प्रश्नाचं एकच उत्तर दिलं-"ईर्ष्येखोर मित्रांच्या भयंकर कारस्थानातून मला वाचविल्याबद्दल आमचं कुलदैवत 'स्वयंभूस्वामी' यांचा मी अत्यंत आभारी आहे."

मंदारक हे सर्व ध्यानपूर्वक पहात होता. त्याने एक दिवशी चंद्रशेखरला विचारले—"चंद्रशेखर, तू आपल्या मित्रांचा सूड घेतलास तर?"

चंद्रशेखर म्हणाला—"मंदारकजी, जगात लोक सद्गुणांपेक्षा दुर्गुणांची पारख अधिक सहजपणे करतात. मी एक छोटंसं उत्तर देऊन त्या दोन्ही बदमाषांची बदमाषी जगाला दाखवून दिली. हा ही एक सूड घेण्याचाच प्रकार नाही का?"

संतुष्ट होऊन मंदारक म्हणाला—"तू म्हणाला होतास की एकाद्या विद्वानाप्रमाणे तू त्यांना क्षमा करू शकणार नाहीस, पण एकाद्या बुद्धिमान माणसाप्रमाणे त्यांचा सूड घेशील. आणि ते तू सहज करून दाखवलंस! तुझी कार्यकुशलता पाहून मला फार आनंद व संतोष होत आहे.



# चान्दोबाच्या बातम्या

## मोठा दिवस

गेल्या ३० जून व १ जुलै मधल्या मध्यरात्री आपण सर्वजण जेंव्हा गाढ निद्रेत झोपलो होतो, तेंव्हा दिल्लीच्या 'नॅशनल लॅबोरेटरी' तील वैज्ञानिक मात्र जागत राहिले होते. त्या प्रयोगशाळेतील 'ॲटॉमिक क्लॉक'—मधील एका सेकंदाचा वेळ त्यांना बरोबर करायचा होता; यासाठीच त्यांना जागत रहावे लागले



होते. त्यांच्या हिशोबा प्रमाणे त्या दिवशी पृथ्वीच्या स्वतःभोवती फिरण्याच्या वेगात एका सेकंदाचा फरक पडत होता. तो फरक तेंव्हाच ताबडतोब ठीक केला नसता तर 'ॲस्ट्रानॉमिकल टाइम' मधे आणि आपल्याजवळ असलेल्या घड्याळांत-दुसऱ्या दिवशी फरक पडला असता. अशीच घटना अकरा वर्षांपूर्वी जून ३०, १९७२ रोजी घडली होती. त्यावेळी दिवस एक सेकंदाने वाढला होता. पण टी. व्ही. च्या पडद्यावर पाहून आपापली घड्याळे ठीक करणाऱ्या आपल्यासारख्या लोकांच्या लक्षात ही गोष्ट कशी येणार?

## पृथ्वी विनाशापासून वाचली

जवळपास ६००० टन वजनाचा नक्षत्राच्या आकाराचा एक छोटासा ग्रह, २० मे रोजी ताशी ४८,००० मैलांच्या वेगाने पृथ्वीच्या दिशेने येत होता.



पण तो पृथ्वी पासून २०,००० मैल दूर असतानाच अचानक दिशा बदलून दुसरीकडेच पुढे निघून गेला. अन् सौभाग्याने त्याच्याशी टक्कर होण्यापासून पृथ्वी थोडक्यात वाचली! तसे घडले नसते, तर पृथ्वीचे फार मोठ्या प्रमाणावर नुकसान झाले असते. ही बातमी अमेरिकेच्या दोन अंतरिक्ष वैज्ञानिकांनी प्रसृत केली. अंतरिक्षातील 'आस्टिरायडर्स' शोधन हेच त्यांचे प्रमुख काम आहे.

## अंतरिक्षातील नवीन विजय

'ऑडवर' नावाचे एक विलक्षण अवकाशयान अमेरिकेने २९ जून रोजी अंतरिक्षात पाठवले आहे. युरोपियन रीसर्च सैटलाईट 'युरेका' सहा महिने अगोदरच अंतरिक्षात पोचले होते. 'ऑडवर' च्या प्रवाशांनी ते शोधून काढले व आपले यान 'युरेका'शी जोडून घेतले. गेले सहा महिने 'युरेका' विविध प्रकारच्या शोधाची माहिती पृथ्वीवर पाठवत होते.




जांबवान, हनुमान, वेगदशे आणि ऋषभ यांनी सुग्रीवाच्या आज्ञेनुसार कलश घेतले आणि ते पाचशे नद्यांचे पाणी घेऊन आले. तसेच त्यांनी चार समुद्रांचे पाणी पण आणले.

नंतर विधिवत् श्रीरामाचा राज्याभिषेक झाला. राम व सीता यांना रत्नजडित सिंहासनावर बसविण्यात आले.

शत्रुघ्नाने रामाच्या डोक्यावर श्वेत छत्र धरले, सुग्रीव चौरी ढाळू लागला. विभीषणाने ही एक निराळ्या प्रकारची चौरी आपल्या हाती घेऊन ती तो हलवू लागला.

आपल्या राज्याभिषेकाच्या शुभ समयी रामाने ब्राह्मणांना सवत्स धेनु, सोनं व वस्त्रालंकार दान म्हणून दिले. रामाने सीतेला एक अतिसुंदर मोत्यांची माळ दिली आणि सांगितलं—"वानरांपैकी ज्याच्यावर तुझं सर्वाधिक प्रेम आहे, त्याला ही भेट म्हणून दे." सीतेने ताबडतोब ती माळ हनुमानाच्या हाती दिली.

विभीषण लंकेला परत गेला. रामाने भरताला युवराज बनविले व तो राज्य-शासन करू लागला.

रामाने एक दिवशी सुमंतला बोलवले आणि म्हणाला—"जन- कल्याणाची कामे खूप मोठ्या प्रमाणावर करावीत असे मला वाटते. धन-संग्रह करायला सुरुवात कर."

रामाचे राज्य-शासन



सुमंत म्हणाला—"प्रभु, गेली चौदा वर्षे प्रजेने कर दिलेला नाही."

दुःखी अंतःकरणाने राम म्हणाला—"याचा अर्थ असा की वेळेवर पाऊस पडला नसावा. बिचाऱ्या प्रजेला खूपच त्रास सहन करावा लागला असेल!"

सुमंत एक क्षण भर गप्प बसला, नंतर सांगू लागला—"तसं नही प्रभू, आपला देश धन-धान्याने परिपूर्ण आहे. प्रजेला कशाची ही कमतरता नाही. परंतु जनतेत काही बदल झालेला दिसतो आहे. श्रीमंत व्यापाऱ्यांनी कराचे पैसे दिले नाहीत. शेतकऱ्यांनी पण असंच केलं. त्यामुळे श्रीमंत लोक अधिक श्रीमंत झाले, आणि गरीब अधिक गरीब झाले."

राजकोषात काही शिल्लक नसल्याबाबत व धनाचा अभाव असल्याचे सुमंतने लक्ष्मणाला ही विस्ताराने समजून सांगितले.

लक्ष्मण अमळ विचारात पडला आणि नंतर त्याने सुचवले—"तर मग आता आपण एक काम करू या. राज्यात सर्वत्र घोषणा करा की ज्यांना कराची रक्कम खजिन्यात जमा करायची असेल, त्यांनी एका भोपळ्याच्या वजनाचं सोनं आणून दिलं की बस झालं. यामुळे कोणाला ही काही त्रास होऊ नये. असं मला वाटतं."

रामाने लक्ष्मणाची सूचना मान्य केली. त्याच दिवशी कोशल राज्यात दवंडी पिटवली गेली. चौदा वर्षे ज्या जनतेने कर दिला नाही, ती भोपळ्याच्या वजनाचंच काय, हत्तीच्या डोक्याच्या वजनाचं सोनं ही आनंदाने देईल हे लक्ष्मणाला चांगलं माहीत होतं. तरी पण पुरेशी सावधगिरी घेण्याच्या उद्देशाने त्याने हनुमानाला बोलवून सांगितलं—"तू जनतेत जाऊन अवलोकन करून ये. तू त्यांच्यात आहेस हे त्यांना न कळावं. आपण जी घोषणा केली आहे, त्याबाबत जनतेची प्रति-क्रिया जाणून घे. आपल्या या घोषणे बाबत जनता असंतुष्ट तर नाही ना हे ही जाणून घे.



हनुमान सूक्ष्म रूपात जनतेत जाऊन मिसळला. लोक आपापसात जे काही बोलत होते, ते सर्व त्याने लक्षपूर्वक ऐकले. परत येऊन त्याने लक्ष्मणाला अहवाल दिला—"भोपळ्याच्या वजनाचं सोनं द्यायला कुणाची काही हरकत नाही. उलट लोक असं म्हणतात की हा राम भरतापेक्षा ही भोळा आहे. चौदा वर्षे कर दिलेला नसताना आता केवळ भोपळ्याच्या वजनाचं सोनं अपेक्षित आहे, याबाबत सर्वांनाच फार संतोष आहे."

हनुमानाचं बोलणं ऐकून लक्ष्मणाच्या मनात एक शंका आली. प्रजेत काही लोक निश्चितच प्रामाणिक व पापभीरू धर्मात्मा असले पाहिजेत. अशा लोकांवर अन्याय होऊ नये. ज्यांना भोपळ्याच्या वजनाहून कमी सोनं देता येण्यासारखं आहे, त्यांना तसं करायला स्वतंत्रता असावी.

लक्ष्मणाने यावर खूप विचार केला. त्याला एक उपाय सुचला. तो हनुमानाला घेऊन अयोध्येच्या मंदिरात गेला. सूक्ष्म रूप धारण केलेल्या हनुमानाशी लक्ष्मणाने शांतपणे बोलणे केले व ते दोघे जण बाहेर आले. तोपर्यंत सूर्यास्त होऊन अंधार पडू लागला होता.

सकाळी राजभवाच्या परिसरात त्यांनी एक मोठा तराजू टांगला. एका पारड्यात



एक मध्यम आकाराचा भोपळा ठेवला. सोन्याच्या लगडी हातात घेऊन लोक येऊ लागले. एका माणसाने जे सोनं आणलं होतं ते दुसऱ्या पारड्यात टाकलं. भोपळा असलेलं पारडं वरच येईना. त्याला मोठं आश्चर्य वाटलं. डोकं खाजवीत तो घरी गेला आणि आणखी सोनं घेऊन आला. बरोबर आणलेलं सर्व सोनं त्याने पारड्यात घातलं तेव्हा भोपळ्याचं पारडं वर झालं. हे पाहून बाकीचे लोक ही आपापल्या घरी गेले आणि अधिक सोनं घेऊन आले.

तेथे जमलेल्या लोकांपैकी एकाने थोडंच सोनं आणलं होतं. भीत भीत त्याने



ते पारड्यात टाकले. त्या थोड्याच सोन्याने पारडं जड झालं आणि भोपळा ठेवलेलं पारडं वर आलं. हे पाहून लोकांना मोठंच आश्चर्य वाटलं. यानंतर बऱ्याच लोकांनी तराजूत सोनं टाकलं. हा तराजू काही सामान्य तराजू नाही हे लोकांच्या लक्षात आलं. हा तराजू तर मोठा महिमावान् आहे. न्यायपूर्वक जेवढं मिळायला पाहिजे तेवढंच हा ग्रहण करतो. या न्यायप्रेमी तराजूने लोकांना फारच संतोष वाटला. लोक आनंदाने सोनं देत राहिले. अशा रीतीने खूप सोनं जमलं. राजकोष भरून गेला.

जे घडलं ते पाहून रामाला ही आश्चर्य वाटलं. त्याने लक्ष्मण व मंत्री सुमंत यांना आपल्या खाजगी कक्षात बोलवलं. त्यांच्या मागे हनुमानाने ही आपल्या सूक्ष्म रूपात प्रवेश केला.

रामाने कठोरपणे विचारले– "लक्ष्मणा, भोपळ्याचे वजन अधिकाधिक किती असेल? त्याने मण-मण सोनं मोजलं. भोपळ्याने निरनिराळ्या प्रकारे आपले वजन बदलले. तुम्ही सर्वांनी मिळून प्रजेला फसवलं. होय की नाही?"

लक्ष्मणाने हात जोडले नि नम्रतापूर्वक म्हणाला– "आम्ही कोणाला ही फसवलं नाही. जे काही घडलं ते धर्मदेवतेच्या आदेशानुसार घडलं. यात हनुमानाची थोडी किमया अवश्य आहे. हनुमानाने सूक्ष्म स्वरूपात तराजूचा मध्य पकडला. धर्मदेवतेचा आदेश मिळेपर्यंत त्याने भोपळा असलेलं पारडं आपल्या पायाने दाबून ठेवलं. धर्मदेवता जे सांगे ते केवळ हनुमानालाच ऐकू येई. हनुमान आणि मी-आम्ही दोघांनी मिळून धर्मदेवतेची पूजा केली आणि तिचे सहकार्य मिळविले. आपल्या धर्माचे ठीक पालन करणारी माणसे थोडीच! कर न देणारी माणसंच अधिक. आम्ही धर्मदेवतेच्या मदतीने प्रत्येकाकडून न्यायपूर्वक जे मिळायला हवे तेवढेच मिळवले. आम्ही खूप



विचारपूर्वक ही योजना कार्यवाहीत आणली."

राम काही बोलणार एवढ्यात धर्मदेवतेची अशरीरी वाणी ऐकू आली– "रामा, लक्ष्मणाने जे काही सांगितले ते सर्व खरे आहे." तावडतोब हनुमान पण आपल्या सूक्ष्म रूपातून साधारण रूपात प्रकट झाला आणि त्याने रामाला नमस्कार केला. रामाने हनुमानाची खूप प्रशंसा केली.

यानंतर काही दिवसांनी रामाने कोशल राज्यातील सर्व जनतेला एक मेजवानी दिली. या मेजवानीसाठी आवश्यक ती सर्व सामग्री आणण्याची व्यवस्था हनुमानाने केली. त्याला एक क्षणाची फुरसत मिळेना. या मेजवानीची व्यवस्था उत्तम प्रकारे व्हावी म्हणून हनुमान सर्वतोपरि प्रयत्न करीत राहिला.

हनुमानाचे सर्व परिश्रम सीता पहातच होती. तिचे त्याच्यावर पुत्रवत् प्रेम होते. लंकेत सीतेला शोधून काढणारा सर्वप्रथम हनुमानच होता. तिने हनुमानाला आपल्या जवळ बोलवलं नि म्हणाली– "पुत्र हनुमान, सकाळपासून एक क्षण भर ही विश्रांति न घेता तू परिश्रम करीत आहेस. जेवणाची वेळ झाली आहे. पाहुण्यांच्या सत्कारात काही उणीव राहू नये ही जबाबदारी तुझीच. म्हणून तू



अगोदर जेऊन घेतलंस तर बरं!"

सीतेची सूचना मान्य करून हनुमानाने स्वयंपाक-मंडपात प्रवेश केला. सीतेने पत्रावळ मांडून वाढायला सुरुवात केली. ती जे जे वाढी, हनुमान क्षणात खाऊन टाकी. असे थोडा वेळ चालू राहिले आणि पाहता-पाहता हजारो निमंत्रितांसाठी तयार केलेले खाद्य-पदार्थ संपून गेले. भात, भाज्या नि पक्वान्नांनी भरलेली भांडी रिकामी झाली. हे पाहून सीतेला आश्चर्य वाटलं आणि तीने धावत रामापाशी येऊन रामाला सर्व वृत्त कथन केलं.

राम हसत म्हणाला– "तू हनुमानाला काय समजली आहेस? हा साक्षात्



परमशिवाचा अवतार आहे. त्याला तृप्त करणं हे तुझ्या शक्तीवर अवलंबून आहे. याबाबत मी काही करू शकणार नाही."

सीता स्वयंपाक-मंडपात परत आली नि हनुमानाच्या मागे येऊन उभी राहिली. मनांतल्या मनात म्हणू लागली— "परमेश्वरा, तू कोण आहेस हे आता मी समजले. आता जर तू आपल्या भुकेचा त्याग केला नाहीस तर माझी अब्रू धुळीस मिळेल. प्रभु माझे रक्षण कर!" असे म्हणत सीतेने पंचाक्षरी मंत्राचे शंभर वेळा पठण केले.

दुसऱ्याच क्षणी हनुमानाने तृप्तीचा ढेकर दिला. पुढे येऊन सीतेने विचारले—"पुत्र, आणखी वाढू?"

"नको मातोश्री, पोट भरलं आता!" असे म्हणत हनुमान स्वयंपाक-मंडपातून बाहेर पडला.

यानंतर सीतेने अन्नपूर्णादेवीचे स्मरण केले. तिने सर्व भांडी पूर्ववत् खाद्य-पदार्थांनी भरून टाकली. नागरिक आणि वानर जेवायला बसले. वानरांच्या पंगतीत कोपऱ्यात बसलेला एक वानर-बालक आवळ्याकडे मोठ्या आश्चर्याने पहात होता. त्याने आपल्या बोटांनी तो दाबला, तशी त्यातील बी आवाज करीत वर उडाली.

उडणाऱ्या बीकडे पहात छोटा वानर म्हणाला—"तुला काय वाटतं तूच फक्त उडू शकतेस? आता माझं कौशल्य पहा." आणि तो उभा राहून त्याने एक बीहून उंच उडी मारली. त्याला पाहून आणखी एका वानराने त्याच्याहून अधिक उंच उडी मारली. तिसरा एक वानर हे सर्व पहात होता. त्याने उत्साहाने आणखी उंच उडी मारली. अशा रीतीने सर्व वानर एकाहून एक उंच अंतरिक्षात उड्या मारू लागले. अंगद, नीळ आणि सुग्रीव यांनी ही उंचच उंच उड्या मारल्या. ही कदाचित् रामाची आज्ञा असेल असे वाटून हनुमानाने ही सर्वात उंच उडी मारली.

उड्या मारणाऱ्या वानरांना पाहून रामाने हनुमानाला विचारले—"का रे? इतर सर्व वानर उड्या मारीत असताना, तू फक्त एकच उडी मारून गप्प का बसलास?"

नम्रतापूर्वक हनुमान म्हणाला—"रामा, एवढ्या महान पराक्रमी वीरांपुढे मी किती सामान्य प्राणी!"

जांबवंत पुढे येऊन म्हणाला—"या हनुमानाला आपल्या शक्ति-सामर्थ्याची बरोबर कल्पना नाही. ते काम दुसऱ्या कोणीच केले पाहिजे."

एक शुभ्र कमळ हनुमानाच्या हाती देत राम म्हणाला—"आमच्या वंशाचा मूळ आधार सूर्य-नारायणाला हे कमळ दे. हनुकान मूर्यनासयणाको गेला नि म्हणाला— "गुरुदेव, हे कमळ आपल्याला समर्पण करण्यासाठी मला रामाने इकडे पाठविले आहे." नंतर हनुमानाने ते कमळ सूर्याच्या चरणांवर अर्पित केले.

भगवान सूर्याने हनुमानाला 'चिरंजीव हो!' असा आशिर्वाद दिला. आपल्या हातातील एक दुसरे श्वेतकमल हनुमानाला देत सूर्य म्हणाला-" हे रामाला दे. याच्या प्रभावाने रामाच्या राज्यात सर्वत्र सुख, शांति व संपन्नता नांदेल."

हे श्वेत-कमल कधी सुकत नाही. ते जेथे असेल तेथे छान पाऊस पडतो. उत्तम पीक येते. थोडक्यात सांगायचं म्हणजे ते फूल हे एक महान् वरदान आहे. सूर्य-नारायणाची परवानगी घेऊन हनुमान परत यायला निघाला. त्याने ते श्वेतकमळ रामाला समर्पित केलं.

रामाने आनंदातिरेकाने हनुमानाला अलिंगन दिले. हनुमानाने राम व सीता यांना नमस्कार केला. सीतेने हनुमानाला आशिर्वाद दिला—"पुत्र, चिरंजीव हो!"





# तिसरे साहस

तरूण रंजनला साहसाची कामे करणे फार आवडे. माझ्यासारखा शूर, वीर व साहसी अन्य कोणी नाही असे तो घरात म्हणे. रंजनच्या आजोबांना त्याचे हे नुसते बोलणे आवडत नसे. एकदा ते त्याला म्हणाले-"हे बघ रंजन, तू जे बोलतोस ते सर्व करून दाखव, नुसतीच बढाई मारणे हा काही सद्गुण नव्हे!"

रंजन त्यांना म्हणाला-"मी काही बढाई मारीत नाही!"

"जर तू खरंच बुद्धिमान असशील तर जंगलात जाऊन तेथील मुलीशी आपले लग्न जमवून ये." आजोबा म्हणाले.

रंजन दिमाखाने म्हणाला-"सांगा आजोबा, कोण आहे ती मुलगी? "

रंजनच्या आजोबांनी विस्तारपूर्वक सांगितलं-"श्रीमंतनगर् शहरापासून एक कोस भर अंतरावर एक जंगल आहे. तिथे एक सुंदर मुलगी राहते. तुला शक्य असेल तर तेथे जाऊन त्या मुलीशी लग्न करून ये."

रंजन श्रीमंतनगरला गेला आणि एका खानावळीत उतरला.

दुसऱ्या दिवशी भल्या पहाटे रंजन जंगलात गेला. जंगल चांगलंच घन-दाट होतं. त्यांमुळे वाट काढणं मुश्किल होत होतं. हातातील तलवारीने फांद्या कापीत तो पुढे चालू लागला.

अशा रीतीने आणखी पुढे गेल्यावर एका झाडाखाली दगडावर एक युवती त्याला दिसली. त्याला वाटलं आजोबा सांगत होते ती सुंदरी हीच असावी. त्याने तिला विचारले-'सांग, तू कोण आहेस?'

"मला ठाऊक नाही. पण तू कोण? तूच इकडच्या बाजूला ये. मला मागे वळता येत नाही." ती युवती म्हणाली.

श्रुति तांबे